# स्यूतसौतिक



हा अध्यात्मपर ग्रंथ

कार्लाइल साहेबांच्या सार्टार रिसार्टस नांवाच्या मूळ इंग्रजी ग्रंथाचे आधारें



लेखक व प्रकाशक

**श्रीकृष्ण सदाशिव घारपुरे, बी. ए.**

असिस्टंट मास्तर गरूड हायस्कूल धुळें,

यांनीं मराठींत केला.



मुद्रक—केशव रावजी गोंधळेकर,

'जगद्धितेच्छु' प्रेस शनवार पेठ पुणें सिटी.



सन १९११

*To*

# DOCTOR FRANCIS GUY SELBY,

M A.; LL. D; C. I. E.

Late Director of Public Instruction,

BOMBAY.

Without whose sympathy, advice,
instruction and constant care this arduous
task would never have been undertaken,
much less brought to a successful conclusion,
and,
to whose guidance and personal interest the compiler owes much of his intellectual
training,
this translation of Carlyle's Sartor
Resartus is most gratefully dedicated by his

most humble and dutiful pupil,

Shrikrishna Sadashiv Gharpure,

Translator.

# अनुक्रमणिका.

## पुस्तक पहिलें.

## पुस्तक तिसरें.

# प्रस्तावना.

हा ग्रंथ मूळ इंग्रजी भाषेंत तत्ववेत्ता **टॉमस कार्लाइल** यानें सन १८३१ त लिहिला. ग्रंथांतील विषय सामान्य लोकमताविरुद्ध असल्यामुळें कार्लाइल साहेबांनीं आपलें नांव गुप्त ठेवून एका मासिक पुस्तकांतून तो एका जर्मन ग्रंथावर टीका अशा वहाण्यानें प्रसिद्ध केला होता. लक्ष्मी व सरस्वती या एकत्र नांदत नाहींत; आणि महासाधूंवर लोकांतील दोषाविष्करण करण्याची बिकट कामगिरी असल्यामुळें त्यांस त्यांच्या हयातींत बहुधा कोणी बरेंहि म्हणत नाहीं, या दोन्ही नियमांची सत्यता कार्लाइल साहेबांचे चरित्रांत बरीच स्पष्ट दिसते. या अप्रतिम ग्रंथाबद्दल कार्लाइल साहेबांस त्यांच्या देशबांधवांकडून शिव्यांशिवाय कांहीं मिळालें नाहीं! आणि पुस्तकरूपानें त्यांच्या ग्रंथाच्या दोन आवृत्ती मूळ मासिकावरून अमेरिकेंत तिऱ्हाइतांनीं काढिल्यावर दुसऱ्या आवृत्तीच्या पंचवीस प्रती तेथून इंग्लंडांत आल्या! असो.

सामान्य लोकांच्या हौशी व विलासी हृदयांस अध्यात्मपर ग्रंथ रुक्ष व निरस फोलकटाप्रमाणें वाटतात हें साहजिक आहे. त्यांत लोकांचा फारसा अपराध नाहीं. अध्यात्म अथवा वेदांत विषयांत शास्त्रपारंगत लोकांनीं सिद्धांतावर सिद्धांत रचून इतक्या उंच माड्या केल्या आहेत कीं तेथें जातांना सामान्य लोकांची दृष्टि फिरून जाते! इतकेंहि करून कोणी गेलें तरी त्यांस तेथें कांहीं व्यावहारिक उपयोगाची गोष्टहि दिसत नाहीं. याचें कारण माझ्या अल्प समजुतीप्रमाणें असें आहे कीं, हे सिद्धांत युक्तिसिद्ध करून दाखविण्याची जी खटपट असते ती केवळ आप्तवाक्यें व दृष्टांत किंवा उपमान यांचे बळावरच असून, या आप्तवाक्यांस व दृष्टांतादिकांस सामान्य अनुभवाचें असावें तितकें पाठबळ नसतें. यामुळें या सिद्ध केलेल्या सिद्धांतांस बळकटी न येतां शब्दपांडित्याचें स्वरूप मात्र येतें.

१. यावरून आप्तांस किंवा आप्तवाक्यांस दूषण देण्याचा माझा हेतु आहे असें मात्र कोणीं समजूं नये. परंतु अलीकडे आप्तवाक्याचे वेषानें बरेच गैरसमज सिद्धांताचे पंक्तीस येऊन बसले आहेत व त्यामुळें व्यवहारज्ञ लोकांत खऱ्या आप्तवाक्यांविषयींहि श्रद्धा नाहींशी झाली आहे.

स्वरूप झालेल्या मार्गाचें आपण अवलंबन केलें तरच शक्य आहे. विचाराची जागृति होऊन प्रत्यक्ष अनुभव किंवा अनुमान या प्रमाणांवांचून जी गोष्ट असेल तिची सत्यासत्यता अनुभवानें ठरविण्याचा जर आपण निग्रह केला तरच आपल्यास ऊर्जित स्थिति येईल, व आपल्या शास्त्रांस पुन्हां चढती कळा लागेल.

आमच्या लोकांतहि एकंदर विषयांवर बराच विचार झाला आहे, पण त्या विचारास कर्माचा व अनुभवाचा दुजोरा नसल्यामुळें तो निष्प्राण झाल्यासारखा होऊन त्यांत जिकडे तिकडे नैराश्यवाद³ मात्र गोचर होतो. प्रत्येकाचें ह्मणणें एवढेंच कीं हा संसार दुःखमय असल्यामुळें आपण त्यांतील कामाविषयीं उदासीन होऊन, आपल्या आशांची सर्व मदार परलोकाच्या सुखांवर ठेवावी! हें खरें कीं हे विचारी पुरुष स्वतः उद्योगशील असून त्यांच्यांत उपदेशाविषयीं पात्रापात्र विचार असे. परंतु त्यांच्यामागें त्यांचें उपदेशानें व्रत चालविणारी जी सांप्रदायी मंडळी निघाली त्यांच्यांत तसा उद्योग किंवा पात्रापात्रविचार नसून त्यांचा उपदेशहि निवृत्तिमार्गाचा. अर्थात् निवृत्तिमार्गास अवश्य जें कडकडित संन्यासव्रत त्यावर त्यांचाहि विशेष भर नसून तत्संबंधी उपदेशाचा अनुभव घेऊन पाहणें हेंहि गैरसोईचें झालें. आणि मग निवृत्तिमार्गाचा उपदेश व सांप्रदाय हे केवळ चरितार्थाचें एक साधन मात्र होऊन बसलें! इकडे होईल तितकें काम

३. आमचे एक विद्वान मित्र ह्मणतात कीं आमचेमध्यें नैराश्यवाद मुळींच नाहीं! नैराश्यवाद हा शब्द कदाचित नवा असेल पण नैराश्यवादाचें पुढें दाखविलेलें प्रत्यक्ष स्वरूप फार जुनें व बहुतेक सार्वत्रिक आहे.

४. आमच्या एका मित्रानें निवृत्तिमार्गांतील निवृत्ति भोगांपासून आहे, कर्मापासून नाहीं असा आक्षेप घेऊन आह्मांस लिहिलें आहे. हें त्याचेंच ह्मणणें खरें आहे. परंतु सामान्य लोकांचा समज असा नाहीं. एरवीं आमच्यांतील सर्व धर्मपंथास आधारभूत झालेला धर्मग्रंथ जी भगवद्गीता तींतच अर्जुनाचे भाषणांत "ज्यायसीचेत्कर्मणस्तेमताबुद्धिर्जनार्दन । तत्किंकर्मणिघोरेमांनियोजयसिकेशव" "संन्यासंकर्मणांकृष्णपुनर्योगंच. शंससि" वगैरे वाक्यें आलीं नसतीं; व श्रीकृष्णाचेहि भाषणांत "शारीरंकेवलंकर्मकुर्वन्नाप्नोतिकिल्बिषम्—वगैरे वाक्यें आलीं नसतीं. शिवाय भोगेच्छा जर टाकावयाची तर कर्में तरी करावयाचीं कशाकरितां या प्रश्नांचीं श्रीकृष्णांनीं दिलेलीं उत्तरें विचार करून पाहिलीं असतां व किती निवृत्तिमार्गी लोक तसें आचरण करितात हें पाहिलें असतां सामान्य लोकांतील समज कसा आहे हें स्पष्ट होईल.

कमी पडावें या मनुष्यमात्राच्या इच्छेस या निवृत्तिमार्गाच्या उपदेशाचें साह्य होऊन अज्ञ व अविचारी लोकांवर त्याचा इतका अंमल झाला कीं देशांतील बहुतेक उत्कृष्ट कर्तृत्वशक्ति कर्मापासून पराङ्मुख होऊन आजला आपणांस ज्या त्या कामांत दुसऱ्याच्या हातानें पाणी पिण्यावांचून गत्यंतर नाहीं असें झालें आहे !!! वास्तविक पाहतां जोंपर्यंत सुखदुःखोपभोगाचें हें शरीर मनुष्यांस असून सुखाचा यत्किंचितहि लोभ व दुःखाचा तिटकारा मनांत वास करीत आहे, जोंपर्यंत सुख मिळविण्याचें व दुःखाचा प्रतिकार करण्याचें यत्किंचितहि सामर्थ्य मनुष्यांत आहे, जोंपर्यंत समाज करून राहणें हें मनुष्यास आवश्यक आहे, तोंपर्यंत नुसत्या तोंडानें निवृत्तिमार्गाची महती गाणें केवळ अयोग्यच नव्हे तर पापमूलक आहे. श्रीकृष्णांनीं भगवद्गीतेंत तिसऱ्या आध्यायाच्या १६ ते २६ पर्यंत श्लोकांत हेंच तत्व प्रतिपादिलें आहे. श्रीकृष्णाचें ह्मणणें तर जो खरोखर विरक्त व अंतःकरणापासून निवृत्तिमार्गी ज्ञाता असेल त्यानेंहि आपलें गूढ निवृत्तिपर मत एकीकडे ठेवून लोकांतील प्रवृत्तिमार्ग न मोडे असेंच वागून सर्व व्यावहारिक कर्में केलीं पाहिजेत. वास्तविक पाहतां सामान्य लोकांचे समजुतींत असलेला निवृत्तिमार्ग ह्या धर्मपंथच नव्हे. धर्म ह्मणजे समाज चालविण्यास समर्थ, ( व एवढ्याकारितांच सार्वत्रिक करण्यासारखा ) आचार, विचार, व मनःप्रवृत्ति यांचा समूह. निवृत्तिमार्ग हा एकट्यादुकट्याच्या समाधानास झाला तर आधार होईल. पण धर्म ह्मटला ह्मणजे तो सर्व समाजाच्या, निदान समाजाच्या बऱ्याच मोठ्या भागाच्या समाधानास तरी आधार झाला पाहिजे. आतां, समाज जर पाहिला तर तो केवळ प्रवृत्तिमार्गावरच चालला आहे; इतकेंच नव्हे तर व्यक्तिशः आपलें जीवितहि प्रवृत्तिमार्गावरच आहे. अर्थात् एकदम आत्महत्या करून घेण्यास जो तयार नाहीं, अशा कोणत्याहि मनुष्यास निवृत्तिमार्ग केवळ घातक व अपायकारक आहे याचा समाजांतील प्रत्येक मनुष्यानें विचार केला पाहिजे. धर्मग्रंथांनीं उपदेशिलेला खरा निवृत्तिमार्ग म्हटला म्हणजे संसाराचे मोहांत असल्यामुळें जीं परोपकाराचीं कामें व्यक्तिसुखावर पाणी सोडिल्यावांचून होत नाहींत तीं करण्याचा उच्चतर कर्ममार्ग. प्रवृत्ति म्हणजे योग्य व्यवहारकर्माकडे प्रवृत्ति--निवृत्ति म्हणजे योग्य कर्माच्या आड येणाऱ्या मोहापासून निवृत्ति. प्रवृत्तिमार्ग व निवृत्ति-

मार्ग दोन्हीहि कर्ममार्गच असून मनुष्यधर्माच्या गाड्याचीं परस्परांस साह्य करणारीं चाकें आहेत.

यावर कोणी असा आक्षेप घेईल कीं जर हा संसार दुःखमूलकच असेल, जर या संसारांत सुखाशा व्यर्थ असेल, जर नैराश्यवाद खरा असेल, तर कसें? मग प्रवृत्तिमार्गाचे पाठीस लागून अत्रहि नाहीं आणि परत्रासहि अंचवावें आणि

" स्वार्थसुखें परमार्थ बुडविला, अनर्थ केला बुधा ॥ "

या रामजोशाचे निर्भर्त्सनेस पात्र व्हावें कीं काय? या प्रश्नाचाहि उलगडा सदरील ग्रंथांत आहे. अग्नि हा सुखमूलक आहे का दुःखदायक आहे या प्रश्नाचें जें उत्तर देतां येईल तेंच संसाराबद्दलहि देतां येईल. अग्नीची व्यवस्था वेडीं माणसें आणि व्रात्य पोरें यांचेकडे असली तर तो अत्यंत हानिकारक होईल; पण तीच हुशार, सावध व कुशल माणसांकडे असली तर तोच अग्नि अनेक सुखांस कारण होईल; तसाच संसार आहे. अविचारी, अविवेकी, कामचोर, अप्पलपोटे, गैरसावध, व नीतिपराङ्मुख लोकांच्या कृतीनें संसार हा दुःखमय व दुःखदायक होईल; पण सत्वशील, विवेकी, नीतिमान्, पराक्रमी, जागरूक व समाधानवृत्तीच्या मनुष्यांच्या योगानें तो सुखदायक होऊन समाधानासहि कारण होईल. या दोन्हीं प्रकारचीं माणसें समाजांत थोडी फार असतातच. व त्यांच्या प्रमाणानेंच समाजांतील लोकांच्या संसाराची सुखरूपता अगर दुःखरूपता, सुखमूलकता अगर दुःखमूलकता असते. अशा स्थितींत नैराश्यवादास जागाच नाहीं. उलट असेंच म्हणावें लागतें कीं समाज हा आंतलि लोकांच्या बरे वाईटपणाच्या प्रमाणानें एकसारखा विकासच पावत राहील; आणि कदाचित वाइटाचें प्रमाण फारच जास्त झाल्यामुळें पुढें विकासास जागा न राहिली तर त्याचें रूपांतर तरी होऊन तो विकासाचे मार्गास लागेल. नाग जसा वरचेवर कांत टाकून पुन्हा ताजा तवाना होतो, तसाच समाज हाहि आपली कालांतरानें आलेली जरा वरचेवर टाकून देऊन ताजातवाना होतो व पुन्हां प्रगतीचे मार्गास लागतो. हें तत्व श्रीकृष्णानेंहि " सकालेनेह महता योगोनष्टः परंतप " ॥ आणि " धर्म संस्थापनार्थाय संभवामि युगे युगे " ॥ या दोन श्लोकार्धांत सांगितलें आहे; व तें आमच्या लोकांनीं नेहमीं आपल्या मनांत वागवून आपल्या समाजांतील लोकांच्या संसाराची सुखरूपता व्यक्तिशः

आपल्या सत्वशीलतेवर, आपल्या नीतिमत्तवर, आपल्या पराक्रमावर, आपल्या विवेकावर, आपल्या जागरूकतेवर व आपल्या समाधानवृत्तीवर अवलंबून आहे हें ओळखून चाललें पाहिजे. कर्मनिवृत्तिमार्ग व नैराश्यवाद हे दोन्हीहि समाजांतील मनुष्यांस कुचकामाचे आहेत.

आपल्या धर्मसंबंधीं विचारांत एक प्रधान कल्पना वरचेवर येत असते, आणि ती फारच अपायकारक आहे. ती कोणची, तर कर्म शब्दाचे अर्थाविषयीं विशेष कल्पना—कर्म ह्मणजे सामान्य व्यवहारांतील क्रियेपेक्षां निराळी जपजाप्यादि क्रिया अशी विशेष समजूत—स्नानसंध्या, जप, यज्ञयाग नामस्मरण वगैरे गोष्टी केल्या असतां स्वर्गदायक होतात किंवा पापांचा उच्छेद करितात अशी विशेष समजूत. या समजुतीवरहि श्रीकृष्णांनीं भगवद्गीता अध्याय दोन, श्लोक ४२ते४७ मध्यें अपरोक्षपणें चांगली खरमरित टीका केली आहे. या समजुतीनें ईश्वराच्या न्यायीपणास बट्टा लागतो. या समजुतीमुळें व्यावहारिक कर्म व धर्मकर्म यांचा विरोध होऊन शुद्धाचरणाचा पाया जें व्यवहारांतील सत्य, त्यास या हिंदुस्थानांत कोठेंच थारा नाहींसा झाला आहे. ही गोष्ट सिद्ध करण्याचीहि जरूर नाहीं. खोटें बोलून व्यवहारांतील एखादी मोठी गोष्ट साध्य होण्याजोगी असून खोटें बोलणार नाहीं असा मनुष्य आमच्यांत नसेलच असें मी म्हणत नाहीं. कारण असेहि कांहीं वेडपीर असतील! परंतु शहाण्या लोकांत असा सत्यवादी अमुक एक मनुष्य आहे असेंहि कोणास नांव घेऊन सांगता येणार नाहीं! इतका आमचा व्यवहार पापमय झाला आहे. पण पूजा, जप, वगैरे क्रिया मनापासून करणारे बरेच लोक दाखवितां येतील. ही भयंकर तफावत कर्म शब्दास भलताच आगंतुक अर्थ दिल्यानें झाली आहे. आपण सर्व लोक धर्माविषयीं उदासीन झालों आहों असें नाहीं. परंतु सर्व धर्मांचें आदितत्व व्यवहारांतील कर्म व सत्य हें आहे, ही कल्पनाहि जिवंत नाहीं. अर्थात् सत्कर्माचा आधार अशारीतीनें नाहींसा झाल्यामुळें खरें सत्कर्महि राहिलें नाहीं. शेंडी काढलेले संन्यासी आहेत; जटा राखलेले गोसावी आहेत हठयोगाचे पराक्रम दाखविणारे योगी असल्याविषयीं कर्णोपकर्णीं समजतें; जपजप्याचे थाटमाटहि आहेत, परंतु सद्धर्माचें मात्र नांवाशिवाय कांहीं राहिलें नाहीं. वर तिसरे पारिग्राफांत सांगि-

५. ही गोष्ट स्पष्टपणें सांगणें ह्मणजे आपल्या देशाची व आपल्या लोकांची नालस्ती आहे अशा समजुतीनें कांहीं लोक मला दोष देतील. परंतु सत्यापलापानें प्रौढी मिळविणें

तलेलें आमचें नैष्कर्म्य आणि हा आमचा कर्मठपणा यांच्या कचाटींत आमचा संसार दुःखमय न होईल तर काय होईल? अस्तु; याहि स्थितींत तरणोपाय नाहीं असें नाहीं व अशा तरणोपायाचा हेतु धरूनच मी ही लोकांची अल्प सेवा करीत आहें.

या ग्रंथाचा मूळ लेखक इंग्रज असल्यामुळे स्थलविशेषीं तिकडील महासाधु ख्रिस्त व बायबल यांचा उल्लेख आलेला आहे. तो पाहून आमच्या लोकांनीं बुजूं नये. कारण धर्मांचा चांगलेपणा नामविशेषावर नाहीं. आणि पुरुषांचाहि चांगुलपणा धर्मविशेषावर नाहीं. धर्मांचा व मनुष्याचाहि चांगलेपण सद्विचार, सदाचार व श्रद्धा यांवर अवलंबून आहे. सदाचार कोणचा हें ठरविण्याचा अधिकार कोणाहि व्यक्तीस नाहीं. ज्यांत सत्य व समाजाचें हित आहे तो सदाचार हा नियम, आणि "महा जनो येन गतः स पंथाः" हीं दोन ठोकळमानें आहेत. पण तीं लावून पाहून अमुक सत्कर्म हें ठरविण्याचा अधिकार आपले अंतरंगांत जी विवेक नावाची ईश्वरी विभूती आहे तिजकडे आहे. तिच्या अनुरोधानें जी योग्य गोष्ट दिसेल ती करणें, जी अयोग्य दिसेल ती न करणें हें मात्र मनुष्याकडे आहे. तेवढें केलें ह्मणजे मुक्तीचा मार्ग खुला आहेच. धर्मांतरानें सज्जनत्व येतें अगर मुक्तीस सोपा मार्ग होतो हें ह्मणणें केवळ मूढपणाचें व खोटें आहे.

सामान्य लोकांच्या मनांत प्रपंच व परमार्थ यांचा विरोध असल्यामुळें परमार्थपर ग्रंथ त्यांस आवडत नाहींत. शिवाय कादंबरी नाटकांप्रमाणें त्यांत विशेष संविधानकहि नसतें. ही अडचण सांप्रत ग्रंथांत पर्यायानें दूर केली आहे. योग्य व्यवहार ह्मणजेच परमार्थ असा या ग्रंथाचा भावार्थ असून सद्यःस्थितिनिदर्शक असें संविधानकहि आहे. शिवाय भाषांतरांत साधली तितकी भाषाहि सुगम घातली आहे. ह्मणून अध्यात्मपर इतर ग्रंथांपेक्षां हा ग्रंथ लोकांस जास्त सुगम व प्रिय होईल अशी आशा आहे. तथापि या विषयांत विचारशक्तीचें साह्य अवश्य असल्यामुळें केवळ एखाद दुसऱ्या सरळ वाचनानें वाचकांस विषय व्यक्त होईल असें नाहीं. श्रवण अथवा अवलोकन, मनन, व निदिध्यास या तीन पाहिऱ्यांनंतरच साक्षा-

---

हें इतकें घातुक आहे कीं आतां ही खोटी प्रौढी झुगारून देणें आणि तिचे ऐवजीं खरी योग्यता आंगीं आणणें हेंच आपलें पहिलें काम आहे.

त्कार शक्य आहे; आणि तेथपर्यंत वाचकांनीं टिकाव धरिला तरच माझ्या श्रमाचें सार्थक होणार आहे.

आमच्या लोकांत पुराण, अध्यात्म वगैरे परमार्थविषयक ग्रंथ केवळ फुरसतीचे वेळीं, प्रपंचांतील भर संपला ह्मणजे वाचावयाचे असा सामान्य प्रघात आहे. परंतु योग्य व्यवहार हाच परमार्थसाधनाचा मार्ग असून अध्यात्मज्ञानाचा खरा उपयोग व्यवहारांतच आहे. मी कोण आहें, कोठून आलों, जावयाचें कोठें, कोणच्या मार्गानें, व मी करीत आहें काय वगैरेचें नुसतें ज्ञान होऊन उपयोग नाहीं. त्या ज्ञानाचें पर्यवसान आचरणांत झालें पाहिजे आणि मूळ ग्रंथकाराचाहि हाच हेतु होता. ह्मणून हा अध्यात्मविषयक ग्रंथ असला तरी तो वाचण्याचें काम संसारी लोकांनीं उतारवयावर न लोटतां होईल तितक्या सवडीनें पूर्व वयांतच करून या आपल्या हतभाग्य व मृतप्राय समाजाचें पुनरुज्जीवन होण्याजोगें त्यांचे हातून जें काय होण्यासारखें असेल तें करावें. हा विषय कठीण आहे व तो समजण्यास विचारशक्ति प्रौढ झाली पाहिजे हें खरें. परंतु कर्मकर्तृत्वाची तरतरी गेल्यावर मग अध्यात्म विषय समजून घेणें म्हणजे सत्तर वर्षांपर्यंतचे वय कुलटासमागमांत घालवून मग कुलीन नववधूचें पाणिग्रहण करण्याइतकेंच हास्यास्पद आहे.

या पुनरुज्जीवनास ग्रंथकाराचे मतानें व आमचेहि मतानें मुख्यतः तीन गोष्टी अवश्य आहेत व त्या तिहींनीं बाकीच्या सर्व सुसाध्य आहेत:—१, निष्कपट सत्य भाषण व सत्याचरण; २, प्रकृतीच्या मानानें अव्याहत उद्योग ( पण तो दुष्कर्मांत नसावा;) आणि ३, प्रेम. या तिन्ही गोष्टी कोणाच्याहि धर्माच्या किंवा सुखाच्या आड न येतां, कोणत्याहि कायद्याच्या कचाटींत न येतां करितां येण्यासारख्या आहेत, आणि त्या करणाऱ्यांमध्यें हटकून अत्यंत जोमाची व सर्वतोपरी स्तुत्य एकी होईल. म्हणून हिंदु, मुसलमान, बौद्ध, ख्रिस्ती, यहुदी वगैरे माझ्या सर्व बांधवांना माझी अशी प्रार्थना आहे कीं त्यापैकीं प्रत्येकानें या तीन, निदान पहिल्या दोन, निदान पहिली एक तरी आपल्या धर्माची बाब ह्मणून मरेपर्यंत चालविण्याचा निग्रह करून हें व्रत नेटानें पार पाडिलें पाहिजे. हें व्रत चालविणारे लोकच समाजाचे खरे आधारस्तंभ होत हें व्रत चालवितांना थोडे क्लेश होतील; पण हे क्लेश सोसणेंच खरें तप होय; त्यानेंच सत्वबळ वाढतें. अशा सत्याभिमानी समाजाचा पाया या भरतखंडांत पुन्हा कोणी घालील काय ?

या भाषांतरांत जेथें अपरिचित ऐतिहासिक गोष्टी आल्या आहेत तेथें व इतर दुर्बोध ठिकाणीं टिपा दिल्या आहेत. ज्या अलौकिक पुरुषांनीं हें जग आपल्या बाहुबलानें अगर बुद्धिबलानें या स्थितीस आणिलें त्यांचा या ग्रंथांत जेथें प्रथम नामनिर्देश झाला आहे तेथें टिपांतून त्यांच्या पराक्रमाची अटकळ होण्याइतकी त्यांची त्रोटक माहिती दिली आहे.

या ग्रंथांतील भाषेसंबंधानें वाचकांची विशेष करडी नजर नसावी अशी माझी त्यांस विनंति आहे. मुळांतील अर्थ भाषांतरांत हुबेहूब उतरण्यास किती अडचण असते याचा थोडाबहुत अनुभव बऱ्याच वाचकांस असेल. तशांत मूळ लेखक कार्लाइलसारखा आणि विषय अध्यात्मासारखा असल्यावर भाषांतरकाराची कोण त्रेधा उडते याचा अजमास कार्लाइलचे इंग्रजी ग्रंथ व अध्यात्म विषयावरील ग्रंथ वाचणाऱ्यांस मात्र होईल. म्हणून हें भाषांतर करितांना मुळांतील अर्थ न सोडतां होईल तितकी सुबोध भाषा वापरावी एवढेंच धोरण ठेविलें होतें. अर्थात् व्याकरणशास्त्र, साहित्यशास्त्र वगैरे भाषाविषयक शास्त्रांच्या नियमांचें या भाषांतरांत अतिक्रमण झालें नसेल अशी आशा करणें ह्मणजे माझ्या अल्पमतीस नसतें महत्व देणें होय. अर्थात् अशा दृष्टीनें जे कोणी हें भाषांतर वाचतील त्यांचा हिरमोड झाल्यावांचून राहणार नाहीं. आतां भाषांतर या नात्यानें मूळ इंग्रजी ग्रंथाशीं जे कोणी हा ग्रंथ ताडून पाहण्याची तसदी घेतील त्यांस या माझ्या अल्पकृतीबद्दल थोडी जास्त माहिती दिली पाहिजे. सदरील ग्रंथाचें शब्दशः भाषांतर अगदींच अशक्य आहे. किंबहुना तसें भाषांतर केल्यास तें शुद्ध मराठी वाचकांस कळणारहि नाहीं. ह्मणून होतां होईल तोंपर्यंत वाक्यशः भाषांतर करून बाकीच्या ठिकाणीं मूळ ग्रंथकाराची विचारसरणी कायम ठेवून अर्थसंकोच अगर विपर्यास न करितां मुळांतील विधानें जशींच्या तशींच परंतु भाषेंत बदल करून दिलीं आहेत. जेथें मुळांत प्रस्तुत विषयास जरूर नसलेल्या गोष्टी संदर्भानें आल्या आहेत, आणि भाषांतर अशक्य दिसलें, किंवा आपल्या भिन्न स्थितीमुळें भाषांतर दुर्बोध होईल असें वाटलें, तेथें संदर्भ जुळवून घेऊन त्या गोष्टी क्वचितस्थळीं अजीबात गाळल्या आहेत, किंवा सादृश्यार्थ त्यांचे ऐवजीं दुसऱ्या गोष्टी देऊन पूर्तता केली आहे. दुसरें, यूरोपांतील सारस्वत समुद्र इसवीसनाच्या दुसऱ्या शतकापासून पंधराव्या शतकापर्यंत विचारवायूच्या अभावामुळें इतका स्तब्ध व निश्चळ झाला होता

कीं त्यांतील ज्ञानजल गोंठून जागजागीं विद्वान् लोकांचा भर असलेल्या ठिकाणीं अत्यंत मोहक पैलूदार जाळीं मात्र होऊन त्यास वर दुसरे पारिग्राफांत दर्शविलेल्या आपलेकडील शब्दपांडित्याचीच दशा प्राप्त झाली होती. पुढें पंधरावे शतकांत त्या वेळच्या धर्मोपदेशकांचें भोंदूपण स्पष्ट नजरेस येऊन लोकचित्तक्षोभाचें एकदम वादळ झालें; आणि या सारस्वत समुद्रांत धर्मसुधारणा व त्याबरोबरच इतर शास्त्रांच्या सुधारणेच्या लाटा उसळूं लागून अनेक विद्वान् लोक अध्यात्मशास्त्रांतहि बुड्या देऊन त्यांतील नवीं नवीं सिद्धांतरत्नें बाहेर काढूं लागले. व तो क्रम आजपावेतों चाललाहि आहे. अर्थात् या विचारक्रांतीबरोबर पारिभाषिक शब्दांची नवी सृष्टीहि उत्पन्न झाली, व ते पारिभाषिक शब्द या ग्रंथांत जाग जागीं आले आहेत. त्यांना बरोबर पर्याय शब्द आज आपले भाषेंत मिळणें अशक्य आहे. कारण आमच्या सारस्वताची सध्यांची स्थिति यूरोपांतील सारस्वताच्या चौदाव्या शतकांतल्या स्थितीसारखीच हुबेहूब आहे. या सर्व अडचणी लक्ष्यांत घेऊन माझ्या सुज्ञ उद्योगशील वाचकांनीं मुळाशीं हें भाषांतर ताडून पाहून त्यांतील दोष मला कळविले व इष्ट सुधारणा सुचविल्या तर त्यांचा मी फार आभारी होईन. हल्लीं लोकांस सादर केलेल्या ग्रंथांतील लेखनशुद्धीबद्दल दोन शब्द लिहिले पाहिजेत. ज्यानें लिहिलेला मजकूर तोच तपासूं लागला म्हणजे बहुधा असें होतें कीं तोच मजकूर डोक्यांत घोळत असल्यामुळें व मजकुराचे अंतरंग शुद्धीकडे त्याचें सर्व लक्ष्य असल्यामुळें शब्दांतील ऱ्हस्वदीर्घादि शोधनाकडे तितकें लक्ष्य जात नाहीं. या कारणामुळें या ग्रंथांत बरींच अशुद्धें राहिलीं आहेत. त्याबद्दल वाचकांनीं क्षमा केली पाहिजे. शिवाय बोलण्यामध्यें जशीं ऱ्हस्वदीर्घें येतात तशींच ठेवण्याचें प्रुफें तपासतांना धोरण असल्यामुळें विद्वान वाचकांस क्वचित् अपरिचित ऱ्हस्वदीर्घेंहि आढळण्याचा संभव आहे.

आतां या ग्रंथांतील विषयसंगती संबंधानें पाहतां मूळ ग्रंथकारानें त्यास ताफ्यांच्या पुलाची उपमा दिली आहे. अर्थात् एका ताफ्यावरून दुसऱ्या ताफ्यावर याप्रमाणें या पुलावरून उड्या मारीतच गेलें पाहिजे. याचा भावार्थ असा कीं, या ग्रंथांतील प्रकरणांचा पूर्वोत्तर संबंध असावा तितका स्पष्ट नाहीं. हें जाणून सुज्ञ वाचकांनीं या पुलावरून हलक्या पायांनीं विचाराचा आधार घेतच गेलें पाहिजे. आणि रिकाम्या वेळांत, आपल्या

जड अंगाच्या बांधवांनाहि त्यावरून बिनधोक जातां यावें म्हणून प्रत्येक तुटक ठिकाणीं तर्कशास्त्राचे साहित्यानें भक्कम मच्छ बांधून अन्य ठिकाणींहि योग्य डागडुजी करीत राहिलें पाहिजे.

मूळ ग्रंथकारानें या ग्रंथास " स्यूत सौतिक " ह्मणजे ठिगळें जोडून तयार केलेला शिंपी, अशा अर्थाचें अन्वर्थक नांव दिलें आहे; त्यांतला तरी भावार्थ हाच. या ग्रंथांतील विषय " वस्त्ररहस्य. " त्याचें यथास्थित प्रतिपादन करण्यास ट्यूफेल्सड्राक साहेबांसारखा प्रत्यक्ष पुरुष [ शिंपी ] च पाहिजे होता. तो लोकांपुढें जशाचा तसा उभा करणें दुरापास्त असल्यामुळें त्याच्या चरित्रांतील कांहीं ठोकळ गोष्टी व त्याचीं कांहीं ठोकळ मतें हे धडपे जोडून त्यांची ही चारित्ररूपी वाकळ किंवा गोधडी लोकांस सादर केली आहे. तींतील धडपे हे वरील रूपकांतील ताफे होत. अर्थात् सदरील शिंप्याच्या प्रत्यक्ष चारित्ररूप वस्त्रांत याहून अनेक जास्त धडपे असूनहि ते जेथल्यातेथें बेमालुम विणलेले आहेत. हे जास्त धडपे कोणचे व ते कोणच्या ठिकाणीं असले पाहिजेत, असलेले धडपे कोणच्या ठिकाणीं जास्त मजबूत पाहिजेत वगैरे गोष्टी सुज्ञ लोकांस स्वानुभवानें व विचारानें कळतील; व मग " भवशीत–भीति–भीत स्वांताला " या वाकळीच्या साह्यानें सर्व वस्त्ररहस्य व्यक्त होईल.

आतां या भाषांतराचे कामीं ज्या सद्गृहस्थांनीं उदार मनानें मला साह्य केलें आहे त्याचें कृतज्ञतापूर्वक नामनिवेदन केलें पाहिजे. त्यांत पहिल्या प्रतीचें साह्य माझे कालेजांतील परमपूज्य अध्यापक सेल्बी साहेब यांचें होय. सन १८९३ त मी आपल्या समाजाची सर्व बाजूंनीं जी अत्यंत हीन स्थिति झाली आहे तिचें एका इंग्रजी निबंधांत विवेचन करून तींतून वर डोकें निघण्यास देशांतील ज्ञान व शरीरसामर्थ्य यांचा मिलाफ झाला पाहिजे, व तो होण्यास सुशिक्षित लोकांनीं आपलें ज्ञानभांडार मराठी व इतर देशभाषांतील शिक्षकवर्गाचे द्वारां शेतकरी व कारागीर लोकांकडे पोहोंचविण्याजोग्या कांहीं संस्था पाहिजेत असें सुचवून तो निबंध देशाची कळकळ बाळगणाऱ्या बऱ्याच सद्गृहस्थांकडे पाठविला होता. व ही सूचना बऱ्याच लोकांस पसंतहि पडली; व तदन्वयें भाषांतराचे कांहीं उपक्रमही सुरू झाले. या निबंधावर मेहेरबान सेल्बी साहेब यांनीं विचार करून मला लिहिलें कीं, माझा हेतु सिद्धीस जाण्यास

प्रथम कार्लाइल साहेबांच्या या ग्रंथाचें व रस्किन साहेबांच्या " सिसेम अँड लिली " आणि " क्राउन ऑफ वाइल्ड ऑलिव्ह " या दोन ग्रंथांचीं भाषांतरें होऊन तीं लोकांत प्रचलित झालीं ह्मणजे आपण-काय केलें पाहिजे याचा लोकांस उमंग होईल. हीं तिन्हीं भाषांतरें आज तयार असून हें भाषांतर तर लोकांच्या हातांतहि पडलें आहे. याप्रमाणें हें काम मूळ मीं हातीं घेण्यासच ह्या सद्गृहस्थांचा उपदेश प्रवर्तक झाला असून पुढेंहि वरचेवर त्यांजकडून अर्थबोधाची मदत मिळाल्यानेंच हें काम मजकडून इतपत उरकलें आहे. मला साह्य करणारे दुसरे गृहस्थ डेक्कन कालेजांतील माझे संस्कृत विषयांतील अध्यापक गुरुवर्य रामकृष्ण गोपाळ भांडारकर हे होत. अशा उतार वयांतसुद्धां त्यांना फुरसत अगदीं नाहीं असें असून केवळ शिष्यवत्सलतेनें त्यांनीं कार्लाइल साहेबांचें मूळ ग्रंथांतील सर्व कठीण भागाचें भाषांतर मुळाशीं ताडून पाहून इष्ट फेरफार सुचविले. हा पुरुष भाषाविषयांत किती निष्णात आहे व किती निस्पृह आहे याची ज्यास स्वानुभवानें माहिती असेल त्यासच त्यांनीं मला केलेल्या साह्याची खरी किंमत कळणार आहे. मूळ ग्रंथकाराची भाषा साभिप्राय व गूढ असून विषय तर इतका कठीण. अशा स्थितींत तो ग्रंथ इंग्रजी न शिकलेल्यास सुबोध होऊन मुळांतील अर्थ तर सुटूं नये असा आमचा हेतु; म्हणजे आकाशास गवसणी घालण्यासारखेंच जवळ जवळ होतें. आणि डाक्तर भांडारकर यांनीं चांगलीच चिकित्सा केल्यावर हा ग्रंथ चांगला साधला आहे असें जर प्रेमानें व उत्साहानें मला सांगितलें नसतें तर कदाचित् हा ग्रंथ लोकांपुढें मांडण्याचें धाडसहि मीं केलें नसतें. असो मला साह्य करणारे तिसरे गृहस्थ माझे कॉलेजांतील सहाध्यायी मित्र जगन्नाथ मोरेश्वर सामंत बी. ए. एल. एल. बी. हे होत. यांनीं वेदांत विषयाचा चांगला व्यासंग केला असून यांनीं अवलपासून अखेरपर्यंत सर्व ग्रंथ मोठ्या हौसेनें वाचून शब्दशः मुळाशीं ताडून पाहिला आहे.

याप्रमाणें मूळग्रंथ अति उत्तम, त्याचे भाषांतराची आमचे लोकांस अत्यंत आवश्यकता, आणि विद्याखात्यांतील अति उच्च अधिकाऱ्यांनीं मला दिलेलें प्रोत्साहन व प्रत्यक्ष साह्य इतक्या गोष्टी जुळल्या असून आमचे देशांत शास्त्रविषयक ग्रंथांची इतकी अनास्था आहे कीं मज निर्धनास हा ग्रंथ-छापून देण्याचें साह्य दोन वर्षेपर्यंत कोणीहि करीना. मे० सेल्बी साहेब

यांनीं स्वतः एका अत्यंत मोठ्या व उदार गृहस्थास पत्रहि दिलें, पण तें पत्र त्यांच्या प्रायव्हेट सेक्रेटरींनीं तहरिरींत टाकिलें आणि कांहीं विशेष वशिला असल्याशिवाय कांहीं उपयोग होणार नाहीं असें मला लिहिलें. त्याबद्दल मला किती वाईट वाटलें असेल याचा वाचकांनींच विचार करावा. अखेरीस तें पत्र मीं परत आणवून आज पांच वर्षें बाळगिलें आहे. अजून आमची डाळ शिजत नाहीं. असो, अखेरीस राजश्री केशव रावजी गोंधळेकर यांचा माझा परिचय नसतांही ग्रंथ छापून काढण्याचें काम त्यांनीं पतकरिलें; त्याबद्दल त्यांचा मी ऋणी आहे. आणि त्यांच्या ऋणांतून मुक्त होण्याचीच काय ती आतां काळजी आहे. त्यांसहि अनेक अडचणीं मुळें गेल्या साडेचार वर्षांत या पावणे तीनशें पानांपेक्षां जास्त छापता आलीं नाहींत यावरूनहि आमच्या दुर्दैवाची परिक्षा होईल. अजून या ग्रंथाचीं सुमारें १२५ पानें छापावयाचीं शिल्लक आहेत आणि त्यांत तर ग्रंथाची अखेर व उत्कृष्ट भाग आहे. तीं आतां कधीं होतील तीं होवोत.

मुक्काम धुळें.
ता० ९।१।१०

श्रीकृष्ण सदाशिव घारपुरे.

## सूचना.

प्रस्तावना छापली गेली त्यावेळी या ग्रंथापैकीं तिसरें पुस्तक छापलें जाऊन तें वाचकांस लवकर देतां येईल असें वाटलें नव्हतें; परंतु छापखान्यांतून तें लवकर छापून मिळाल्यामुळें हा सबंध ग्रंथ वाचकांस एकदम देण्यांत येत आहे.

धुळें, ता. ११।२।११

श्रीकृष्ण सदाशिव घारपुरे.

मूळ कार्लाइल साहेबांचे ग्रंथाबद्दल व आमच्या प्रयत्नाबद्दल मिस्तर सेलबी साहेब माजी डिरेक्टर यांचा अभिप्रायः—

Deccon College Poona.
October 4. (1904)

Mr. S. S. Gharpure, formerly a pupil of mine and now a] master in the High School at Sholapur has written a Marathi version of Carlyle's " Sartor Resartus." Mr. Gharpure will be able to submit the opinions of competent native scholars as to his book. His aim is to bring the best thoughts of English writers to the knowledge of those who cannot read English. The Sartor is of course a very difficult book; but it is one of the finest in English literature. and I would recommend Mr. Gharpure's work as deserving patronage.

F. G. SELBY.

सार्टार रिसार्टच्या भाषांतरावरील डाक्टर **रामकृष्ण गोपाळ भांडारकर** यांचा अभिप्रायः—

**कार्लाइल** नामक प्रसिद्ध तत्त्वज्ञान्यांनीं केलेला ग्रंथ "**सार्टार रिसार्टस**" याचें मराठी भाषांतर राजमान्य राजश्री श्रीकृष्ण सदाशीव घारपुरे, यांनीं करण्याचा यत्न केला आहे. कार्लाइल साहेबांचे विचार अति गहन आणि त्यांची भाषासरणी अलौकिक व साभिप्राय अशी आहे. आणि घारपुरे यांचा तर आपल्या भाषांतरापासून वाचकांस सहज बोध व्हावा असा उद्देश आहे. तेव्हां अर्थ न सोडतां अशा प्रकारचें भाषांतर करणें ही गोष्ट अत्यंत दुष्कर आहे. भाषांतराचे कांहीं भाग मला घारपुरे यांनीं वाचून दाखविले त्या वेळेस मला ज्या सूचना त्यांस करावयाशा वाटल्या त्या केल्या. नंतर पुन्हां कांहीं महिन्यांनीं भाषांतर मजकडेस आणून आणखी कांहीं भाग वाचून दाखविले. एकंदरींत माझा मत असा झाला आहे कीं त्यांनीं पत्करिलेलें दुष्कर कार्य बऱ्याच अंशीं सिद्धीस गेलें आहे. त्यांचें भाषांतर मराठी भाषणपद्धतीस अनुसरूनच आहे; आणि त्याची सरणी प्रौढ, गोड, व रसिक अशी झाली आहे. आणि मूळचा अर्थ जितका आणवेल तितका आणिला आहे. स्थळविशेषीं अर्थ कोठें चुकलाही असेल. परंतु ग्रंथाच्या काठिन्याकडे लक्ष्य दिलें ह्मणजे या गोष्टीस फारसें महत्व देणें योग्य होणार नाहीं असें दिसून येईल. हा ग्रंथ छापून प्रसिद्ध झाला असतां त्याचा उपयोग होईल; आणि मराठी वाचकांस रम्य व बोधप्रद असा एक नवीन ग्रंथ प्राप्त झाला असें होईल.

मुक्काम लोणावळें,
ता. २९।१।०४

**रामकृष्ण गोपाळ भांडारकर**

# स्यूतसौतिक.

## पुस्तक पहिलें

### भाग पहिला—उपोद्घात

आज सुमारें पांच हजारांहून अधिक वर्षे शास्त्रज्ञानाची मशाल कमी जास्त उजेडानें जिकडे तिकडे प्रकाशत आहे, व विशेषतः सांप्रतकाळीं तिची ज्योत फारच तीव्र झाली असून, शिवाय दुसऱ्याही तिजवर पेटविलेल्या लहानसान असंख्य चुडेचा व सनकाडचा चोहोंकडे चमकत असल्यामुळें सृष्टि व कला यांचा कोणताही भाग अप्रकाशित राहण्याचा संभव

१. शास्त्र–अलीकडे अशिक्षित लोकांत "शास्त्र" शब्दाच्या अर्थसंबंधानें फार घोंटाळा झाला आहे. कांहीं लोकांला असें वाटतें कीं, शास्त्र ह्मणजे धर्मसंबंधीं नियम. कित्येकांस असें वाटतें कीं, शास्त्र ह्मणजे ज्योतिषादि ग्रंथांतील नियम. परंतु अशिक्षित लोकांतील सार्वत्रिक समज असा आहे कीं, शास्त्रांतील सिद्धांत अनुभवावर अवलंबून नसून ते ईश्वरानें ठरविले आहेत. अर्थात् अनुभवाची अपेक्षा ठेवून त्याविषयीं साशंक असणें, किंवा अनुभवाचे आधारावर त्यांस खोटें ठरविणें ह्मणजे पाखंड अगर पाप होय, असा सामान्य लोकांत समज आहे. या गैरसमजाचें मुख्य कारण प्रस्तावनेंत सांगितलेली आप्तवाक्यावरील फाजील श्रद्धा होय. वास्तविक ह्मटलें तर "शास्त्र" म्हटलें म्हणजे कोणत्याही सृष्ट अगर सिद्ध वस्तुवर्गाविषयीं अनुभवजन्य ज्ञान व विचार यांच्या अनुरोधानें बांधलेले नियम व केलेलें व्यवस्थित विवेचन. ही व्याख्या नवीन इंग्रजी शिक्षणानें तयार झालेली नाहीं. ती पूर्वींची जुनीच आहे. आणि म्हणूनच तींत व्याकरण, तर्क, गणित वगैरे लौकिक गोष्टींवरील ग्रंथांचाही समावेश केलेला आढळतो. या मानानें पाहतां अनुभवज्ञान दिवसेंदिवस वाढत असल्यामुळें शास्त्रांत उत्तरोत्तर बदल व सुधारणा होणारच.

२. चुडया–सनकाडींप्रमाणेंच कांहीं तेलकट लांकडें पेटविलीं असतां त्यांची मशालीसारखी अव्याहत ज्योत जळते तीस "चुडी" असें म्हणतात. खेडे गांवांत अंधारांतून जातांना अद्यापिही चुडयांचा उपयोग क्वचित् करितात.

नसतां, शास्त्रदृष्टया किंवा इतिहास दृष्टयाही कपडे अथवा पांघरूणें
विषयावर ह्मणण्यासारखें कोणींच कांहीं लिहिलें नाहीं. या गोष्टीचें आजच
आपल्या उन्नत स्थितीकडे पाहिलें असतां विचारशील मनुष्यास खचित
नवल वाटेल.

सूर्यसिद्धांत ( गुरुत्वाकर्षणाविषयीं शास्त्र[३] ) बहुतेक पूर्ण दशेस आले
आहे. तत्ववेत्ता लॅग्रेंज[४] यानें या सिद्धांताचे उपपत्तीवरून ही ग्रहमा
अशीच अखंड चालेल असें ठरविल्याचें सर्वांस ठाऊक आहे. लाप्लेसनें
त्याच्यावरही कडी करून असें ह्मटलें आहे, कीं ईश्वरानें मूळ सृष्टि के
तेव्हांच ती या सिद्धांताचे धोरणानें केलेली असावी. निदान इतकें खरें,
या सिद्धांतानें आमच्या जहाजवरील रजिष्टरें पूर्वीपेक्षां चांगल्या रीतीनें ठेव
येत असूनं त्यामुळें पाण्यावरील रहदारी फारच सोईची झाली आहे. भू

---

३. गुरुत्वाकर्षण—पदार्थविज्ञानशास्त्राचा असा एक सिद्धांत आहे कीं, प्रत्येक व
आपल्यांतील सारभूत पदार्थाचे मानानें दुसऱ्या वस्तूंस आपणाकडे ओढीत असते, व
आकर्षण त्या दोन वस्तूंमधील अंतराच्या वर्गाचे प्रमाणानें कमी होतें. या सिद्धां
गुरुत्वाकर्षणाचा सिद्धांत म्हणतात.

४. लॅग्रेंज—फ्रेंच गणितशास्त्रवेत्ता ( १७३६-१८१३ ). यानें पातळ पदार्थांतील ग
पदार्थांतील कंप वगैरे विषयीं महत्वाचे शोध लाविले. त्याच्या सर्व शोधांत Calcul
of variations हा फारच महत्वाचा आहे.

५. ग्रहमाला—म्हणजे सूर्य, व त्याचे भोंवतीं फिरणारे ग्रह, ग्रहांचें भोंवतीं फिर
उपग्रह किंवा चंद्र आणि धूमकेतु वगैरेंचा समूह. आपल्या जुन्या ज्योतिषांत मानिले
ग्रहांपैकीं सूर्य हा ग्रह नसून ग्रहप्रवर्तक तारा आहे; चंद्र हा पृथ्वीचा उपग्रह
मंगळ, बुध, गुरु शुक्र, व शनि हे ग्रह आहेत; राहू व केतू मिळून पृथ्वी हा एक ग्रह
या शिवाय युरेनस व नेपच्यून हे दोन मोठे ग्रह आहेत आपल्या पृथ्वीला मात्र चंद्र
असें नाहीं. तर शनि गुरु व युरेनस यांसही एकच नव्हे तर चार चार आठ आठ
आहेत. या शिवाय ग्रहमालेंत किरकोळ ग्रह अनेक आहेत; ते दुर्बिणींतून मात्र दिस

६. लाप्लेस—फ्रेंच गणितशास्त्रवेत्ता व नामांकित सरदार ( १७४५-१८२७ ).

७. गुरुत्वाकर्षणाचा नियम ठरल्यामुळें कोणचा ग्रह कोठें केव्हां असेल हें आतां ज
यानें नक्की समजतें व त्यावरून समुद्रांत जहाज कोठें आहे व कोणच्या दिशेनें
पाहिजे हें नक्की कळतें.

शास्त्र व भूघटनाशास्त्र यांचीही आपणांस हवी तितकी माहिती आहे. वरनेर व हटनें[11] सारख्या तत्ववेत्त्यांचे परिश्रमानें व त्यांच्या शिष्यवर्गांच्या अचाट बुद्धिवैभवानें, लोकांना आतां या सृष्टिसंबंधानें कांहींच गूढ म्हणण्यासारखें राहिलें नाहीं. समाजबंधन[12], आवडनिवड व तिचीं कारणें[13], माशांचीं स्थळांतरें[14], वगैरे संबंधानें ग्रंथ आहेत ते नांवें घेऊन सांगितले पाहिजेत असें नाहीं. त्याचप्रमाणें अर्थशास्त्रा[15]पैकीं भाड्यानें देणें घेणें[16], पदार्थांच्या किंमतीचें मान[17], वगैरे विषयांवर, भाषाशास्त्रावर, इतिहासावर[18], सूत्रशास्त्रावर, मादक पदार्थांवर, व भूतांखेतांव ही अनेक ग्रंथ झाले आहेत. तात्पर्य मनुष्यजातीचा आयुष्यक्रम, व त्याशीं संबंध येणाऱ्या हरएक वस्तु, यांची फोड करून विद्वान् लोकांनीं आमचे पुढें मांडली असून, मनुष्याचा आत्मा, शरीर व जिंदगी, यांतील खडान् खडा व दोरान् दोरा नीट रीतीनें तपासून, त्याची शास्त्रीयरीत्या परीक्षा व चिकित्सा झालेली आहे. आपल्या ज्या अनेक मानसिक

---

८. भूगर्भशास्त्र—पृथ्वीचे पृष्ठभागाखालीं काय काय व कसकशा व्यवस्थेनें आहे या विषयींचें शास्त्र.

९. भूघटनाशास्त्र—पृथ्वीची रचना कसकशी झाली या विषयीं शास्त्र. टीप १० व ११ पहा.

१० वरनर—जर्मन खजिनशास्त्रवेत्ता १७५०-१८१७ यानेंच खजिनशास्त्रास प्रथम व्यवस्थित स्वरूप दिलें. यांचे मतें पृथ्वीची घटना पाण्याचे कार्यानें झाली.

११. हटन—इंग्रज भुगर्भशास्त्रवेत्ता १७२६-१७९७ याचे मतें पृथ्वीची घटना अग्नीचे कार्यामुळें झाली असावी, असें आहे.

१२. समाजबंधन—या विषयावर फ्रेंच तत्ववेत्ता रूसो ( पु० २ भा० १० टी० १० पहा. ) यानें आपला ग्रंथ १७६२ त प्रसिद्ध केला.

१३. आवडनिवड व तिचीं कारणें—या विषयावर ह्यूम यानें १७५७ त व अलिसन यानें १७९० त आपले ग्रंथ प्रसिद्ध केले.

१४. टामस पेनेंट व इतर प्राणिशास्त्रवेत्त्यांचे मतें हेरिंग माशांचें मूळ उत्पत्तिस्थान ध्रुवाकडील समुद्रांत असून तेथून ते इतर ठिकाणीं पसरतात.

१५. अर्थशास्त्र—संपत्तिविषयक शास्त्र.

१६. भाड्यानें देणें घेणें या विषयावर अडाम स्मिथनें १७७६ मध्यें, माल्थसनें १८१५ त व रिकार्डोनें १८१७ त आपले ग्रंथ प्रसिद्ध केले.

१७. पदार्थांच्या किंमतीचें मान—अडमस्मिथ १७७६ रिकार्डो १८१७.

१८. इतिहास रहस्य या विषयावर हरडरनें १७८४ त हिजेलनें १८२२ त व शिजेलनें १८२९ त आपले ग्रंथ प्रसिद्ध केले.

शक्ति आहेत त्यांनाही स्टीवर्ड[19], कैझन[20], रोये कोलेर[21] प्रभृति वस्ताद परीक्षक भेटलेले आहेत. आणि आपल्या शरीरांतील प्रत्येक दोरान् दोरा कोणा तरी अचाट बुद्धीच्या लारेन्स[22], म्याजेंडी[23], किंवा बिशॉ[24] वगैरेच्या नांवानें दुमदुमत आहे.

असें असतां सर्व दोऱ्यांमध्यें जो श्रेष्ठ दोरा, ज्या दोऱ्यामुळें दोरा हें नांव सार्थ आहे तो दोरा, अथवा त्यानें बनलेले पदार्थ, म्हणजे लोंकरीचे किंवा इतर प्रकारचे अगांत घालण्याचे कपडे, त्याविषयीं शास्त्रानें अगदींच मूकव्रत कसें धरलें आहे, हा प्रश्न विचारी मनुष्याचें मनात साहजिक उत्पन्न होतो. आपले कपडे कांहीं यःकश्चित् पदार्थ नव्हत. मनुष्याच्या आत्म्याचें सर्वांत बाहेरचें वेष्टण कपडे हे होत. आपले कपडे हे आपल्या आत्म्याचाच पोषाख म्हटलें तरी चालेल. या दोऱ्यांच्या कपड्यांतच आपले सर्व शारीरिक व मानसिक शक्तींचे धागे राहून काम करितात. त्याविषयीं शास्त्राची इतकी अनास्था असावी काय ? कारण जरी कदाचित् एखाद्या सांदी कोंपऱ्यांत पडलेल्या ग्रंथकारानें या विषयाकडे दुरून दुरून आपली नजर पोंचविली असली, तरी बहुतेकांनीं या विषयाची अगदींच दाद घेतलेली नाहीं; जणूं काय कपडे हे मनुष्यास नैसर्गिकच असून केंसांप्रमाणें, अथवा झाडांच्या पानाप्रमाणें अथवा पक्ष्यांच्या पिसाप्रमाणें आपोआपच फुटत असावे ! मनुष्याविषयीं जे जे विचार लोकांनीं केले आहेत, त्या सर्वांत कपड्यांनीं वेष्टिलेला मनुष्य मात्र त्याचे समोर होता. परंतु वास्तविक पाहतां मनुष्य हा जात्या नग्न प्राणी असून कांहीं विशेष अडचणीमुळें मात्र

---

१९. ड्यूगाल्ड स्टीवर्ड--एडिंबरो येथील नीति व अध्यात्मशास्त्रवेत्ता १७५३-१८२८ यानें मनाचें कार्य या विषयावर एक ग्रंथ लिहिला आहे.

२०. व्हिक्टर कझन--फ्रेंच अध्यात्मशास्त्रवेत्ता व सरदार १७९२-१८६७.

२१. रोयेकोलर--फ्रेंच तत्वज्ञ व राजकारणी पुरुष १७६३-१८४५.

२२. सर विलियम लारेन्स-इंग्रज शस्त्रवैद्य व ग्रंथकार १७८३-१८६७.

२३. म्याजेंडी-विख्यात फ्रेंच डाक्टर १७८३-१८५५ यानें शारीर शास्त्रांत बऱ्याच गोष्टींचा शोध लाविला.

२४. बिशा-विख्यात फ्रेंच डाक्टर व प्राणिशास्त्रवेत्ता १७७१-१८०२ हा अत्यंत लोकप्रिय होता व त्यानें मोठ्या मेहनतीनें बरेच शोध लाविले.

त्यानें आपल्यासही कपड्यांची गवसणी केलेली आहे. शेक्सपियर[२५] म्हणतो कीं मनुष्य हा मागें पुढें पाहून चालणारा प्राणी आहे. पण असें जर आहे तर त्यानें आपल्या अगदीं निकट, सभोंवतीं व समोर काय चाललें आहे तेंही पाहूं नये हें थोडें विचित्र दिसतें.

अशा बहुतेक प्रसंगीं आह्मांस जर्मनीचा हातभार असतो; आणि याही विषयांत विद्वान, व अविश्रांत खोल विचार करणाऱ्या जर्मनीनें आमची पाठ सोडिली नाहीं. या असल्या राज्यक्रांतीच्या[२६] काळांत सुद्धां शास्त्र विद्येस एका देशांत तरी अजून आश्रय मिळत आहे हेंही आमचें महद्भाग्यच होय.

---

२५. शेक्सपिअर—अतिविख्यात व अद्वितीय इंग्रज नाट्याचार्य १५६४-१६१६ यांचीं बरींच नाटकें आपल्या भाषेंतही झालीं आहेत. या कवीचें मनुष्य स्वभावाचें वर्णन इतकें अप्रतिम व हुबेहूब आहे कीं, तीं माणसें आपणांस प्रत्यक्षशीं भासतात. त्यानें आपल्या नाटकांत शेंकडों पात्रें पूर्णपणें दाखविलीं आहेत; परंतु मनुष्यस्वभावाचा एकच मासला कोणच्याही दोन पात्रांत आढळत नाहीं. आमच्या आधुनिक शिक्षणांत प्रत्यक्ष व्यवहाराची फार उणीव आहे; ती सेक्सपियरच्या नाटकांचा अभ्यास केल्यानें दूर होणार आहे. आणि नाटकांचा खरा उपयोग हाच आहे. आपणांतील " बुकिश " किंवा गद्य नाटकांचे प्रयोग " संगीत " नाटकांनीं नामशेष केलें ही देशाची फारच मोठी हानी झाली आहे. कारण यामुळें संगीतांत कांहींच सुधारणा न होतां उलट पूर्वींचीं जीं कांहीं रागदार गाणीं होतीं तीं मात्र नाहींशीं होऊन लोकांत छचोरपणा वाढला आहे इकडे वाचकांनीं आणि " देशहितेच्छु " आणि " प्रासादिक " नाटक कंपन्यांनीं लक्ष्य दिलें पाहिजे.

२६. राज्यक्रांतीचा काळ—येथें राज्यक्रांति ह्मणजे एक घराणें जाऊन दुसरें राज्यावर येणें येवढाच केवळ अर्थ नाहीं. तर राजसत्ताक अंमल व प्रजासत्ताक अंमल यांची उलटापालट असा अर्थ आहे. या क्रांतीची लाट प्रथम अमेरिकेंत उत्पन्न होऊन युनायटेड स्टेटस हें नांव धारण करून इंग्रजी राज्याचे अमलांतील तेरा संस्थानें प्रथम स्वतंत्र होऊन त्यांत संयुक्त प्रजासत्ताक अंमल १७७४ मध्यें सुरू झाला. त्या वेळीं सदर संस्थानें व इंग्लंड यांच्यामध्यें जबर संग्राम होऊन अखेरीस नऊ वर्षांनीं हें प्रजासत्ताक राज्य इंग्लंडास कबूल करावें लागलें. या संग्रामांत शेजारद्वेषामुळें अमेरिकन लोकांस फ्रान्सनें साह्य केलें. परंतु यामुळें फ्रेंच लोकांतही स्वतंत्रतेचें वारें शिरून फ्रान्स प्रथम १७८९ त प्रजासत्ताक झालें. परंतु लागलेंच तें नेपोलियन बोनापार्ट यानें बळकावून बादशाही अंमल केला. त्याचे मागें पुनः राजसत्ताक अंमल झाला. नंतर पुनः प्रजासत्ताक याप्रमाणें अनेक क्रांत्या होत होत अखेरीस सन १८७३ त कायमचा प्रजासत्ताक अंमल होऊन तो अंमल हल्लीं चालू आहे,

आज जिकडे तिकडे क्याथलिक लोकांस राजकीय अधिकारदानें, पार्लमेंटांत मेंबर पाठविण्याचे हक्क, पारिसचें बंड वगैरे विषयांच्या गडबडीनें फ्रेंच व इंग्रज लोकांचे कान अगदीं बधिर झाले आहेत; अशा वेळेस जर्मनीनें आपल्या वेधशाळेंत शांतपणें उमें राहून या आपल्या देशांतील व इतर ठिकाणच्याही भांबावलेल्या लोकांस सावध करून "बाबांनो! आतां अमुक वाजले," असें सांगत राहणें तरी थोडें झालें काय? रिकामटेंकडा उद्योग करण्यासंबंधानें जर्मनीस लोक नेहमीं नांवें ठेवितात, जणों काय त्यांच्या उद्योगांनीं लोक सुखास अंचवून श्रम मात्र त्यांच्या पदरांत पडत असावे. प्रसंग-

---

२७. क्याथलिक लाकांसअधिकार दान. इंग्लंडांत १८२९ पर्यंत क्याथलिक पंथाचे लोकांस सरकारी अमलाच्या जागा न देण्याविषयीं कायद्यानें बंदी असे. प्राटेस्टंट पंथ निघून सुमारें तीनशें वर्षें झालीं असून क्याथलिक लाकांस स्वतःच्याच देशांत देशी राज्याच्या अमलांतच इतकें पारतंत्र्य असे. या मानानें पाहिलें तर आपण अगदींच हताश होण्याचें कारण नाहीं. राज्यकर्त्यांची न्यायदेवता जागृत होऊन आपणास योग्य अधिकार मिळाल्यावांचून राहणार नाहींत; मात्र तोंपर्यंत आपण आपली पात्रता न घालवितां सतत उद्योग चालू ठेवून आपली लायकी वाढविली पाहिजे.

२८. टीप २६ पहा. तारीख २७ ते २९ जुलई सन १८३० या तीन दिवसांत पारिस मध्यें फिरून राज्यक्रांती होऊन लोकांनीं पूर्वींच्या राजवंशास पदच्युत करून धाकट्या पातीचा राजा गादीवर बसविला.

२९. वेधशाळा. दुर्बिणी वगैरे यंत्रांचें साह्यानें ग्रहनक्षत्रादिकांचें सूक्ष्म अवलोकन करण्याची जागा, आणि सूक्ष्म अवलोकन करणें ह्मणजे वेध घेणें अगर लावणें. गणितावरून ज्योतिषसंबंधीं एखादी गोष्ट कळल्यावर तिचा अनुभवाशीं कितपत मेळ पडतो. हें पाहण्याकरितां मुख्यत्वें हे वेध घ्यावयाचे असतात. ग्रहणांत वेध लागतात असें अजून आपण सर्व लोक म्हणतों. पण वेधांचा ग्रहणांशीं संबंध असल्यामुळें आपल्या जेवणाखाण्यांत अडचण करण्यापलीकडे त्यांत कांहीं अर्थ असेल असें आपल्या स्वप्नींही येत नाहीं! आतां ग्रहणाची वेळ गणित मानानें बहुधा बिनचूक कळते; परंतु ज्या वेळीं वेधांत अत्यंत महत्वाच्या कामाशिवाय जेवणासारखींही कामें करावयाचीं नाहींत असा निर्बंध झाला त्या वेळीं गणितशास्त्राची इतकी प्रगती झाली नसून सूर्यग्रहणाचे गणितांत व अनुभवांत पराकाष्ठा बारा तासांची आणि चंद्रग्रहणाचे संबंधांत पराकाष्ठा नऊ तासांची चूक पडे, ह्मणून सूर्यग्रहणाचे अगोदर बारा तास व चंद्रग्रहणाचे आगोदर नऊ तास सर्वांनीं वेध लावून बसावें असें त्या वेळीं ठरविलें होतें. पण मूर्खपणानें व गतानुगतिकत्वानें आतां आपण या गोष्टींत व इतर गोष्टींतही काय काय करितों व त्याचा सांप्रत स्थितीशीं व विवेकाशीं कितपत मेळ पडतो याचा वाचकांनींच विचार करावा.

विशेषीं विचारी लोक एकादा वायफळ विषय घेऊन त्यावर व्यर्थ परिश्रम घेत बसतात हें खरें; आणि जर्मन लोक जर असें करीत असतील तर त्याचे परिणाम त्यांसही भोगावे लागतील. परंतु आपण एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, रशियांतील वैराण प्रदेशांत सुद्धां मधून मधून उत्कृष्ट वनस्पतींनीं शृंगारिलेल्या सुंदर टेंकड्या आहेत; व जे कित्येक प्रदेश दुरून उदास, उध्वस्त, व नुसत्या दगडांनीं भरलेले असावेसे दिसतात, त्यांत सुद्धां अति मनोहर, व पिकांनीं भरलेलीं, सुंदर सुंदर ठिकाणें जवळ गेल्यावर दिसतात. त्याप्रमाणेंच सकृद्दर्शनीं नीरस अगर वायफळ वाटण्यासारख्या विषयांपासूनही पुढें अचानक महत्कार्य साधण्याचा संभव नाहीं असें नाहीं. ह्मणून, एकाद्या विषयांत न शिरण्याबद्दल मनुष्याचे मनास टीकाकारांनीं इशारत देणें जरी एकपक्षीं योग्य होईल तरी अमुक विषयांत त्यानें शिरूं नये ह्मणून त्यास प्रतिबंध अगर आडकाठी करणें योग्य होईल काय? आपल्या पवित्र शास्त्रांतच लिहिलें आहे कीं, लोक इकडे तिकडे वावरूं लागतील व अनुभवानें ज्ञान वाढेल[३०] आणि खरोखरच बालबोध नियम ह्मटला

---

३०. आपल्याही धर्मग्रंथांत ज्ञानवृद्धीचा हाच मार्ग सांगितला आहे:—

"तपसा ब्रम्ह विजिज्ञासस्व।" ( तपाचरणानें ब्रम्हास जाण )

तैतिरीयोपनिषद्.

परंतु "तप" शब्दाच्या अर्थासंबंधानें आमच्यांत फार घोंटाळा झाला आहे. वास्तविक पाहतां तप हाच धर्माचा व समाजस्थैर्याचा मुख्य आधार होय. तप हेंच आपल्या व ख्रिस्ती धर्माचेंही मुख्य रहस्य होय. परंतु तप म्हणजे काय? या संसारमार्गांत मनुष्याचे वाट्यास जे आधिभौतिक ( नैसर्गिक कारणांमुळें होणारा ताप अग्निप्रलय धरणीकंप वगैरे ) आधिदैविक ( देवाच्या इच्छेनें होणारा ताप, टोळधाड, अवर्षण वगैरे, ) आणि आध्यात्मिक (जीवदशेमुळें होणारा ताप रोग, तहान भूक वगैरे ) ताप आहेत ते आपण सत्वभ्रष्ट न होतां सोसणें.—उदाहरणार्थ सत्यरक्षण, व समाजस्थितिरक्षण हीं मनुष्यांचीं सत्वांगें आहेत. अर्थात कोणत्याही कारणाकरितां, जिवावर आरिष्ट आलें तरी, असत्याचरण न करणें व समाजास अहितकारक गोष्ट न करणें म्हणजे सत्वरक्षण. हें सत्वरक्षण करीत असतां अनेक अडचणी येतात; आणि ईश्वरावर हवाला ठेवून न डगतां या अडचणी सोसणें म्हणजेच तप. वक्तास खावयास मिळालें नाहीं तर सत्वरक्षणार्थ कंदमुळही सेवन करावीं; गांवांत वस्ती दुर्धर झाली किंवा वस्त्रप्रावर्ण न मिळालें तर रानांत राहून वल्कलेंही परिधान करावीं, परंतु आपलें सत्व जाऊं देऊं नये याचें नांव तप. आतां, अशा अडचणी आल्यावाचून सत्वाची

म्हणजे, मनुष्यानें हवे ते प्रयत्न करून त्यांपासून कांहीं फायदा होण्यासारखा असेल तर पहावा हेंच रास्त आहे. कारण, हा किंवा तो विशिष्ट मनुष्य ह्मणजे मनुष्यजात नव्हे; तर सर्व मनुष्यें मिळून मनुष्य जात होते. आणि त्याचप्रमाणें सर्व मनुष्यांचें काम मिळून मनुष्य जातीचें काम होय. कित्येक प्रसंगीं तर अशा गोष्टी घडल्या आहेत कीं, ज्या उद्योगांत प्रथम दर्शनीं समूळ नाश वाटावा, त्यांतच लोकांच्या टीकेकडे लक्ष न देऊन कित्येक साहसी लोक जाऊन मनुष्य जातीस अनेक सुखाची जोड त्यांनीं करून दिली आहे. प्रथमतः अशा उद्योगांत यश आल्यावर सुद्धां ही गोष्ट त्यांनीं कितीही जीव तोडून लोकांना सांगितली तरी तिजवर लोकांचा विश्वासही बसूं नये; पण अखेरीस त्यामुळें लोकांची सुखसमृद्धि जास्त होऊं लागल्यावर मग गतानुगतिकत्वानें ज्यानें त्यानें त्याच उद्योगास लागावें! यावरून पाहातां विचारशील मनुष्यास, वाटेल त्या दिशेनें जाण्यास मोकळीक असावी, असें ह्मणणारे लोकच जास्त विचारी ह्मणावे लागतात.

आपणां इंग्लिश लोकांत शुद्ध शास्त्रांची, व विशेषतः शुद्ध नीतिशास्त्रांची हेळसांड होत असून व्यापार, राज्यसत्ता, वगैरे साक्षात् फायद्याच्या विषयांकडेच सर्व इंग्लिश लोकांच्या प्रयत्नांची प्रवृत्ति आहे. यामुळें आपणांत 'कपडे' याविषयांवर ग्रंथ नाहींत ते नाहींतच; परंतु त्यांची उणीव असल्याविषयीं लेख सुद्धां आपल्या मार्फत हाच प्रथम छापला जात आहे, ही गोष्ट आपल्या सांप्रतच्या हीन स्थितीचें उत्तम द्योतक होय! एकाद्या इंग्लिश तत्ववेत्यानें आपल्यास विचार करण्यास हा विषय निवडून

---

खरी परिक्षा होत नाहीं, आणि सत्वरक्षणाची योग्यता अंगीं येण्याकरितां तयारी दाखल देहास क्लेश होण्यासारखीं व्रतेंही अवश्य आहेत. म्हणून तप शब्दास या अडचणी सोसणें असा विशिष्टार्थ आला. पण यामुळें कंदमुळें खाऊन व उपोषणादि करून वल्कलें नेसून रानांत राहून जपजापादि करणें यासच आपण तप म्हणूं लागलों; व ज्याकरितां इतकें करावयाचें त्या सत्वरक्षणाकडे व सत्वसंशोधनाकडे कानाडोळा करूं लागलों! सत्व म्हणजे माणूसपण; कर्तृत्ववान, विचारवान मनुष्यें; विवेकी प्राणी, या नात्यानें आपला विशेष अधिकार; मनुष्यें व इतर प्राणी यांच्यांतील विशेष वरील वाक्यांत तप शब्दास सत्वशुद्धि ठेवून संपादिलेलें अनुभवज्ञान असा विशेष अर्थ आहे.

३१. शुद्धशास्त्रें म्हणजे केवळ विचारगम्य शास्त्रें; पदार्थविषयक शास्त्रें नव्हत तीं.

घेतला असता काय? फार कशाला, पण हा विषय कोणाला सुचला तरी असता काय? परंतु विद्यासंपन्न जर्मनी देशाची तशी स्थिति नाहीं. कोणत्याही विषयास तेथें आडकाठी ह्मणून नाहीं. जणूं काय तो देश विचार करणाऱ्या लोकांकरितां राखूनच ठेविला आहे. त्या देशांत सर्व प्रकारच्या विषयावर विचार करण्याऱ्या लोकांस स्वातंत्र्य आहे इतकेंच नव्हे; तर अशा विचारांस तेथें स्फूर्तिही आहे. आणि एवढ्याच करितां हा विषय विचारास पात्र होऊन तेथें बराच काळ लोटला असावा असें वाटतें. खुद्द आह्मीं आपल्या विचारशीलतेचा व बहुश्रुतपणाचा जरी एवढा अभिमान वाहतों, तरी आह्मांस प्रांजलपणें इतकें कबूल केलें पाहिजे, कीं आपल्यांत "कपडे" या विषयावर शास्त्रीय ग्रंथ नाहीं, ही गोष्ट इतकी ढळढळीत असूनही ती आमचे नजरेस गेल्या थोड्याशा महिन्यांचे अगोदर कधींच आली नव्हती; व ज्या वेळेस ती आली तेव्हांही परक्यांनीं दाखविल्यावर मग आली **विसिनिचूवो** येथील प्रोफेसर **ट्यूफेल्सड्राक**[३२] साहेब यांजकडून या विषयावर लिहिलेलें एक पुस्तक आमचेकडे आलें त्यावरून हे विचार आह्मांस सुचले. या ग्रंथांतील मतें ग्राह्य किंवा त्याज्य असतील तीं असोत; परंतु एवढें खरें कीं, तीं कशींही असलीं तरी त्यांचा वाचकांचे मनावर फारच मोठा परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं, हें आमच्या स्वतःच्या अनुभवावरून सिद्ध आहे. या ग्रंथाची भाषाही इतकी खुबीदार आहे कीं, ती कोणास समजो अगर न समजो, तिजकडे कसाही वाचक असला तरी त्याचें लक्ष वेधलेंच पाहिजे.

सदर पुस्तकाचे मळपृष्ठावर खालीं लिहिलेप्रमाणें मजकूर आहे:—
"**वस्त्र-रहस्य** (वस्त्रें, त्यांची उपपत्ती, व परिणाम) हा ग्रंथ **डायोजिनिस** "**ट्यूफेलसड्राक** जे. यू. डी. (एल्. एल्. डी.) यांनीं केला तो **विसिनिचट्वो** येथें **श्लिशाविजन**[३३] आणि कंपनी यांनीं छापिला. सन १८३१ इसवी.

---

३२. या ग्रंथांतील विशेषनामें सर्व अन्वर्थक आहेत. त्यांचें शब्दशः भाषांतर केल्यानें त्यांतला विशेषपणा व कार्लाइल साहेबांस अवश्य वाटलेला जर्मनपणा नष्ट होईल म्हणून आम्हीं तींच नांवें कायम ठेविलीं आहेत. आणि जेथें जेथें हीं नांवें प्रथम आलीं तेथें मात्र त्यांचें अर्थ टिपांत दिले आहेत. पुढील टीप पहा.

३३ डायोजिनस=दिव्य. टयूफेल्सड्राक=कलीची खरवड; कलीनें परित्यक्त केलेला. (या अर्थाचेंच नांव इंग्रजींत हिंगास आहे व तो उन्माद झाला असतां औषध ह्मणून

यावर विसिनिचूटवोसमाचार पत्रानें पुढें दिल्याप्रमाणें मत दिलें आहे. ‘हा ग्रंथ फारच विस्तृत, दाट छापलेला व फार सूक्ष्म विचारांनीं भरलेला असून तो जर्मनींत, विशेषतः आमच्या शहरांत उदयास येणें हें आह्मांस भूषणावह आहे. **श्लिशविजन** कंपनीचें सर्वच काम निर्दोषपणाबद्दल प्रख्यात असून त्याप्रमाणें त्यांनीं छापलेला हा ग्रंथ बाह्यंगानें तर सर्व प्रकारें उत्तम आहेच; परंतु त्याचें अंतरंगही अत्यंत चित्तवेधक आहे. हा ग्रंथ जुने शोध लावणाऱ्यांना, इतिहासकारांना व तत्वज्ञ लोकांनाही फारच प्रिय होईल. यांत ग्रंथकर्त्याचें अद्वितीय विचारप्रागल्भ्य कुशाग्रदृष्टि, लोकहितचिंता व त्याचा स्वातंत्र्यप्रिय जर्मनपणा हीं स्पष्ट व्यक्त होतात. मोठमोठ्या लोकांत या ग्रंथाविरुद्ध दुरभिमान व्यक्त होणार नाहीं असें ह्मणतां येत नाहीं, परंतु आमच्या या जर्मतींत या ग्रंथामुळें टचूफेल्सड्रॉक साहेब याचें नांव पहिल्या प्रतीच्या तत्ववेत्त्यांत पडेल यांत संशय नाहीं.’

प्रोफेसर मजकूर यांची आमची जुनी मैत्री आहे. तिला स्मरून त्यांनीं हें पुस्तक आपल्या कीर्तिरंगाच्या भरांत आह्मांस नजर ह्मणून पाठविलें आहे. या नवीन कीर्तीनें ते भांबावून गेले आहेत असें नाहीं. तर त्यांनीं हें पुस्तक पाठवितांना जी नम्रता व आमचे विषयीं आदरबुद्धि प्रकट केली आहे, ती आत्मश्लाघेचे भीतीमुळें आह्मांस लोकांसमोर आणितां येत नाहीं. परंतु या ग्रंथाबद्दल बरा वाईट त्यांनीं एकही उद्गार अगर इच्छा आपल्या पत्रांत व्यक्त केली नसून “या अपूर्व ग्रंथाचा इंग्लिस्थानांतही प्रसार होवो” या शेवटच्या वाक्यावरून मात्र त्यांचें या ग्रंथासंबंधानें स्वतःचें काय मत आहे त्याचा आजमास होत असेल तर वाचकांनीं करावा.

---

देतात. आपलेकडेही पांचवी साहवीस बाळांतिणीचे खोलींत येणाऱ्या सटवीची बाधा होऊं नये म्हणून हिंगाची अक्षद करून लावितात. म्हणून श्लेषानें या नांवाचा अर्थ सैतानाची बाधा दूर करणारें वस्ताद औषध असा आहे ). विसिनिचट्वो=कोण जाणे कोठें आहे. श्लिशविजन = मौन.

# भाग दुसरा



## आमच्या अडचणी.

एक कवी ह्मणतो त्याप्रमाणें वेळ हें आपलें शेत असून त्यांत आपणांस ज्ञान रूप बीं बिवडा उत्पन्न करावयाचा आहे. अर्थात् मनुष्याची उन्नत्ति नवीन कल्पनांवर अवलंबून असल्यामुळें या वेळांत ज्या नवीन कल्पना उपलब्ध होतील त्याच आपला मुख्य फायदा होत. या मानानें पाहिलें तर प्रोफेसर ट्यूफेल्सड्राक यांचा हा ग्रंथ आमच्या हातीं पडला तो दिवस आमचा महद्भाग्याचाच समजला पाहिजे. हा ग्रंथ फारच विस्तृत असून यांत अनंत ज्ञानाचा साठा आहे. हा ग्रंथ केवळ विचाराचा सागर असून तो जरी खवळलेला व भीतिप्रदसा वाटला तरी विचाररत्नांच्या पाठीस लागलेल्या तत्ववेत्तेरूपी पाणबुडयांची बुडी मारण्याची हौस पूर्ण करण्यासारखा तो असून ह्या बुडयांपासून होणारा रत्नलाभही कांहीं लहान सान नाहीं.

हा ग्रंथ एकदां वाचल्या बरोबर आमची खात्री झाली कीं, त्यांत तत्वविचारास नवीनच दिशा दिलेली असून, तीमुळें आजपर्यंत अवगत नसलेले बरेच सिद्धांत या ग्रंथांत आलेले आहेत. दुसरें, या ग्रंथाचे कर्ते प्रोफेसर ट्यूफेल्सड्राक साहेब यांच्या बुद्धीचें व स्वभावाचें विलक्षण स्वरूपही त्यापासून स्पष्ट होत आहे. हे नवीन सिद्धांत व ते काढणारा पुरुष यांची चांगली ओळख करून घेण्याच्या खटपटीस प्रथम आह्मीं लागलों. परंतु आपला गुण दुसऱ्यास लावावा असा प्राणिमात्राचाच काय, पण वस्तुमात्राचाही धर्म आहे; आणि मनुष्य प्राण्यांत तर तो जास्तच नजरेस येतो. ह्मणून या खटपटींत आह्मांस थोडेंबहुत यश येतें न येतें, तोंच आह्मांस झालेलें हें अपूर्व ज्ञान इतरांस कसें प्राप्त करून देतां येईल हा नवीनच विचार आह्मांस उत्पन्न झाला. आमच्या प्रमाणेंच लोकांनाही या ज्ञानाची अवश्यकता असून आमच्या राष्ट्रांतील लोकांच्या अंतःकरणांत या पुस्तकांतील पोक्त विचार खेळूं लागून ते जर त्यांच्या व्यवहारांत व आचरणांत दिसूं लागले, तर फारच हित होईल असें आह्मांस साहजिकच वाटलें. कारण नवें सोनें दुसऱ्यांचे नजरेस पडण्याकरितां आपली पेटी फोडील कीं काय

असें मालकास होऊन जातें अशी ह्मणच आहे. तेव्हां नवें ज्ञान तर सोन्या पेक्षांही जास्त किंमतीचें असल्यामुळें जास्तच उचंबळूं लागतें यांत नवल नाहीं.

परंतु या कामांत एका मागून एक अडचणींच येऊं लागल्या. पहिल्यानें आह्मांस वाटलें कीं, आपल्या आढळांतील पुष्कळ खप असणाऱ्या व ग्रंथपरीक्षणास जागा देणाऱ्या एखाद्या मासिकास पैशानें अगर विषयाच्या गोडीनें वश करून घेऊन त्यांतून या अपूर्व ग्रंथावर एका मागून एक टीकारूप लेख द्यावे. परंतु पंचाईत ही पडली कीं, या ग्रंथांतील मतें दिल्यानें कदाचित् त्या बिचाऱ्या मासिकाचा खप तर कमी होणार नाहींना ? जर कदाचित् आमचे राष्ट्रांतील प्रजापक्षाचे लोक, राजपक्षाचे लोक, व रॅडिकल ह्मणजे निःसीम सुधारक लोक यांचा भेदभाव मोडून, राष्ट्रांतील सर्व मासिक पुस्तकेंही एकरूप झालीं तर मात्र "मनुष्यांचे कपडे" या विषयावरील सदर ग्रंथांतील तत्वविचारांचा प्रवाह त्यांतून सोडणें शक्य झालें असतें. परंतु मोठ्या दुर्दैवाची गोष्ट ही आहे कीं, फ्रेझर्स मॅगझीन शिवाय दुसरें असें मासिक पुस्तक उपलब्धच नाहीं, व त्यांत तर वाचकांस हंसतां हंसतां त्राहि त्राहि करून सोडणाऱ्या वाग्बाणांवांचून दुसऱ्या गोष्टींचा शिरकाव होत नाहीं! दुसरें असें कीं, कपड्यावरील तत्वविचार प्रकट करावयाचे झाले तर ते मूळ ग्रंथकाराच्या स्वभावविशेषाचे ओळखीवांचून लोकांस

---

१ इंग्लंडांत राजसूत्रें पार्लमेंट नांवाच्या लोकनियुक्त समासदांच्या सभेचे हातीं आहेत. सुधारणेची लाट इंग्लंडावरून गेली तेव्हां सामान्य लोकांत व त्या मानानें पार्लमेंटचे सदासदांतही टोरी व व्हिग किंवा कान्सरव्हेटिव व लिबरल असे दोन तट झाले. एकाचें ह्मणणें होईल तितकें जुनें कायम राखावें; दुसऱ्याचें ह्मणणें जुन्यांत बदल करून थोडेसें जास्त हित साधत असेल तर जुनें बदलण्यास हरकत नाहीं. याप्रमाणें हे दोन तट बराच काळ या नांवानेंच होते. पुढें राज्यकारभाराची जोखीम व जबाबदारी राजावरची नाहींशी करून प्रधानांवरच कायद्यानें टाकिली तेव्हां अर्थात् प्रधान लोक प्रबळपक्षाचे धोरणानें वागून प्रबळ पक्षाची अनुकूलता नाहींशी झाली ह्मणजे त्यांनीं राजीनामा देऊन प्रबळपक्षानें आपल्या वतीनें दुसरें प्रधानमंडळ स्थापावें अशी वहिवाट सुरू झाली तेव्हां एकास गव्हरमेंट किंवा सरकारपक्ष व दुसऱ्यास अपोझिशन किंवा विरूद्ध अगर प्रजापक्ष अशीं टोपण नांवे सुरू झालीं. या शिवाय तिसरा पक्ष रॅडिकल लोकांचा आहे. त्यांचें ह्मणणें विवेकास व न्यायमार्गास जें योग्य दिसेल तेंच करावें मग त्यांत जुनें राहो अगर जावो, स्वतःचें हित साधो किंवा न साधो.

समजावे कसे? ग्रंथकाराविषयीं माहिती न देतां नुसते त्याचे विचारच सांगूं ह्मटलें तर दोहोंसंबंधानेंही गैरसमज मात्र होणार. आणि ग्रंथकारासंबंधीं माहिती देऊं ह्मटलें तर त्याला साधनें बिलकुलच नाहींत! व मिळवूं ह्मटलें तर सदर ग्रंथकाराची जी आह्मांस थोडीबहुत माहिती आहे, तीवरून अशीं साधनें असलीं तरी ती मिळावयाचीं नाहींत अशीच खात्री वाटे. या प्रमाणें दोहोंकडूनही अडचण वाटून हे कपड्यावरील तत्वविचार कसे प्रकट करितां येतील या काळजींतच आह्मांस बरेच महिने घालवावे लागले.

इतक्या अवधींत या ग्रंथावर बरींच पारायणें झाल्यावर त्यांतील कित्येक मुद्दे चांगले विशद झाले; व ग्रंथकर्त्याचे व्यक्तित्वाबद्दलही जास्त कौतुक वाटूं लागलें. परंतु जसजशी ग्रंथकर्त्याचे मतांची जास्त माहिती होऊं लागली तसतसें त्याचें व्यक्तित्व इतकें गूढ वाटूं लागलें कीं, तेथें आमच्या पूर्वींच्या परिचयाचा व माहितीचा तर कांहीं इलाज चालेनाच, पण आमची कल्पनाशक्तिही कुंठित झाली! आणि यामुळें पूर्वींची मनाची अस्वस्थता जास्त वाढून कायम होऊं पहात होती तोंच प्रोफेसर मजकूर यांचे विसिनिचट्वो येथील मुख्य स्नेही होफ्राथ हूस्केके यांचा आमचा जरी पूर्वीं पत्रव्यवहार नव्हता तरी त्यांचें अकस्मात् पत्र आलें. त्या पत्रांत बराचसा फालतू मजकूर झाल्यावर जर्मनींतील विद्वान लोकांत "वस्त्ररहस्य" ग्रंथानें किती हालचाल उत्पन्न केली याविषयीं बराचसा उहापोह असून सदर ग्रंथाचें खरें ह्द्गत काय आहे, व त्याचा कल कसा आहे, याचेंही थोडेंसें वर्णन आहे. पुढें सदर ग्रंथाचें व त्याच्या कर्त्याविषयींचें ज्ञान इंग्लंड देशांतील लोकांस व त्यांचे द्वारा अमेरिकेंतील लोकांसही करून दिल्यास त्याचा किती उपयोग होईल, हें सांगून इंग्लंडांतील सारस्वताची एवढी कीर्ति होण्याचें मुख्य कारण ज्या अनेक प्रकारच्या लायब्ऱ्या, त्यांमध्यें

२ होफ्राथ = राजमान्य राजश्री; हूस्केक = टोळ.

३ लायब्ऱ्या—गरीब गुरिबांस अल्पखर्चानें स्वभाषेंतील पोक्त विचाराचीं पुस्तकें वाचतां यावीं या हेतूनें ही लायब्ऱ्यांची कल्पना प्रथम निघाली. ही कल्पना प्रथम १६ व्या शतकांत निघाली व आज बहुधा प्रत्येक खेड्यासही यूरोपांत लायब्ररी झाली आहे. त्या सर्वांत ब्रिटिश म्यूझिअम नावाची लायब्ररी फार मोठी असून तींत पंधरा लक्ष छापील ग्रंथ व एक लक्ष हस्तलिखित ग्रंथ आहेत. आमचेकडेही बाह्यानुकरणप्रिय लोकांनी लायब्ऱ्या स्थापन केल्या आहेत. पण त्यांतील ग्रंथांची निवड व व्यवस्था मनोरंजनाच्या एकाच तत्वावर होत असल्यामुळें त्यांचा व्हावा तसा उपयोग होत नाहीं. बास्तविक

हा ग्रंथ किती आवडता होईल, व त्याचे योगानें लोकांच्या विचारसरणींत केवढा फरक होईल, याविषयींही बरीच चर्चा होफ्राथ साहेबांनीं अडून अडून केल्यावर, सदर ग्रंथकाराचें चरित्र लोकांस सादर करण्याचें आह्मीं योजल्यास अशा चरित्रास साधनीभूत कागदपत्र देण्याचें आपले स्वाधीन आहे, असेंही अखेरीस स्पष्ट लिहिलें आहे.

कांहीं रसायन प्रयोगांत[४] एकादा पदार्थ आंतील पाण्याची वाफ होत असतां रूपांतर न होतां तसाच पडला राहून अखेरीस एखादी तार किंवा दुसरा कांहीं पदार्थ आंत पडून चलन झाल्याबरोबर त्या रसायनाचें मूळस्वरूप एकदम बदलून सर्व रसायन घट्ट होऊन त्याच्या पैलूदार वड्या बनतात. तशीच स्थिति हें पत्र पाहून आमच्या मनाची झाली. पूर्वीं ज्या गोष्टींविषयीं मनांत कांहींएक निर्बंध होत नव्हता, त्याच आतां आमचे पुढें स्पष्ट मूर्तिमंत उभ्या राहून जसें कोणीं वर्गीकरण करावें त्याप्रमाणें सजातीय कल्पना एकमेकांशीं मिळून सर्व प्रकार नीट व्यवस्थेनें वेगळे वेगळे दिसूं लागले. मग लवकरच या ग्रंथासंबंधाचें सांप्रतचें आमचें कर्तव्य व पुढील कर्तव्याचें धोरण आमच्या लक्षांत येऊन लागलींच आह्मीं ओलिव्हर यार्के[५]च्या छापखान्याकडे पत्र लिहिलें. मग त्या गृहस्थाची बरेच वेळ गांठ घेतल्यावर आमच्या उद्योगास हल्लीं हें वाचकांपुढें असलेलें स्वरूप प्राप्त झालें आहे. आमच्या लायब्र्यांसंबंधानें होफ्राथ साहेबांनीं लिहिलेल्या गोष्टी तूर्त बाजूस ठेवून त्यांनीं आह्मांस जें कागदपत्र पाठविण्याविषयीं अभिवचन दिलें आहे ते पाठविण्याविषयीं लागलेंच आह्मीं त्यांना पत्र लिहिलें. या प्रमाणें हे कागदपत्र येण्याची चांगलीच आशा असल्यामुळें आमच्या

---

पाहतां लायब्र्यांचा मुख्य हेतु सामान्य लोकांस रिकाम्या वेळांत आपली जिज्ञासा तृप्त करून ज्ञानलाभ करून घेतां यावा हा आहे.

४ उदाहरणार्थ पाण्यांत जितकी तुरटी व मोरचुत विरघळेल तितका विरघळून पाणी अगदीं स्वस्थ ठेविलें तर त्याची उष्णता कितीही कमी केली तरी तें तसेंच राहतें.परंतु आंत चलन होण्यासारखा कांहीं यत्किंचित पदार्थ पडला तरी तेवढ्यानें रसायण क्रिया सुरू होऊन पाणी हळूहळू उडून जातें, मोरचुदाचे पैलू निराळे पडतात व तुरटीचे पैलू निराळे पडतात. याप्रमाणें पाणी तुरटी व मोरचूद यांचे मिश्रणांतून तिन्ही पदार्थ रसायण क्रियेनेंच आपोआप अलग होतात, मात्र त्यास एखाद्या कस्पटाचे तरी उत्तेजक मिळालें पाहिजे.

५ ओलिव्हर आणि यार्के हें केवळ काल्पित नांव आहे ( प्रस्तावना पारिग्राफ १ पहा. )

कामास सुरुवात होऊन हा "स्यूतसौतिक किंवा ठिगळांचा शिंपी" ह्मणजे ट्यूफेत्स्ड्राक साहेब यांचें चरित्र व मतें हा ग्रंथ सुरू होऊन पूर्ण होण्याच्या पंथास लागला आहे.

हें काम हातीं घेण्यास वर लिहिल्याप्रमाणें आह्मांस कारणें झालीं. परंतु तें काम पार पाडण्यास आमची लायकी काय आहे, हेहीं खरें ह्मटलें तर वाचकांस समजलें पाहिजे. पण तें सांगूं गेल्यास वाचकांस कंटाळवाणें होईल, ह्मणून आमची एवढीच विनंति आहे कीं या ग्रंथांत जें कांहीं आह्मीं सादर करीत आहों, तें आमच्या ब्रिटन मधील वांचकांनीं मोकळ्या अंतःकरणानें व जितकी विचारशक्ति व कुशाग्रता त्यांस परमेश्वरानें दिली असेल तिचा उपयोग करून, मनन करून वाचावें. त्यांनीं आपली विवेकशक्ति जागृत ठेवून, तिला वेडगळ समजुतींचा व विशेषतः प्रचारांतील शब्दपरिपाठीचा उपसर्ग होऊं न देतां, तिचा उपयोग त्यांनीं या पुस्तकांतील भावार्थ समजून घेण्याकडे करून, हा ग्रंथ लिहिणारा मनुष्य कोण, व कशा प्रकारचा आहे, या विषयीं व्यर्थ चर्चा करीत बसूं नये. आह्मीं कोण आहों व कशा प्रकारचे आहों ही गोष्ट अप्रधान असून तूर्त गुप्तच राहिलेली बरी, आणि ती कळूनही कांहीं विशेष उपयोग आहे असें नाहीं. "वस्त्ररहस्य" ग्रंथाचें हृद्गत सांगणारी ही कोणी तरी आकाश-वाणी आहे इतकें तूर्त समजून ज्याला कान असतील त्यानें या आवाजाचें इंगित जाणून घ्यावें.

आणखी एका मुद्यावर वाचकांस इशारत करणें जरूर दिसतें. ती ही कीं, आमचे मनांत आपल्या वाडवडिलांनीं स्थापिलेल्या संस्थांविषयीं पूर्ण कळकळ वसत आहे. ही कळकळ कदाचित् असावी तितकी तीव्र नसेल, परंतु आमच्या वाडवडिलांच्या संस्थांचा अभिमान बाळगून आपल्या हातून बनेल तितकें त्यांचें मंडन करावें हाच आमच्या प्रयत्नाचा अंशतः मूळ उद्देश होता. अलीकडील निष्कारण व नवीन ढवळाढवळीची प्रवृत्ति बदलण्यास किंवा निदान तिचा ओघ बदलून तिच्या तडाक्यांतून जुन्या संस्थांचें रक्षण करण्यास चतुर पुरुषास ट्यूफेल्सड्राकच्या ह्या ग्रंथासारखें उत्कृष्ट साधन दुसरें मिळणें कठीण आहे.

आतां बाकीच्या गोष्टींविषयीं आह्मी इतकेंच सांगतों कीं, ट्युफेल्सड्राक ह्यूस्केक, किंवा, हा वस्त्ररहस्य नांवाचा ग्रंथ याशीं आमचा स्वतःचा जो संबंध आहे, त्यामुळें आमच्या न्यायप्रवृत्तींत यत्किंचित्ही फरक पडण्याची

भीति बाळगण्याचें कारण नाहीं. आम्हीं कोणत्याही गोष्टीवर पांघरूण घालणार नाहीं; किंवा एखादी गोष्ट फुगवूनही सांगणार नाहीं. खासगी रीतीनें आमच्या मित्रांनीं जी आमची स्तुति केली आहे, तीमुळें आमचा न्यायाचा कांटा बिलकुल ढळणार नाहीं. अर्थात् स्नेहामुळें जी पूज्यबुद्धि आमच्या मित्रांनीं दर्शविली आहे तिजबद्दल आम्हीं त्यांचे फार आभारी आहों; आणि टय़ूफेल्स्ड्राक साहेबांचे समागमांत असतांना तत्त्वज्ञान-लहरींचे जे अपूर्व तरंग आमच्या अंगावरून रात्रीं व दिवसा जात असत, व जें स्वर्गसुख त्यांचा समामग सोडल्यापासून आम्हांस पुन्हां प्राप्त झालें नाहीं, त्यांची आठवण मात्र या पुस्तकाचे संबंधानें आम्हांस वरचेवर होत राहील. परंतु त्याचें काय ? ग्रीक भाषेंत म्हण आहे कीं "प्लेटो हा आमचा

---

६ प्लेटो...ग्रीस देशांतील विख्यात तत्ववेत्ता. (ख्रि० पू० ४२९—३४७) याची आई सोलनच्या वंशांतली होती व त्याचा बाप अथेन्सच्या पुरातन राजघराण्यांतला होता. याचें मूळचें नांव अरिष्टोक्लीज असें होतें. पण त्याच्या मल्लविद्येंतील शिक्षकानें त्याचे रुंद बाहू व सशक्त शरीर पाहून त्यास प्लेटो ( भीम ) हें अन्वर्थक नांव दिलें. सामान्य शिक्षण व मल्लविद्या झाल्यावर त्यानें संगीत व काव्यरचना यांचा अभ्यास करून आलिंपस येथील यात्रेंत बक्षीस मिळविण्याकरितां एक काव्यही लिहिलें. परंतु तेथें साक्रेटिसचें एक व्याख्यान ऐकून त्यास उपरति झाली व त्यानें आपलें काव्य जाळून तो साक्रेटिसचा शिष्य होऊन राहिला. दहा वर्षें साक्रेटिस जवळ राहून त्याचे मृत्युनंतर (ख्रि० पू० ३९९ मध्यें ) अथेन्स सोडून त्यानें ज्ञानार्जनार्थ देशयात्रा आरंभिल्या. ता सिरीन येथें भूमिती व इतर गणित विद्या शिकला. नंतर इजिप्तमध्यें तेरा वर्षें राहून तेथील धर्मोपाध्यायांपासून जितकें शिकण्यासारखें होतें तेवढें शिकला. नंतर इटालींत युरिटस व अर्चिलास यांचा स्नेह संपादून सृष्टिचमत्कार पाहण्यास सिसिलींत गेला. तेथें सायरॅक्यूजचा राजा डायोनिशियस याचा व त्याचा स्नेह जमला, परंतु प्लेटोनें कांहीं गोष्टींत त्याची मर्जी मोडल्यामुळें ज्या जहाजांतून तो परत येणार होता त्याच्या मालकाडून डायोनिशिअसनें त्यास गुलाम म्हणून विकलें ! परंतु नंतर त्याच्या मालकानें त्याचे गुण ओळखून त्यास दास्यमुक्त केलें ! तो परत अथेन्स येथें आल्यावर अकॅडेसियाचें बागेंत तत्वज्ञानाचें शिक्षण लोकांस देऊं लागला. त्यावरून त्याच्या तत्वज्ञानास अकॅडेमिक्स असें नांव पडलें. सायरॅक्यूजचा नवीन राजा दुसरा डायोनिशिअस याच्या चुलत्याच्या आग्रहावरून पुन्हां तो सायरॅक्यूज येथें गेला होता; परंतु राजा आपल्या उपदेशाप्रमाणें चालत नाहीं. असें पाहून तो अथन्स येथें परत आला. तेथें पुष्कळच लोक त्याचे शिष्य बनले पुढें अखेरपर्यंत तत्वज्ञान व शास्त्र यांच्या चिकित्सेंत त्यानें आपला काळ घालविला. त्याच्या ग्रंथापैकीं फीडो ( ह्याचें भाषांतर झालें आहे ) हा ग्रंथ प्रश्नोत्तररूप असून त्यांत साक्रेटिसच्या अंत-

मित्र खरा, परंतु **सत्य** हें त्याहूनही **निकटतर** मित्र आहे." त्या प्रमाणेंच टच्यूफेल्सड्रूक जरी आमचा मित्र असला, तरी सत्य हें आमचें आराध्य दैवत आहे. आम्हीं ग्रंथपरीक्षण करूं लागलों, किंवा इतिहासावर लेख लिहूं लागलों, म्हणजे या जगाशीं आमचा असलेला संबंध आम्हीं विसरून जातों. आम्हांला कोणाची कडही धरावयाची नसते, किंवा कोणावर तुटूनही पडावयाचें नसतें. त्या वेळेस **असत्य** हा एक मात्र आमचा शत्रू असून त्याच्याशीं लढण्यांत आम्हीं सदैव तत्पर असतों. यांत कांहीं विशेष नाहीं; परंतु हल्लींचा काळ **पोकळ बडेजावी** व **ढोंगधतुरा** यांनीं इतका व्यापिलेला आहे कीं, जसें चिनांतील दुकानदार लोक आपल्या दुकानावर "येथें कोणास फसविलें जाणार नाहीं" अशी पाटी लावितात, त्याचप्रमाणें इंग्लंडांतील लेखकांस आपल्या वाचकांनाही अशी इशारत द्यावी लागते. आणि एवढ्याच करितां आम्हांस हें वर लिहिलेलें अभिवचन देणें जरूर वाटलें.

---

# भाग तिसरा.

## पूर्वींची आठवण

कपड्यावरील हा विलक्षण ग्रंथ पाहून सदर ग्रंथकर्त्याच्या अनोळखी वाचकांस जितकें नवल वाटले असेल त्यापेक्षां त्यांच्या खास मित्रांस कमी नवल वाटलें असेल असें नाहीं. निदान आम्हांला तरी असला ग्रंथ आमच्या

---

काळचें फार हृदयद्रावक वर्णन आहे व "प्रजासत्ताक राज्य" नांवाच्या ग्रंथांत उत्कृष्ट सामाजिक नीति वर्णिली आहे.

या पुरुषाचें विचार उदात्त, नीति निष्कलंक, व पारमार्थिक विचार स्पष्ट आहेत. त्याचे मुख्य सिद्धांत बऱ्याच अंशीं हिंदू धर्मांतील सिद्धांतासारखे आहेत ते असे:— (१) सर्व ज्ञानाची एकवाक्यता व निरनिराळ्या शास्त्रांचें परस्परावलंबित्व. (२) पदार्थांचें भासमान स्वरूप केवळ मायिक आहे. (३) इहलोकच्या जन्माचे अगोदर जीवात्म्याचें अस्तित्व. (४) जीवात्म्याची अनश्वरता किंवा चिरत्व. (५) मायाभ्रम (६) या भ्रमाचें निरसन व वैराग्य हेंच जीवाचें कर्तव्य (७) सद्गुणाचे चार प्रकार—विवेक, धैर्य, आत्मसंयमन, व न्याय.

हातीं पडेल असें कधींच वाटलें नव्हतें. टच्यूफेलसड्राक साहेबांच्या समागमांत आह्मीं होतों, तेव्हां तर ते अगदीं शांत व निरिच्छ असे दिसत. वेदांत[1] विषयास तेव्हांही ते वाहिलेले असतच; परंतु त्यांनीं जर कधीं काळीं एखादा ग्रंथ प्रसिद्ध केलाच तर तो हिजेल[2] अथवा बॅारडिली[3] यांच्या मताचे खंडणार्थ असावयाचा असा आमचा तर्क असे. कारण चमत्कार हा कीं, या दोन्ही ग्रंथकारांना ते एकाच ओळींस बसवीत. परंतु व्यवहाराचे भानगडींत शिरून, लोकांच्या मनास झोंबून लोकांत तट उत्पन्न करण्यासारखीं मतें ते प्रसिद्ध करितील असें आह्मांस कधींच वाटलें नव्हतें. आमच्या संभाषणांत कपड्या संबंधानें तात्विक विचार कधींही निघाल्याचें आह्मांस आठवत नाहीं. त्यांच्या उच्च, शांत गंभीर अध्यात्मांत[4] कांहीं ऐहिक उपयोगाची गोष्ट आह्मांस क्वचित् दिसलीच तर ती राज्यव्यवस्थे संबंधाची असून तीही केवळ काल्पनिक, व सद्यःस्थितीस न जुळणारी असावयाची. जेना[5] येथील ओकन[6] साहेबांशीं जो त्यांचा पत्रव्यवहार चाले त्यांत असे विचार असतील असा प्रसंगवशात् त्याजवर आरोपही असे. तथापि इसिस नांवाचे मासिकांतील अमुकच मजकूर त्यांचा असेल असें ह्मणण्यास अटकळी वांचून साधन नाहीं, हें खरें. तात्पर्य साहेब मजकूर हे नीतिशास्त्रावर एखादा ग्रंथ लिहितील असेंही कोणास वाटलें नव्हतें; मग उपदेशपर धर्मग्रंथाची गोष्ट तर लांबच राहिली.

आमच्या समोर प्रोफेसर टच्यूफेलसड्राक साहेबांनीं जे शेवटचे शब्द उच्चा-

---

१ वेदांत—परब्रह्मासंबंधी विचार.

२ हिजेल—जर्मन तत्ववेत्ता. ( १७७०—१८३१ ) यानें एक नवीन मत स्थापन केलें.

३ बाराडिली—जर्मन तत्ववेत्ता हा कँटचा अनुयायी होता.

४ अध्यात्म—आत्मज्ञान, जीवात्म्याचे प्रकृतिधर्माविषयीं शास्त्र.

५ जेना—जर्मनीतील एक नामांकित विद्यापीठ. गेल्या शतकाचे आरंभीं या विद्यापीठांत हंबोल्ट, फिची, ग्रीसबाक, शिलर, व शिलिंग हे प्रोफेसर होते. हे सर्व पुरुष त्यांच्या लोकोत्तर विद्वत्तेविषयीं फार नामांकित आहेत.

६ लारेंन्स ओकन—( १७७१—१८५१ ) हा स्वीडनमधील गृहस्थ असून तो जेना, म्यूनिच, व झूरिच येथील विद्यापीठांत वैद्यक व सृष्टपदार्थविज्ञान यांचा प्रोफेसर होता. याचे ग्रंथ सामान्य वाचकांस फार कठीण परंतु शास्त्रव्यासंगी पुरुषास फारच महत्वाचे आहेत.

रिले ते, व तेव्हांची वेळ याचें आह्मांस चिरकाल स्मरण राहील:— विसिनिचट्वो येथें सर्व शहाणे व मर्मज्ञ लोक जमण्याचे एक काफीचें दुकान आहे. हेंच काफीगृह तेथें पहिल्या प्रतीचें आहे. त्या काफीगृहांत ह्या वेळीं सर्व लोक बसले असून प्रोफेसर साहेबांनीं आपली चिलीम जरा बाजूस करून व आपला दारूँचा मोठा थोरला गलास भरून "ईश्वराचें व सैतानाचेंही स्मरणपूर्वक ( त्यांचें साह्य मागून) मी असें चिंतितों, कीं बिचाऱ्या गरीब लोकांची भरभराट होवो" असे मंद अभिनंदनपर शब्द त्यांनीं गंभीर व आर्त मुद्रेनें उच्चारिले व आपला गलास ओठांशीं धरिला. त्यासरशीं तेथें जमलेले लोक जे पूर्वीं अगदीं स्तब्ध होते, त्यांनीं सम्मती दाखल एकच गजर करून, दारूच्या असंख्य गलासांचा गुडगुड आवाज संपल्यावर सर्वांनीं प्रोफेसर मजकुराची वाहवा केली. ही वेळ रात्रीच्या अखेरीस तांबडें फुटण्याची होती. नंतर पुन्हां सर्वांनीं आपआपल्या चिलमी घेऊन मोठ्या उल्हासानें चिलमीच्या धुरानें अंतर्बाह्य तर्र झाल्यावर ते सर्व लोक उठले, आणि निजण्याकरितां जाऊं लागले; त्या वेळेस कित्येकांचे तोंडांतून "एखादे दिवशीं या बेट्याचे हाल कुत्राही खाणार नाहीं." असेंही उद्गार निघाले. त्यांतला भावार्थ असा कीं याला असल्या प्रजापक्षीय मतांबद्दल एखादे दिवशीं खचित सुळावर चढावें लागेल! असो बाहेर पडल्यावर "तो काफर कोठें गेला," असें ह्मणून कांहीं लोक इकडे तिकडे त्यास पाहूं लागले! परंतु ट्यूफेल्सड्राक हा बोळाबोळांनीं अगोदरच कोणीकडे निघून गेला होता! तेव्हांपासून त्यांची आमची आज पावेतों गांठ नाहीं.

सदर तत्ववेत्त्यास असल्या मंडळींत बसलेलें पाहून त्यांचें कर्तृत्व व उद्देश यांविषयीं असली अटकळ करण्यापेक्षां जास्त बलवत्तर आमचें

---

७ युरोपियन लोकांत दारूसंबंधानें धर्मप्रतिबंध अगदीं नाहीं. अलीकडे मात्र केन सारख्या महात्म्यांनीं मद्यपान निषेध सुरू केला असून त्यामुळें दारूचा खपही बराच कमी होऊं लागला आहे. इकडे आह्मां लोकांत पूर्वीं पासून धर्माचा प्रतिबंध असून आह्मांत तें व्यसन फारच वाढत चाललें आहे. इकडे चहाचें प्रस्थही माजत चाललें असून तंबाकूनें तर सर्वत्र अंमल बसविला आहे. हीं तिन्ही व्यसनें अत्यंत घातक असून तीं जरी युरोपियन लोकांनीं आणिलीं असलीं व त्यांच्यांत प्रचलित असलीं तरी त्यांचें बाईटपण नाहींसें होत नाहीं. यांचे परिणाम प्रकृतीवर कसे होतात याविषयीं शास्त्रीय माहिती आह्मीं पुस्तकांतरीं दिली आहे.

नशीब नव्हतें. तथापि हे शूर ट्यूफेल्सड्राक! आह्मीं तर परस्थच होतों पण त्या तुझ्याच डोक्यांत या पुस्तकांतल्या सारखे गंभीर विचार असतील असें कोणास तरी वाटलें असतें काय? आहाहा! त्या तुझ्या दाट, रांठ, व सडक केंसांनीं आच्छादिलेल्या डोक्यांतच, त्या शांत मुद्रेखालीं, असले अप्रतिम विचार घोळत असत ना? तुझ्या त्या रांठ भुवयांखालीं, सहज दिसण्यांत अगदीं स्तिमित, व तारवटल्यासारख्या खोल गेलेल्या डोळ्यांतच दिव्य अथवा राक्षसी कोणतें तरी अलौकिक तेज त्या वेळेसही चमकत असलेलें आह्मांस दिसत नव्हतें काय? त्याच वेळेस आह्मांस वाटे कीं, त्या डोळ्यांतील स्थिरता अपरिमेय गतीनें जाणाऱ्या पदार्थाच्या स्थिरतेसारखी असावी. जसा एखादा भोंवरा खूप जोरानें फिरत असतां स्थिर असल्या सारखा, किंवा पेंगल्या सारखा दिसतो, त्याप्रमाणें तुझ्या डोळ्यांतील स्थिरतेचें प्रत्यक्ष स्वरूप कांहीं निराळेंच असावें असें आह्मांस त्याचवेळेस वाटत होतें. पण केरकचऱ्यांत व अडगळींत विचार करीत व तंबाकू ओढीत दिवसाचे दिवस घालविणाऱ्या तुझ्या त्या लकतऱ्या घातलेल्या वामनमूर्तींत हें इतकें भव्य हृदय सांठविलें असेल याची आह्मांस कल्पनाही नव्हती. तरी या **संसारसागरांतील** खरें **मर्म** तुझ्याच लक्षांत येऊन तूं आपल्या दिव्य दृष्टीनें या **सृष्टीचें** हृद्गत जाणलेंस तसें आजपर्यंत कोणासही कळलें नसेल. त्याच तुझ्या हृदयांत सूक्ष्म रूपानें हा **वस्त्ररहस्य** ग्रंथ होताना? तुझ्या त्या तर्कमय अध्यात्मांत व अगदीं गरीब शांत सौजन्याशीं मिसळून असलेल्या तुझ्या पाखांडांतच या ग्रंथाचें मूळ होतें ना? पण थोरांची गोष्ट बहुधा अशीच असते. त्यांची योग्यता अगोदर कोणास कळतच नाहीं. व कधीं कधीं तर त्यांच्या संबंधानें भलत्याच अटकळी लोक करितात. प्रोफेसर मजकुरासंबंधानेंच पाहतां, त्यांच्या कर्तृत्वाबद्दल यत्किंचित् कल्पनाही आमच्या मनांत नव्हती, तेव्हांच त्यांनीं या विलक्षण ग्रंथाचा ताणा मागावर चढविला असून अद्भुत विचारांचें धोटें कोणास न कळत त्यांत वाण भरूं लागलें होतें!

या पुरुषाचे चारित्राची साधनें ह्यूसक्रेक साहेब आह्मांस कशीं मिळवून देणार हा एक मोठा प्रश्न आहे. यांत समाधानाची गोष्ट एवढीच आहे

८ ताणा—कापडांतील उभा दोरा; वाणा किंवा वाण—कापडांतील आडवा दोरा. हीं नांवें पडण्याचें कारण ताणा हा मागावर ताणून बसविलेला असतो व कापडाचें रंगरूप ( वाण—वर्ण ) मुख्यतः मागून भरलेल्या आडव्या दोऱ्यानें बदलतें.

कीं, या प्रश्नाचा विचार करण्याची जबाबदारी आमचेकडे नसून त्यांजकडे आहे. आह्मांला तर अनेक प्रयत्न केल्यावरून अशी खात्री वाटते कीं, विसिनिचट्वो येथें सरकारी दप्तरांतून किंवा मोठमोठ्या माहितगार लोकांच्या स्मरणांतून सुद्धां टच्यूफेल्सड्राक साहेबांच्या चरित्रास उपयोगीं पडण्यासारखी खरी माहिती मिळणें अशक्य आहेच; परंतु खोटी माहितीही कांहीं मिळण्याची आशा नाहीं! वाऱ्यानें जसा एखादा पक्षी एखादे स्थळीं यावा त्याप्रमाणें हेही गृहस्थ केवळ प्रसंगवशात् विसिनिचट्वो येथें आलेले असून चौकस लोकांनीं त्याच्या मातापित्यांची, जन्मभूमीची, उद्योगांची, व पुढील आशादिकांची बरीच चौकशीही केली होती. परंतु त्यांस कांहींच माहिती न मिळतां फुकट कष्टी मात्र व्हावें लागलें. बरें कांहीं माहिती प्रत्यक्ष त्यांसच विचारावी तर त्यांचा स्वभाव इतका शांत व एकलकोंडा आहे कीं त्यांस पर्यायानेंही अशी माहिती विचारण्याची मोठी भीति वाटते. शिवाय कोणी एकादा प्रश्न विचारलाच तर हंसत हंसत त्याची खरडपट्टी काढून बोलण्याचा ओघ फिरविण्याची हातवटी प्रोफेसर साहेबांस इतकी कांहीं साधली आहे, कीं त्यांस केलेले प्रश्न अगदींच निष्फळ होतात, व त्यापासून तसे प्रश्न करण्यास दुसऱ्यांनाही धीर होत नाहीं! जसा येशूख्रिस्त बापावांचून लोकांस तारण्यास उत्पन्न झाला, तसाच हाही कोणी दिव्यदेहधारी पुरुष लोकांस तारण्याकरितां अवतरला आहे, असें त्यांचे संबंधानें लोक कुचेष्टेनें नेहमीं बोलत असत. आणि त्यांच्या ऐतिहासिक व इतर प्रकारच्या अगाध माहितीमुळें, तसेंच जुन्या काळच्या किंवा परदेशांतील गोष्टींचें हुबेहूब व चटकदार वर्णन करण्याच्या हातवटीमुळें त्यांस कोणी सर्वगामी ज्यू ( नारदमुनी ) असेंही ह्मणत.

बहुतेक लोकांना तर प्रोफेसर मजकूर ह्मणजे कोणी मनुष्य आहे असें वाटण्यापेक्षां कांहीं वस्तु असावी असेंच वाटत असे. अर्थात् ही वस्तु त्यांना दिसे व तीपासून त्यांना समाधानही वाटे. परंतु ती तेथें आली कशी, व तिचा उपयोग कसा करावयाचा, याचीं कोणासच पंचाईत करावीशी वाटत नसे. जसे सूर्यनारायणाच्या शरीराचे माहिती विषयीं लोक उदासीन असतात

९ येशूख्रिस्ताची आई मेरी हिचें लग्न झालें होतें; परंतु ती मानव संभोगावांचून गर्भिणी झाली अशी बायबलांत कथा आहे. आपल्या पुराणांतही पांडवादिकांची उत्पत्ति अशाच तऱ्हेची वर्णिली आहे.

तसेच तेथले लोक प्रोफेसर साहेबांविषयीं असत. सूर्य हा आहे, आपणास दिसतो, व असाच तो असावासाही वाटतो. त्यापासून जितका फायदा करून घेतां येईल तितका आपण करून घेतों. पण त्याविषयीं याहून जास्त विचार आपण कांहींच करीत नाहीं. त्याचप्रमाणें ट्यूफेलसड्राक हा पुरुष त्यांच्या थोड्याशा मित्रांनाही वाटत असे. असे लोक सांपडले तर जर्मन युनिव्हर्सि-टींतच कांहीं असतील. हे लोक जिवंत आहेत असे जरी दिसतात, व त्यांचा कांहीं इतिहास असलाच पाहिजे असेंही जरी वाटतें, तरी पाहूं गलें असतां त्यांचा इतिहास कांहींच उपलब्ध होत नाहीं; व झालाच तर एखाद्या पर्व-ताच्या इतिहासाच्या तोडीचाच तो असावयाचा! पर्वताचा इतिहास काय, तर तो कोणा तरी अदृश्य शक्तीचे सामर्थ्यानें उत्पन्न झाला आहे, हळू हळू तो झिजतो आहे, त्यानें प्रकाशाचें परावर्तन होतें, व कितीही वजनाचा भार त्याला सहन होतो. ह्मणजे, या आभासमय जगांत ज्या अनंत अतर्क्य वस्तु आहेत, त्यांपैकीं हा पर्वतही एक असून तो दृश्य आहे, व स्पर्श झाला असतांही तो आपणास समजतो! इतकेंच.

सदरील गृहस्थास सरकारांतून वस्तुतत्वज्ञ असा किताब आहे; व वस्तु-तत्वांविषयीं त्यांना माहितीही पराकाष्टेची आहे. असें असतां या विषयावर-ही त्यांनीं कधीं व्याख्यान वगैरे दिल्याचें ऐकिवांत नाहीं. असें व्याख्यान देण्याचीं मुख्य दोन कारणें असतात. एक लोकहिताची कळकळ, व दुसरें लोकाग्रह. पण यांतून एकाही कारणावरून व्याख्यानाची संधी आली नसावी असें वाटतें. हल्लीं सर्व वस्तूंची प्रवृत्ति कमी जास्त वेगानें पृथःकरण होऊन पुनः कर्दमरूप[१०] आदितत्वांत सामील होण्याकडे असून, अशा वेळेस उदार जर्मन सरकारानें विसिनिचट्वो येथें नवीन युनिव्हर्सिटी स्थापन करून पुढें प्रसंग येईल तेव्हां कर्दमरूप आदितत्वांतून सृष्टीची पुनर्घटना होण्यासें मदत व्हावी, ह्मणून या युनिव्हार्सिटींत सदर प्रोफेसरांची नेमणूकही केली आहे; यांतच त्या सरकारास आपण आपलें कर्तव्य उरकलेसें वाटल्यासारखें दिसतें. कारण प्रोफेसर मजकुरांनीं आपल्या विषयावर व्याख्यानें देऊन,

---

१० ह्मणजे या पृथ्वींतील एकंदर पदार्थ कांहीं आदितत्वांच्या व्यवस्थित मिश्रणानें तयार झाले आहेत त्यांचें पृथःकरण होऊन तीं तत्वें अलग होऊन पुन्हां सर्व तत्वांचा एकच कर्दम किंवा खिचडा होईल.

किंवा शिष्य वर्ग वाढवून, वस्तुतत्वाचें ज्ञान प्रचालित करण्याची आजच जरूर नाहीं असेंच बहुतकरून त्या सरकारास वाटलें असावें; व तेवढ्या करितांच प्रोफेसर मजकुरांची नेमणूक केली असूनही त्यांस कांहीं वेतनाची तजवीज केलेली नाहीं. एवंच, मोठमोठ्या नामांकित गृहस्थांचे शिफारशी-वरून जरी प्रोफेसर मजकुरांची नेमणूक झाली असली, तरी नामांकित मनुष्य होण्यापलीकडे तीपासून त्यांस तादृश फायदा कांहींच झाला नाहीं.

आपल्या सुधारलेल्या सरकारानें चालू काळची उणीव जाणून लोकां-करितां एक प्रोफेसरची जागा मंजूर केली असून आतां वस्तुमात्र कर्दमरूप होऊन संसाराचें आभासमयत्व किंवा असाररूप कायम न ठरतां उलट प्रोफेसर साहेबांचे मदतीनें त्याचें सत्यत्व स्थापित होऊन त्याचें पुनरुज्जी-वन होईल, व तेणेंकरून जर्मनी आणि विसिनिचट्वो जगांत प्रमुख होऊन राहतील, याबद्दल तेथील सुधारलेल्या लोकांत तर फारच धन्यता वाटत आहे. त्याचप्रमाणें या नवीन युनिव्हर्सिटीस मिळालेले प्रोफेसर काम पड-ल्यास व्याख्यानें देण्यांत चतुर असून, व्याख्यानें देण्याजोगा आतां समय नाहीं असें आपल्या सुधारलेल्या सरकारास वाटेल, तेव्हां स्वस्थ राहून ते कडकडीत मौन-व्रतही चालविणारे आहेत, याचेंही लोकांस कौतुक वाटत आहे. परंतु इतकी जरी धन्यता व कौतुक वाटलें असलें तरी तें कायम राखण्यासारखें प्रोफेसरमजकूर यांजकडून कांहींच होत नसल्यामुळें तें टिक-णार किती? फार झालें तर नव्याचे नऊ दिवस! अर्थात् आह्मीं जेव्हां तेथें गेलों होतों, तेव्हांच या धन्यतेचा व कौतुकाचा मागमूस नाहींसा होत होता; फार तर काय, धूर्त लोक असेंही ह्मणूं लागले होते कीं, कित्येक राजकारणांवरून तेथील प्रधानमंडळावर लोकांची अप्रीति झाली होती ती दूर करून त्यांची मर्जी प्रसन्न करून घेण्याकरितां त्यांनीं केलेला हा एक कावाच असेल!

असो; ट्यूफेल्सड्रॉक साहेबांचा विसिनिचट्वो येथील लोकांशीं परिचय ह्मटला ह्मणजे, रात्रीं ते त्या काफीगृहांत जात, तेव्हांचा. या शिवाय इतर वेळीं आपल्या गांवांत सदरील गृहस्थ राहतात इतकेंही कोणाच्या ध्यानीं-मनीं वाटत नसे. या काफीगृहांत मात्र गग्गक नांवाच्या दारूनें भरलेलें आपलें टंबरेल हातीं घेऊन ते वर्तमानपत्रें वाचीत बसत. कधीं कधीं कांहीं गूढ विचारांत निमग्न असल्याप्रमाणें आपल्या चिलमींतून निघणाऱ्या तंबा-

खूच्या धुराकडे पहातच ते स्तब्ध बसलेले असत. व केव्हांही झालें, तरी त्यांना पाहून तेथें जमलेल्या लोकांस कौतुकानें प्रेमाचें भरतें येत असे. विशेषतः जेव्हां एखादें भाषण करण्याकरितां ते तोंड उघडीत तेव्हां त्या काफीगृहांतील सर्व लोक, अगदीं स्तब्ध होत, जणूं काय त्यांच्या तोंडांतून कांहीं अत्यंत महत्वाचे उद्गार निघावयाचे आहेत असें त्यांस अगोदर पासूनच कळलें असावें ! आणि खरोखरच, केव्हां केव्हां फार विचार करण्यासारख्या व लक्षांत ठेवण्यासारख्या गोष्टींनीं परिपूर्ण असा सरस्वतीप्रवाह प्रोफेसर साहेबांचे मुखांतून चाले; व एकदां त्याला पाझर फुटला आणि योग्य श्रोते मिळाले ह्मणजे ते तासचे तास त्या नादांत भाषण करीत असत. अर्थात् साहेब महसुफ यांना त्या श्रोत्यांविषयीं विशेष कळकळ किंवा नुसती त्यांची माहितीही नसल्यामुळें, या उद्गारांस जास्तच महत्व येई. आणि जसा एखादा रहदारीच्या रस्त्यावरील नळ, आपल्या पितळेच्या तोंडांतून, वाटसरू लोकांची लायकी गैर लायकी न पहातां, अगर आपण दिलेलें पाणी एखादी आग विझविण्याचे कामीं जातें अगर स्वयंपाकाकडे जातें याचीही बिलकूल पर्वा न करितां, एकसारखा वाहत असतो, त्याचप्रमाणें त्यांचाही सरस्वती प्रवाह चाले. फार तर काय, परंतु जसा तो नळ चालू असो अगर बंद असो, त्याची गंभीर मुद्रा कायम असते, तशीच यांचीही स्थिति असे.

तथापि आह्मांस हा एक ज्ञानतत्पर व शोधक इंग्रज आहे असें समजून इतरांपेक्षां आमच्याशीं टच्यूफेल्सड्राक साहेब फारच मोकळ्या मनानें वागत असत. परंतु त्यावेळेस साहेब महसुफांची योग्यता अगदींच आमचे ध्यानांत आली नसल्यामुळें त्यांचे संबंधानें ज्या गोष्टींचें बारकाईनें निरीक्षण केलें पाहिजे होतें त्यांजकडे आमचें लक्षच पोहोंचलें नाहीं. या गोष्टीची आतां आह्मांस हळहळ वाटते. प्रोफेसर साहेबांचे खास दिवाणखान्यांत प्रवेश होण्याइतकें भाग्य विसिनिचट्वो येथील तीन मनुष्यांचें सुद्धां नसतां, तो अलभ्य लाभ आह्मांस प्राप्त झाला होता. त्यांचें बिऱ्हाड सर्व [०१] वाघनासांत उंच ठिकाणावर असून तेथेंही अगदीं वरच्या मजल्यावर असे. त्याला विसिनिचट्वोचें शिखर ह्मटलें तरी चालेल, कारण इतकें उंच छपर दुसऱ्या कोणच्याही घराचें नसून, तें घरही उंचवट्यावर होतें. त्याला चोहोंकडून खिडक्या

---

०१ वाघनास =मायाचौक.

असून तेथून सर्व शहराचा देखावा दिसत असे. शहराच्या तीन बाजू त्यांच्या दिवाणखान्यांतूनच दिसत. चौथी बाजू त्यांच्या निजण्याच्या खोलींतून दिसे. त्यांच्या स्वयंपाकघरास दोन खिडक्या असत, त्या निराळ्याच. याप्रमाणें त्यांचा दिवाणखाना फारच मोकेशीर[१२] असून तेथून त्या अफाट शहरांतील जीवनकलेची[१३] सर्व हालचाल, व बहुतेक पेठा व रस्ते दिसत.

एके दिवशीं ट्यूफेल्सड्राक साहेब आह्मांस ह्मणाले :—"या ठिकाणीं "बसून हें सर्व गांधिलमाशांचें अथवा मधमाशांचें पोंवळें[१४] मला नेहमीं "स्पष्ट दिसतें. त्या मेण कसें करितात, मध कसा करितात, त्यांच्या "नांग्यांत विष कोठून येतें, आणि गंधकानें त्यांचा गुदमारा कसा होतो, "हें सर्व मला या ठिकाणावरून दिसतें. राजे साहेब जेथें खाना खाण्यास "बसतात व समोर ब्यांड वाजत असतो, त्या जागेपासून, तों त्या लहा-"नशा गल्लींत आपल्या दारांत बसून पोटाची खांच भरून काढण्याकरितां "सारखे शिवणकामाचे परिश्रम करणारी एक बिचारी निपुत्रिक विधवा "बाई संध्याकाळचे उन्हास पाठ देऊन बसते तेथपर्यंत शहरांतील "एकंदर गोष्टी मला दिसतात कारण या शहरांतील प्रार्थना मंदिराचे "शिखरास ध्वज आहे तो मात्र आमच्या घरापेक्षां उंच आहे. "इकडे जासूद लोक कातड्याच्या पिशव्यांतून आनंदाच्या व दुःखाच्या "बातम्या घेऊन धांवत आहेत, इकडे जाहागीरदार लोक चार चार "घोड्यांच्या गाड्यांतून बायकापोरांसह सहल करीत आहेत, इकडे हा "पायतुटका शिपाई आपल्या लांकडाच्या पायावर कष्टानें भीक मागत "हिंडतो आहे, इकडे हजारों गाड्या धान्यानें व इतर कच्या सजीव[१५] व "निर्जीव मालानें लादलेल्या, खडखड खडखड करीत येत आहेत, इकडे "वखारींतून तयार झालेल्या मालानें लादलेल्या हजारों गाड्या तशीच "खडखड करीत बाहेर चालल्या आहेत. या रस्त्यांतून अनेक गुणांनीं भरले-

---

१२ मोका—पाहण्याचेसंबंधानें अत्यंत सोयस्कर जागा.

१३ जीवनकला—हा शब्द येथें वेदांत शास्त्रांतील पारिभाषिक अर्थानें योजिला नाहीं. मनुष्यांतील अनेकविध चैतन्याचे व्यापार असा येथें सामान्य अर्थ आहे.

१४ पोंळें—मनुष्यजातीच्या प्राण्यांनीं गजबजलेलें शहर.

१५ सजीव माल—मेंढरें वगैरे.

"त्या अनेक वयाच्या जीवांचा प्रवाह वाहत आहे. या प्रवाहाचा उगम कोठून "झाला व तो कोठें जातो हें तुला ठाऊक आहे काय? हा प्रवाह त्या "**अनादींतून** येतो व त्याच **अनंताकडे** जात आहे. अरे हीं सर्व **भूतें** "होत. **भूत** ह्मणजे काय? **आत्म्याच्या** आधारावर दृश्य होऊन पुन्हां "अंतर्धान पावणारी वस्तु नव्हे काय? तशींच हीं सर्व आहेत. त्यांचें **भास-** "**मानस्वरूप** केवळ आपल्या इंद्रियांच्या साह्यानें कळणारें **आभासमय** "असून, त्यास पाया पाहतां केवळ **शून्याचा** आहे, व अनंत **काळ** हा "मात्र त्यांच्या मागें व पुढें आहे. हा समोर दिसणारा तांबडा पिंवळा पोषाख "व पिसें लावलेली टोपी घालून व पायास ममरेजी[१६] लावून फिरणारा स्वार आहे, "पण हा मनुष्य आजचा आहे, व **भूतकालाशीं** व **भविष्यकाळाशीं** "त्याचा कांहीं संबंध नाहीं; आणि तुमचें **बेट**[१७] (इंग्लंड) दोनहजार वर्षांपूर्वी "**हेंगस्ट** आणि **होर्सा** यांनीं उध्वस्त केलें त्या वेळेस याचा मागमूसही "नव्हता; असें तुला वाटतें काय? छे, छे! मित्रा असें ह्मणूं नको. या "**वस्तुमात्रास** व्यापून टाकणारी जी **इतिहासाची** विशाळ **सांखळी**, "तिच्यांतलाच हा एक दुवा किंवा कडी आहे! नीट लक्ष देऊन पहा, कांकीं "तो एकदा दृष्टीआड झाला, कीं पुन्हां दिसावयाचा नाहीं."

एके दिवशीं मध्यरात्रीं काफीगृहांतून आह्मीं आलों असतां प्रोफेसरसाहेब ह्मणाले, "अहाहा, प्रिय मित्रा येथें रहाणें ह्मणजे खरोखरच स्वर्गवास "होय. ही पहा पेठापेठांना रोषनाईची झालर लागली आहे. या दिव्यांचा "उजेड धुरांतून आणि हजारों प्राण्यांच्या श्वासोश्वासानें कोंदलेल्या हवें- "तूनही आपला मार्ग काढून **रात्रीच्या** कदीम सौराष्ट्रांत[१८] कांहीं हात "लांब पोंहोंचला आहे. प्रज्वलित **नक्षत्रमालारूप** दोऱ्यांनीं बांधलेले आ- "पले कुत्रे[१९] **यमराज** आकाश कटाहांतून नेत असतां त्यास या दिव्यां- "विषयीं फारच कौतुक वाटत असेल नाहीं बरें! या वेळेस सर्व व्यापार बंद

---

१६ ममरेज—घोड्यास टोंचण्याकारितां बुटांस अगर चढाऊ जोड्यांस जो फिरकीचा आंकडा लावितात तो.

१७ तुमचें बेट—(इंग्लंड.) हेंगस्ट व होर्सा या जुनाट काळच्या जर्मन योध्यांनीं पांचव्या शतकांत इंग्लंडवर स्वारी करून तें बेट उध्वस्त केलें होतें.

१८ कदीम = पुरातन; सौराष्ट्र = अंमलातला अफाट विस्तार,

१९ या कुत्र्यांचें वर्णन ऋग्वेदांतही आहे तें असें:—

" असून मध्यरात्रीची मधूम मधून अस्पष्ट गुणगुण मात्र ऐकूं येत आहे.
" छछोर लोकांचे रथ या वेळेस पलीकडच्या गल्ल्यांतून हिंडत असून आ-
" पल्या मालकांना रोषनाई केलेल्या मोठमोठ्या बंगल्यांतून पोहोंचवीत
" आहेत. दुर्दैवी व दुर्वृत्त लोक मात्र या वेळेस घुबडांप्रमाणें इकडे तिकडे
" शोक करीत व चाहूल घेत संचार करीत आहेत. जसें आजारी मनु-
" ष्याच्या झोंपेंतलें बरळणें व घोरणेंही **परमेश्वरास** ऐकूं येतें त्याप्रमाणें
" ही मध्यरात्रीची गुणगुणही **परमेश्वरास** खचितच ऐकूं येत आहे. या
" विषारी वातावरणाचे खालीं या वेळेस काय काय तरी प्रकार चालले आहेत!
" आनंदांत दंग झालेले लोक आहेत; दुःखांत चूर झालेले लोक आहेत; इकडे
" कांहीं माणसें मरत आहेत; कांहीं जन्मास येत आहेत. कांहीं लोक **भगव-**
" **त्कीर्तन** करीत आहेत, कांहीं **ईश्वराचे** नांवानें खडे फोडीत आहेत; व या सर्वां-
" भोंवतीं **रात्रीचें** आवरण पडलें आहे. हे दिमाखदार सरदार लोक आपल्या
" सुवासित केलेल्या दिवाणखान्यांत अजून बसले आहेत, व कांहीं आपल्या
" रेशमी मच्छरदाण्यांतून निजले आहेत. इकडे दरिद्री लोक गोधड्यांतून
" मुरकुंडच्या मारून पडले आहेत; व कांहीं नुसत्या गवतावरच पडून उपा-
" समारीनें निद्रासुखास आंचवल्यामुळें तसेच कुडकुडत बसले आहेत. इकडे
" जुगारींचा डाव ऐनरंगांत आला असून बिचाऱ्या व्यसनी लोकांचें दैव
" उघडें करून दाखवित आहे; आणि इकडे राजे साहेबांचें प्रधानमंडळ,
" खोट्या बुद्धिबळाचे डावाविषयीं नव्हे, तर **खऱ्याबुद्धीबळाचे** डावा-
" विषयीं खलबतें करीत आहे. या डावांतील मोहरे बिचारे हे पराधीन रयत
" लोक होत. इकडे **चोरट्या लग्नांचीं** खलबतें होऊन नवरीला पळवून नेण्या-

---

अतिद्रव सारमेयौ श्वानौ चतुरक्षौ शबलौ साधुना पथा।
अथा पितॄन् सुविदत्रानुपेहि यमेन ये सधमानं मदन्ति ॥
यौ तौ श्वानौ यम रक्षितारौ चतुरक्षौ पथिरक्षी नृचक्षसौ।
ताभ्यामेनं परिधेहि राजन्स्वस्तिचास्मा ननमीवंचधेहि ॥

यापैकीं श्यामशबल ( हे यमराजाचे कुत्रे ) हा तारकापुंज सप्तऋषींपैकीं तीन ताऱ्यांच्या कैवारांत आहे. त्यासच लागून कांहींसा पूर्वेस व दक्षिणेस भूतप ( यम ) हा तारकापुंज असून स्वाती हा त्यांतील योगतारा आहे.

२० चोरटीं—लग्नें यूरोपियन लोकांत बहुधा मुलगी प्रौढ झाली ह्मणजे लग्न होतें. लग्नाचे अगोदर नवऱ्यानें आपले सद्गुण प्रकट करून नवरीचें कोर्टशिप किंवा वशीकरण करावयाचें असतें. मग त्या उभयतांचा लग्न करण्याचा विचार झाला ह्मणजे मुलीच्या

" करितां नवऱ्यानें गाडी तयार करून आणिली असून तींत ही नवरी हर्ष व
" भयानें व्याकुल होऊन परहद्दींत जाऊन लग्न करण्याचे इराद्यानें मुका-
" ट्यानें बसत आहे. इकडे चोरटे लोक कुलपें व भिंती फोडण्याचीं आपलीं
" हत्यारें घेऊन गस्तवाले झोंपीं जाण्याची वाट पहात आहेत; मोठमोठ्या
" हवेल्यांतील दिवाणखानें रोषणाईच्या प्रकाशानें व आंतील मनुष्यांच्या
" आनंदातिरेकानें भरून गेले आहेत. इकडे हे तुरुंगांतील लोकांचे आरक्त
" नेत्र सभोंवतालच्या अंधारांतून दुसरे दिवसाच्या उजेडाकडे मोठ्या
" कष्टानें लागले आहेत—या सहा मनुष्यांना उजाडल्यावर सुळी द्यावयाचें
" आहे. तिकडून हा घणांचा आवाज ऐकूं येत आहे तो बहुधा त्यांचे सूळ
" तयार होत असतील त्याचाच असावा. यावेळेस येथें पांच लक्षांहून अधिक
" **पक्षरहित द्विपाद पशु** पृथ्वीवर आपल्या भोंवतीं आडवे पडले असून
" त्यांना विलक्षण स्वप्नें पडत आहेत. इकडे हे दारूबाज लोक झोंकांड्या
" खात बडबडत आहेत. इकडे ही बाई आपल्या आसन्नमरण झालेल्या
" पोराचे उशागतीं गुडघे टेंकून **ईश्वराचा** धांवा करीत त्या पोराचे सुक-
" लेलें ओंठ आपल्या अश्रुजलानें भिजवींत आहे. हें सर्व प्रकार या शह-
" रांत एके ठिकाणींच चाललेले असून हीं माणसें एकमेकांपासून भिंती
" आणि कवाडें यांनींच काय तीं विलग झालेलीं आहेत. जसे एखाद्या पिपांत
" खारलेले मासे कोंब कोंबून भरावे, किंवा एखाद्या गारुड्याच्या घागरींत
" पुष्कळ साप भरलेले असून त्यांपैकीं प्रत्येक साप आपलें डोकें इतरांवर
" काढण्याकरितां वळवळ करीत असतो, त्याचप्रमाणें धुरानें कोंदलेल्या या
" शहरांतील लोकांची स्थिति असून मी मात्र एकटा सर्वांहून उंच बसून
" येथें स्वर्ग-सुख अनुभवीत आहें."

ऐन रात्रीच्या वेळेस या विलक्षण विचारांचे भरांत त्यांची चर्या कशी दिसत असेल, व त्या चर्येवरून सदर विचारांचा परिणाम प्रोफेसर मजकुरांचे अंतःकरणावर कसा काय झाला असेल, हें पाहण्याकरितां आह्मीं त्यांजकडे बराच वेळ बघत होतों. परंतु दिवा लांब असल्यामुळें आह्मांस त्यांच्या नेहमींच्या चर्येंत कमी जास्त कांहींच दिसलें नाहीं.

अशा वेळीं प्रोफसर साहेबांस भाषणाचें भरतें येत असे. बहुधा ते

---

आईबापांची अगर पालकांची संमति मिळवावी लागते. चोरटीं लग्नें ह्मणजे ही वडिलांची संमति न घेतां अनोळखी गांवांत जाऊन लग्नें होतात तीं.

प्रसंगानुसार एखाद दुसरा शब्दच बोलत, किंवा अगदींच मुकाट्यानें बसून चिलमीवर चिलमी फुंकीत असत. त्यांचेकडे येणाऱ्या लोकांनीं वाटेल तर खुशाल बोलत बसावें आणि प्रोफेसर साहेबांनीं मधून मधून "हूं" करावें; नाहीं तर कांहीं वेळ इकडे तिकडे पाहून त्यानें आपलें निमूटपणें निघून जावें! या दिवाणखान्याची स्थिति फारच विचित्र होती. जिकडे तिकडे पुस्तकें व फाटके कागद पडले असून ह्मणाल त्या जिनसांचे तुकडे ताकडे तेथें असावयाचे. टेबलांखालींही बुकें पडलीं असून येथें एक पोथीचें पान फडफडतें आहे, तेथें एक फाटका हातरुमाल पडलेला आहे; येथें घाईघाईनें प्रोफेसर साहेबांनीं काढून टाकलेली कानटोपी पडली आहे. दोतींची तर एक रांगचरांग लागली असून मधून मधून भाकरीचे तुकडे[२१], काफीचे पेले व बशा, तंबाकूचे डबे, वर्तमानपत्रें, आगपेट्या, मासिक पुस्तकें, जोडे, बूट यांचा खच पडला आहे. त्यांचे घरीं **लिशन** ह्मणून एक ह्मातारी बाई होती. तिनें झाडलोट, बिछाना, धुणीं, भांडीं, चूल वगैरे सर्व संभाळिलें असून निरोप वगैरे नेण्याआणण्याचें कामही तीच करीत असे. घरची सर्व आणने तीच करी. ती फारच टापटीपशीर बाई होती. पण प्रोफेसर साहेबांच्या या दिवाणखान्यांत मात्र तिचें कांहीं चालत नसे. महिन्यांतून एकाद वेळ मात्र केरसुणी व दस्तरुमाल घेऊन नको नको ह्मणतां, तिनें आंत घुसून पुस्तकें व लेख यांशिवाय जें ह्मणून दिसेल त्या सर्वांची खरवड काढून टाकावी. या वेळेस आपले लेख तिच्या तडाक्यांतून वांचविण्याकरितां प्रोफेसर साहेबांची जी कांहीं धांदल उडे ती पुसूं नये. या प्रसंगास त्यांनीं धरणीकंप असें नांव ठेविलें होतें! या धरणीकंपाइतकी भीति त्यांना कशाचीही वाटत नसे. येथें असेच विचार करीत सदोदित, किंवा निदान केरकचऱ्याचा खच सांठून सांठून आंत बसावयास जागा नाहींशी होई-पर्यंत तरी, एकसारखें बसावयास सांपडलें असतें तरी प्रोफेसर साहेबांना तें पुरवतें. परंतु या **लिशन**पुढें त्यांचें कांहींच चालत नसे. **लिशन** ह्मणजे त्यांची केवळ उजवा हात होती. ती अगदीं हुबेहुब आमच्या दृष्टीपुढें दिसत आहे. इतकी शांत बाई कीं, कांहीं लोक तर तिला मुकी ह्मणूनच

---

२१. भाकरीचे तुकडे—युरोपियन लोकांचा आचारक्रम आपल्यापेक्षां इतका भिन्न आहे कीं त्यांच्या कांहीं गोष्टी आपणास अगदीं बेडगळ वाटतील. त्या लोकांत खरकटें अगर सोंवळें ओंवळें या तत्वांचा समावेश स्वच्छपणांत करितात.

समजत! ती बहिरट आहे असेंही एखाद्याला वाटावयाचें! कारण प्रोफेसर साहेबांशिवाय कोणीं बोललें तर त्याकडे ती लक्षच देत नसे! व त्यांच्याशीं तरी तिचा संवाद बहुतेक खुणांनींच होत असावा असें वाटतें. कारण एखाद्या मनकवड्याप्रमाणें त्यांच्या मनांत कांहीं हवेंसें वाटलें कीं, लागलेंच तर्कानें तिनें तें त्यांस आणून द्यावें. ती स्वस्थ ह्मणून कधींच बसत नसे. भांडीं घांसावयाचीं तिनेंच. निसणेंनिवडणें करावयाचें तिनेंच, झाडसारवण, स्वयंपाक, झाडून तीच करीत असे; परंतु तें करितांना कोणाच्या कानीं एवढा आवाज असा यावयाचा नाहीं; आणि इतकेंही असून अमुक गोष्ट करावयाची राहिली असेंही कधीं होत नसे. वेळच्या वेळेस सर्व कामें करून प्रोफेसर साहेबांस तिचाच उलट "जेवणाची वेळ झाली," "चहाची वेळ झाली" असा तगादा असे. तिची चर्या नेहमीं प्रसन्न असून तीवरून तिची परोपकारबुद्धि स्पष्ट दिसत असे.

वर सांगितल्याप्रमाणें त्या दिवाणखान्यांत परक्यांचा बहुतेक शिरकावच नव्हता ह्मटलें तरी चालेल. आमच्या शिवाय दुसरा परका गृहस्थ आह्मांस तेथें भेटला तो हॉफ्राथ ह्यूसक्रेक. ह्या गृहस्थाचें नांव व त्याचेपासून जो लाभ होण्याची आह्मांस आशा आहे त्याची माहिती वाचकांस पूर्वींच झालेली आहे. बहुधा प्रत्येक समाजांत मुग्ध, लांब मानेचे, छानछोक पोषाख करणारे, शांतताप्रिय असे कांहीं लोक असतातच. त्यांना ओळखण्याची खूण हीच कीं, पाऊस असो नसो, त्यांचे हातांत छत्री ही सदोदित असावयाची. जगांतील कारभार किती शहाणपणानें चालतात, व जर्मनींत काय आणि इतर देशांत काय, शेंकडा नव्याण्णव दरबारी लोक एका शंभराव्याचे तंत्रानें निमूटपणें वागणारे असून समजून किंवा नकळत त्याकडून कसे फसत असतात, हें जर आह्मांस पूर्वीं ठाऊक नसतें तर या गृहस्थास काउन्लिरची जागा कोणी, कशी दिली असेल याचेंच आह्मांस नवल वाटलें असतें; आणि हे काउन्सिलर कोठले, तर सर्व जर्मनींत अग्रगण्य मानलेल्या विसिनिच्टूवोचे! यांचे शरीर गबाळ्यासारखें, सडपातळ, व चालतांना दर पावलास हिसकल्यासारखें हालत असून त्यांची चर्या अशी आहे कीं, त्यांस पाहातांच त्यांचे मनांतील विचार अगदीं गोंधळलेले असावे असेंच लोकांस वाटतें. हे गृहस्थ कोणाही पुरुषास काय, व स्त्रीस काय, सल्लामसलत ती काय देणार! मात्र 'हा पुरुष केवळ **दयादेवीचाच** अवतार

आहे,' 'त्यांचे डोळे निळे असून प्रेमाश्रूंनीं सदा डबडबलेले असतात,' 'याचकांचे उपयोगार्थ त्यांची पैशाची पिशवी नेहमीं खुली असते,' इत्यादि अनेक स्तुतिपर उद्गार त्यांच्या संबंधानें लोकांचे तोंडीं असत; व ते साधार आहेत असेंच तूर्त आपण मानावें हें बरें; कारण, आपल्याला त्यांचेकडून चरित्रपर लेखासंबंधीं काम करून घ्यावयाचें आहे! वास्तविक पाहतां मनुष्याची परीक्षा करण्याचे कामांत टघूफेल्सड्राक साहेबांची हातोटी कोणास यावयाची नाहीं; आणि ते तर ह्यूस्केक साहेबांविषयीं असें ह्मणतात कीं "त्यांना बुद्धि आहे व कळकळही आहे, निदान पूर्वीं होती. "परंतु ती लोकांत प्रकट करावी कशी, हें त्यांस ठाऊक नसल्यामुळें ह्मणा, "किंवा दैवाची मेहेरनजर नसल्यामुळें ह्मणा, ते आतां आपले वेडसर व "थिजल्यासारखे झाले आहेत." आपल्या विषयीं प्रोफेसर साहेबांचें असलें मत, वाचून होफ्राथ साहेबांस काय वाटेल ते वाटो! परंतु इतिहासकार या नात्यानें असेल ती गोष्ट सांगणें हेंच आमचें कर्तव्य असल्यामुळें आह्मांस त्याबद्दल विशेष काळजी करितां येत नाहीं.

आतां ह्यूसक्रेक साहेबांसंबंधानें सर्वांस अत्यंत महत्वाची गोष्ट ह्मटली ह्मणजे त्यांचें टघूफेल्सड्राक साहेबांवर असलेलें प्रेम होय. प्रत्यक्ष ह्यूसक्रेक साहेबांचे इतिहासांत सुद्धां विशेष महत्वाची ह्मणण्यासारखी गोष्ट हीच आहे. **जानसन** साहेबांविषयीं जी पूज्यबुद्धि **बॉसवेल**[22] साहेबांत होती तशीच पूज्यबुद्धि **प्रोफेसर** साहेबांविषयीं **ह्यूसक्रेक** साहेबांचे मनांत आहे; आणि **प्रोफेसर** साहेबांकडून तिची फेडही **जानसन** साहेबांप्रमाणेंच होते! कारण आह्मीं तेथें असतांना **टघूफेल्सड्राक** साहेब या आपल्या भक्तास बाह्यात्कारीं तरी अगदींच मान देत नसून हा केवळ वेडसर मनुष्य असावा असेंच मानीत. **दया** हा गुण **प्रोफेसर** साहेबांचे अंगवळणीं पडला अस-

---

२२ बासवेल—( १७४०–१७९५ ) जानसनचा भक्त व चरित्रकार. जानसन ( सेम्युएल ) १७०९–१७८४. एक नामांकित इंग्रज ग्रंथकार. बासवेलची जानसनविषयीं इतकी पूज्यबुद्धि होती कीं जानसननें आपणाविषयीं कांहीं जरी ह्मटलें तरी ते त्यास प्रसादवत वाटे. बासवेलनें जानसनचें चरित्र लिहिलें आहे त्यांत आपल्याविषयीं जानसनचे निंदापर उद्गारही मोठ्या प्रौढीनें जसेच्या तसेच दिले आहेत! बासवेल हा केवळ या जानसनच्या चरित्रामुळेंच चिरायु झाला आहे.

त्यामुळें, व कृतघ्नतेचा दोष न यावा एवढ्याच करितां **ह्यूसक्रेक** साहेबांवर ते प्रेम करीत असतील असें वाटतें. इकडे **काउन्सिलर** ( ह्यूसक्रेक ) साहेब **प्रोफेसर** साहेबांपेक्षां वयानें वडील व श्रीमान् असून आपणांस प्रोफेसर साहेबांपेक्षां जास्त अनुभवशीर समजून, **प्रोफेसर** साहेब हे कोणी अवतारी पुरुष आहेत अशा भावानें ते त्यांजवर पुत्रवत् प्रेम करीत. टय़ूफेल्सड्राक साहेबांचें तोंड उघडलें कीं त्यांच्या **सरस्वती** प्रवाहास आपल्या हृदय मंदिरांत येण्यासाठीं खुला मार्ग देण्याकरितांच कीं काय, आपलें यांचेंही तोंड वांसावें! कान व डोळेही उघडे असतच; तात्पर्य त्या प्रासादिक वाणीचा लेशही फुकट जाऊं नये! प्रोफेसर साहेब बोलतांना थांबत तेव्हां तेव्हां हे मनापासून त्यांस वाहवा देत; त्याचे प्रकार दोन असत. एक घोगऱ्या घशानें खोकल्यासारखें करून हंसावें अगर “खरेंच, मलाही असेंच वाटतें!” असें ह्मणावें! तात्पर्य भोळसर लोकांची जी श्रद्धा मांत्रिकावर असते, तशीच श्रद्धा **ह्यूसक्रेक** साहेबांची **प्रोफ़ेसर** साहेबांवर असे.

अशा स्थितींत व असल्या वातावरणांत टय़ूफेल्सड्राक साहेब हे आह्मीं तेथें असतांना रहात होते; व अशा स्थितींत राहूनच ते विचार करीत असत. आणि हल्लींही बहुधा त्यांचा हाच क्रम चालला असेलसें वाटतें. आपल्या या उंच मोकेशीर दिवाणखान्यांत एकांतात बसूनच या निग्रही ऋषीनें आळस व अज्ञान यांशीं सामना केला असून येथेंच बहुधा त्यांनीं हा ‘ **कपडे** ’ या विषयावरील विलक्षण ग्रंथ लिहिला असावा.

दिसण्यांत हा पुरुष साधारण भरज्वानींत असावा. त्याच्या पोषाख वगैरेची इतर किरकोळ माहितीही आह्मांस बरीच देतां आली असती. परंतु ती आह्मीं देत नाहीं. वास्तविक पाहतां या काळांत जो **शाहणा** तोच **मोठा** असून लोकांच्या जिज्ञासेचा कल **राजे** वगैरे भपकेदार लोकांसंबंधीं माहिती मिळविण्याकडे नसून **तत्त्वज्ञ** लोकांच्या चरित्राकडे आहे. शिवाय आह्मीं कितीही लिहिलें आणि वर्णनें केलीं तरी मागें सांगितलेले चरित्रपर लेख आमच्या हातीं पडेपर्यंत टय़ूफेल्सड्राक साहेबांचें हुबेहुब चित्र वाचकांपुढें उभें करणें आह्मांस अशक्यच आहे. साहेब महसुफ यांचें चरित्र आज आह्मांपासून गुप्तच असून त्याची कांहीं अस्पष्ट कल्पना मात्र सध्यां आह्मांस करितां येण्यासारखी आहे. आणि वास्तविक पाहूं जातां “ **कपडे, त्यांची उपपत्ति व प्रभाव** ” या विलक्षण ग्रंथामध्यें त्यांचा

प्रत्यक्ष **आत्माच** आपणापुढें प्रगट असल्यामुळें अशा अर्धवट वर्णनाचे भानगडींत तूर्त न पडतां या ग्रंथाकडेच आपण वळावें हें बरें.

# भाग चवथा

## ग्रंथाचें विशिष्ट स्वरूप.

"वस्त्रें" या विषयावरील हा ग्रंथ आह्मांस सर्वथैव पसंत आहे असें ह्मणणें ह्मणजे केवळ व्याजस्तुति होणार आहे. कोणतेंही उत्कृष्ट व हिकमतीचें काम घेतलें तरी त्यांत कुशाग्रदृष्टि, विलक्षण हुषारी वगैरे कर्त्याचे गुण जसे दृष्टीस पडतात, तसेच मठ्ठपणा, दृष्टीची तरलता, व प्रसंगविशेषीं तर अगदीं आंधळेपणा वगैरे दोषही आढळणें साहजिक आहे. फार कशाला, प्रत्यक्ष **ईश्वराचे** सृष्टींतील **सूर्य** हा अगदीं अप्रतिम कुशलतेचें काम ना? परंतु त्यावर सुद्धां काळे डाग, प्रकाश-पुंज, वगैरे दोष आहेतच. तेव्हां याच ग्रंथांत कोणत्याही तऱ्हेची उणीव अगर दोष नाहीं असें ह्मणणें ह्मणजे सृष्टिधर्मास हा ग्रंथ मात्र अपवादक आहे असें ह्मटल्यासारखेंच होईल.

ह्मणून विसिनिचट्वो येथील वर्तमानपत्रांनीं या ग्रंथाची जशी पराकाष्ठेची स्तुति केली आहे तशी स्तुति करण्यास आह्मीं तयार नाहीं. तत्रापि आह्मांस एवढी एक गोष्ट कबूल केली पाहिजे कीं, हा ग्रंथ वाचल्यापासून आह्मांत कांहीं विलक्षण उद्योगशीलता संचार करूं लागली आहे; आणि कोणतेंही उत्कृष्ट पुस्तक झालें तरी त्याचा चांगुलपणा याच गोष्टीवरून व्यक्त होतो. सदर ग्रंथाचा परिणाम आमचे विचार-सरणीवरही बराच झाला असून आह्मीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें या प्रमेयरत्नाच्या विलक्षण खाणींत जसजसें खोल खणावें तसतशीं जास्त जास्तच प्रमेयें सांपडणार असून, कितीही विचारी लोक या कामीं खपले तरी तीं संपणार नाहींत. विशेषेंकरून आतां येथें इतकें सांगावयाचें कीं प्रोफेसर ट्यूफेल्सड्राक साहेबांची विद्वत्ता, शोधकपणा, विचारसरणीचा व भाषेचा जोरदारपणा, हे गुण या

पुस्तकांत उत्तम रीतीनें व्यक्त झाले आहेत. त्याचप्रमाणें फाजील बारकाईचीं वर्णनें, संदिग्धता, अनेकार्थता व अप्रासंगिक शब्दयोजना हे दोषही या ग्रंथांत आहेत. तात्पर्य जशी एखादी नवीन खाण काढतांना दगडधोंडे माती वगैरे निरुपयोगी व त्रासदायक पदार्थ असावयाचेच, त्याप्रमाणें या ग्रंथांत जरी अमूल्य प्रमेयरत्नें असलीं तरी वायफळ गोष्टीही बऱ्याच आहेत. ह्मणून इंग्लंडांत सर्वच लोक या ग्रंथास मान डोलावतील असें वाटत नाहीं. एकतर या ग्रंथाचा विषय **कपडे** हा आहे; शिवाय त्यांतील विचारसरणीवरून ग्रंथकाराचा रानवटपणा व एकलकोंडेपणा दिसून येतात. या गोष्टी जर्मन लोकांच्या दृष्टीनें कितीही साहजिक व क्षम्य असल्या तरी इंग्रज लोकांना त्या पसंत वाटणार नाहींत.

ट्यूफेल्सड्राक साहेबांनीं वरिष्ठ प्रतीच्या लोकांचे समाज बहुधा फारसे पाहिले नसावे किंवा त्यांतील चालीरीतींची त्यांस आठवण तरी नसावी असें वाटतें. कांहीं गोष्टींना आडपडदा पाहिजे त्या ते उघड शब्दांनीं बोलतात, व बहुतेक वस्तूंचा नामनिर्देश ते नुसत्या सामान्य शब्दांनींच करितात! उदाहरणार्थ, प्रार्थनामंदिरास ते सामान्य दिवाणखान्याप्रमाणेंच लेखितात! तेथें कितीही सुंदर व्यासपीठें, आरसे, गालिचे असले तरी प्रोफेसर साहेबांस त्याचें कांहींच वाटत नाहीं! ते ह्मणतात "मला तर या दिवाणखान्यांत कमजास्त कांहींच दिसत नाहीं. हाही एक अनंत आकाशाचा तुकडा असून यांत सांप्रत ईश्वरानें निर्मिलेले इतके जीव (प्रार्थनेच्या मिषानें) एकत्र जमतात, इतकेंच." ट्यूफेल्सड्राक साहेबांना एखादी राजकन्या सन्मान्य वाटेल, परंतु ती तिच्या जडावाच्या बांगड्यांमुळें किंवा भरजरी शालूमुळें वाटणार नाहीं. एखाद्या सरदाराच्या झबल्याचे चांद, व एखाद्या रानवट मनुष्याच्या कोटाच्या जस्ताच्या गुंड्या, हीं त्यांना सारखींच दिसतात. ते ह्मणतात "हे दोन्हीं जिन्नस अंगरख्याचीं पाखीं एकमेकांस चिकटून बसविण्याकरितां केलेलीं साधनें आहेत. दोन्ही धातू खाणींतून काढिल्या असून धातुकारांनीं घडल्या आहेत." याप्रमाणें आमचे प्रोफेसर साहेब येथील समाजस्थिति ठाऊक नसलेल्या, चंद्रलोकांतून पडलेल्या, एखाद्या नवख्या मनुष्यासारखे विलक्षण निःपक्षपात दृष्टीनें सर्व लोकांकडे व वस्तूंकडे पहात असतात. वास्तविक पाहतां या ग्रंथांतील उणीव, पाल्हाळ व तऱ्हेवाइकपणाचें दुसरे दोष याच कारणामुळें आले असतील असें वाटतें.

सर्व वस्तु ईश्वरस्वरूप आहेत अशा दृष्टीनें सर्वत्र पाहण्याची जी त्यांस संवय आहे तीमुळें, व त्यांच्या विलक्षण तत्त्वविचारामुळें या वरील गोष्टी त्यांचे ग्रंथांत आल्या नसतील, असें तरी कोणीं सांगावें? पण जर त्या त्याच कारणानें आल्या असतील तर मात्र प्रोफेसर साहेबांची धडगत दिसत नाहीं!

आपल्या देशांत तत्त्वविचार करणारे कांहीं लोक तरी असतील असें आह्मांस वाटतें; आणि अशा लोकांना हा ग्रंथ वाचण्याविषयीं आह्मीं बिनदिक्कत शिफारस करितों. शिवाय आमचे प्रोफेसर साहेब म्हणतात त्याप्रमाणें "अगदीं चोपून बसविलेल्या गळपट्टीखालीं प्राणवायूच्या नळ्या असतात, व भरजरी आंगरख्याखालींही हृत्पिंड उडत असतात[1]" हें जर खरें असेल, तर वरिष्ठ प्रतीच्या लोकांत सुद्धां या ग्रंथांतील गूढ, पण कळकळीनें दिलेल्या विचाररूपी चंद्राच्या किरणांनीं एखाद दुसऱ्याच्या तरी मनोरूप चंद्रकांतास द्रव येईल असें आह्मांस वाटतें. आपल्या पुराणांतून लोकांवर अनुग्रह करणाऱ्या व रानांत राहून कंदमूळांवर निर्वाह करणाऱ्या ऋषींचीं वर्णनें आहेत, त्यांपैकींच प्रोफेसर साहेब हे असून, जरी ते उदासीनवृत्तीनें राहत असले तरी त्यांचे लेखांत अनुभवाची तरतरी आणि स्वाभाविक जोर असा कांहीं आढळतो कीं सामान्य लेखकांत तसा असणें असंभाव्य आहे. या अतर्क्य **सृष्टी**विषयीं, व त्याहून अतर्क्य अशा या **मनुष्यजन्मांतील** कांहीं गोष्टींविषयीं, फार खोल व फार योग्य असे विचार या ग्रंथांत आहेत. स्थळविशेषीं सामान्य लोकांचे समजुतींत जेथें घोटाळा झालेला असतो, तेथें **सत्यतत्त्व** कितीही खोल असलें, तरी तेथपर्यंत मजल मारून अति निवडक शब्दांनीं सर्व वाग्जाळ तोडून टाकून अगदीं वरवर पाहणारांसही तें सत्यतत्त्व स्पष्ट दिसण्यासारखें केलें आहे; हें पाहून प्रोफेसर साहेबांचे चातुर्याबद्दल फारच चमत्कार व विस्मय होतो. परंतु सर्वत्र असाच प्रकार आहे असें मात्र नाहीं. अशी एखादी आश्चर्यानें चकित करून सोडणारी शिताफीची गोष्ट केल्यावर मग कित्येक पृष्ठेंपर्यंत अगदीं सामान्य गोष्टींवर कांहीं तरी चऱ्हाट लाविलेलें दिसेल; जणूं काय तें लिहित असतां साहेब मजकूर झोंपेंतच असावे! यूरोप, हिंदुस्थान, सयाम, चीन, अरबस्थान वगैरे सर्व ठिकाणच्या ग्रंथभांडाराशीं साहेब मजकुरांचा

१ ह्मणजे मनुष्य श्रीमान असला तरी त्यासही विचारशक्ति असते.

चांगला परिचय आहे हें येथें सांगण्याची विशेष जरूरी दिसत नाहीं. कारण जरी असलें सार्वत्रिक ज्ञान आमच्या लोकांना विलक्षण वाटलें, तरी जर्मन लोकांना त्याचें विशेष कौतुक वाटणार नाहीं. जर्मनींत असलें ज्ञान अवश्य असलेंच पाहिजे असा तेथील लोकांचा समज आहे. एकादा मनुष्य विद्वान् झाला तर यांत जर्मन लोकांना कांहींच नवल वाटत नाहीं; कारण ते ह्मणतात कीं जो शिकला तो विद्वान् झाला यांत नवल तें काय?

हें या पुस्तकांतील विचारसरणीसंबंधानें झालें. भाषेसंबंधानेंही पहातां या ग्रंथांत ग्रंथकाराचें कौशल्य स्पष्ट दिसून येत आहे. परंतु तेंही वर सांगितलेली ग्राम्यता, अप्रासंगिकपणा, व वरिष्ठ प्रतीच्या लोकांशीं दळणवळण नसल्यामुळें भाषेंत येणारे इतर दोष, यांनीं कलंकित झालें आहे. कांहीं ठिकाणीं पहावें तों त्यांची भाषा अत्यंत जोमाची व प्रसादयुक्त असते. प्रज्वलित यज्ञकुंडांत अग्निशिखेंतून जशी **स्वाहा** देवी प्रगट व्हावी त्याप्रमाणें त्यांचे उज्वल विचार उज्वळ अशा शब्दांचे द्वारें आपणांपुढें उभे राहतात. त्यांची भाषा अलंकारांनीं युक्त, रूढीशीं अनुरूप, अनेक तऱ्हेच्या उपमांनीं भरलेली व अर्थगंभीर आहे. कुशाग्र बुद्धीच्या मनुष्यास सुचणाऱ्या अचाट व खुबीदार कल्पना आणि **अद्भुत** व **भयानक रस** यांचें योग्य मिश्रण सर्व ग्रंथभर पसरलें आहे. परंतु कांहीं ठिकाणची भाषा झोपेंतल्या बरळण्याप्रमाणें असून बरेच ठिकाणीं पुनरुक्त्या, चर्वित चर्वण, आणि वेडगळपणाचे हेंगाडे उद्गार यांनीं भरलेली आहे. एकंदरींत पाहतां टच्यूफेल्सड्राक साहेब भाषेच्या संबंधानें चांगले निष्णात नाहींत असेंच ह्मणावें लागतें. फार झालें तर शेंकडा नव्वद वाक्यें शुद्ध असलीं तर न जाणों. बाकीचीं वाक्यें कोणाला पाय आहेत तर डोकें नाहीं, डोकें आहे तर कान नाहींत, याप्रमाणें अर्धवट असून त्यांची पूर्तता कंसें व क्षेपकें घालून करावी लागली आहे. कांहीं वाक्यें तर अगदींच अपुरीं असून पूर्तता होण्याकरितां मागल्या वाक्याच्या आश्रयास जावें कीं पुढल्या वाक्याच्या आश्रयास जावें या विवंचनेंत पडलीं असावींशीं दिसतात. असें जरी आहे तरी चमत्कार हा कीं, कितीही अर्धवट वाक्य असलें तरी त्याचेही अंगीं विलक्षण मोहक शक्ति आहे. या पुरुषाचे वाणींत अल्लडपणा सर्वत्र व्यक्त असून एक वाक्य गंध-

२ कंस—दुर्बोध शब्दांचे अगर वाक्यांचे स्पष्टीकरणार्थ कंसांत दिलेले पर्याय शब्द अगर वाक्यें. क्षेपकें—अर्थसंबंध स्पष्ट करण्याकरितां दिलेली किरकोळ माहिती.

वींचे मधुर गायनाप्रमाणें वाटतें तर दुसरें राक्षसाच्या भयंकर आरोळ्या-प्रमाणें वाटतें. तात्पर्य कोणचेंही वाक्य घेतलें तरी त्यांत विलक्षण जोरदार-पणा व मोहकता असून या अल्लडपणाचा समावेश प्रसाद[३] या गुणाखालीं करावा किंवा अयोग्यतेसारख्या दोषाखालीं करावा याचा आह्मांसच निवाडा होत नाहीं.

आतां प्रोफेसर साहेबांच्या अंतःकरणप्रवृत्ती संबंधानेंही आह्मीं असेच बुचकळ्यांत पडलों आहों. प्रोफेसर साहेबांची आह्मांस प्रत्यक्ष माहिती आहे तरी त्यांच्या मनोवृत्तींची चिकित्सा करणें आह्मांस अत्यंत दुर्धर झालें आहे. इकडे पहावें तों जसे सूर्याचे किरण चोहोंकडे फांकतात त्याप्रमाणेंच त्यांचे आत्म्यांतून दयेचे किरण सर्व जीवमात्राकडे फांकत असून, त्यांचे सौहार्दास व दयेस पारावारच नाहीं असें वाटतें. ज्याप्रमाणें एखादें पाखरूं आपल्या अंड्यांस पंखाखालीं आश्रयास धरून आपल्या आंगांतील रक्ता-च्या उष्णतेनें त्यांतील पिलांस जीव आणितें, तसेंच प्रेम, सर्व सृष्टींतील चरा-चराविषयीं आमच्या प्रोफेसर साहेबांमध्यें व्यक्त होत आहे. पण इकडे दुसऱ्या बाजूनें पाहिलें तर त्यांचे आंगीं इतकी विलक्षण उदासीनता दिसून येते कीं, ज्या गोष्टींकरितां मनुष्यें एकसारखीं धडपडत असतात त्या गोष्टी विषयीं त्यांना कांहींच वाटत नाहीं! त्यांचे चर्येवरून पाहतां त्यांना या जगाविषयीं कांहींच कौतुक वाटत नसून, विश्व हें एक अनेक पदार्थांनीं भर-लेलें खेळणें आहे व त्यांत राव रंक, देव दैत्य, बरें वाईट यांचा जो खिचडा आहे त्यापासून पोरास मात्र कौतुक वाटावें असें समजाणाऱ्या **मेफिस्टो-फिलिसाचा**[४] प्रोफेसर साहेब हे प्रत्यक्ष अवतार आहेत कीं काय असें वाटतें, इतक्या तिरस्कार दृष्टीनें ते या जगाकडे पहात असतात. त्यांची मुद्रा फार गंभीर आहे असें आह्मीं मागें सांगितलेंच आहे. पण ही गंभीरता आपले येथें कोर्टांत जबानी देणाऱ्यांच्या गंभीरतेसारखी नसून एखाद्या ज्वाला-मुखीच्या तोंडाशीं असलेल्या सरोवरांतील पाण्याच्या गंभीरतेसारखी असते. आंत पहाणाऱ्यांना अतोनात भय वाटतें कीं यांत नेत्ररूपानें जें हें तेज

---

३ प्रसाद—वाचकाच्या मनावर कोणच्याही प्रकारचा आघात न होतां अनायासें अर्थबोध होऊन आल्हाद होण्याचा काव्यांतील गुण.

४ मेफिस्टोफिलिस—गॉटच्या फास्ट नामक काव्यांतील भूमिका; अर्वाचीन काळां-तील सैतानाचा किंवा कलीचा अवतार.

प्रकाशत आहे तें न जाणों कदाचित् स्वर्गांतील नक्षत्रांचेंच तेज असेल, परंतु आंतल्या ज्वालामुखीच्या भयंकर ज्वालांचे उमाळे तरी नसतील कशावरून?

याप्रमाणें ट्यूफेल्सड्राक साहेबांचा स्वभाव अत्यंत गूढ व अपरिज्ञेय असल्यामुळें त्या संबंधानें कांहींच तर्क करितां येत नाहीं. आमच्या इतक्या परिचयांत त्यांना एकवेळ मात्र हसतांना आह्मीं पाहिलें. कदाचित् हेंच त्यांचें हास्य सगळ्या जन्मांत अव्वल अखेरचें असावें. तरी पण त्या अट्ट-हास्याचें वर्णन करणें अशक्य आहे. पुराणप्रसिद्ध **कुंभकर्ण**, तोही त्यानें जागा झाला असता. या अट्टहास्यास कारण जर्मनींतील अद्वितीय पुरुष **जीनपाल**[5] हे होत. काय त्यांचें वर्णन करावें! जणूं काय जगांतील **हास्य-रसाचा** महाशयच. हाय हाय! आतां तोही मृत्यूच्या तडाख्यांत गोंठून गेला ना! हा धिप्पाड पुरुष, व आमचे वामनमूर्ति प्रोफेसर साहेब इकडल्या तिकडल्या गप्पा मारीत होते. किती आमचें भाग्य कीं आह्मांस त्या वेळेस तेथें बसावयास सांपडलें! या वेळेस **पाल** साहेब छोटेसें अद्वितीय भाषण करीत होते. ओघानें सहज त्यांनीं ओतींव मूर्तीस राजा करण्याची कल्पना काढिली! ती ऐकतांच प्रोफेसर साहेबांचे डोळ्यांतून विलक्षण तेज तोंडावर फांकूं लागून त्यांच्या कुरूप चेहऱ्यांतही अत्यंत दैदीप्यमान सौंदर्याची छाया दिसूं लागली; आणि जे ते एकदम मोठ्यानें हसूं लागले तें कांहीं पुसूं नये. डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा चालूं लागल्या. हातांत चिलीम होती तो हात तसाच वर धरिला असून प्रोफेसर साहेबांचा एक पाय तर अगदीं आकाशांत चालला! इकडे हंसें एकसारखें खूप मोठ्यानें चाललें असून तें कांहीं केल्या आंवरेना! तें नुसतें तोंडांतूनच व्यक्त होत होतें असें नाहीं. त्या वेळेस प्रोफेसर साहेब नखशिखांत हास्यमय झाले होते, असेंच ह्मटलें पाहिजे. तेव्हां आह्मींही हंसलों, पण आमचे हंसण्यास परिमित होती. पण प्रोफेसर साहेबांची अवस्था पाहून आह्मांस तर वाटलें कीं, त्यांस वायु झाला कीं काय न कळे. परंतु कांहीं वेळानें त्यांचें हंसें आंवरलें. व नेहमींप्रमाणें त्यांची मुद्रा शांत व गंभीर होऊन तिजवर लज्जेची किंचित् झांक दिसूं लागली. मग **जीनपाल** बरेच वेळ बोलत होते. पण साहेबांची गंभीरता त्यांच्यानेंही मोडवेना! आमच्या कांहीं वाचकांना तरी **सामुद्रिक**[6]

५ जीनपाल एक जर्मन ग्रंथकार (१७६३–१८२५)

६ सामुद्रिक लक्षणें—हात पाय वगैरेवरील रेषांवरून किंवा कृतीवरून मनुष्याच्या गुणदोषाचें भाकित करणाऱ्या शास्त्रास सामुद्रिक असें ह्मणतात.

लक्षणें अवगत असतील. त्यांना हास्य लक्षणाचें महत्व किती आहे तें माहीत असेल. जो मनुष्य एक वेळ तरी मनापासून व निखालस हंसतो तो हाडाचा वाईट नसावयाचा. नुसतें हंसणें ही कांहीं सामान्य गोष्ट नाहीं; तर मनुष्याचें अंतरंग पूर्णपणें दाखविणारें हें सामुद्रिक लक्षण आहे. कांहीं मनुष्यें नेहमीं उगीच हंसल्यासारखीं दिसतात. परंतु त्यांचें हसें केवळ ओढून ताणून आणिलेलें वरकरणीं असतें. दुसरींही कांहीं माणसें हंसल्यासारखें करितात, पण त्यांच्या हंसण्यावरून हे पाषाणहृदयी लोक असावे असें स्पष्ट दिसतें. खरें हास्य ज्याला ह्मणावयाचें तें फारच थोड्या लोकांस साधतें; व ज्याला खरें हंसें येत नाहीं तो मनुष्य मोठमोठे गुन्हे करण्यासही मागेंपुढें पाहणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर खरोखर हास्य उत्पन्न करणाऱ्या गोष्टींपासून ज्याचे हृदयावर परिणाम होत नाहीं त्याचा सर्व जन्मच पापमय असून इतरांस फसविण्याचा तो एक पाशच होय, असेंही ह्मणण्यास हरकत नाहीं; असो.

ग्रंथकर्ता या नात्यानें पाहिलें असतां ट्यूफेल्सड्राक साहेबांमध्यें एक मोठाच अक्षम्य दोष आहे; तो हा कीं, त्यांचे ग्रंथांत विषयव्यवस्था कशी ती बिलकूल नाहीं. या विलक्षण ग्रंथांत कालानुक्रमानें गोष्टी सांगितल्या असल्यामुळें त्यांत कांहीं तरी व्यवस्था असावी असें सकृद्दर्शनीं वाटतें खरें; परंतु वास्तविक पाहतां तर्कशास्त्राचे अनुरोधानें जी व्यवस्था व पूर्वोत्तर संबंध असावयाचा त्याचा या ग्रंथांत कोठें मागमूसही नाहीं. प्रोफेसर साहेबांनीं या ग्रंथांत अनेक परिच्छेद व प्रकरणें घातलीं आहेत; परंतु खरें पाहिलें असतां त्यांच्या ग्रंथाचे मुख्य दोन भाग करावयास हवे होते; एक **ऐतिहासिक** व वर्णनात्मक, व दुसरा **तात्त्विक** व तार्किक. परंतु हा भेद त्यांचे ग्रंथांत स्पष्टपणें कोठेंच दिसत नाहीं; व त्यांनीं जे भाग ह्मणून केले आहेत त्यांतही अलग अलग विवेचन नसून ते एकमेकांत गुरफटलेले व एकमेकांच्या मर्यादांचें उल्लंघन करणारे आहेत. कांहीं भागांत तर कोणत्या विषयाचें विवेचन आहे याचाच पत्ता नाहीं. अशा अव्यवस्थेमुळें एखाद्या मोठ्या मेजवानींत भाज्या, चटण्या, कोशिंबिरी, सांबारीं, भात, पक्वान्नें वगैरे सर्व पदार्थ एकाच भांड्यांत घालून पाहुण्यापुढें ठेविल्यानें जशी त्यांची त्रेधा होईल तशीच त्रेधा या ग्रंथांत आमची होत आहे.

---

# भाग पांचवा



## वस्त्रधारी जग.



आमचे प्रोफेसर साहेब ह्मणतात " मांटेस्कूनीं[1] जसें कायद्यांचें रहस्य " लिहिलें तसेंच मींही वस्त्रांचें रहस्य लिहिल्यास कांहीं हरकत नाहीं असें " वाटतें. कायदेरहस्याच्या जोडीला आपणांत वस्त्ररहस्यही असलें पाहिजे. " वास्तविक पाहतां शिवणकाम काय, आणि कायदे करण्याचें काम काय " कोणचेंही झालें तरी तें आपोआप उगीच होत नाहीं. दोन्ही कामांत " हात एकसारखा चाललेला असतो; व तोही मनाच्या अतर्क्य प्रेरणेनें " चाललेला असतो. कपड्यांच्या निरनिराळ्या प्रकारांत व बेतबातांत कांहीं " तरी इमारत उभी करण्याची कल्पना आधारास असतें. **शरीर** ही या " इमारतीची जागा होय. **कापड व दोरा** हीं या इमारतीचें साहित्य होत. " या दोहोंच्या योगानें **पुरुष** ही सज्ज इमारत बांधावयाची असते. कारण " मनुष्यानें चीर्ण[2] घातलेले झगे घालून व फुलांसारख्या खडावा घालून " हिंडावें, किंवा घंटा लाविलेले कंबरपटे बाहुभूषणें आणि सुळक्या- " सारखी उंच टोपी घालून हिंडावें, किंवा खळ लावून घट्ट केलेले गळेबंद

---

१ मांटेस्कू—प्रसिद्ध फ्रेंच कायदे पंडित व ग्रंथकार ( १६८९–१७५५ ) यानें " कायद्याचें रहस्य " नांवाचा राजनीतिसंबंधी ग्रंथ लिहिला आहे. हा ग्रंथ लिहिण्याकरितां अनुभविक माहिती मिळविण्याचे हेतूनें त्यानें जर्मनी, हालंड व इंग्लंड या देशांत बराच वास केला. या ग्रंथास वास्तविक राष्ट्ररहस्य हें नांव पाहिजे होतें. या ग्रंथाचे तीन भाग आहेत; त्यांत अनुक्रमें प्रजासत्ताक राज्यव्यवस्था, मर्यादित राजसत्तात्मक व्यवस्था, व बादशाही किंवा अमर्यादित राजसत्तात्मक व्यवस्था यांचा फार सूक्ष्म व स्पष्ट उहापोह केला आहे; अर्थात, त्या काळपर्यंत अवगत असलेली राजनीति या ग्रंथांत चांगल्या रीतीनें व्यक्त केली आहे. या पुरुषानें " पर्शियन पत्रें " व " रोमन बादशाहीच्या उदयास्ताचीं कारणें " असे आणखी दोन ग्रंथ लिहिले आहेत.

२ चीण ( चूण )—परकर, लेहंगे, वगैरेच्या कंबरेंत, झग्याच्या पाठीवर, कुडत्यांच्या कफांना शिवणींत जी सुरकुत्यांची माळ करितात ती.

" व रूदार अंगरखे किंवा दुसरे विलक्षण प्रकारचे ओबड धोबड कपडे
" घालून लठ्ठ असल्यासारखें दिसावें, किंवा हातापायांस निरनिराळ्या गव-
" सण्या घालून चार अवयवांचा समूह अशाच रूपानें लोकांत वागावें, हें
" सर्व शिंप्यांच्या मनांत जी इमारतींची कल्पना असेल, तिजवर अवलंबून
" राहणार आहे. कपड्यांचे संबंधानें, कालांतराचे व देशांतराचे मानानें जे
" फरक दृष्टीस पडतात, ते याच कल्पनेच्या फरकामुळें होतात. त्याचप्रमाणें
" कपड्यांच्या रंगांतही फारच गूढ अर्थ आहे. अगदीं फिक्या डूबापासून[३]
" तों नजर न ठरण्यासारख्या सतेज रंगापर्यंत पसंतीसंबंधानें मनाचे अनंत
" कल दृष्टीस पडतात. अर्थात् काटछाटापासून जशी बेतणाऱ्याची बुद्धी
" व्यक्त होते, तसेंच कपड्यांच्या रंगावरून मनुष्याचें अंतःकरण व स्वभाव
" हीं व्यक्त होतात; व या दोन्ही गोष्टींसंबंधानें, व्यक्तिविशेषांत काय, व
" राष्ट्रांत काय, कार्यकारणसंबंध असतोच; मग तो कितीही गूढ व इतर
" विकाराशीं मिसळलेला असो. कातरीचा एक छाट सुद्धां कोणच्या तरी
" चालू असणाऱ्या विशेष कारणामुळेंच होत असून हीं विशेष कारणें बुद्धि-
" मान् लोकांस गोचर असतात यांत संशय नाहीं.

" अशा बुद्धिमान् लोकांस, जर कायद्याच्या रहस्याप्रमाणें वस्त्रांचेंही
" रहस्य कार्यकारणसंबंध दाखवून कोणीं लिहिलें तर तें शिळोप्याचे वेळेस
" करमणुकीला बरें होईल असें वाटतें. सामान्य लोकांना अशा तात्त्विक
" ग्रंथाचा कांहीं उपयोग होईल असें मला वाटत नाहीं. कारण मांटेस्क्यू
" झालें तरी त्यांचीं योग्यता ती किती? जसें एखादें गूढ पुस्तक एखाद्या
" पोरानें 'ट' 'फ' करीत वाचावें, तद्वतच अनादि काळापासून चालत
" आलेलीं जीं ईश्वरनिर्मित सूत्रें, त्यांवर **मांटेस्क्यू** सारख्यांनीं उहापोह
" करणें होय. आह्मी असले कपडे कां घालतों, किंवा असले कायदे कां
" पाळितों, हें सांगण्यांत काय आहे. हे कायदे पाळण्यास व हे कपडे
" घालण्यास आह्मी येथें कां आलों, हें जर कोणी सांगेल तर बरीक खरें.
" ह्मणून या वस्त्ररहस्य विषयाचा सारा जरी नाहीं तरी बराच भाग काल्प-
" निक, निष्फळ व अप्रासंगिक असें समजून एका बाजूस ठेवून, कांहीं

३ डूब—रंगात कापड एक वेळ बुडवून जो फिका रंग देतात तो.

" ठळक ठळक गोष्टी व त्यापासून निघणारे सिद्धांत मात्र लोकांपुढें नम्रपणें
" मांडावे एवढाच माझा अल्प हेतु आहे.

ट्यूफेल्सड्राक साहेबांनीं जरी वर सांगितल्याप्रमाणें दूर दृष्टीनें अल्प-संकल्प करून आपला विषय संकोचित केला आहे, तरी सुद्धां या ग्रंथांत फारच लांबवर, निदान आमच्या दृष्टीच्या टप्प्या पलीकडे, त्यांच्या विचारांच्या भराऱ्या गेल्या आहेत. अर्थात त्यांचे विचार लोकांपुढें ठेवितांना आह्माला निवड ही करावीच लागणार.आणि एवढ्याकरितांच त्यांच्या ग्रंथाच्या पूर्वार्धाचें मात्र निरीक्षण आह्मी येथें करणार आहों. या पूर्वार्धांतही प्रोफेसर साहेबांची सर्व विषयांतील विद्वत्ता व्यक्त होत असून हा भाग फारच शांततेनें व **न्यायतत्वास** अनुसरून लिहिलेला आहे, शिवाय त्यांतील सिद्धांत व वर्णनें इतकीं खुबीदार आहेत कीं, सार्वजनिक, मनोरंजक, उपयोगी व निरुपयोगीही ज्ञानाचा संग्रह करणाऱ्या लायब्रऱ्यांचें चित्त त्यांजकडे वेधलेंच पाहिजे. ज्या वेळेस ह्यूस्केक साहेबांनीं या ग्रंथाची प्रशंसा करून इंग्लंडांतील सारस्वताचे वैभवास कारणीभूत ज्या लायब्रऱ्या, त्यांना या ग्रंथाचे परिशीलन करण्याविषयीं शिफारस केली, तेव्हां त्यांच्या मनांत हाच भाग घोळत असेल असें वाटतें आणि हें जर खरें असेल तर लायब्रऱ्यांकरितां नवीन ग्रंथ करणारांनीं या शिफारशीकडे लक्ष्य पोहोंचवून या उत्कृष्ट खाणींत काम करण्यास आपलीं कंबर बांधावी हें योग्य आहे.

या भागांतील पहिल्या परिच्छेदांत नंदनवनादिकांचीं वर्णनें असून पौराणिक, औपमेय, वादग्रस्त, अशा अगदीं जुनाट विषयांचें विवरण केलें आहे. पण त्याशीं आपणांस कांहीं कर्तव्य नसल्यामुळें त्याची विशेष चिकित्सा करण्याची जरूर नाहीं. त्याचप्रमाणें बाबा **आदम**ची पहिली बायको **लिलिस** व तिजपासून झालेली हवेंतील, पाण्यावरील, व जमिनीवरील **पिशाच्य** संतति (ही उत्पन्न झाली नसती तर बरें झालें नसतें ? ), यांच्याशीं तर आपणांस कांहींच करावयाचें नाहीं. या परिच्छेदांतच पंच महाभूतें होण्याचे अगोदर जें एक आदितत्व होतें व ज्यापासून पंच महा-

---

४ न्यायशास्त्र—तर्कशास्त्र; प्रत्यक्ष नसलेली गोष्ट अन्य प्रमाणांवरून सिद्ध करण्याचें शास्त्र

५ लिलिस—आपल्याही पुराणांतील आदिपुरुष कश्यप यास दिती व अदिती अशा दोन बायका असून त्यांपासून अनुक्रमें तमोगुणात्मक व सत्वगुणात्मक प्रजा झाल्याचें **वर्णन आहे.**

भूतें उत्पन्न झालीं, त्यासंबंधानें व त्याचप्रमाणें उजेड व काळोख व्यक्त होण्यापूर्वीं उत्तरेकडे जें अव्यक्त तेजस्तत्व होतें त्या संबंधानें फार गूढ विचार केले असून, त्यांतील **अन्वय व्यतिरेक**[६] पद्धति, आणि जुन्या **हिब्रू** व **ज्यू** धर्मांतील ग्रंथांचें अगाध ज्ञान पाहून ग्रेटब्रिटनमधील कोणताही हिब्रूभाषा व्यासंगी पुरुष तोंडांत बोटच घालील इतकें या परिच्छेदाविषयीं सांगितलें ह्मणजे वाचकांस त्याची कांहीं कल्पना होईल.

परंतु ज्याची कल्पनाही होणार नाहीं अशा त्या जुन्या काळाच्या अलीकडे मजल मारून ट्यूफेल्सड्राक साहेब **बाबेल**[७]च्या मनोऱ्यानंतर मनुष्यजात या पृथ्वीवर सर्वत्र पांगली, त्या वेळेपासूनचा वृत्तांत सांगूं लागतात त्याकडे आतां वळूं. या परिच्छेदांत **हिंदुस्थान, ग्रीस, स्कॉंडिनव्हिया, मिसर देश, आटाहीट**[८] वगैरे ज्या ज्या देशांत अत्यंत धर्मोन्नति झाली होती, तेथील अर्वाचीन व प्राचीन काळच्या हरएक प्रकारच्या माहितीचे साह्यानें पृथ्वीवरील सर्व देशांतील व सर्व काळांतील लोकांच्या पेहरावांचें सूक्ष्म चित्र आपणापुढें मांडण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. जुन्या गोष्टींचा शोध लावणारे लोक, व इतिहासकार यांनीं या परिच्छेदाचा आदरपूर्वक स्वीकार केलाच पाहिजे. **विद्या** ह्मणावयाची ती या परिच्छेदांत दिसून येतें. हें विद्याभांडार येथें व्यवस्थित रीतीनें मांडलेलें नाहीं हें खरें; परंतु **नायविलंग**[९] राजाचें द्रव्यभांडार बारा गाड्या रोज तीन तीन खेपा करून सारखें बारा दिवस वहात होत्या तरी संपलें नाहीं, तसेंच हेंही भांडार अपार आहे.

---

६ अन्वयव्यतिरेक पद्धति— न्याय शास्त्रांत एखादी गोष्ट सिद्ध करण्याचे दोन प्रकार आहेत. कार्य व कारण यांपैकीं कार्यावरून कारणाचें अनुमान करणें यास अन्वय ह्मणतात जसें फलाण्यास औरस मुलगा आहे यावरून त्याचें लग्न झालें होतें हें अनुमान. परंतु कारणाभावावरून कार्याभावही समजतो. जसें अमक्याचें लग्नच झालें नाहीं या माहिती वरून त्यास औरस मुलगा नाहीं हें अनुमान. अशा अनुमानास व्यतिरेकानुमान ह्मणतात.

७ बाबेलचा मनोरा—बायबलांत अशी कथा आहे कीं, पूर्वीं सर्व मनुष्यांची एकच भाषा होती. परंतु मनुष्यांनीं जूट करून स्वर्गापर्यंत जातां येण्यासारखा मनोरा बांधण्याचा विचार केला व त्याप्रमाणें बाबेल येथें मनोरा बांधण्याचें काम सुरूही झालें. तेव्हां देवास धास्ती पडून त्यानें प्रत्येक मनुष्याची भाषा निराळी करून एकाचें बोलणें एकास कळूं नये असें केलें. त्यामुळें मनुष्य जातींत फाटाफूट होऊन मनोऱ्यांचें काम राहिलें!

८ आटाहीट—टाहिटी—दक्षिण पासिफिक महासागरांतील सोसायटी बेटांपैकीं एक बेट.

९ नायविलंग—एका जर्मन महाकाव्यांतील नायक.

शेळीच्या कातडयाचे झग्यापासून अनेक प्रकारचे व अनेक साहित्यांनीं तयार केलेले **कपडे** या भागांत आले आहेत; फारतर काय, **किलमारनाक**ची रात्रीची टोपीही त्यांतून सुटली नाहीं! मग काश्मिरी शालजोड्या वगैरेंची गोष्ट तर कशाला पाहिजे! तात्पर्य, जरी या परिच्छेदांतील माहिती अठरा धान्याचे कडबोळ्यासारखी व अव्यवस्थित अशी आहे, तरी या संबंधानें मिळणारी सर्व माहिती छापून येथें एकत्र केली आहे, एवढें तरी आह्मांस कबूल केलें पाहिजे.

**कपडयांच्या** या वर्णनांत मधून मधून **तात्विक विचारांची** मिसळ आहे; त्यापैकीं पुढें दिलेले उतारे पाहून आह्मांस मोठें कौतुक वाटतें. आमच्या प्रोफेसर साहेबांचे मतें कपडयांचा मूळ उद्देश अंगरक्षण किंवा लज्जारक्षण नसून भूषणांची इच्छा हें आहे. ते ह्मणतात:—"मूळच्या " रानटी लोकांची स्थिति पाहतां त्यांच्या अंगावर लांब लांब केंस असून " दाढी व डोक्याचे केंस ढुंगणापर्यंत लांब सोडलेल्या झग्याप्रमाणें सभोंवती " लोंबत असत. बाकीचे शरीरास दाट केसांनीं भरलेल्या कातडयाचें वेष्टण " असे. ते उघडया रानांत हिंडून रानफळावर आपला निर्वाह करीत; किंवा " **कॅलिडोनियांतल्या** प्रमाणें पाणवठयास बसून तेथें जीं जनावरें अगर " माणसें येतील, त्यांच्या मांसावर उपजीवन करीत असत. हातांशिवाय " दुसरें हत्यार त्याचेजवळ कांहींच नव्हतें. फार झालें, तर एक गारगोटी " मात्र असावयाची. ही गोटीच काय ती त्याची सर्व मालमत्ता व रक्षणाचें " साधन होय. ती आपणापासून जाऊं नये, ह्मणून तिला एक कातडयाची " दोरी बांधलेली असून त्या दोरीच्या योगानें त्यास ती गोटी परत घेतां " येई इतकेंच नव्हे, तर फारच जोरानें बिनचुक ती शत्रूला मारतांही येई. " तत्रापि **भूक व सूड**, या दोन गोष्टींची विवंचना दूर झाल्यावर त्याला " पुढची काळजी सुखाबद्दल नसून **अलंकार भूषणा** संबंधाची उत्पन्न " झाली. कारण पारधीच्या श्रमानें हवी तितकी ऊब त्याचे आंगांत येई. " शिवाय वाळलेल्या पानांमध्यें, किंवा झाडाच्या ढोलींत किंवा झाडाच्या " सालींनीं बांधलेल्या गुंफांत, किंवा रानांतील झुडपांच्या जाळ्यांतूनही " हवा तितका उबारा त्यास मिळत असे. परंतु भूषणांची **आवड** भाग- " विण्यास **कपडे** अवश्य होते. इतकेंच नव्हे तर या **रानटी** लोकांत कप-

१० किलमार्नाक (अयरशायर-स्काटलंड) येथील कानटोप्या पूर्वीं फार प्रसिद्ध असत.

" ह्यांचे आगोदर अंगास **रंग** लावण्याची चाल असे. यावरून रानटी
" लोकांमध्यें पहिली मनाची हाव **भूषणांची** होती हें निर्विवाद आहे. व
" हीच गोष्ट सांप्रतच्या सुधारलेल्या लोकांतही दिसून येते.

" वाचकहो **ईश्वरी** स्फूर्तीनें गाणारा **कवि**, अत्युच्च **सिंहासनावर** बसणारे
" **महाराज**, तुमच्याच स्वतःच्या मनांत अधिष्ठान करून बसलेली तुमची
" **प्रियपत्नी** कीं जिचे केस काळे भोर असून गालांचे गौर वर्णांत गुलाबी
" झाक मारिते, जी **वनदेवते** प्रमाणें हवेंत चालते कीं काय असें वाटण्या इतक्या
" नाजूकपणानें पाऊल टाकणारी, जिला तुह्मी अधिदेवता समजतां व जी
" खरोखरच **आदिदेवाची प्रतिमा**, ती सुद्धां या केंस ठेवलेल्या, गारगोटी
" फेंकणाऱ्या, नरमांस खाणाऱ्या, मूळच्या **रानटी** लोकांपासूनच उत्पन्न झालेली
" आहे! पवित्र शास्त्रांत लिहिलें आहे कीं, खाणारापासून खाद्य होतें व
" बलिष्टापासून मोहकाची उत्पत्ति होते, तें कांहीं खोटें नाहीं. प्रत्यक्ष **काळ**
" जरी कांहीं फेरबदल करीत नाहीं, तरी या **कालमार्गांत सृष्टीमध्यें** किती
" विलक्षण फेरफार होत आहेत! **मनुष्यजातचशी** काय, परंतु **मनुष्य**
" **जात** जें जें कांहीं करिते, जें जें कांहीं पाहते, तें तें सर्वच एकसारखें
" वृद्धिंगत होत असून त्याचें पुनर्जीवन आणि त्यांतील **जीवनशक्तिची**
" परिणति होत आहे. या सतत चालू असणाऱ्या जगांत तुझें एक **कृत्य**
" किंवा एक **शब्द** जरी पडला, तरी तो **बीजरूप** होऊन आज जरी त्याचा
" परिणाम आपल्या दृष्टीस पडला नाहीं, तरी तें **बीज** एक हजार वर्षांनीं
" एखाद्या वटवृक्षाच्या बेटाप्रमाणें किंवा, न जाणो, विषवल्लींच्या जाळ्या-
" प्रमाणें फैलावलेलें खचित दिसेल! एक यःकश्चित् **शब्द** किंवा यत्किंचित्
" **कृत्य** झालें तरी तेंही नष्ट होत नसून त्याचा वृक्ष, परिणाम रूपानें,
" अनंत काळपर्यंत, एकसारखा वाढत राहणार, यांत संशय नाहीं.

" ज्या इसमानें प्रथम **छापण्याची कला**[११] काढून लेखकांचे श्रम वांच-

---

११ छापण्याची कला—टाइपानें छापण्याची सुरवात जर्मनींत गटेनबर्ग व फास्ठ यांनीं १४५० त केली. गटेनबर्ग यानें लाकडाचें टाइप १४३८ तच उपयोगांत आणिले होते. मूळ छापण्याची कला चिनांत निघाली. पण ती कोणीं कधीं काढिली त्याचा आज मागमूसही नाहीं. परंतु इतकें खरें कीं ही कला चिनांत एक हजार वर्षांपूर्वीपासून उपयोगांत आहे.

" विले, त्यानेंच **पगारीफौजा**[१२], **राजे,** आणि **राज्यकारभाराच्या** सभा
" यांना नष्ट करून नवीन **प्रजासत्ताक** अंमल उदयास आणिला नाहीं
" काय? **सोरा, गंधक,** आणि **कोळसा**[१३] यांच्या पिठाचें मिश्रण कुटणाऱ्या
" मनुष्याच्या पहिल्या पहारीनें कडीपाटास एका क्षणांत भोंक पडलें;
" आतां शेवटची पहार काय करील याची कोणास कल्पना आहे काय?
" आजच्या अनुभवावरून अनुमान दृष्टीनें पाहतां ती शेवटची पहार

---

१२ पगारी फौजा---समाजाच्या आद्य स्वरूपांत सर्व लोक सारखे असून समाजांतील कोणच्याही भागास कोणच्याही प्रकारची अडचण आली तरी तिचें निवारण करण्यास प्रत्येकानें झटावें, असें असतें. असें होतांहोतां शूर, साहसी, व सार्वजनिक कामांत कळकळ वाळगणोर लोक पुढारी किंवा राजे होऊन बाकीचे लोक त्यांच्या तंत्रानें वागून समयीं त्यास साह्य करितात. पुढें कांहीं लोकांस इतर कामांच्या अडचणीमुळें किंवा अन्य कारणामुळें लढाईस वगैरे कामास जाण्यास सवड नसली ह्मणजे त्यानीं बदली देऊन किंवा पैशांचे रूपानें मदत करून आपले वरील जबाबदारी पार पाडावी असें होतें. अशा रीतीनें लष्करी नोकरीबद्दल पैसा द्यावा असें झालें ह्मणजे त्या पैशानें पगारी लष्कर उत्पन्न होतें. राजांचे मनांत जुलमाची प्रवृत्ति नसून पगारी लष्कराचा पगार देण्यास प्रजेनें स्वसंतोषानें दिलेल्या पैशावांचून अन्यसाधन नाहीं तोंपर्यंत ही तजवीज सोयीची असते. परंतु राजांच्या खजिन्यांत शिल्लक पुष्कळ होऊन किंवा कर्ज काढून लोकांचे मर्जीविरुद्ध पैसे मिळण्यास सवड असली, आणि राजे स्वतः पुरतेच पाहूं लागले ह्मणजे या पगारी फौजा लोकांचे इच्छेविरुद्ध लढाई करून राज्यविस्तार वाढविण्यास व प्रसंगीं लोकांवरही जुलूम करण्यास उपयोगी पडतात. आजपर्यंत जे जे जुलूम लोकांवर झाले ते बहुधा पगारी फौजांच्या जोरावरच झाले आहेत. शिवाय मनांत वैर नसतां, केवळ पोटाचा धंदा ह्मणून, दुसऱ्यांच्या इच्छेनें, तो मनुष्यें मारण्याचा निंद्य प्रचार या पगारी फौजांमुळें पडतो, निराळाच. खऱ्या प्रेमाच्या रडण्यांत व मोलाच्या रडण्यांत जें अंतर तेंच आत्मप्रवृत्तीनें लढणाऱ्याच्या शौर्यांत व या पगारी लोकांच्या शौर्यांत आहे.

१३ बंदुकीच्या दारूचा उपयोग हिंदुस्थानांत व चिनांत अतिप्राचीन काळापासून ठाऊक आहे. ग्रंथकाराच्या पुढील वाक्याची सत्यता हिंदुस्थानच्या आजच्या स्थितीवरून स्पष्ट होत नाहीं काय? हिंदुस्थानांतील लोकांच्या मानसिक शक्तिचा कमताकतपणा ह्मणजे शारीर प्रवृत्तीवर व तात्पुरत्या सुखाशेवर विवेकाचा अंमल न चालणें हेंच आमच्या सांप्रतच्या हीनतेचें खरें कारण आहे. दृष्टांतास महाराष्ट्रांतील प्रत्येक मनुष्याच्या पूर्ण अनुभवास आलेलें प्लेगचेंच उदाहरण घ्या. कोणच्याही गावीं प्लेग प्रथम होतो तो दुसऱ्या प्लेगदूषित गांवाहून प्लेगचें बीज येऊनच सुरू होतो. आणि हें प्लेगचें बीज गावांत येऊं न दिलें तर प्लेग होणार नाहीं. हें जाणून सरकारानें प्लेगदूषित गांवातून आलेले

" **शारीरिकशक्तीवर मानसिकशक्तीचा** पुरा अंमल बसवून **शारीरिक-**
" **शक्तीस** शरण येण्यास लावील यांत संशय नाहीं. ज्यावेळेस लोक गुरें
" राखण्याचा व्यवसाय करून उपजीवन करीत, त्या वेळची नुसती एक
" क्षुल्लक कल्पना घ्या. त्यावेळेस अदलाबदलीनें माल देत घेत असून
" मालाची किंमत बैलांचे संख्येवर असे. आपला बैल पाहिजे तो जिन्नस
" मिळेपर्यंत लोकांचे दारोदार हिंडविण्याची गैरसोय वाटून एका चाणाक्ष

---

लोक दूर ठेवून इतर लोकांस उपसर्ग होऊं नये, ह्मणून क्वारंटाइनची तजवीज केली होती. तींतील दोष दूर करून आपल्या पाहुण्याची गैरसोय होऊं न देतां आपलाही बचाव करून घ्यावा, अशा रीतीनें सत्याचरणानें सरकारास साह्य व्हावें हेंच विवेकाप्रमाणें आपलें काम होतें. पण आपल्या घरीं येणारे पाहुणे कोठून येतात हें आपणांस पक्कें ठाऊक असून लवाडीनें सरकारची व शेजाऱ्या पाजाऱ्यांची समजूत करून आपण त्यांस आंत घेतों व मूर्खपणानें वर्षांतले सहा महिने स्वत:स व इतरांसही घर पारखें करितों ! शिवाय इतक्या खटपटींत दरसाल लाखों मनुष्यें अकालीं मृत्युमुखीं पडतात, हजारों मुलांचे व गरीब बायकांचे पोशिंदे जाऊन तीं उघडीं पडणात, हजारों पोरांचें शिक्षण बुडतें आणि कायम प्रगतीच्या सर्व संस्था बंद पडतात तें निराळेंच ! इतकें हें कशा करितां ? प्लेग दूषित गांवाहून येणाऱ्या आमच्या पाहुण्यास कांहीं दिवस दूर राहण्याची गैर सोय न व्हावी ह्मणून!!! अशानें किती लोकांची किती काळपर्यंत सोय होते व किती लोकांची किती काळ पर्यंत गैरसोय व हानि होते याचा विचार केला ह्मणजे ज्यांनीं दुसऱ्यांस उपसर्ग पोहोंचूं नये ह्मणून " अहिंसा परमोधर्म:, " " परोपकार: पुण्याय, " वगैरे सूत्रें धर्मग्रंथांत घालून ठेविलीं व सूतकादिकांचे नियम केले त्यांचेच आह्मी वंशज आहों असें कोणास वाटणारही नाहीं. या प्लेगच्या संबंधांत प्रत्येकाचे पाहणें एवढेंच असतें की "या माझ्या पाहुण्यास दूर ठेविल्यानें त्यास थोडीशी गैर सोय खचित होणार; बरें, त्याचे बरोबर रोगाचें बीज आलें असेलच अशीही खात्री नाहीं. मग उगीच त्यास कां अडचण होऊं द्यावी ? ईश्वर रक्षण करणार समर्थ आहे. भिऊन काय होणार आहे ? ( हेंच कायतें आमचें हल्लींचें शौर्य ) तशांत जर रोग आलाच तर जी सर्वांची गत तीच आमची ! " असेंच प्रत्येक जण ह्मणतो. परंतु " माझ्या पाहुण्याबरोबर जर रोग आला, किंवा मी आपला पाहुणा घरांत घेतला हें पाहून दुसऱ्यानें घरांत घेतलेल्या पाहुण्याबरोबर जरी आला, तरी इतक्या भावी अनर्थाचें खापर माझ्या माथीं आहे ह्मणून आपल्या पाहुण्यासच थोडीशी अडचण झालेली पुरवली," असा कोणीही विचार करीत नाहीं !!! असेंच चाललें तर याचा शेवट उघड दिसत आहे. महाराष्ट्रांतील किंवा न जाणों सर्व हिंदुस्थानांतील **कीटकप्राय** माणसांचा संहार होऊन इतरत्र ज्या उद्योगी व धाडशी लोकांना जागेचा अत्यंत संकोच झाला आहे, त्यांस हवी तितकी उजाड पण अत्यंत सुपीक जमीन मिळेल. या गोष्टीकडे आमच्या राष्ट्रीय पुढाऱ्यांचें लक्ष कसें जात नाहीं ? कां या गोष्टींत राष्ट्रीय हितसंबंध **कांहींच नाहीं ! ! !**

" मनुष्यानें बैलाचें चित्र चामड्यावर काढून तें नांद्ये[14] बैलांचे ऐवजीं चालावें
" अशी युक्ति काढिली. नाण्याचें अव्वल स्वरूप हें. आतां यानें देवघेवीस
" सोय झाली; आणि आज कातड्याचे ऐवजीं सोन्या रुप्याची नाणीं झालीं
" असून त्यांनीं समाजांत किती उलथा पालथ केली आहे ती सर्वांस ठाऊक
" आहेच. **राष्ट्रीयकर्ज**[15] ह्मणजे काय हें कोणास ठाऊक नाहीं? ज्याच्या
" खिशांत पावली आहे, त्याला त्या पावलीपुरती सर्व लोकांवर सत्ता प्राप्त
" होते; त्याचा स्वयंपाक करण्यास आचारी मिळतो, त्याला शिकविण्यास
" तत्ववेत्ते मिळतात, आणि त्याचें रक्षण करण्यास त्या चार आण्यां पुरताच
" कां होईना, प्रत्यक्ष राजपुरूष पाहरा करण्यास मिळतो! हीच गोष्ट
" **कपड्यांची. कपडे** प्रथम प्रथम **भूषणा**करितां उत्पन्न झाले खरे.
" परंतु आज कपडे ह्मणजे काय नाहींत? भूषणाचे मागून जास्त **संरक्षण**
" व **ऊब** यांचें सुख मिळूं लागलें; पण ही केवळ क्षुल्लक बाब होय. परंतु
" **लज्जा**,–सर्व गुणांची अधिष्ठात्री **लज्जादेवी**, जिचा अंमल कपड्यापूर्वीं
" या नरमांस भक्षकाचे मनावर कधींच झाला नव्हता, ती या कपड्यांमुळें
" भूलोकीं अवतीर्ण होऊन मनुष्याच्या उत्तम गुणांचें वसतिस्थान होऊन
" बसली आहे. **कपड्यांनींच** आपणांस **आपलेपणा, व्यक्तित्व** व **समाज**

---

१४ नांद्ये—बैलाचें चित्र असलेलीं नांणीं–इंदूर येथील तांब्याचे नाण्यांवर बैलाचें चित्र आहे त्यांस नांद्येच ह्मणतात.

१५ राष्ट्रीय कर्ज—आह्मां लोकांस राष्ट्रीय कर्ज म्हणजे काय हें चालू राज्याचे आगोदर बहुधा ठाऊक नव्हतें, व अजूनही फारच थोड्या लोकांस ठाऊक आहे. पूर्वीं एखाद्या संस्थानिकास साह्य करावयाचें तें इतर संस्थानिक अगर सावकार पैशाचे रूपानेंही करीत. परंतु त्या पैशाचे फेडीबद्दल स्वतः राजाच जबाबदार असे. देवघेवींच्या कामांत राष्ट्र म्हणजे राजाहून निराळी संस्था अशी त्या वेळीं कल्पनाच नव्हती. हल्लींची स्थिति निराळी आहे. हल्लीं सरकार ( म्हणजे राजा नव्हे ) खाजगी लोकांकडून कांहीं व्याजाचे करारानें ठेवी-दाखल पैसे घेतें व त्या पैशाचा उपयोग राष्ट्रीय कामाकडे करितें. या ठेवींचे दस्तास प्रामिसरी नोट असें म्हणतात. या दस्तांचें बेचनही करितां येतें.इतर नोटा, ज्या पैशाचे ऐवजींच चालतात,त्यांची किंमत व नाण्यांतील हिणाचे वजनाची नाण्याचे भावानें होणारी किंमत, हेंही एक प्रकारचें राष्ट्रीय कर्जच होय. पण त्यास व्याज नसतें. व ही तूट भरून काढण्याची जबाबदारीही कोणाचे शिरावर नसते. व हें चलन देशांतल्या देशांत असल्यामुळें सरकारची पत आहे तों पर्यंत त्याविषयीं कोणी पर्वाही करीत नाहीं. हल्लीं हिंदुस्थानसरकारास १,८०,००,००० रुपये कर्ज आहे! ( पृष्ठ ४६ टीप १२ पहा )

" हीं दिलीं आहेत. **कपड्यांनीं** आपणांस **मनुष्य** पदवीस आणून सोडलें
' आहे. व आतां हे **कपडे** आपणांस केवळ **बाहुल्यांचे** स्थितीस आणितात
' कीं काय अशीही भीति आहे!"

अखेरीस आमचे प्रोफेसर साहेब ह्मणतात, " एकंदरींत पाहतां **मनुष्य**
" हा **साधनांचा** उपयोग करणारा प्राणी आहे. किती दुर्बळ, केवढासा
' आकार, दोन्ही पायांचा मिळून आकार फार मोठा झाला तरी अर्धा
' चौरस फूटही होणार नाहीं; उभा राहिला तर केव्हां पडेल याचा नेम
' नाहीं; वाऱ्याच्या झोंकासरशी कल जाऊं नये ह्मणून त्यास पाय फांकून
' उभें रहावें लागतें. इतका दुर्बळ द्विपाद प्राणी कोणी तरी पाहिला असेल
' काय? एका मणाच्या ओझ्यानें तो मरगळीस येतो. कुरणांतलें वासरूं त्यास
' एखाद्या चिंधीप्रमाणें फेंकून देतें. पण **साधनांचा** उपयोग त्यास करितां
' येतो; व त्यास **साधनें** उत्पन्न करितां येतात. या **साधनां**पुढें मोठमोठे
' पहाडही पिष्टप्राय होऊन पडतात. जशी कणीक तिंबावी त्याप्रमाणें लाल
' रसरशीत लोखंड त्यास तिंबतां येतें[१६], समुद्रावरून तो चालतो, आणि
' **अग्नि** व **वायू** यांजकडून तो घोड्याचें काम करून घेतो. **साधना**वांचून
' मनुष्य कोठेंच सांपडावयाचा नाहीं. **साधना**वांचून जर पाहिलें तर
' मनुष्य ह्मणजे कांहींच नाहीं. तोच **साधनयुक्त** झाल्यानें सर्वशक्तिमान्
' होऊन बसला आहे."

येथें क्षणभर थांबून आह्मांस इतकें सांगितलें पाहिजे कीं, '**मनुष्य** ह्मणजे
**साधनांचा** उपयोग करणारा प्राणी,' ही व्याख्या आह्मांस अगदीं योग्य
व निर्दोष दिसते. 'मनुष्य ह्मणजे हंसराणा प्राणी' अशीही एक व्याख्या
आहे. परंतु माकडेंही हंसत नाहींत काय? निदान हंसण्याचा प्रयत्न तरी
करितात कीं नाहीं? शिवाय ज्या मनुष्यांत मनुष्यत्वाचा अतिरेक असतो
त्यांत हंसण्याचे गुणाचाही अतिरेक असतो काय? फार लांब कशाला? ट्यूफे-
ल्सड्राक साहेबांचीच गोष्ट घ्या. ते तर सर्व जन्मांत एकदांच हंसले, असें
आह्मीं मागेंच सांगितलें आहे. फ्रेंच लोकांत मनुष्याची एक व्याख्या 'स्वयं-

१६ इंग्लंडांत कांहीं लोखंडाच्या कारखान्यांत दहा दहा खंडी लोखंडाच्या रसाच्या मुशी आहेत! आपलेकडे लोखंड व पोलाद ओतण्याचें काम पूर्वीं फार होत होतें; पण आतां परक्यांनीं शिकविलें तर येणार, इतकी दशा आली आहे.

पाक करणारा प्राणी[१७]' अशी आहे, ती तर अगदींच कुच कामाची असें आह्मांस वाटतें. शास्त्रीय ग्रंथांत तर ती अगदींच उपयोगाची कारण **तातार** लोकांत खान्याचें जनावर तयार करावयाचें ह्मणजे पळवून पळवून मारितात. या कृतीस स्वयंपाक ह्मणतां येईल **ग्रीनलंडांतील** मनुष्य पाहिला तर तो आपल्या व्हेल माशांचे चर्बीचे काढून सांठवून मात्र ठेवितो. पण हीच गोष्ट **मार्मट** नांवाचा प्र करितो. मग ही व्याख्या खरी धरिली तर मनुष्यांत आणि त्याच्यांत काय? त्याचप्रमाणें **हंबोल्ट**[१८] साहेब ह्मणतात कीं **ओरिनोको** **इंडियन** लोक झाडांच्या फांद्यावर कावळ्याप्रमाणें घरटीं करून रा व सहा महिनेपर्यंत जमिनीवर पाणी पसरल्यामुळें त्यांस एक प्रका मातीशिवाय दुसरें कांहींच खावयास मिळत नाहीं. अशा लोकांत स व्याख्या करणारे गृहस्थ गेले तर त्यांची काय स्थिति होईल! परंतु च्याही काळांतला, कोणच्याही देशांतला मनुष्य ध्या. त्याचे जवळ क कांहीं **साधनें** ही असलींच पाहिजेत. आतांच आह्मीं सांगितलेले **क्यालि यन** लोक पहा. त्यांचे जवळ एक **गारगोटी** व तिला लाविलेली एक तरी असेच. कोणत्याही इतर प्राण्याजवळ असलें **साधन** कधीं न **असणें** शक्यही नाहीं.

असो; टच्यूफेल्सड्राक साहेब या परिच्छेदाचा शेवट करितांना प ह्मणतात "मनुष्य हा **साधनांचा** उपयोग करणारा प्राणी असून क "या व्याख्येचें नुसतें एक उदाहरण होत. आणि खरोखरच प्रथ "मनुष्यानें **खुंटी** केली असेल, ती मध्यें आणि **लिव्हरपूल** येथें "लेल्या **आगगाड्या** अगर **ब्रिटिशपार्लमेंट** यांमध्यें असलेलें म "जर पाहिलें तर साधनांचे संबंधानें मनुष्याचें पाऊल किती सरसावलें "या विषयीं थोडीशी कल्पना होईल. मनुष्य हा कांहीं जातीचे काळे

---

१७ "मनुष्य ह्मणजे स्वयंपाक करणारा प्राणी" ही व्याख्या अर्ल आफ सेप मुख्य आचारी यूड ह्मणून होता त्यानें आपल्या "लासायन्स डि ग्वेल" या दिली आहे.

१८ हंबोल्ड--हा अतिविख्यात जर्मन तत्ववेत्ता विशेषत: त्याच्या प्रवास-वृत्त फार प्रसिद्ध आहे. हा सर्वश्रुत प्रवास त्यानें केवळ सृष्टपदार्थचिकित्सेकारितांच केला त्यामुळें त्यास बहुतेक राजांकडून अपूर्व बहुमान मिळाला. हें प्रवासवृत्त फारच लोकमान्य असून त्याचे शेंकडों ग्रंथ झाले आहेत. जन्म १७६९ मृ० १८५९.

' जमिनींतून उकरून काढून त्यांस ह्मणतो कीं 'मला आणि माझ्या य
' ओझ्याला दर तासास पस्तीस कोस प्रमाणें घेऊन चला' आणि ते दगड
" त्याप्रमाणें करितात! प्रसंगवशात् या सहाशें अठ्ठावन बाजार बुणग्या
" लोकांस एकत्र करून तो सांगतो कीं 'या अमक्या राष्ट्राला आमच्या
' करितां परिश्रम करण्यास, आंगाचीं रक्तें काढून घेण्यास, तहान भूक
' दुःख सोसण्यास व आमच्या करितां पातकें करण्यास लावा' आणि ते
' बिचारे निमुटपणें तसें करितात!"

# भाग सहावा

## मळवस्त्रें. ( पडदण्या )

टच्यूफेल्सड्राक साहेबांच्या समग्र ग्रंथांत **मळवस्त्रें** किंवा **पडदण्या** या विषया रील परिच्छेदा इतका ओंगळ व नापसंत परिच्छेद दुसरा नाहीं. इराणांतील ूर लोहार गावो[1] यानें केलेल्या बंडांत आपलें मळवस्त्र निशाण ह्मणून उभा- लें असून त्या बंडास यश आल्यामुळें आज तेंच मळवस्त्र उत्तम त्तम जवाहिराखालीं दडून **राष्ट्रीय निशाण** बनलें आहे; "माझ्या नवऱ्यानें ोटी शपथ घेऊन धर्मोपदेशकाचें काम करावें त्यापेक्षां मींच आज माझ्या ळवस्त्रानें त्याचें मुस्कट बांधून टाकावें हें बरें" असें ह्मणून **जान नॉक्स**[2]-

१ गावो—प्राचीन काळीं इराणचा राजा झोहाक यानें कांहीं सर्प पाळिले होते. व र्पांना तो आपल्या राज्यांतील माणसें मारून त्यांचें मांस घालीत असे! होतां होतां ावे नांवाच्या लोहाराचे तीन पुत्र या सर्पांचे अन्नाप्रीत्यर्थ खपले. त्या संतापाच्या भरांत यानें आपलें मळवस्त्र ( ठिणग्या वगैरे न लागाव्या ह्मणून लोहार लोक एक पटकूर समोर ांधतात तें ) निशाण ह्मणून भाल्यास लावून त्यानें बंड केलें. पुढें त्या बंडास यश येऊन िरिडोन हा राज्यावर बसला. त्यानें या मळवस्त्रासच राज्याचें कायमचें निशाण केलें. सलमान लोकांनीं इराण देश जिंकीपर्यंत इराणचें हेंच निशाण होतें.

२ जान नाक्स—स्काटलंडचा प्रख्यात धर्मोन्नतिकार ( १५०५-१५७२ ) हा प्रथम मन क्याथलिक असून त्या पंथाचा धर्मोपदेशक होता. परंतु आगस्टाइन व जेरोम या ाधूंचे ग्रंथ वाचून त्यास उपरति झाली व त्यानें क्याथलिक पंथ सोडला. त्यामुळें मुख्य र्मोपाध्याय बेटन यानें त्यावर पाखंडीपणाबद्दल खटला करून त्यास दोषी ठरविलें, परंतु

त्या मुलीनें प्रत्यक्ष राजास धमकी दिली; हंगारींतली संतमालिकेंत गेलेली जहागीरदारीण इलिझाबेथ इला 'गरीब लोकांस अन्न वाटूं नको' अशी तिच्या नवऱ्यानें ताकीद दिली असतां तिनें चोरून आपल्या पडदणींतून अन्न नेऊन लोकांस वाटिलें; वगैरे मळवस्त्रावरून प्रसिद्धीस आलेल्या ऐतिहासिक स्त्रीपुरुषांच्या गोष्टी जरी या परिच्छेदांत आल्या असल्या, तरी आह्मांस त्यांत कांहीं विशेष वाटत नाहीं. या परिच्छेदांत फाजील बारकाई व प्रसंग विशेषीं ग्राम्यपणाही स्पष्ट नजरेस येतो. उदाहरणार्थ या पुढें दिलेल्या वाक्यांचें काय प्रयोजन आहे? आह्मांस तर कांहींच दिसत नाहीं.

"मळवस्त्रें ह्मणजे सामान्यतः रक्षणाचीं साधनें होत. मनुष्यांचा स्वच्छ-
" पणा, अगर सुरक्षितपणा, अगर विनय व शुद्धता, व कधीं कधीं लबाडी
" यांस जी इजा पोहोंचण्याचा संभव असतो, त्या इजेपासून कपड्यांचें

---

नवीन सुधारलेल्या पंथाचा फार झपाट्यानें प्रसार होऊन क्याथलिक पंथाचा कट्टा भक्त बेटन याचा खून झाला व नाक्स हा आपल्या मतांचा उपदेश उघडपणें देवळांतील व्यासपीठावरून करूं लागला. परंतु १५४७ त फ्रेंच अरमारानें सेंट अंड्र्यूजवर हल्ला करून जान नाक्स व जे इतर लोक लढाईंत सांपडले त्यांस कैद करून नेलें व नाक्स यास रूवें येथील नावा वल्हविण्याचे सक्त मजुरीस लाविलें. या कैदेंत तो १९ महिने होता. तेथून सुटल्यावर तो इंग्लंडांत आला व त्या वेळचा राजा सहावा एवडर्ड यानें त्यास आपल्या वाड्यांत औपाधिकही दिलें. त्यास बिशपचीही जागा मिळत होती पण इंग्लंडांतील धर्ममतें आपल्या मतांशीं जुळत नाहींत हें पाहून त्यानें ती नाकारिली. मेरीच्या कारकीर्दींत तो फ्रँकफर्ट येथें जाऊन राणीच्या जुलमामुळें जे लोक देशत्याग करून तेथें गेले होते त्यांस उपदेश करूं लागला. हा पाखंडी आहे असें मेरीनें जर्मनीचे बादशहास कळवून तेथेंही त्यास त्रास दिला. तेथून तो जिनीव्हा येथें गेला. तेथें असतांना त्यानें "बायकांच्या पलटणीविरुद्ध ओरड" या नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध केला. सन १५५९ त तो परत स्वदेशीं येऊन राणीच्या व त्या वेळच्या धर्माध्यक्षाच्या विरुद्ध लोकांस उपदेश करूं लागला. त्याच्या उपदेशाचा लोकांच्या मनावर इतका परिणाम झाला कीं क्याथलिक पंथाच्या तिटकाऱ्यानें त्यांनीं क्याथलिक पंथाचीं सर्वधर्मपीठें व प्रार्थनामंदिरें उध्वस्त केलीं.

३ जान नाक्सची मुलगी एलिझाबेथ. तिचा नवरा जान वेल्श हा आयर (स्काटलंड) येथील धर्मोपाध्याय होता. त्यास त्याच्या सुधारलेल्या धर्ममतांबद्दल हद्दपार केलें होतें. त्यावरून एलिझाबेथनें खटपट करून राजाची भेट घेतली व आपल्या नवऱ्यास परत येऊं देण्याविषयीं अर्ज केला. राजानें सांगितलें कीं तो आमच्या नियमांस कबूल झाला तर असें करण्यास कांहीं हरकत नाहीं. या उत्तरावर एलिझाबेथनें सदरचें उत्तर दिलें.

योगानें हें रक्षण करावयाचें असतें. मळवस्त्राचे प्रकार बहुत आहेत. नरेन-बर्गच्या कारखान्यांतील सुशिक्षित बायका रेशमी विणलेले रुमाल मळवस्त्राची प्रतिमा म्हणून शोभेकरितां बांधितात, किंवा हिंदुस्थानांतील जहागीरदार भरजरी शेले वापरितात, तेथपासून तों गवंडी वगैरे लोक काम करितांना आपल्या कंबरेस कमाविलेलीं कातडीं बांधितात, किंवा लोहार लोक अर्धवट पोषाख करून आपल्या पुढचे अंगास लोखंडाचे पत्रे बांधितात तेथपावेतों शोभेच्या व उपयोगाच्या मानानें मळवस्त्रांत किती तरी भेद नजरेस येतात! या मळवस्त्रानें किती तरी गोष्टी झांकल्या जाऊन त्यांचा बचाव होतो! वास्तविक पाहतां कोटयावधी रुपयांच्या खर्चानें सरकार **लष्कर** व **पोलीस** ठेवितें, तीं तरी काय? तीं या समाजांचीं मळवस्त्रेंच होत. हीं रंगदार व लोहप्रचुर मळवस्त्रें घालून, सैतानाच्या भट्टीसारख्या या जगांतील ठिणग्या व मळ यांपासून आपला बचाव करून हा समाजरूपी घिसाडी येथें बऱ्याच प्रयासानें काम करितो! **धर्मोपदेशक** व **आचार्य** हेही आपलीं मळवस्त्रेंच होत. परंतु एकंदर मळवस्त्रांत या शेवटच्या मळवस्त्रांचें मला फारच कोडें पडलें आहे. या मळवस्त्रांचा **उपयोग** काय? शब्दशः पाहिलें तर एपिसकोपस (हा धर्मोपदेशकाचा सामान्य हुद्दा आहे) म्हणजे **आत्म्यावर** देखरेख ठेवणारा असा अर्थ आहे. पण हे आचार्य पाहिले तर जसें कांहीं आपलें काम आटोपलें आहे याप्रमाणें एका बाजूस अगदीं स्वस्थ झोंप घेत आहेत!"

त्याचप्रमाणें हा दुसरा उतारा पहा. असला बाष्कळ **मजकूर** आमच्या वाचकांच्या आढळांत कधीं तरी आला होता काय? "पॅरिसचे आचारी लोक **मळवस्त्राचे** ऐवजीं **वर्तमानपत्रें** घेतात हें पाहून मला असें वाटतें कीं **छापण्याच्या कलेस** व अर्थात् त्या देशांतील **सारस्वतास** हें एक नवें उत्तेजकच झालें असून आपण त्याचें अभिनंदनच केलें पाहिजे; आणि लंडन येथील एका प्रसिद्ध व्यापाऱ्यानें हा प्रचार इंग्लंडांत घालण्याकरितां एक संस्थाही काढिली आहे असें ऐकून तर मला फारच संतोष झाला." काय हें लिहिणें! आम्ही आजन्म प्रत्यक्ष इंग्लंडांतच राहोंत, पण आमच्या कानावर तर अशी कांहींच गोष्ट आलेली नाहीं; आणि जरी आमचें सारस्वत आज फार फोंफावलें आहे तरी आचाऱ्यांची सोधणीं बनण्या इतकी आज त्यांतील लेखांस पाळी आली नाहीं या गोष्टीचा आम्हांस

संतोषच आहे. असो. ट्यूफेलसड्राक साहेब पुढें काय म्हणतात पहा " जर
" छापील कागद इतके झाले कीं आमच्या गल्ल्या व रस्ते बंद पडावे, तर
" अर्थात् त्याबद्दल कांहीं विशेष तोड काढावी लागेल. आतां, हें जग
" उद्योगावरच चाललें आहे अशा स्थितींत विस्तवाचा उपयोग कांहीं तरी
" नवीन वस्तु बनविण्याकडे न करितां, तयार झालेल्या वस्तु जाळण्याकडे
" त्याचा उपयोग करणें आमच्या कांहींसें जिवावर येतें; हें खरें. तथापि
" ईश्वर सर्वशक्तिमान आहे; तो कांहीं तरी मार्ग दाखवीलच, तूर्त सालिना
" खंडोगणती चिंध्या उकिरड्यांतून वेंचून, पाण्याच्या व आगीच्या सहा-
" य्यानें त्यांचे कागद बनून, ते छापून विकून पुन्हा ते उकिरड्यांत यावे;
" व या प्रदक्षिणेंत अनेक कुटुंबांचीं त्यावर पोटें भरावीं ही ईश्वरी योजना
" किती विलक्षण आहे ? तात्पर्य चिंध्याचा उकिरडा म्हणजे सांप्रत एक
" प्रकारचें विद्युद्ग्राहक यंत्रच असून तेथून या अफाट संसारांतील मनुष्यांचे
" उद्योग हीच विद्युत उत्पन्न होऊन पुनः तेथपर्यंत येऊन मिळते.[३]"
मनुष्यजातीविषयीं आम्हांस जात्याच अभिमान असल्यामुळें असले उद्गार
वाचून आम्हांस कसेंसेंच होतें.

पुढें हा एक उतारा आमचे दृष्टीस पडतो :—" सांप्रत काळीं ग्रंथकार
" व वर्तमान पत्रकार हेच खरे राजे व खरे धर्मोपदेशक होत; आणि जे
" इतिहासकार मूर्ख नसतील त्यांनीं तरी ट्यूडर, बोरबोन, हॅप्सबर्ग[४] वगैरे
" राजकुलाचा इतिहास लिहिण्याचा नाद आतां सोडून देऊन छापील अष्ट-
" पत्री, षोडशपत्री, चतुष्पत्री वगैरे ग्रंथांचे, आणि वर्तमान पत्रांचें व त्यांतील
" लेखकांचे इतिहास लिहिले पाहिजेत. एकंदर वर्तमानपत्रांत इंग्लंडांतील
" वर्तमानपत्रांचा नंबर पहिला असून त्यांची गुप्त बातम्या मिळविण्याची
" तजवीजही फारच आश्चर्यकारक आहे; व त्यांचा इतिहास सैतानाचें

---

३ विद्युद्ग्राहक यंत्राची सामान्य रचना अशी असते कीं एके ठिकाणीं घर्षणाचे योगानें किंवा रसायणाचे क्रियेनें पदार्थांतील धन व ऋणविद्युत् निरनिराळी केलीं असून त्यांस वाहक तारा लाविल्या असतात. या तारांचा निकट संयोग होऊन दोन्ही विद्युत्प्रवाहांची प्रदक्षिणा पुरी झाली ह्मणजे विजेचीं कार्यें होऊं लागतात.

४ ट्यूडर, बोरबोन, व हप्सबर्गचीं राजघराणीं—ट्यूडर घराणें इंग्लंडांत, बोरबोनचें फ्रान्सांत, व हप्सबर्गचें आस्ट्रियांत, फारच इतिहासप्रसिद्ध झालीं.

" अदृश्यजग या नावाचा इंग्रजी भाषेंत झालाही आहे. पण मोठी खेदाची " गोष्ट ही कीं, तो ग्रंथ विसिनिचट्वो येथील एकाही लायब्ररींत मला " सांपडत नाहीं. "

यात्रमाणें आमचे कविराज प्रसंगविशेषीं नुसत्या डुलक्याच घेत नसून मधून मधून निदसुरानें बरळतही असतात. जेथें आपलें कांहीं काम नाहीं तेथें तोंड घालून डाकिणीसंबंधीं आज उपलब्ध असलेल्या ग्रंथास "ब्रिटिश वर्तमान पत्रांचा इतिहास" असें बळेंच कल्पून विनाकारण भलत्या ठिकाणीं ठेंचा खाऊन चुका करण्याचें वास्तविक पाहतां त्यांस कांहींच प्रयोजन नव्हतें

# भाग सातवा.

## चिल्हर ऐतिहासिक.

परंतु मध्यकाळापासून, वस्त्रप्रावर्णांचे संबंधानें चैनीची शिकस्त केलेल्या सतरावे शतकाचे अखेरपर्यंतचा वस्त्रांचा इतिहास देण्याचें काम आमचे प्रोफेसर साहेबांस चांगलें साधलें असून तो भाग खरोखरच शास्त्रीय व ऐतिहासिक मर्मज्ञतेनें लिहिलेला आहे. आणि जुन्या गोष्टींत शोध लावणारे लोक, व पोषाखासंबंधी रितीभातीची माहिती मिळविणारे लोक या दोघांनाही सदर भागापासून फार फायदा होईल. या भागांत टेनियर[1] व कॅलट[2] सारख्या चित्रकारांना कल्पनाही करितां येणार नाहीं; असले विचित्र पोषाख एकामागून एक वर्णिले आहेत. त्यांस उपमा एकच. स्वप्नांत जसा एक राक्षस दुसऱ्यास खातो, त्याला तिसरा खातो, त्याला चौथा, त्याप्रमाणेंच अनंत प्रकारचे पोषाख भराभर एका मागून एक आपल्या समोर उभे राहतात. वास्तविकच या भागांतील परिच्छेद इतके हुबेहुब, चित्रप्राय, व सर्वतोपरि मनोरंजक आहेत

५ ग्लासगोंतील प्रोफेसर सिंक्लेअर यांनीं १६८५ त "सैतानाचें अदृश्य जग" या नांवाचा 'भुतें व डाकिणी' संबंधाचा आपला ग्रंथ प्रसिद्ध केला.

१ डेविड टेनियर ( १५८२–१६४९ ) व त्याचा पुत्र ( १६१०–१६९० ) हे नामांकित फ्लेमिश चितारी होते.

२ क्यालट ( १५९३–१६३५ ) नामांकित फ्रेंच खोदीव काम करणारा.

कीं, या भागाचें भाषांतर करून मेरिक साहेबांनीं केलेल्या जुन्या शास्त्रां-वरील ग्रंथांस प्रस्तावने दाखल जोडण्याचें कोणीं योजिल्यास तें वावगें होणार नाहीं. उदाहरणार्थ हा खालील उतारा पहा :—

" पंधराव्या शतकांतील जर्मन लोकांच्या पोषाखाकडे पाहिलें तर आप-
" णांस हंसूंच येईल; आणि आज जर त्या वेळेचे कांहीं लोक जिवंत झाले
" तर त्यांनाही आपले हल्लींचे पोषाख पाहून मोठें आश्चर्य वाटेल. परंतु
" ईश्वरकृपेनें पूर्वींचें लोक सजीव होऊन, पूर्वींच्या काळांत व सांप्रतच्या
" काळांत विनाकारण बखेडा होण्याची अगदीं भीति नाहीं. असो; सांप्रतच्या
" गोष्टी पूर्वींच्याच गोष्टीपासून झाल्या असून ही वाढ कांहींशीं वृक्षाचे वाढी-
" सारखी आहे. वृक्षांचीं मुळें फांद्यामध्यें न गुरफटतां तशींच जमिनींखालीं
" राहतात, त्याप्रमाणेंच या पूर्वींच्या गोष्टीत नवीन गोष्टींत व्यर्थ कालवाकालव
" करीत नाहींत. इतकेंच नव्हे, तर हल्लींचे काळांतील जें कांहीं उत्कृष्ट व
" प्रियतम आहे तेंहीं फारच थोड्या काळानें रसातळास जाऊन त्याची जागा
" कशानें तरी भरून निघेल. ही गोष्ट लक्ष्यांत येणें कांहींसें खेदकारक
" तर आहेच, परंतु अगदींच निरुपयोगी नाहीं. एवढा बहादर नेपोलियन

---

३ हा ग्रंथ १८२४ त प्रसिद्ध झाला. यांत नार्मन विजयापासून दुसऱ्या चार्लसच्या अखेरपर्यंत ( १०६६–१६८५ ) यूरोपांत व विशेषतः इंग्लंडांत जीं शस्त्रास्त्रें प्रचलित होतीं त्यांचा इतिहास व त्या संबंधानें टीका आहे.

४ नेपोलियन बोनापार्ट—( १७६९–१८२१ ) हा दहा वर्षांचा असतांच कांहीं लोकांच्या वशिल्यानें ब्रीन येथील प्रसिद्ध युद्धशिक्षणाचे शाळेंत शिरला. तेथें पांच वर्षें मन लावून अभ्यास केल्यावर १७८४ त पारिस येथील रायल मिलिटरी स्कूलमध्यें गेला. व पुढें एक वर्षानें त्याची नेमणूक तोफखान्यांत एका सबलेफटनंटच्या जाग्यावर झाली. १७९२ त त्यास कोर्सिका बेटांतून हद्दपार केल्यावर तो एक वर्ष मार्सेल्स येथें होता; व तेथील फिडरल लोकांवर गोलंदाजी केल्याबद्दल त्यास १७९३ मध्यें कप्तानाची जागा दिली. त्याच वर्षी त्यानें कानव्हेन्शनकडे ( फ्रान्सच्या राज्यक्रांतीचा इतिहास पहा ) नेमणुकी-बद्दल अर्ज केल्यावरून त्यास लेफटनेंट कर्नल करून टुलोनवर पाठविलें होतें. त्या वेळीं टुलोन हें इंग्रजांनीं बळकावून त्यांचा सरदार लार्डहुड हा कानव्हेन्शनशीं बळकटीस आला होता. कितीएक हल्ले झाले तरी हुड हा त्यांस दाद देईना. तेव्हां नेपोलियननें एक नवीन युक्ति सुचविली; व ती केल्यावर हुडसाहेबांस मुकाट्यानें पळच काढावा लागला. टुलोन लागलेंच सर झालें, व नेपोलियनची वाहवा होऊन त्यास एका ब्रिगेडवर जनरल नेमिलें.' सन १७९४ त आल्पस् हद्दीचे सैन्यांत त्यास तोफखान्यावरील कमांडरची जागा मिळाली;

टीप मागील पृष्ठावरून पुढें चालू

परंतु हा बेमान झाल्यास कसें होईल अशी सरकारास धास्ती पडून त्यास परत पारिस मध्यें बोलावलें व त्याचें नांव लष्करी खात्यांतून काढून टाकिलें. पुढें कांहीं काळ त्यानें गरिबींत व अज्ञातवासांत काढिला. एकदां तर तुर्कीसरकारची नोकरी पतकरण्याचाही त्यानें विचार केला! परंतु ता० ४ अक्टोबर रोजी पारिसमध्यें बंड झालें व त्यामुळें त्याचें नशीब फिरलें. त्याचा स्नेही बारास यास त्या वेळीं ६००० स्वारांवर कमांडर नेमिलें होतें. त्यानें नेपोलियनास दुय्यम कमांडर नेमिलें. मग नेपोलियननें ४०००० बंड-खोरांचा पाडाव केला व १२०० लोकांस ठार केलें. याबद्दल कानव्होकेशननें त्यास एका तुकडीवर जनरल करून शिबंदी फौजेवर कमांडर केलें. एक वर्षानें त्यास इटलींतील फौजेवर जनरल नेमिले. ही फौज त्या वेळीं अगदीं अव्यवस्थित व दुबळी झाली होती. पण त्याच फौजेनें दीड वर्षांत त्यानें चार मोठमोठया फौजांची दाणादाण केली. त्याच्या या अद्वितीय विजयशालित्वामुळें फार्मिओचा तह होऊन फार मोठा मुलूख फ्रान्सच्या ताब्यांत आला. या वेळीं फ्रान्समध्यें नेपोलियनसारखा लोकप्रिय मनुष्यच नव्हता; यामुळें हाच कदाचित् फ्रान्सचें राज्य बळकावील अशा धास्तीनें डायरेक्टरीनें त्यास इजिप्तवर स्वारी करण्याविषयीं रुकार देऊन एका ३००० लोकांच्या उत्कृष्ट सैन्यानिशीं त्याची रवानगी केली. थोडक्याच काळांत त्यानें सर्व इजिप्त सर केला; कैरो येथील बंडवाल्यांची कत्तल करून बंड मोडलें; सिरियांत जाऊन तुर्क लोकांचें जाफा शहर हल्ला करून घेतलें. एक शहर घेण्याचा त्यानें पुष्कळ प्रयत्न केला परंतु इंग्रज लोकांचा अडमिरल सर सिडणेस्मिथ याच्यापुढें त्याचा कांहीं इलाज चालेना. मग इजिप्तमध्यें शिरून पुन्हा अबुकर येथें तुर्की सैन्याचा पराभव केला. या वेळेस फ्रान्समध्यें फार घोटाळा चालला होता. तो समजतांच सैन्य तेथेंच टाकून तो पारिस येथें परत आला. तेथें डायरेक्टरीचा लोकांस फार त्रास आला होता. ही संधी पाहून नेपोलियननें प्रबळ पक्षास मिळून अबेसेइस, लुसियन, व जनरल लेक्केअर यांच्या मदतीनें ता० ९ नवंबर १७९९ रोजीं डायरेक्टरी मोडून आपण पहिला कान्सल बनला. कँबे, सेरीज, आणि लेब्रन यांनाही त्यानें कान्सलची पदवी दिली, परंतु त्याच्या हेतूंस मदत करावी या पलीकडे त्यांस जास्त अधिकार नव्हता. सन १८०० मध्यें इटलीचे सैन्यानिशीं आल्प्स् पर्वत ओलांडून त्यानें मारेंगोची लढाई मारिली. मग होहेनलिंडन येथें आस्ट्रियाचा पराभव करून आस्ट्रिया व इंग्लंड यांनीं तह केल्यावर लढाई संपली. याच वर्षी त्यास ताहयात कान्सल नेमिलें. या कारकीर्दींत त्यानें कोड नेपोलियन नांवाचा कायदा व दुसरी अनेक सार्वजनिक कामें केलीं. १८०४ मध्यें त्यानें फ्रेंच लोकांचा बादशाह असा सरनामा धारण केला. पुढें सहा महिन्यांनीं आल्प्स्च्या पलीकडील प्रजासत्ताक अंमल मोडून इटली व मिलनचा राजा असा किताब घेऊन तेथील राज्य करूं लागला. १८०५ त नेलसननें फ्रेंच व स्पॅनिश आरमारांचा ट्राफलगार येथें नाश केल्यामुळें त्यानें इंग्लंडवर स्वारी करण्याचा नाद सोडिला. त्याचवर्षी इंग्लंड, आस्ट्रिया, व

रशिया एक होऊन फ्रान्सशीं लढूं लागले. परंतु आस्टरलिड्झच्या लढाईनें फ्रान्सला पुष्कळ मुलूख मिळून प्रेसबर्गच्या तहानें पूर्वी काबीज केलेला मुलूखही फ्रान्सकडे कायम झाला. १८०६ त त्यानें आपल्या एका भावास नेपल्सचे राज्यावर बसविलें; व दुसऱ्यास हालंडचे राज्यावर बसविलें. त्याच वर्षी जेना येथील लढाईनें प्रशियाचा पाडाव झाला. नंतर त्यानें रशियावर स्वारी करून रशियाचे बादशहाकडून टिलसिटचा तह करून घेतला. व आपल्या चुलत भावास वेस्टफॅलियाचे राज्यावर बसविलें. १८०८ त त्यानें स्पेनमध्यें स्वारी केली. त्याचें सैन्य येतांच स्पेनचा राजा चौथा चार्लस कुटुंबासुद्धां फ्रान्समध्यें पळाला व आयताच नेपोलिअनच्या कैदेंत सांपडला. मग सेनापती मुराद यास आपल्या भावाचें राज्य देऊन नेपोलिअननें आपल्या भावास स्पेनच्या गादीवर बसविलें. परंतु स्पेननें इंग्लंडची मदत घेऊन पांच वर्षें भांडून अखेरीस नेपोलिअनचा अनेक लढायांत पराभव केला. या लढायांत फ्रान्सचें एकंदर चार लक्ष सैन्य पडलें! मध्यंतरीं त्याचे मित्रांनींही त्याची पाठ सोडिली; आणि पोपचें राज्य त्यानें घेतल्यामुळें पोपनें त्यास बहिष्कार घातला. इंग्लंडला बुडविण्याकरितां फ्रान्सांतील व्यापाराच्या सोलती त्यानें बंद केल्या होत्या; त्यामुळें देशास विपत्ति व दारिद्र्य आलें. सन १८१२ त त्यानें पांच लक्ष सैन्य घेऊन रशियावर स्वारी केली व पुष्कळ लढाया मारून मास्को येथें तहाच्या आशेनें तळ देऊन बसला असतां हिंवाळा सुरू झाला. मग तेथून पळ काढतां काढतां थंडीनें व लढायांनीं मिळून त्याचें सर्व सैन्य मेलें व सुमारें पंधरा हजार लोकांनिशीं तो फ्रान्सांत परत पोहोंचला. तेथें पुन्हा त्यानें साडे तीन लक्ष सैन्य तयार केलें व बऱ्याच मोठ्या लढायाही मारिल्या. परंतु रशिया, प्रशिया, आस्ट्रिया व स्वीडन यांनीं त्याजवर कंबर बांधली होती; व लैपझिक येथें तीन दिवसांत त्याचें पन्नास हजार सैन्य खपून त्याचे सामर्थ्यास धक्का बसला. शत्रू लागलेच फ्रान्सांत शिरले. व नेपोलिअननेंही आपलें सैन्य अव्यवस्थित झालें आहे असें पाहून फ्रान्सची गादी सोडिली व आपण एल्बा बेटांत राहण्याचें कबूल केलें. परंतु पुन्हां एक वर्षाच्या आंत तो फ्रान्समध्यें शिरला व तो पारिस येथें येईपर्यंत सर्व सैन्य त्याला मिळालें. पुन्हां रशिया, प्रशिया, आस्ट्रिया स्वीडन व इंग्लंड एक झाले. परंतु नेपोलियननें अगोदरच चाल करून ता० १६ जून १८१५ रोजीं लिगनी येथें प्रशियाचा पराभव केला. परंतु लागलीच ता० १८ रोजीं इंग्लिश सरदार वेलिंग्टन यानें त्याचा पराभव केला. पुढें चार दिवसांनीं त्यानें आपल्या मुलास गादी दिली. या दुसऱ्या वेळीं त्यानें १०० दिवस राज्य केलें. नंतर तो अमेरिकेंत जाण्यास निघाला असतां वाटेंत त्यास इंग्लिशांनीं गांठून कैद केलें व सेंट हेलेना बेटांत कैदेंत ठेविलें. तेथें त्यास पुष्कळ जाच झाला व तो १८२१ त मरण पावला. राज्यधुरंधरपणा, बळ, वीरश्री, कुशाग्रदृष्टि, युद्धकौशल्य, महत्वाकांक्षा व आपले हेतूस इतरांस वळविण्याची हातोटी या गुणांत त्यास इतिहासांत जोड नाहीं. परंतु त्याच्या बुद्धीची तीव्रता व कुशाग्रता यांस त्याच्या उद्धटपणाचें, लबाडीचें व अप्पलपोटेपणाचें विरजण झालें होतें. गुप्त कारस्थानाबद्दल त्याचें पोलीस फार प्रसिद्ध होतें.

" एवढा प्रेमळ कवी **बायरॅन,** या यूरोपांत ज्याच्या त्याच्या ध्यानीं मनीं
" असावयाचे, पण तेही नाहींसें होऊन सात वर्षें लोटलीं नाहींत तोंच
" विस्मृतिपथासही गेले! पण प्रगती संबंधाची ईश्वरी तरतूत अमलांत
" येण्यास या गोष्टी अवश्यच आहेत ! आणि इतर गोष्टीप्रमाणेंच कपडच्या-
" पैकीं सुद्धां अमुक एक प्रकार कायम राहील असें नाहीं !

" त्या वेळच्या लष्करी पोषाखाचें व सरंजामाचें वर्णन कादंबऱ्यांतून
" इतकें केलें आहे कीं, त्या पोषाखाचे वर्णनावरूनच ही अमक्या काळची
" गोष्ट आहे असें लोकांस लागलेंच समजतें. ह्मणून त्या संबंधानें विशेष
" चर्चा करण्याची आपणांस आवश्यकता उरली नाहीं. शिवाय शांतपणें
" काळ घालविणाऱ्या संसारी लोकांत कमी मनोरंजक पोषाख सांपडतील
" असेंही नाहीं. ह्मणून आपण तिकडेच वळूं.

" श्रीमंत लोकांत टुसिक या नांवाचा एक जातीचा अंगरखा असून
" कंबरेस एक चांदीचा कंबरपट्टा असे. त्याला लहान लहान घंटा असून
" त्या घंटा चालतांना घण घण वाजत. जे लोक सुरज्ञ व शौकी असत ते
" तर सप्तस्वरांतील सर्व सुरांच्या नादाच्या घंटा करून या कंबरपट्ट्यास
" लावीत; आणि एकाएकी फिरतांना किंवा अन्य प्रकारें चालतांना एका
" दम अटकाव वगैरे झाला ह्मणजे त्या घंटांचा विलक्षण कर्णमधुर आवाज
" होई. तसेंच या लोकांना उंच सुळक्याची फारच हौस असे. पुरुष उंच
" सुळक्याच्या टोप्या घालीत. ह्या टोपीचा सुळका सुमारें एक एल ( ह्मणजे
" तीन फूट ) लांब असून एका बाजूस कलता लोंबत असे. त्यांच्या जोड्यांलाही
" एक एल लांब सुळका असून त्याच्या दोहोंबाजूस कलाबतूची नक्षी अस.
" खडावांना सुद्धां हे एलभर लांबीचें नाक असलेंच पाहिजे ! या सुळक्यां-
" नांही कांहीं लोक घंटा लावीत. या लोकांत सबंध विजार नसून निरनि-
" राळे दोन पाय असत; ते पाय आयत्या वेळेस कुडत्याला जोडीत व त्याचे
" खालपर्यंत त्या लोकांचे लांब लांब झगे पोहोंचत.

" श्रीमंत कुमारिका बाहेर जातांना मागल्या पुढल्या अंगास वरच्या
" बाजूनें वाटोळे कातरे काढलेले झगे घालीत त्यामुळें त्यांच्या पाठीचा व
" छातीचा बराच भाग उघडा असे. विवाहित कुलीन बायकांच्या झग्यांना
" मागच्या बाजूस चार चार पांच पांच एल लांबीचे पागोरे असत. व हा

५ बायरन—एक विख्यात इंग्रज कवी ( १७८८–१८२४ ).

"भार उचलण्यास त्यांचे मागें एकएक हुजऱ्या असे. हे झगे घालून शूर
"क्लिओपात्राप्रमाणें त्या चालूं लागल्या असतां रेशमी कापडांच्या नांवातून
"त्या हिंडत आहेत कीं काय असें वाटे. त्यांचे सोंगे धरणारे हुजरेही
"या नांवांचें सुकाणूं धरणाऱ्या मदन मूर्तींप्रमाणें दिसत असतील! या
"झग्यांना एकएक हात रुंदीच्या झालरी असत, व ही झग्याची झालर त्या
"बायकांचे भोंवती सारखी हलत असे. यांना गळ्यापासून तों बुटांपर्यंत
"चांदीच्या किंवा झगझगीत शिंपांच्या गुंड्या असत. कुमारिकांचे डोक्या-
"वर चांदीची जाळी असून तीमध्यें सोन्याची बारीक बारीक चांदण्यां-
"सारखीं फुलें असत. त्यांच्या आयांच्या शिरोभूषणांचें वर्णन तर अशक्यच
"आहे. इतकें असून भूषणांकरितां सोईकडे गैर लक्ष होत असेल ह्मणावें
"तर तसेंही नाहीं. हिंवाळ्यांत सर्व बायकांचा पोषाख सारखाच असे. त्या
"लांबलांब झगे घालीत व त्या झग्यांचे ओंचे लांबवर लोंबत असत.
"हिंवाळच्या झग्यास झालर एकेरी नसून दुहेरी असे; व गळ्याला घट्ट व
"कडकडित गळेबंद असे.

"अद्याप पर्यंत झग्यांमध्यें लांकडांचीं टेकणें घालण्याचा प्रघात बायकांत
"नव्हता. पुरुषांच्या बंड्यांतून मात्र आंतल्या बाजूनें कडकडीत कापडाच्या
"वळकट्या चिकटवून शिवीत असत. व त्यामुळें विवक्षित भागीं पोषा-
"खास फुगारा येई. याप्रमाणें पोषाखाचे संबंधानें स्त्री पुरुषांत चढाओढ
"असे; पण नेहमींप्रमाणें पुरुषांचे बाजूसच सरशी असे."

आमच्या प्रोफेसर साहेबांचे लिहिण्यांत शब्दरंग असो अगर नसो; परंतु मधून मधून त्यांची थट्टा करण्याची प्रवृत्ति बरीच दिसून येते. व असल्या शांत मनुष्याच्या प्रकृती संबंधानें जरी कोणतेंही विधान खात्री-लायक करितां येण्यासारखें नाहीं, तरी त्यांच्या मनांत खऱ्या प्रेमाचा अभाव नसावा एवढें तरी स्पष्ट दिसतें. पोषाखांचे इतिहासांत घंटाचे कंबर पट्टे, पोकळ विजारी, लांबलांब शिंगाचे जोडे, वगैरे जे जे पोषाखाचे प्रकार आहेत ते आमच्या प्रोफेसर साहेबांचे नजरेंतून चुकले नाहींतच. पण हे पोषाख वापरणाऱ्यांना प्रसंगोपात् त्यांपासून ज्या ज्या अडचणी आल्या,

६ क्लिओपात्रा—सिलिसिया प्रांतांत टार्सस येथें असतांना इसवी सन ४१ त ॲन्टनीनें आपली बायको क्लिओपात्रा ईस बोलाविलें होतें तेथें जात असतां ती कशी दिसत होती त्याचें वर्णन शेक्सपियरनें ॲंटनी आणि क्लिओपात्रा या नाटकांत फार सुरेख केलें आहे.

त्यांकडेही त्यांनीं आपलें लक्ष्य मुद्दाम पुरविलें असून त्यांचें चित्र हुबेहूब आपले पुढें वठविण्याविषईं त्यांची विशेष तत्परता दिसून येते. आमच्या **एलिझाबेथ** राणीच्या वाटेंत चिखल असल्या जागीं **सर वाल्टररॅले** यांनीं

---

७ एलिझाबेथ—इंग्लंडची राणी ( १५५८–१६०३ ) तिच्या बापानें तिच्या आईचा शिरच्छेद करविला होता. तिलाही तिची बहीण राणी मेरी इनें नजर कैदेंतच ठेविलें होतें. मेरीचे मृत्यूनंतर ती गादीवर बसली. तिच्या बहिणीनें आपल्या कारकीर्दींत नवीन धर्मोन्नतिस आपल्या अमर्याद जुलमानें मोठा अटकाव केला होता. परंतु एलिझाबेथनें मोठ्या कुशलतेनें फार लोकांचीं मनें न दुखवितां नवीन धर्मपंथास उत्तेजन देऊन कायम केलें. ही राणी हुशार, शहाणी, अभिमानी, व विनयशील होती; आणि धर्माभिमानामुळें स्पेनच्या फिलिप राजाशीं वैर येऊन जरी त्यानें इंग्लंडवर स्वारी केली होती तरी तिनें स्वतः आपल्या फौजेंत हिंडून व भाषणें करून फौजेचें प्रोत्साहन केलें व तिच्या सांगण्याप्रमाणें लोकांनींही आपआपसांतले धर्मसंबंधी मतभेद एकीकडे ठेवून जुटीनें मदत केली. मग अर्थात् परमेश्वराचें साह्य होऊन स्पेनच्या आरमाराचा पराभव झाला. स्काटलंडची राणी मेरी इचा तिनें मत्सरभावानें शिरच्छेद केला ही मात्र तिच्या हातून फार वाईट गोष्ट झाली. हिच्या कारकीर्दींत धर्मछळामुळें इतर राज्यांतील अनेक कसबी लोक इंग्लंडांत आश्रयास आले त्यास तिनें आश्रय देऊन साह्य केलें. त्याचप्रमाणें विद्वान् लोकांसही तिनें चांगलें साह्य केलें, यामुळें इंग्लंडची चांगलीच सुधारणा व भरभराट झाली. ही राणी आमरण अविवाहितच होती.

८ सर वाल्टर रॅले ( १५५२–१६१८ ) एक नामांकित इंग्रज मुत्सद्दी, ग्रंथकार, व जलप्रवासी. या सरदारानें एलिझाबेथ राणीचे कारकीर्दींत इतर राष्ट्रांतील धर्मोन्नतीच्या नवीन पंथांस कुमक करून पुष्कळ लहान लढाया मारिल्या. अमेरिकेंत नवीन वसाहत करण्याचाही त्यानें प्रयत्न केला होता, पण तो निष्फळ झाला. एलिझाबेथची त्यावर फार मर्जी होती; परंतु जेम्सराजाच्या कारकीर्दींत त्यावर इतराजी होऊन राजद्रोहाच्या बनावट आरोपावरून १३ वर्षे त्यास कैदेंत रहावें लागलें; आणि आफ्रिकेंतील सोन्याच्या खाणी दाखवितों अशी राजास लालूच दाखवून त्यानें कैदेंतून आपली सुटका करून घेतली होती; पण खाणी सांपडत नाहींत असें राजास कळल्यावर त्या जुन्या आरोपावरूनच त्याचा शिरच्छेद झाला. याच पुरुषानें प्रथम अमेरिकेंतून तंबाकू आणिली. आणि ईस्ट इंडिया कंपनीच्या आपल्या देशाशीं झालेल्या व्यापारी संबंधामुळें ती हिंदुस्थानांत शिरून कोट्यावधी लोक आज त्या व्यसनांत फसले आहेत. या वनस्पतीचा ताप फारच भयंकर असून तिचे व्यसनांत फसलेल्या मनुष्यांस तर अपाय होतोच, पण तो समजण्यांत येत नाहीं, परंतु त्यांची संतति अगदींच सत्वहीन होते. यामुळें या देशाचा फार मोठा घात झाला आहे. ( तंबाकू वरील माझा लेख पहावा. )

आपला उत्कृष्ट झगा पसरिला, त्याचें आमच्या प्रोफेसर साहेबांस विशेष कौतुक वाटत नाहीं. ते या प्रसंगासंबंधानें इतकेंच ह्मणतात कीं "या वेळेस "सदर **कुमारी राणीचे** गाल तिच्या दासींनीं गौर वर्णानें रंगविले असून "नाक तांबडें रंगविलें असेलें. कारण ह्मातारपणांत रागानें प्रसाधनक्रियेच्या "(वेणी फणीच्या) वेळेस ती आरशांत पहात नसे, व सर्व कारभार दासींचे "मुखत्यारीवरच असल्यामुळें त्या हव्या तेथें हवा तसा रंग भरीत!" आह्मांस तर असें वाटतें कीं **रॅले** साहेबांनीं जो आपला झगा चिखलांत पसरला तो **राणी** साहेबांच्या नाकाच्या अगर गालाच्या रंगविशेषामुळें पसरला नसून आपण काय करितों हें पूर्णपणें जाणूनच **सर वाल्टरनीं** तसें केलें; आणि जरी सदरील **सुकुमार कुमारी** राणी सुकुमार नसून तिचें तोंड भयंकर विष-रंगानें जरी प्रसाधनक्रियेंत रंगविलें असतें, तरी त्यांनीं तसेंच केलें असतें.

त्याच प्रमाणें मोठमोठ्या पोकळ व फुगीर कपड्यांविषयीं लिहितांना झालरी फितें वगैरेचें वर्णन देऊन धान्याचें बारीक भुसकट भरून कपडे फुगीर करण्याच्या चालीबद्दल लिहीत असतां, एक सरदार खिळा पुढें आलेल्या खुर्चीवर बसल्यामुळें राजे साहेबांची स्वारी आली असतां उत्थापन देतांना बिचाऱ्याची विजार फाटून कित्येक शेर भुस्सा खालीं पडल्यामुळें जी फजीती झाली तिचें वर्णन देण्याची संधि प्रोफेसर साहेबांनी दवडली नाहीं. या प्रसंगासंबंधानें साहेब बहादूर खालीं लिहिल्याप्रमाणें टीका करितात.

"प्रसंगोपात् घडलेल्या गोष्टींनीं मनुष्यास किती तरी ऐतिहासिकत्व येतें व "प्रसिद्धि होते तें पहा. **इरोस्ट्रेटस**[10] हा एका मशालीमुळें प्रसिद्धीस आला. **मायलो**[11]

---

९ यूरोपियन लोकांतील बायकांमध्यें चेहेरा सतेज व सलावण्य करण्याकरितां रंगवि-ण्याची अजूनही चाल आहे पण आतां ती छछोरपणाच्या सदरांत आली आहे.

१० इरोस्ट्रेटस—( ख्रि० पू० ३५ ) यास आपलें नांव प्रसिद्ध होण्याविषयीं अत्यु-त्कट इच्छा होती; पण लोकोत्तर गुणाभावामुळें त्याचा कांहींच जम बसेना. तेव्हां त्यानें डायनाच्या देवळास आग लाविली; कीं अशानें तरी आपलें नांव प्रख्यात होईल! पुढें त्यावर खटला होऊन त्यास शिक्षा देण्याकरितां सरकारनें असा ठराव केला कीं त्याचें नांव कोणींही घेऊं नये! पण या ठरावाचा कांहींच उपयोग झाला नाहीं.

११ मायलो—हा ख्रि० पू० सहाव्या शतकांत एक पैलवान होता—तो भरज्वानींत आलेला बैल सहज खांद्यावरून नेई. त्यानें एक ओक वृक्ष फाडण्याचा प्रयत्न केला पण

' हा एका बैलामुळें प्रसिद्धीस आला. **हेनरीडॉन्लें**[१२] हा आपल्या अंग-
' व्यंगतेमुळें आला, **बॉयलोडेस्प्रो**[१३] हा तर एका वदकाच्या कळपामुळें आला,
' आणि आमचा हा हतभाग्य सरदार विजारीच्या फारोळ्यामुळें उदयास
' आला! कारण (जर्मनीचा) बादशाहा **ऑटो** यांच्या कोणत्याही बखरींत
' सदर गोष्टींचें वर्णन नाहीं असें नाहीं. ग्रीक योद्धा **थेमिस्टोक्लीस**[१४] यानें
' आपणास **विस्मृतिची** देणगी मिळावी ह्मणून परमेश्वराची प्रार्थना
' केली होती पण हा वर मिळून गतकाळची जरी विस्मृति झाली
' तरी त्यांत काय जीव आहे? माझे मित्रांनो **भवितव्यतेस** मान
' लववावी यांतच शहाणपणा आहे. कारण नशीबीं असतें तें होत असतें,
' मग त्याकडे धैर्यानें पाहण्यास काय हरकत आहे?" प्रोफेसर साहेबांच्या
। लिहिण्यावर आमचें असें ह्मणणें आहे कीं **विस्मृतिच्या** तोडीचाच
**ौन** हाही गूण असून बरेच इंग्रज लोक तो पाळतातही, इतका प्रोफेसर
ाहेबास इषारा करणें जरूर दिसतें, असो.

आमचे प्रोफेसर साहेब लिहितात, "इतिहासांत सर्वांत साधा पोषाख आमचे नजरेस आला तो **कोलंबियांतील** लढाईंत **बोलिव्हारच्या**[१५]

---

ाच्या चिरफळ्यांत त्याचा पाय सांपडून तो मग कोणासही काढतां येईना; अखेरीस त्यास ाल्या तेथेंच लांडग्यांनीं खाल्लें!

१२ हेनरी डार्न्ले—स्काटलंटच्या इतिहासांतील एक पुरुष.

१३ बायलो डेस्प्रो—एक फ्रेंच कवी व ग्रंथकार. हेलवेटिअस (पु० २ भाग २ टीप ० पहा) ह्मणे कीं लहानपणीं या गृहस्थास एका वदकानें दुखापत केली होती त्यामुळें ाच्या स्वभावांत कायमची खिन्नता आली; व तीमुळेंच त्याच्या काव्यांतूनही खिन्नता ली आहे!

१४ थेमिस्टोक्लीस—(खि० पु० ५१४–४२९) अथेन्स येथील एक विख्यात योद्धा—नें इराणच्या राजापासून ग्रीसचा चांगला बचाव केला. परंतु पुढें कांहीं कुचराईमुळें क लोकांनीं त्यास हद्दपार केलें; तेव्हां इराणच्या राजानें त्यास आश्रय दिला. परंतु ाल्या जन्मभूमीची वरचेवर आठवण होऊन त्यास दुःख होई. तेव्हां विस्मृ-ती तरी देवानें आपणास भिक्षा द्यावी असें ह्मणून तो विलाप करी. अखेरीस तें दुःख ाह्य होऊन त्यानें आत्महत्या केली.

१५ बोलिव्हार—(१७८३–१८३०) यानें दाक्षिण अमेरिकेंतील स्पॅनिश लोकांचा ार्वभौम अंमल झुगारून दिला. बोलिव्हारच्या सैन्यांत कफल्लक साहसी लोक, नागवे ाीलोक; व अर्धवट माणुसपणांत आलेले टेनरास नांवाचे रानटी लोक होते.

" घोडेस्वारांनीं घातलेला. हा पोषाख ह्मणजे बारा फुट लांबीच्या कर्णाचें
" एक चौरस घोंगडें. त्यांचीं टोकें कातरून कांहीं लोक तें वाटोळें करीत.
" त्याच्या मध्यभागीं एक दीडफूट लांबीची चिरणी देऊन त्यांत हे घोडे-
" स्वार आपली मान अडकवीत. या घोंगड्याचे आंत दुसरें वस्त्र कांहींच
" नसे. यानें शीतोष्ण हवेपासून तर त्यांचा बचाव होईच; परंतु त्याचे
" लोंबते सोगे डावे हातास गुंडाळल्यानें लढाईत वारांपासूनही रक्षण होई."

जरूरीपेक्षां जास्त खटाटोप करण्याचा जुन्या **रोमन** लोकांत फार तिट-कारा असे. तशा नैसर्गिक स्थितींतील पोषाखाचें एक सदरचें चित्र देऊन आह्मीं हा भाग संपवितों.

# भाग आठवा

## वस्त्रविरहीत जग.

ट्यूफेल्सड्राक साहेबांनीं आपल्या ग्रंथाच्या **वर्णनात्मक** व **ऐतिहासिक** भागानें ह्मणजे ज्यांत वस्त्रांची उत्पत्ति व सुधारणा यांविषयींचा मजकूर आहे, त्याच्या योगानें जर आपल्या वाचकांस इतकें थक्क करून सोडिलें आहे, तर ज्यांत कपड्यांचा आत्म्यावर होणारा परिणाम वर्णिला आहे त्या **तार्किक** व **तात्विक** भागानें वाचकांस जास्तच नवल वाटेल. कामाचा खरा बोजा आह्मांवर जो आहे तो याच भागांत. कारण वस्त्रांसंबंधानें खरोखर महत्वाचे, व तात्विक विचार येथूनच सुरू होतात. पण या भागांत आह्मी आल्यावर आह्माला शुद्ध वेड्यासारखें झालें आहे. या भागांत कोणत्या दिशेनें निरीक्षण करून कोणत्या बाजूनें हल्ला करून हा भयंकर गड सर करावा, कोणची जागा सारमय असून आह्मांस तोलून धरील, कोणची पोकळ असून आह्मांस रसातळास नेईल, याचा कांहींच उमज आम्हांस होत नाहीं. आणि आमचे हातून या ग्रंथाचें योग्य परिशीलन होण्यास असा उमज झाल्यावांचून तर मार्ग नाही! ट्यूफेल्सड्राक साहेबांनीं तर या भागांत कपड्यांचा मनुष्याचे नीतीवर, समाजावर व धर्मावर काय काय व कसकसा परिणाम होत गेला याचें विवेचन करण्यास कंबर बांधिली आहे. **त्यांचा मूळसिद्धांत असा आहे कीं** मनुष्याचें ऐहिक जीवित-सर्वस्व या

कपड्यांच्या योगानें, जसें कोणीं बांधून टाकावें त्याप्रमाणें अगदीं गुरफटून गेलें आहे, आणि या सिद्धांताची सिद्धता हजारों दिशांनीं करून दाखविण्याचें त्यांनीं योजिलें आहे. या भागांतला एकंदर मथितार्थ असा आहे कीं, " समाज हा केवळ वस्त्राचे आधारावर आहे;" " या अनाद्यंत काळमार्गांतून मनुष्यसमाज हा वस्त्ररूप विमानाचे आधारानें चाललेला आहे;" आणि " इष्टस्थळाप्रत नेणारा मंतरलेला झगा कित्येक गोष्टींत आपल्यास ऐकूं येतो; तसेंच हें वस्त्ररूपी विमान असून त्याचे साह्यावांचून मनुष्य हा एक तर अगदीं रसातळास जाता, किंवा वरतीं स्वर्गमंडळाचा भेद करून तरी गेला असता, व याप्रमाणें एका ना एका मार्गानें अगदीं नष्ट झाला असता. "

हा सिद्धांत ज्या अनेक प्रमाणांनीं सिद्ध करून दाखविला आहे, व त्यापासून आचरणास मार्गदर्शक जे अनंत उपसिद्धांत काढिले आहेत ते सर्व लोकांपुढें मांडणें अगदीं दुरापास्त आहे. सिद्धांत सिद्ध करण्याची आमचे प्रोफेसर साहेबांची ही रीत सामान्य तर्कशास्त्रांतील रितीप्रमाणें नसल्यामुळें प्रत्येक अनुमानांतील **व्याप्ति, हेतु** व **सिद्धांत** यांची सरणी स्पष्टपणें दृष्टिगोचर होत नाहीं. फार झालें तर आपणांस इतकेंच ह्मणतां येईल कीं त्यांनीं आपले सिद्धांत अनुभविक गोष्टीवरून स्पष्ट करून दाखविले आहेत. या बाह्य सृष्टींत जसा अनेक प्रकारच्या रंगरूपादिकांचा विलक्षण घोंटाळा असून हे प्रकार धड एकही ह्मणतां येत नाहींत, धड निराळे म्हणतां येत नाहींत, तशाच मासल्याचा हा प्रोफेसर साहेबांचा तात्विक ग्रंथ आहे. त्यांत जिकडे पहावें तिकडे जीव भांबावून जातो. परंतु सूक्ष्म विचाराअंतीं प्रोफेसर साहेबांचे सिद्धांत अगदीं सप्रयोजक व यथार्थ आहेत अशी तर खूण पटते. कित्येक ठिकाणीं सामान्य जनांच्या विचारांतील घोंटाळ्यासारखा घोंटाळाही

---

१ **अनुमान** ह्मणजे चिन्हावरून चिन्हवान् पदार्थाविषयीं तर्क. जसें धूर हें विस्तवाचें चिन्ह आहे; ह्मणून प्रत्यक्ष विस्तव न दिसतां एखादे ठिकाणीं धूर आहे असें पाहून तेथें विस्तव आहे असा तर्क होतो. खात्रीबंद अनुमान होण्यास चिन्हाचें **व्याप्तित्व** ह्मणजे त्या चिन्हवान पदार्थाशिवाय इतरत्र असंभव जरूर आहे. जर धूर हा विस्तवावांचून इतरत्र सांपडेल तर धूर पाहून येथें विस्तव आहेच असें ह्मणतां येणार नाहीं. **हेतु** ह्मणजे जी सिद्ध करण्याची गोष्ट तिचें चिन्ह विवक्षित ठिकाणीं आढळून येणें. या गोष्टिचा जास्त खुलासा तर्कसंग्रहादि ग्रंथांत पहावा.

नजरेस येतो. कित्येक ठिकाणीं दिलेले सिद्धांत सिद्धतेवर अवलंबून नसून ग्रंथकाराचे जातिस्वभावावर अवलंबून असावे, अगर अनुभवानें त्याचे प्रतीतीस आले असावे असें वाटतें; व त्यांच्या चरित्राचे लेख कधीं हस्तगत होतील अशी आतुरता होते. तूर्त ग्रंथकाराची जी थोडीशी माहिती या ग्रंथांत जागजागीं मिळते ती एकत्र करून तीवरून अनुमान बांधून त्या अनुमानाचे साह्यानें जितके सिद्धांत लोकांपुढें मांडतां येतील तेवढेच मांडण्यावांचून आज गत्यंतर नाहीं. सुज्ञ वाचकांस आमची एवढीच प्रार्थना आहे कीं त्यांनीं अति सूक्ष्म चित्त देऊन आमच्या ज्ञानदृष्टीच्या पोहोंचांतील जेवढ्या या ग्रंथांतल्या गोष्टी आम्ही देतों तेवढ्या वाचून व त्यांवर खोल विचार करून, ज्यांच्या दृष्टीची पोहोंच आम्हांहून जास्त असेल त्यांच्याही श्रमाचें सार्थक्य करण्यासारखे विचार या ग्रंथांत असतील कीं नाहीं याची कल्पना करावी. या भागास प्रोफेसर साहेब पुढें दिल्याप्रमाणें आरंभ करितात.

" विचारशील मनुष्य प्रसंगविशेषीं फार खोल व मधुर विचारांत " निमग्न होऊन आश्चर्यानें व भयानें गांगरून जाऊन तो आपल्या आप- " णासच प्रश्न करितो कीं " **मी कोण आहें** ? **मी** शब्दानें दर्शविला " जाणारा पदार्थ **काय** आहे ? " अशा वेळेस या जगांतील सर्व प्रका- " रचे व्यवसाय व गोंगाट त्याच्या दृष्टी आड होऊन, त्याच्या सभोंवतीं " असलेली भिंत, व्यापाराचे व राज्यसंबंधीं कारखाने, अनेक जीवांचा समाज, " अनेक निर्जीव पदार्थांचा गराडा, या सर्वांतून वाट काढून त्याची दृष्टी " त्या **अगाध, अनंत, अतींद्रिय,** व **अव्यक्त, वस्तू**कडे वळते; व सर्व " जगांत आपण एकटेच आहों अशी स्थिति होऊन मुकाट्यानेंच त्या **अव्य-** " **क्ताशीं** त्याचे विचार सुरू होतात.

" **मी कोण आहें** ? **मी** म्हणून ज्यास म्हणावयाचें तें **काय** आहे ? " **आवाज** ? **गति** ? **स्वरूप** ? या **अनाद्यंत आत्म्याची** दृग्गोचर झालेली " सशरीर **कल्पना** ? अरे विचारी प्राण्या, या शब्दांनीं कितीही लपंडाव " केले तरी अशानें भागेल काय ? अरे हीं उत्तरें कबूल केलीं तरी अशानें " किती मजल गेली ? मी **आहें** यांत तर कांहींच संशय नाहीं. कांहीं वेळां- " पूर्वीं मी नव्हतों हेंही खरेंच. परंतु मी आलों **कोठून, कसा,** व पुढें

" जाणार **कोठें**, हे प्रश्न तसेच राहतात. या **प्रश्नाचें उत्तर** सर्वत्र आप-
" ल्या सभोंवार आहे. तें सर्व प्रकारच्या **रंगांनीं**, सर्व प्रकारच्या **गतींनीं**,
" सर्व प्रकारच्या हर्ष शोकादिकांच्या **स्वरांनीं**, या सृष्टीच्या अनंत **स्वरू-**
" **पांतून** अनंत **वार्णीनीं** निघत आहे. परंतु ती गूढ लिपी वाचण्याला,
" ते गूढ शब्द ऐकण्याला योग्यता असलेला **डोळा** व **कान** मात्र नाहींत,
" कीं त्यापासून आपणांस बोध व्हावा. स्वप्नसृष्टींतील एखाद्या अपार
" **उद्यानांत** बसल्याप्रमाणें आपण येथें आहों. हें **उद्यान** अति सूक्ष्म
" दिसणाऱ्या ताऱ्याच्याही पलीकडे किती पसरलें आहे त्याचा ठिकाण नाहीं. ही
" गोष्ट स्थलमानाची झाली. कालमानाची गोष्टही अशीच. कोणचेंही लांबचें
" शतक कल्पिलें तरी तें या **उद्यानाच्या** आद्यंतापासून हल्लींच्या काळा-
" पेक्षां यत्किंचितही जवळ होईल असें नाहीं. ( अगदीं लांबचें जरी शतक
" घेतलें आणि त्याचें आपणापासून अंतर कितीही वाटलें तरी अनाद्यंत काळा-
" च्या मानानें तें कांहींच नाहीं. एक लाख वर्षांच्या मानानें जसें एक पळ
" अलिकडे पलिकडे झालें तरी त्याचें कांहीं वाटणार नाहीं तसाच हा
" कल्पित शतकापर्यंतचा काळ एकंदर काळाच्या मानानें आहे. ) यांत अनेक
' प्रकारचे **आवाज**, अनेक प्रकारचीं **स्वरूपें** आपल्या इंद्रियांस भासमान
' होतात. परंतु **तो अविज्ञेय** कीं ज्याला झोंप नाहीं, स्वप्नद्रष्टा व स्वप्न
' हीं दोन्हीं **ज्याच्या** मायेनें झालीं, तो आपणांस दिसत नाहीं; व प्रसंग
' विशेषीं अर्धवट जागेपणीं जें कांहीं **त्या**विषयीं आपणांस वाटेल तेवढ्या
' शिवाय **तो असेल** अशी शंकाही आपले मनांत कधीं येत नाहीं !
' एक कवी म्हणतो, कीं ही सृष्टि एखाद्या इंद्रधनुष्या सारखी
' सदैव आपणापुढें आहे परंतु ज्या सूर्या[२]मुळें हें इंद्रधनुष्य झालें तो सदैव
' आपल्या पाठीमागें आपल्या दृष्टीआड गुप्त आहे ! असो या विलक्षण
' स्वप्नांत जे मिथ्याभास आपणांस होतात तेच खरे समजून आपण त्यांचे
' करितां किती झटत असतों ! तुमचे कोणते तत्वविचार स्वप्नसिद्धांता-
' पेक्षां जास्त तथ्यात्मक आहेत असें तुह्मास वाटतें? जसें **भाज्यास** व
**भाजकास** ठिकाण नसतां **भागाकार** नक्की अमुक आहे असें सांगावें **तशांतलेच**

---

२ इंद्रधनुष्य हें अंतरिक्षांतील पाण्याच्या अनंत थेंबांवरून सूर्याच्या प्रकाशाचें परावर्तन त्यानें होतें. अर्थात् इंद्रधनुष्य दिसण्यास सूर्य पाठमोरा असावा लागतो.

" आपले तत्वविचार होत. तुमच्या **राष्ट्रीय लढायां**[3], **मास्कोतून काढलेले**
" **पळें**[4], अत्यंत द्वेष व रक्तस्राव करून केलेल्या **राज्यक्रांत्यां**[5], हीं सर्व
" अर्धवट झोंपेंतलीच हालचाल नव्हे काय? ही झोंपेंतली हालचाल, हें स्वप्न,
" यालाच आपण **जीवित**[6] असें ह्मणतों. व असें ह्मणण्यांत जणूंकाय आप-
" णास तथ्य कळत असावें याप्रमाणें लोक सारखे बरळत असतात! पण
" वास्तविक पाहतां आपणांस कांहीं कळत नाहीं, हें ज्यांना कळलें
" तेच शहाणे होत.

" आजपर्यंतच्या **अध्यात्म–विचारां**पासून कांहींच फलनिष्पत्ति नसावी
" ही किती खेदाची गोष्ट आहे. ग्रीक लोकांच्या पुराणांत **स्पिंक्स**[7] नामक
" यक्षानें लोकांस एक कोडें घालून तें जो सोडविणार नाहीं त्यास मारण्याचा
" सपाटा चालविला होता. मनुष्याचे अस्तित्वाचें गुह्य बीज हेंही तसलेंच कोडें
" आहे, तें सोडविल्यावांचून तर गत्यंतर नाहीं. आणि सोडवूं ह्मटलें तर
" सुटतही नाहीं. हें कोडें सोडवितां न आल्यामुळेंच **मृत्यूचा** भुंगा सारखा
" आपल्या पाठीस लागला आहे. आणि तोही मृत्यु केवळ शरीराचा नव्हे--
" तर प्रत्यक्ष **आत्म्याचा मृत्यु**. तुमचीं **प्रत्यक्ष प्रमाणें**, **व्याख्या**, **शास्त्रें**
" व **सिद्धांत** हीं काय आहेत? नुसते पोकळ शब्द. हे शब्दाचे किल्ले केवढ्या
" कुशलतेनें हवेंत बांधले आहेत! हे शब्दरूप दगडही तर्कशास्त्राचे चुन्यानें
" नीट व घट्ट बसविले आहेत. मात्र या किल्ल्यांत ज्ञानराजा वस्तीस येत नाहीं,
" एवढेंच 'एखादी वस्तु तिच्या अंशापेक्षां मोठी असते.' होय; अगदीं अक्षरशः

---

३ राष्ट्रीय लढाया—राष्ट्राच्या इभ्रतीकरितां होणारीं निकाराचीं युद्धें.

४ मास्कोतून कढलेले पळ—पु० १ भा. ७ टीप ४ पहा.

५ राज्यक्रांत्या—पु. १ भा. १ टीप २६ पहा.

६ मनुष्यजातीच्या इतिहासांत असल्या गोष्टींसच प्रमुख मानितात.

७ आपल्या पुराणांतही पांडवादिकांस यक्षांनीं असे कूटप्रश्न विचारून त्यांची उत्तरें न मिळाल्यास त्यांचे प्राण घेतल्याचें वर्णन आहे. स्पिंक्सचा प्रश्न असा होता:—"कोणच्या प्राण्यास चार पाय, दोन पाय, व तीन पाय असून व एकच भाषा असून, पाय ज्या मानानें अधिक त्या मानानें तो दुर्बळ असतो!" या प्रश्नाचें उत्तर युरिपिडिसनें **"मनुष्य"** असें दिलें तें ऐकून स्पिंक्सनें आपणासच मारून घेतलें.

८ हें एक गणितशास्त्राचें प्रत्यक्ष प्रमाण आहे.

" खरें 'सृष्टीस रिकामी पोकळी खपत नाहीं.' हें निखालस खोटें व दुराग्रहाचें.
" तसेंच 'जी वस्तु जेथें आहे तेथल्यापेक्षां तिचा अंमल दुसरीकडे होत नाहीं.'
" होय, अगदीं खरें; पण ती आहे कोठें, हाच मुख्य प्रश्न आहे. नुसत्या
" शब्दपांडित्याचे दास होऊन उपयोग नाहीं. ज्याला दूर अंतरावर आहे असें
" ह्मणावयाचें, ज्याला **मृत** असें ह्मणावयाचें त्याच्यायोगानें जर आज येथें
" आह्मांस प्रेमानुभव होतो,किंवा त्याची इच्छा होते,तर मग तो पदार्थ हल्लीं येथें
" आहे असें ह्मणावयाचें नाहीं काय ! 'आतां मी येथें उभा आहे' या वाक्यांत
" **येथें** या शब्दास जो अर्थ आहे तोच अर्थ त्या नष्ट झालेल्या पदार्थां-
" संबंधानें **येथें** या शब्दास नाहीं काय ? परंतु याचा कांहींच विचार होत नाहीं.
" आमच्या **स्वप्नोद्यानास** '**कोठें**' ( स्थळ ) हा एक व त्याचाच भाऊ
" '**केव्हां**' ( काळ ) हा दुसरा हेच दोन मुख्य रंग आहेत. विशेष समर्पक
" उपमा द्यावयाची ह्मणजे या स्वप्नोद्यानरूप चित्रास आधाररूप जो पट
" आहे त्याचा ताणा (उभा दोरा) **कोठें (स्थळ)** असून **केव्हां ( काळ )**
" हा त्याचा बाणा ( आडवादोरा ) आहे. या दोन धाग्यांच्या विणकरीनेंच
" आपलीं या संसाररूप स्वप्नोद्यानांतील अनेक विचित्र चित्रें तयार होतात
" असेंही ह्मटलें तरी चिंता नाहीं. तत्रापि स्थळ व काळ ही तत्वें आपल्या
" विचारास अगदींच अवश्य नाहींत. असें जाणणारे ज्ञाते प्रत्येक काळांत
" व प्रत्येक देशांत झाले असून '**येथें**' व '**एव्हां**' यांची वृद्धि होऊन
" तीं '**सर्वत्र**' व '**सदा**' या रूपानींच अशा दिव्य दृष्टिमान लोकांस दिसलीं
" आहेत. प्रत्येक देशांतील लोकांनीं आपला देव सर्वव्यापी व अनाद्यंत
" आहे असें ठरविलें नाहीं काय ? हा परमेश्वर ' येथें ' व ' एव्हां ' आहे;
" परंतु या ' **येथें** ' शब्दाची व्याप्ति **सर्वत्र** या शब्दाशीं आणि

---

९ बंबांत पाणी चढतें किंवा एखाद्या नळींतली हवा चोखली तर तींत पाणी चढतें यावरून ग्यालिलिओनें असा सिद्धांत ठराविला होता कीं "आव्यातप जागा राहणें हें सृष्टि-धर्माविरुद्ध आहे ह्मणून चोखून अगर यंत्रानें काढलेल्या हवेची जागा भरून काढण्या करितां पाणी वर चढतें." पण आतां हा सिद्धांत खोटा ठरला आहे. कारण हें पाणी सुमारें बत्तीस फुटांहून जास्त चढत नाहीं. हें पाणी चढण्याचें खरें कारण बाहेरील हवेचा दाब आहे हें अनुभवानें सिद्ध करितां येतें.

१० यंत्रशास्त्राचा असा सिद्धांत आहे कीं वस्तूंचा परस्पर संबंध असल्यावांचून त्यांचें एकमेकांवर यांत्रिक कार्य होत नाहीं.

" 'एव्हां' किंवा 'आतां' शब्दाची व्याप्ति 'सर्वदा' या शब्दाशीं नाहीं " काय? नीट विचार करून पहा, ह्मणजे तुह्मांसही असें आढळून येईल कीं " स्थळ ही वस्तु विद्यमान नसून मायेच्या योगानें आपल्या इंद्रियांस " भासमान होते. तसाच काळ. वास्तविक पाहतां स्थळही नाहीं आणि " काळही नाहीं. आपण आहों, पण ते काय आहों, हें समजत नाहीं. " सच्चिदानंदरूप परमेश्वररूपी सर्वव्यापी अतींद्रिय सूक्ष्म पदार्थांत आपण "ठिणग्यांप्रमाणें पोहत आहों, इतकेंच.

" तात्पर्य, हें प्रत्यक्ष, व भरींव दिसणारें जग हें हवेंतील किल्ल्याप्रमाणें " केवळ भासमान मात्र असून 'मी' एवढेंच काय तें सत्य तत्व ठरतें. " आणि ही सृष्टी, की जींमध्यें इतक्या गोष्टी उत्पन्न होतात व लयास " जातात, ती तरी आपल्या अंतर्गत चैतन्याचें नुसतें प्रतिबिंब किंवा या " आत्म्याचे स्वप्नांतील तरंग होय. किंवा गीटे[११] कवीच्या फास्ट नामक " काव्यांतील एका भूमिकेनें ह्मटल्याप्रमाणें ही सृष्टी ईश्वरास दृश्य करणारें " सजीव वस्त्र होय असेंही ह्मणतां येईल. फास्ट ह्मणतो :—

---

११ गीटी (गटे)—(१७४९-१८३२) हा आधुनिक जर्मन पंडितांत अत्यंत विख्यात पुरुष होऊन गेला. हा १५ वे वर्षी लैपसिकच्या कालेजांत अभ्यास करूं लागला. तेथून कायद्याचा अभ्यास करण्याकरितां तो स्ट्रॅसबर्ग युनिव्हरसिटींत गेला. तेथेंही त्याचें लक्ष्य कायद्यापेक्षां शारीरशास्त्राकडे व वैद्यकाच्या इतर अंगभूत शास्त्रांकडेच जास्त वेधलें. पुढें कायद्याची परीक्षा झाल्यावर वेझ्लर येथें जेरुसेलेम नावांच्या एका तरुण पुरुषाचें एका स्त्रीवरील प्रेम व आत्महत्या पाहून त्यावर त्यानें आपला वरदर हा ग्रंथ लिहिला. या उत्कृष्ट ग्रंथामुळें सर्व लोकांचे डोळे त्याकडे लागले. पुढें त्यानें सेक्सवीमरच्या संस्थानांत नोकरी पतकरिली. तेथें त्याची मान्यता वाढतां वाढतां त्यास तेथील काऊन्सिलचे अध्यक्ष नेमिलें. वीमर येथें त्याच्या सहवासास जर्मनींतले मोठमोठे नामांकित पंडित येऊन राहिले. गीटीकडे वीमराच्या नाटयशालेची व्यवस्था असे. तेथें शिलरच्या चेपसड्वर नांवाच्या नाटकानें लोकांस अगदीं तल्लीन केलें. स्वत: लिहिलेलीं नाटकेंही तो तेथें करी. त्यांत "फास्ट" हें फारच उत्कृष्ट आहे. त्यानें पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत. शांपेन प्रांतावर स्वारी झाली तींत तो होता. पुढें तो सेक्सवीमरच्या राजाजवळ प्रधानकीचे कामावर होता. त्यास फ्रान्सचा बादशहा नेपोलियन बोनापार्ट व रशियाचा बादशहा अलेक्झांडर दी ग्रेट यांकडून फार मोठ्या सन्मानाचीं वस्त्रें व किताब मिळाले कार्लाइल यानें सदर ग्रंथांत त्याचा व त्याच्या फास्ट आणि वरदर या ग्रंथांचा पुष्कळ ठिकाणीं उल्लेख केला आहे.

## लावणी

" कर्मरूप वादळामध्यें चैतन्य सागरांत । अहा चैतन्य सागरांत ॥
" खालीं वरतीं नाचत नाचत काम आह्मी करित ।
" काळ असे हा माग आमुचा जन्म मृत्यु धागे ॥
तयावर जन्म मृयु धागे ॥
" चैतन्याचें धोटें टाकुनि काढितसों मागें ॥
" अखंड करुनी काम तयावर सृष्टिरूपवस्त्र ॥
" काढितों सृष्टिरूपवस्त्र ॥
" लेवुनि यातें ईशहि तुमच्या दृष्टि योग्य होत ॥ १ ॥

" ही लावणी वीस कोट लोकांनीं वाचली असेल. त्यापैकीं विसांना तरी " तींतील इंगितार्थाचा बोध झाला असेल काय?

" अशाच एका प्रसंगीं वरच्या सारख्या उदात्त विचारांनीं श्रांत व " थक्क झालों असतां सदरील कपड्यांचा प्रश्न प्रथमतः माझे लक्ष्यांत " आला. मला आश्चर्य एवढेंच वाटतें कीं या जगांत शिंपी आहेत आणि " शिंप्यांनीं सजविलेले लोकही आहेत. परंतु ही गोष्ट इतर प्राण्यांत आढ- " ळून येत नाहीं ! मी ज्या घोड्यावर बसतों त्याला घातलेलें खोगीर, " वाद्या, वगैरे काढून टाकिलें तरी त्याला कांहींच कमीपणा येत नाहीं. " त्याचे आंगावर केंसांनीं भरलेलें जाड कातडें आहे तेवढ्यानेंच तो उत्तम " दिसतो. त्याला शिंपी लागत नाहीं, कोष्टी लागत नाहीं, किंवा सूत कात- " णाराही लागत नाहीं. त्याला चांभाराची जरूर नाहीं, जवाहिऱ्या लागत " नाहीं, व सुई धागा विकणारा पसारीही लागत नाहीं. तो पाहिजे " तेव्हां पाहिजे तिकडे जातो; आणि दरबारी थाटाचा उत्तम पोषाख, कीं " ज्याला पावसाचेंही भय नाहीं, असा सदैव त्याचे आंगावर असतो. बरें, " उंचेच्या मानानें व बेताबाताच्या मानानेंही त्यांत कांहीं कमजास्त करितां " येईल असें नाहीं. शिवाय शोभेचे मानानेंही त्यांत काहींच उणेपणा " नाहीं. त्यालाही योग्य ठिकाणीं **झालरी, गोंडे,** व उत्तम उत्तम **रंग** " आहेत. हीच माझी स्थिति पहा. मी आपले आंगावर मेंढ्यांच्या मेलेल्या " लोंकरीचें, झाडांच्या सालीचें ( सण व ताग वगैरेचें ) किड्यांच्या आंत- " ड्यांचें ( रेशमाचें, ) बैलांच्या कातड्याचें, ससे वगैरेंच्या लोंकरीचें, छपर

" घातलें आहे. आणि असा चिंध्यांच्या पुतळ्या सारखा बनून मी बाहेर
" हिंडत असतों. तात्पर्य, **सृष्टिदेवीच्या** उकिरडयांत कुजत पडणाऱ्या ज्या
" जिनसा, त्यांची रास डोक्यावर घेऊन मी वाहत असतों. विशेष इतकाच
" कीं माझ्या आंगावर ते पदार्थ जरा सावकाश कुजतील. दिवसानुदिवस
" हें झोंपडें मला पुन्हां नवें करावें लागतें, कारण वर्दळीमुळें जुन्याची
" जाडी कमी होत होत अखेरीस तें पुन्हां उकिरडयावर टाकावें लागतेंच.
" याप्रमाणें जुन्या चिंध्याचें पीठ किंवा केर झाल्यावर त्या उकिरडयांत
" टाकून द्याव्या व नव्या चिंध्या पीठ करण्याकरितां घ्याव्या, हाच
" आमचा कारखाना ! ही स्थिति पशूंहून किती नीच ! अति निंद्य ! कारण
" सर्व अवयव झांकून टाकणारें कातडें मलाही ईश्वरानें दिलें नाहीं काय ?
" आणि तेंही किती स्वच्छ ? असें असतां, **शिंपी** व **चांभार** यांनीं
" कातरलेल्या चिंध्यांचे गाठोडयाइतकीच आमची योग्यता काय ? कां
" आह्मींही ठाकठीक, सावयव, सर्वत्र सारखे, स्वनियंत्रित, व जिवंत
" प्राणी आहों ?

" मनुष्य जातीचे प्राणी अगदीं स्पष्ट गोष्टींत सुद्धां इतकें दुर्लक्ष्य करून
" आश्चर्यकारक व भीतिप्रद गोष्टींनीं सर्व जग व्याप्त असतां, केवळ
" गतानुगतिकत्वानें कसे वागतात याचेंच मला नवल वाटतें. परंतु नवल
" तरी कशाचें ? मनुष्य हा नेहमींच शंख व सुस्त असून ऐंद्रियविषयांतच
" गर्क राहतो; मनन करणें अगर विचार करणें यांकडे त्याची प्रवृत्तीच
" नाहीं. विवेकाविरुद्ध समजुतींचा जसा कांहीं आपल्यास तिटकारा
" असावा, असें तर तो इकडून दाखवितो, आणि इकडे विवेकाविरुद्ध
" कल्पनाच त्याच्या नियंता झाल्या आहेत ! गतानुगतिकत्व किंवा अंध-
" परंपरा हवें तसें त्यास शेंडी धरून वांकवीत आहे. तें इतकें कीं सूर्योदय
" किंवा जगाचा उदय या सारख्याही अद्भुत गोष्टी एकाहून अधिक वेळ
" झाल्या कीं लागलेंच त्यांतलें अद्भुतत्व नाहींसें झालें असेंच तो
" समजतो. इतकेंच नव्हे, तर तिकडे आपण लक्ष पोहोंचवावें असेंही त्यास
" वाटत नाहीं ! मनुष्य जातीचा द्विपाद पशु सोन्यानें मढलेला **राजा** असो
" किंवा खादीची बंडी घातलेला **कुणबी** असो, तो व त्याचे कपडे हे परस्प-
" रांपासून भिन्न असून हे कपडे विकत घेतल्याशिवाय, अगर चोरल्याशिवाय

" किंवा त्याचे त्यानें नीट तरतुदीनें बेतून शिवून त्यांस बंद, गुंड्या वगैरे
" लावून तयार केल्याशिवाय ते त्याच्या आंगावर येत नसतां मुळीं आपण
" नग्न प्राणी आहों ही गोष्ट सगळ्या जन्मांत एक वेळही त्याचे लक्ष्यांत
" येत नसेल !

" मला तर या माझ्या कपड्यांच्या झोंपडीकडे पाहून, व तिजमुळें
" मला अंतर्बाह्य जो हिणवटपणा आला आहे त्याकडे पाहून काय वाटत
" असेल, त्याची कल्पना गौडा प्रांतांत उच गाई अंगांत रंगीबेरंगी गोण-
" पाटाच्या बंड्या ( झुली ) घालून एकाग्रतेनें चरत असतात, त्यांचेकडे
" पाहून मात्र होणार आहे. तत्रापि जेव्हां एखादा मनुष्य आपली कप-
" ड्यांची झूल टाकून देऊन आपण नग्न आहों व आपण केवळ शरीरात्म-
" कच नसून एकंदर अद्भुत गोष्टींतली अद्भुत गोष्ट ह्मणजे चैतन्य तेंही
" आपणांत आहे असें जेव्हां त्याचे लक्षांत येतें तीच वेळ त्याच्या खऱ्या
" भाग्योदयाची समजली पाहिजे.

---

# भाग नववा.

## आदमीधर्म[१].

मागील भागांत अखेरीस जीं मतें सांगितलीं त्यावरून कोणाही सभ्य
वाचकास राग येऊं नये अशी आमची प्रार्थना आहे. सदरील परिच्छेद
जेव्हां प्रथम आमचे वाचण्यांत आला, तेव्हां आह्मांसही असें वाटलें कीं,
आमची नुसत्या सहजावस्थाभिमानी पुरुषाशींच गांठ पडली नसून वस्त्रमा-

१ आदमीधर्म—पश्चिमेकडील राष्ट्रांच्या पुराणाअन्वयें मनुष्य जातीचा आदि पुरुष
जो आदम त्याप्रमाणें नग्न राहून तसाच व्यवहार करणाऱ्या लोकांचा पंथ. हा पंथ दुसऱ्या
शतकांत उत्पन्न झाला. त्यांतील लोक देवालयांत नग्न रहात व लग्नकार्यें न करिता
सामान्यत्वेंकरून व्यवहार करीत. हा पंथ लौकरच लयास गेला. पण त्याचा उदय पुन्हां
बारावे शतकांत होऊन त्यांत आणखी कांहीं जास्त वेडगळ गोष्टी आल्या. तेव्हांही त्याचा
लवकरच अंत झाला. पुन्हां १४ व्या शतकांत या पंथांतील कांहीं स्त्रीपुरुष बोहीमिया
प्रांतांत आढळून आले. तेथें एका बेटांत ते सर्व नग्न राहून सामान्यत्वें व्यवहार करीत. सन

त्राचा येथून तेथून निषेध करणाऱ्या दिगंबरी मताच्या इसमाशीं पडली आहे; आणि तीही केव्हां तर वेडगळ समजुतींचा व धर्मवेडाचा उच्छेद करूं पाहणाऱ्या या **एकोणिसाव्या शतकांत !**

अरे मूर्खा टच्यूफेल्सड्राका, कोणच्याही युगांत झालें तरी स्त्रिया व पुरुष या उभयतांनाही कपडच्यांनीं किती सुखाची जोड करून दिली आहे याचा थोडा तरी विचार करून घ्याहावयाचें असतेंच ! अरे, तूंच जेव्हां जन्मलास तेव्हां विळविळीत मासाच्या गोळ्यासारखा या ग्रहावर[३] आलास असून या जगाकडे शून्यदृष्टीनें पहात होतास. तेव्हांच तुझ्या आंगावर घातलेलीं पांघरुणें जर नसतीं तर तुझी काय स्थिति झाली असती ? व तशा स्थितींत तुला टाकून दिलें असतें तर तूं स्वतःस आणि इतरांस सुद्धां अरिष्टप्राय झाला नसतास काय ? तुझीं दुपटीं व बाळंतीं जाऊन प्रथम तुला अंगडीं टोप्या व कुंच्या घातल्या तो दिवस तूं विसरलास काय ? त्या दिवशीं सर्व शेजाऱ्यापाजाऱ्यांना ही गोष्ट मोठ्या समारंभानें कळविली असेल व ते तुझ्या आयुष्यांतल्या या पहिल्या आनंदाचे दिवशीं जमून त्यांनीं आपआपल्या शक्त्यनुसार तुला कपडे लेववून मोठ्या कौतुकानें तुझ्या गुलगुलित गालाचे मुके घेतले असतील तें सर्व तूं विसरलास काय ? शिवाय **नटवे, छानशोक,** अगर **नखरेबाज,** किंवा देशकालाप्रमाणें उत्तम

---

१४२१ त त्यांतलि बहुतेक लोकांस जिवंत जाळून लिस्का यानें या पंथाचा उच्छेद केला. या पंथाचे कांहीं लोक नुकतेच आस्ट्रेलियांत आढळले आहेत. परंतु ते उद्योगी व शांत असून त्यांच्यांत नग्नत्वादि गोष्टी असल्या तरी त्या बाहेर दिसत नाहींत. हिंदुस्थानांत असे दिगंबर लोक फार प्राचीन काळापासून आहेत. पण ते विरक्त असून संसार मार्गांत नसतात.

२ दिगंबरीमत—नग्नत्वादि नैसर्गिक स्थिति चांगली असें मानणाऱ्यांचा पंथ–सन १७९१ त फ्रान्समध्यें गरीब देशभक्त निघाले त्यांस प्रथम sansculottist हें टोपण नांव लावीत असत. हे लोक वायफळ चालीरितींचा व श्रीमंत लोकांच्या डामडौलाचा तिटकारा करीत. यावरून राज्यक्रांतीच्या वेळीं समाजांतील उच्चनीच भाव नाहींसा करूं पाहणाऱ्या रूसोसारख्या लोकांना हें नांव देऊं लागले–आणि कार्लाइल साहेबांनीही याच अर्थानें हा शब्द योजिला आहे- दिगंबरी मताचा मनुष्य ह्मणजे श्रीमंती वगैरे वरील डौलावरून समाजांत होणारा उच्चनीच भाव ज्यास आवडत नाहीं तो.

३ पृथ्वी हा सुर्यमालिकेंतलि एक ग्रह आहे ( पु १ भा. १ टीप ५ )

पोषाख घालून नटणाऱ्या लोकांस जीं नांवें असतील तीं नांवें असणाऱ्या लोकांच्या स्थितींत तूं कधींच नव्हतास काय? त्या एकट्या विलक्षण नांवांतच अनेक ग्रंथांचें सार आहे. फार काय सांगावें, पण वयोमानानें तुझा अल्लडपणा जरी आज कमी झाला असला, आणि मिरवण्याच्या हेतूनें जरी आज तुला कपडे घालावयाचे नसले, तरी ते घालतोस तेव्हां या कपड्यांशिवाय आपलें चालावयाचें नाहीं आणि आपल्या शारीरिक हीनतेमुळें कपडे आपणांस घालावे लागतात, अशा बुद्धीनेंच ते तूं घालतोस काय? हे कपडे ह्मणजे आपल्या शरीराभोंवतीं दुसरें शरीरच असून त्यांचे योगानें हवेंतील फेरबदलाची आपणांस बाधा होणार नाहीं असें वाटून तरी तुझ्या मनांत कपड्यांविषयीं एक प्रकारची आदर बुद्धि कधीं वाटत नव्हती काय? अरे तुझ्या घोड्याचें तुला कौतुक वाटतें, त्या घोड्यावर बसूनच जो तूं भर हिवाळ्यांत सुद्धां बिन दिक्कत बाहेर हिंडत होतास तो उबदार उंची कपड्यांच्या, सुरेख मजबूत बुटांच्या, व हरणाच्या कातड्याच्या हातमोजांच्याच जिवावरना? वरून बर्फमालिका सर्वत्र कोसळत होत्या त्यांचें तुझ्या ऊबदार लोंकरीच्या कपड्यांमुळें तुजवर कांहींच चाललें नाहीं; अरण्येंच्या अरण्यें उध्वस्त करून सिंहनादानें घुमणाऱ्या वाऱ्याचेंही तुझ्या पोषाखापुढें कांहीं चाललें नाहीं; व त्यांतूनही तूं घोड्याच्या टापांनीं रस्त्यावर चकमक झाडीत जात होतास. त्या वेळेस जर तुझे कपडे नसते किंवा तुझ्या घोड्याला खोगीर लगाम नसता तर तुझी स्थिति काय झाली असती? आणि तुझ्या त्या चपळ घोड्याची तरी काय झाली असती? सृष्टींत दिसून येणारी प्राण्यांविषयीं ईश्वरी तरतूद खरोखरच चांगली आहे. पण ती असावी तितकी चांगली नाहीं आणि तिची उणीव कपड्यांचे योगानें नाहींशी करून कलादेवीनें ईश्वरी योजनेवरही ताण केली असें ह्मणण्यास काय हरकत आहे? [१] वीजच कोसळली असती तर तुझें कांहीं चाललें नसतें हें खरें, परंतु बाकी कोणत्याही गोष्टीस तुझ्या कपड्यांचे जिवावर तुला टक्कर देतां आली असती.

हें आह्मीच ह्मणतों असें नाहीं. आमचे सभ्य वाचकही आज आपले

---

१ मानवी युक्त्यांनीं ईश्वरीयोजनेंतलाही कमीपणा दूर केल्यामुळें अर्थात कलेस जास्त महत्व दिलें पाहिजे असा भावार्थ.

मनांत ह्मणत असतील की काय हो हे तुमचे ट्यूफेल्सड्राक साहेबच नुकते ह्मणत होते ना, कीं या रानटी लोकांची स्थिति फारच वाईट होती ह्मणून, आणि त्याला हरताळ लावून आज तेच आह्मास आंगच्या कातड्यावर केंसांची झूल वाढवून बाहेर हिंडावयास लावणार कीं काय ?

छे, छे, सभ्य वाचक हो, आमचे प्रोफेसर साहेब जें लिहितात, ते नीट विचार करूनच लिहितात. आपण मात्र त्यांचा भावार्थ नीट समजून न घेतां त्यांस व्यर्थ दोष देत आहों. कारण जरी आज कपडे आपणांस हीनत्व आणीत असले, तरी ही बूड अन्य मार्गांनीं भरून येण्याजोगी नाहीं काय ? याच कपड्यांचा जास्त फलद्रूप रीतीनें उपयोग करितां येणार नाहीं काय ? कीं त्यांना उकिरड्यावरच फेंकून दिलें पाहिजे ! वास्तविक पाहतां जरी ट्यूफेल्सड्राक साहेब सहजावस्थाभिमानी असले तरी ते वस्त्रांचा समूळ निषेध करणारे नाहींत. आणि या हीन स्थितींतून वर डोकें काढण्याचा जरी त्यांचा विचार असला तरी आदमीथर्मांतील लोकां-प्रमाणें नग्नत्व स्वीकारल्यानें आपली स्थिति सुधरेल असें त्यांचें मत नाहीं. कपड्यांचा उपयोग आहे ही गोष्ट त्यांच्या लक्ष्यांत स्पष्ट आलेली आहे, इतकेंच नव्हे, तर कपड्यांचा जो विलक्षण प्रभाव आजपर्यंत कोणाचे लक्षांत आला नव्हता तो व त्यांचें गूढ बीज हींही ट्यूफेल्सड्राक साहेबांचे दृष्टोत्पत्तीस आलीं आहेत.

उदाहरणार्थ, ते ह्मणतात " हीं येथें दोन माणसें आहेत; एकानें उत्तम
" **तांबडा** पोषाख घातला आहे, व दुसऱ्यानें रांठ व भरड निळ्या काप-
" डाचा घातला आहे. **तांबडा पोषाख**वाला **निळ्यास** ह्मणतो, 'तूं जा
" आणि फांसावर चढ ! मग तुझें शरीर शस्त्रवैद्याकडून फाडावयाचें
" आहे'. **निळा** बिचारा पोटांत धस्स होऊन हे शब्द ऐकतो, आणि
" केवढें नवल ह्मणावयाचें, निमुटपणें फांसाकडे जातो, व तेथें त्यास फांसा-
" वर चढविल्यावर जीव जाईपर्यंत धडपडतो ! मागून शस्त्रवैद्य येऊन
" त्यास फाडतात आणि त्याचे हाडांचा सांपळा करून शस्त्रवैद्यक शिक-
" विण्याच्या कामाकडे लावितात. हें इतकें होतें कसें ? जी वस्तु जेथें
" आहे तेथल्याशिवाय तिचा अंमल दुसरीकडे व्हावयाचा नाहीं हा तुमचा
" सिद्धांत नां ? मग त्याचें काय झालें ? शरीराचे मानानें पाहतां या

५ पु. १ भाग ८ टीप १० पहा.

" तांबड्या मनुष्याचा निळ्या मनुष्यावर अगदींच ताबा नाहीं. त्यानें
" त्याला धरिलेलें नाहीं इतकेंच नव्हे तर त्या दोघांचा नुसता शिवाशिवी-
" चाही संबंध नाहीं. फार तर काय, हे फांसावर चढविणारे लोक, फळी
" पाडणारे लोक, फौजदार, पोलीस यांचाही त्या हुकमत करणाऱ्या तांबड्या
" मनुष्याशीं कांहीं असा शारीरिक संबंध नाहीं कीं त्याच्या योगानें त्याला
" त्या लोकांस इकडे तिकडे हालवितां येईल. प्रत्येकाचें शरीर मोकळें
" असून प्रत्येक जण अलग अलग उभा राहतो. तत्रापि जसें हा बोलतो
" तसेंच ते करितात! याचे तोंडांतून शब्द निघाला कीं त्याचा अंमल त्या
" लोकांचे हातावर होऊन फांसाची दोरी व सुधारलेली [६]फळी आपआपलें
" काम आटोपतात.

" विचारशील वाचक हो, याचीं मला दोन कारणें दिसतात. पहिलें हें
" कीं, मनुष्याचें खरें **स्वरूप** चिन्मय आहे आणि तो अनेक अदृश्य
" **बंधनांनीं** इतर मनुष्यांशीं बांधलेला आहे. दुसरें असें कीं वरील
" **गोष्टींचें** दर्शक जे **कपडे** ते तो आंगांत घालितो. या तुमच्या तांबड्या
" मनुष्याच्या डोक्यावर घोड्याचे केंसांचा **टोप** आहे आणि अंगावर
" खारींचीं कातडीं, व एका विशेष प्रकारच्या तांबड्या कापडाचा झगा
" आहे; आणि ह्या वस्त्रांच्या योगानें हा फलाणा मनुष्य **जड्ज्य** आहे
" असें लोक समजतांत. अर्थात ज्या समाजाचें राहून राहून मला इतकें
" कौतुक वाटतें, तो सर्वथैव **कपड्यांवर** उभारला आहे.

" कधीं कधीं विचारांत निमग्न असतां **फ्रँकफर्ट** येथील **राज्यारोहण,**
" **वाढदिवसाचे दरबार** वगैरे समारंभांचें वर्णन माझ्या वाचण्यांत येतें;
" त्यांत **राजसाहेबांचे** बाजूस हा अमुक **सेनापति** उभाराहून व अमक्या
" अमक्या **सरदारांस राजापुढें** उभें करून त्यांची माहिती **राजेसाहेबांस**
" करून देऊन त्यांचा मुजरा होतो; तसेंच हा अमुक **संस्थानिक** आपल्या
" **मांडलिकांस राजेसाहेबांसमोर** उभें करून, हा फलाणा हा अमका,
" असें सांगून त्यांचेही मुजरे होतात; या प्रमाणेंच **सुभेदार, उपाध्याय,**

---

६ सुधारलेली फळी—फांशी द्यावयाचा मनुष्य ज्या फळीवर उभा राहतो ती त्यास धक्का न बसतां एकदम साफ पडून फांस बसावा अशी योजना केलेली असते.

७ निरनिराळ्या देशांत विशिष्ट अधिकारदर्शक निरनिराळे पोषाख असतात. येथें दिलेले पोषाख जर्मनींतले आहेत.

" **फडणीस** वगैरे अनेक प्रकारचे कामगार त्या सिंहासनावर बसलेल्या
" **राज्याभिषिक्त** पुरुषांपुढें मोठ्या अदबीनें जाऊन, लवून मुजरा करीत
" आहेत, इकडे **भालदार** ललकाऱ्या मारीत आहेत, **छडीदार** व **चोपदार**
" लोकही आपआपले कामावर तत्पर आहेत, असें वाचून एकांतांत या
" अद्भुत समारंभाचें चित्र कल्पनेनें डोळ्यांपुढें आणीत असतां एका एकीं
" जादूचीं कांडी फिरल्याप्रमाणें काय चमत्कार होतो पहा,—सांगूच का
" आतां?—सर्वांचे कपडे अकस्मात नाहींसे होतात, आणि सर्व **संस्थानिक,**
" **मांडलिक, सेनापति, सरदार, उपाध्याय, मानकरी** वगैरे त्या नाट-
" कांतील असंख्य माणसें, **अभिषिक्त राजेसाहेबांसुद्धां** एकदम नग्नदिगंबर
" झालेले दृष्टीस पडतात. कोणाच्या अंगावर एक सूतही दिसत नाहीं.
" अशा वेळेस हंसावें कीं रडावें हें मला कांहींच कळत नाहीं. शरीर
" व्यंगतेमुळें ह्मणा, किंवा मानसिक व्यंगतेमुळें ह्मणा, माझी अशी स्थिति
" होते खरी. आणि कदाचित् इतरांचीही तशी स्थिति होत असेल, व
" आपल्यासारखेंच अमक्याला होतें असें पाहून तरी त्यांना बरें वाटावें,
" ह्मणून धीर करीत करीत ही गोष्ट प्रसिद्ध करण्याचा मीं विचार केला."

शिव शिव! ही गोष्ट गुप्त ठेवण्याचीच या गृहस्थाला बुद्धि झाली असती तर किती चांगलें झालें असतें? आतां हा सर्व प्रकार वाचून दरबारांचीं पांच पांच कालमांचीं वर्णनें पोटांत धस्स झाल्याशियाय कोणाच्यानें वाचवतील? परंतु आमच्या एककल्ली ग्रंथकारास इतक्या निष्ठुरतेनें वागाविणें बरोबर नाहीं; कारण सर्वच मनुष्यें थोडीं बहुत एककल्ली असतात, असा विचार होतो. एवढ्याच करितां आमच्या प्रोफेसर साहेबांनीं कांहीं आड पडदा न ठेवतां काढलेलें हें चित्र असेंच कांहीं वेळ पाहूं. ट्यूफेलस्ड्राक साहेब पुढें ह्मणतात.

" कल्पनातरंगांत जी ही गोष्ट मला दिसते तीच खरी होऊन असल्या
" समारंभांत एकदम सर्वांच्या कपड्यांच्या गुंड्या निघून सर्व **कपडे** अदृश्य
" झाले तर कसें होईल? मग **सिंहासनावर** विराजमान झालेल्या **महारा-**
" **जांची** दशा काय होणार? प्रत्येक मनुष्य कोठें तरी आडोशास बस-
" ण्याकरितां दबत दबत चालूं लागतो आणि हें **राज्याचें शोकपर्य-**
" **वसायी नाटक** मध्येंच थांबून त्याचे ऐवजीं शोकपर्यवसायी फार्स

" होऊन, सर्व लोक शोकाकुल होतात!!! असो, याप्रमाणें एकटें वस्त्र
" नाहींसें झाल्यानें किती विपर्यास होईल! होरेस[८] कवी ह्मणतो त्याप्रमाणें
" मूळपासून राज्याचा सर्व सांगाडा ह्मणजे कायदे, मालमत्ता, बंदोबस्त,
" व समाज या सर्वांचेंच पृथःकरण होऊन सर्वांचा शेंवट आरडाओर-
" डींत व्हावयाचा."

एखादा नग्न सरदार पार्लमेंटांत नग्न सभासदां समोर भाषण करीत आहे अशी कल्पना करण्यासारखा कोणी तरी मनुष्य असेल काय? आमची कल्पना तर येथेंच स्तंभित होऊन पुढील वर्णनाकडे पाय घेत नाहीं. अशा नग्न सभेंतील अध्यक्ष, विधिपक्ष[९], निषेधपक्ष वगैरेचें वर्णन करावें तर त्यापैकीं कोणीही नग्न स्थितींत आमच्या वाचाशक्तीच्या टप्यांत रहात नाहींत! परंतु वास्तविक पाहतां अशी गोष्ट सृष्टिधर्माविरुद्ध आहे असें नाहीं. कारण स्वतंत्रतेच्या आधारस्तंभासारखे हे पुरुष गेल्या रात्रींच बहुतेक नग्न नव्हते काय? आणि नशीबच फिरलें तर अशा स्थितींतही त्यांस हिंडावें लागणार नाहीं काय? अर्थात याप्रमाणें हिंडल्याफिरल्यावर न्यायसभेंत किंवा दरबारांत अशीं मनुष्यें असण्यास काय हरकत आहे? असो; पण टयूफेल्सड्राक साहेब! कदाचित् इतरांचीही माझ्यासारखी स्थिति होत असेल, त्यांना बरें वाटण्याकरितां' असें ह्मणून सदरील विचार आपण लोकांपुढें मांडले आहेत; परंतु असली मानसिक अगर शारीरिक व्यंगता कोणत्याही माणसांत असेल असें तरी आपणांस वाटतें काय? आतां ही आपल्या ग्रंथांतील आपली अप्रातिम जबानी वांचून मात्र कोणाचे मनांत असलें वेड आलें तर नकळे; आणि तसें झालें तर त्यास उपायही चालणार नाहीं. असें जाणून ही जबानी पूर्णपणें येथें देण्यास आमचा हात वाहात नाहीं. वास्तविक पहातां टीकाकार व चरित्रकार या नात्यानें ती सबंध लोकांपुढें मांडणें हें आमचें कर्तव्य होतें. परंतु टयूफेल्सड्राक साहेब हे केवळ मत्सरानें गांजलेले दिगंबरी मताचे किंवा वेडसर मनुष्य आहेत अशीच तूर्त समजूत करून घेऊन या जबानीकडे कानाडोळा करणेंच आह्मांस आतां प्रशस्त वाटतें.

---

८ होरेस —( ख्रि. पू. ६५–८ ) एक नामांकित रोमन कवी. याच्या ओड्स नांवाच्या काव्याचें सर्व यूरोपियन भषांत भाषांतर झालें असून त्यांत फार विलक्षण रसवैचित्र्य आहे.

९ विधिपक्ष—एखादें मत स्थापून त्याचें मंडन करणारी बाजू. निषेधपक्ष—त्या मताचें खंडण करणारी किंवा त्यावर आक्षेप घेणारी बाजू.

असो. ही सर्व जबानी झाल्यावर ट्यूफेल्सड्राक साहेब त्याच तावांत पुढें ह्मणतात, " या परिच्छेदांत आतां एका गोष्टीची मात्र चिकित्सा करा-
" वयाची राहिली. शेतांत किंवा इतर ठिकाणीं मनुष्यासारखीं बुजगावणी करून
" ठेवितात तीं वाचकांच्या पाहण्यांत असतीलच, त्यांचेही अंगावर मनुष्या
" सारखे कपडे असतात. तींही राजाप्रमाणें मालमत्तेचें रक्षण करणारीं
" असून, कायद्यासारखी दुसऱ्यांत भीति उत्पन्न करण्याची शक्तिही
" त्यांच्यांत आहे. तेव्हां त्यांनाही धर्माचा फायदा, व आपला निवाडा
" बरोबरीचे पंचांनीं करण्याचा हक्क[10] कां नसावा? आणि राजास जशा कांहीं
" गोष्टी करण्याचा अधिकार असतो, आणि कायद्यांचा जसा सर्वत्र अंमल
" असतो, तसा अधिकार व तसा अंमल या बुजगावण्यासही कां नसावा[11]?
" आणि तो या गांवढळ व कद्रु मनुष्यांनीं त्यांस कां देऊं नये? या
" गोष्टीचा विचार अवश्य झाला पाहिजे. × × × × तात्पर्य
" माझ्या मित्रानों, **यारिक स्टर्न**[12] ह्मणतात त्याप्रमाणें आपण शुद्ध बदका-
" सारखे आहों. एका काठीस तांबडें फडकें लावून जशीं तिनें बदकें हांकतात
" तद्वतच या वरकांति पोषाखांच्या सोंगांचा आपणांवर अंमल आहे,
" आणि नारफोक परगण्यांतील बदकें राखणारीं पोरें नारळाच्या नरोटींत
" कांहीं खडे भरून बदकांकरितां बुजगावणीं करितात तसल्या बुजगावण्या-
" नींच आपल्यांतले मोठे तिस्मारखांही भीत असतात!"

---

१० बरोबरीच्या पंचांनीं निवाडा करण्याचा हक्क. इंग्लिश लोकांत अशा प्रकारचा हक्क पुरातन काळापासून थोडा बहुत होता. परंतु मॅग्नाचार्टा नांवाच्या सनदेंत यास विशेष महत्वाचें स्वरूप आलें. अलीकडे आपल्या राज्यकर्त्यांनीं प्रजेच्या फायद्याकरितां ही पद्धत या देशांतही कांहीं ठिकाणीं सुरू केली आहे.

११ तात्पर्य, अंगावर कपडे घालणें मालमत्तेचें संरक्षण करणें, भीति दाखविणें वगैरे गोष्टी बुजगावणींही करितात. तेवढ्याच जर मनुष्यांनीं केल्या तर बुजगावण्यांत व मनुष्यांत फरक काय? व मग हे विशिष्ट हक्क मनुष्यास कां असावें आणि या बुजगावण्यास माल कां नसावे?

१२ स्टर्न ( लॉरेन्स )१७१३–१७६८ एक मार्मिक इंग्लिश कादंबरीकार. याचा मुख्य ग्रंथ " ट्रिस्टम शँडी " या नांवाचा आहे. यानें यारिक या टोपणनांवाखालीं कांहीं उपदेशपर निबंधही लिहिले आहेत.

# भाग दहावा.

## शुद्ध विवेक

वर ध्वनित केल्याप्रमाणें आमचे प्रोफेसर साहेब एक निःसीम सुधारक पंथाचे गृहस्थ असून त्यांचीं मतेंही अत्यंत कठोर आहेत हें आतां आमच्या वाचकांस उघड कळलें असेल. या सुधारलेल्या मनुष्यसमाजांतील मोठमोठे समारंभ व त्यांचीं उपकरणें आमच्या प्रोफेसर साहेबांस चिंध्यांसारखीं किंवा बदकें राखण्याच्या काठीसारखीं किंवा खडे भरलेल्या नरोटीसारखींच दिसतात! असल्या वाक्पांडित्यांत प्रकृत विषयास अवश्य आहे त्यापेक्षां जास्त रेंगाळणें आमच्या सुज्ञ वाचकांस आवडणार नाहीं. आणि आपल्या प्रकृत विषयास तरी, नग्न समाज शक्य आहे, किंबहुना आज सुद्धां वस्त्रा-आड जग नागवेंच आहे, एवढी गोष्ट समजली ह्मणजे बस आहे. ह्मणून "सर्व समाज नग्न झाल्यावर **राजे** व **गाडीवान** यांच्यामध्यें कुस्त्या 'होऊन त्यांत राजे पडल्यामुळें शस्त्रवैद्यांनीं चीरफाड करून पाहतां 'राजांच्याही शरीरांत सामान्य मनुष्याप्रमाणेंच हाडें, शिरा, रक्तवाहिन्या, 'मज्जातंतु, मज्जा, मांस वगैरे सामान हुबेहूब तसेंच आहे. त्याचप्रमाणें मान-'सिक शक्तीचें पृथःकरण करून पाहतां गरीब मनुष्यासारखीच अनिवार '**हाव, अस्तुटेपणा** व बुद्धीचा **कमकुवतपणा** हीं त्यांच्यांत दिसून येतात. 'फरक इतकाच कीं या **गाडीवान** लोकांना बैलांचे ओढण्यासंबंधाची, 'गाडीच्या चाकांसंबंधाची, धुरोडपणाची व उलाळपणाची आणि दुसरीही गाडीसंबंधाची किरकोळ माहिती असते, ती राजांना नसते. याचा विचार केला ह्मणजे बुद्धिमतेसंबंधानेंही राजांचा नंबर खालींच लागणार. असें असतां या दोघांमध्यें एवढें महदंतर कां? **वस्त्रांमुळें!**" वगैरे पाल्हाळ

१ धुरोढ, उलाळ—गाडींतील सामानाचा भार धुराकडे (बैलाच्या अंगास) जास्त झाला ह्मणजे गाडी धुरोढ झाली व मागच्या अंगास जास्त झाला तर गाडी उलाळ झाली असें ह्मणतात.

आहे त्याशीं आपणास कांहीं कर्तव्य नाहीं. त्याचप्रमाणें "कपडे व भूषणें " नाहींशीं झाल्यावर समाजांत ज्या प्रती आहेत त्यांत घोंटाळा होऊन " **बाईसाहेब** कोणच्या व **दासी** कोणची हें कांहीच कळणार नाहीं," वगैरे गोष्टी नग्न समाजाचें मुख्य बीज समजल्यावर वाचकांस सहज कळण्यासारख्या आहेत; त्याबद्दलही आतां आह्मी लिहित बसत नाहीं. नग्न समाजांत मर्यादा (विनय), राज्यविचार, बंदोबस्त वगैरे कशीं चालतील अशी जर कोणास शंका असेल तर त्यांनीं पाहिजे तर मूळ ग्रंथाचें अवलोकन करून आपली चिकित्सा पूर्ण करून घ्यावी. मग या दिगंबरी[२] मताच्या ओघांत सबंध फौजाच्या फौजा, फार काय सबंध राष्ट्र गडप होण्याजोगे अनंत डोह आहेत, हें आमचें ह्मणणे खरें कीं खोटें याचा त्यांस अनुभव येईल. पण न जाणों या पुढें दिलेल्या एका मुद्यानेंच जर त्यांची खात्री झाली तर इतका खटाटोपही करण्याचें कारण नाहीं.

" अमेरिकेंत **आपोसम, कांगरू** वगैरे कांहीं जनावरें आहेत त्यांच्या " आंगाला जन्मतःच एक एक पिशवी असते, तशी एखादी पिशवी आप- " ल्यास असती तर किती छान झालें असतें? कारण मग आपणांस जें " इंद्रिय मुख्यत्वें पाहिजे, ज्याच्यावांचून आपलें अडावयाचें, जेथें आपला " जीव प्राण असतो, जेथे बुद्धीचें मुख्य स्थान, तें इंद्रिय ह्मणजे **पैसे " ठेवण्याची पिशवी,** ती कपडे नाहींसे झाल्यावर आपणांस कशी मिळेल " ही ददात राहिली नसती."

या विचारासंबंधानें वाचकांस कांहींही वाटो, परंतु त्यामुळें टच्यूफेल्सड्राक साहेबांचा तिरस्कार करणें योग्य होणार नाहीं असें वाटतें. निदान ते तिरस्कारास पात्र आहेत किंवा प्रीतीस पात्र आहेत याविषयीं संशय तरी राहणार. कारण टच्यूफेलसड्राक साहेबांनीं या संसारांतील अत्युत्कृष्ट गोष्टींच्या चित्रांचें निरीक्षण केवळ उरफाट्या बाजूनेंच केलें आहे असें नाहीं. हें खरें, कीं त्यांनीं उरफाट्या बाजूचेंही निरीक्षण फारच बारकाईनें करून आंतल्या शिवणी, कोस, फाटक्या व उसवलेल्या जागा अगदीं उघड्या करून, अत्यंत निलाजऱ्या धिम्मेपणानें लोकांच्या नजरेस आणिल्या आहेत; आणि यामुळें लोकांचें मन त्यांचेविषयीं अलबत कलुषित झालें

२ दिगंबरीमत—पु० १ भा० ९ टीप २ पहा.

सेल. परंतु त्यांचे आंगीं असा एक अप्रतिम गुण आहे कीं तो पूर्वीच्या सध्यांच्याही इतर दिगंबर लोकांत आढळत नाहीं. तो गुण हा कीं मचे प्रोफेसर प्रत्येक गोष्टीचें निरीक्षण मनाची समता राखून दोन्ही जूंनीं करीत असतात. व ह्मणूनच जरी त्यांनीं इकडे इतक्या तत्परतेनें संसाराचित्राचें उरफाट्या बाजूनें निरीक्षण करून मनुष्याचा हीनपणा क्त केला असला, तरी तितक्याच तत्परतेनें सुरफाटी बाजूही पाहून ुष्याचें नैसर्गिक उच्चत्वही स्पष्ट केलें आहे. एका बाजूनें पाहिलें तर ांनीं मनुष्यास गौडा प्रांतांतील झुली घातलेल्या गाईशिवाय बहुतेक पेक्षां नीच ठरविलें आहे, तरी दुसऱ्या बाजूनें त्यांनीं त्यास प्रत्यक्ष मेश्वराचे जोडीस बसविलें आहे!

ते ह्मणतात " सामान्य लोकांच्या दृष्टीनें मनुष्य ह्मणजे काय आहे? केवळ एक **कपडे वापरणारा सर्वभक्षक द्विपाद पशु**—परंतु विवेकाचे दृष्टीनें पहिलें तर तो **आत्मा, चैतन्य** किंवा प्रत्यक्ष **परमेश्वरच** आहे. **मी** शब्दानें दाखविला जाणारा पदार्थ आहे त्याच्या भोंवतीं या कपड्यांच्या आवरणाचे आंतून **शरीर** नांवाचा इंद्रियात्मक पोषाख आहे. हा पोषाख **परमेश्वराचे मागावर** तयार झाला असून त्याच्या योगानें हा **मी नांवाचा पुरुष** दृश्य होतो; आणि **स्नेहद्वेषादि** धर्मांनीं इतरांशीं ागून आपल्या **बुद्धिवैभवाप्रमाणें** समाज व इतर सृष्टि उत्पन्न करून यांचा उपभोग घेत राहतो. या अप्रमिम शरीरवस्त्रांत अनेक प्रकारचे शब्द, अनेक प्रकारचे आकार, अनेक प्रकारचे रंग यांनीं **तो** इतका गुरफटलेला आहे कीं यांतून त्यास वेगळें करणें अशक्य आहे. हा दिव्य ोषाखही केवळ निंद्य नसून प्रत्यक्ष **ईश्वरानें केलेला, ईश्वरानें घालण्याच्या** योग्यतेचा आहे. या शरीराचे योगानेंच तो या अमर्याद सृष्टीच्या मध्यभागीं राहून **स्थळ** व **काळ** या **अनादि** व **अनंत** वेभूतींच्या मिश्रणांत वास करीत नाहीं काय? त्याला इंद्रियांनीं समतें, त्याला **विवेक** व **ज्ञानशक्ति** हीं आहेत. **श्रद्धा** व **भक्ति** हींही

: पदार्थांस जें स्वरूप आहेसें वाटतें, तीं आपल्या बुद्धिविशेषामुळें वाटणारी माया तें कांहीं खरें व कायमचें स्वरूप नव्हे. खरें स्वरूप काय आहे तें आपणांस कळणें क्य आहे. ही गोष्ट पुढें सिद्ध केली आहे. तात्पर्य हा सर्व खेळ आपल्याच चैतन्याचा ापल्या इंद्रियरूपी नेत्रांवर जो मायेचा चष्मा आहे त्याचाच आहे.

" त्याला दिलीं आहेत; इतकेंच नाहीं, तर **प्रेम** नांवाचा जो केवळ दिव्य
" गुण नाहीं त्याच्या स्वरूपांत, थोडा वेळ कां होईना, पण व्यक्त होतो.
" तात्पर्य स्वर्ग **देव मनुष्य हाच** आहे; **परमेश्वराचें स्वरूप** आपल्या
" डोळ्यांपच नव्हे तर आपल्या अंतःकरणासही जसें **मनुष्य व्यक्तींत**
" दिसून येतें तसें अन्यत्र कोठें तरी दिसतें काय? असें जें एका ऋषीनें
" दिव्य वाणीनें ह्मटलें आहे तें अक्षरशः खरें आहे."

अशा उदात्त विचारांचीं स्थळें जरी थोडीं असलीं तरी असले विचारच सदर ग्रंथकाराच्या स्वभावाचे निदर्शक असावे असें वाटतें; कारण हे विचार सुरू झाले कीं मग त्यांचा सारखा प्रवाहच वाहूं लागतो. आणि जरी त्यावर स्थळविशेषीं ग्राम्य विचाराचें आवरण किंवा कलंक पसरलेला असला तरी त्यांतूनही ग्रंथकाराच्या प्रेमलहरींनीं उचंबळणारा ज्ञानसमुद्र स्पष्ट नजरेस येतो. परंतु पुन्हां त्याजवर तर्कटी विचारांचे ढग येऊन फिरून तो आपल्यास दिसेनासा होतो.

सदरील ग्रंथांत वरच्यासारख्या गूढ विचाराकडे असलेली ग्रंथकाराची प्रवृत्ति सर्वत्र दिसून येते; व हीं गोष्ट सुज्ञ वाचकांच्या लक्ष्यांत मागेंच आली असेल. दुसरें असें कीं आमचे प्रोफेसर साहेब जें जें कांहीं पाहतात त्यामध्यें सामान्य लोकांचे नजरेस न येण्यासारखी कांहीं तरी गोष्ट त्यांस दिसतेच. शिवाय प्रत्येक गोष्टीच्या दोन्ही बाजू पाहण्यास ते कधींच चुकत नाहींत. उदाहरणार्थ शार्लमेन[४] बादशहाचा **झगा** किंवा **राजदंड** वगैरे अव्वल दर्जाच्या वस्तूंत, आणि बैलास टोंचण्याच्या **पुराण्या**[५] व भोंदू लोकांच्या **गोधड्या**[६] या अत्यंत नीच वस्तूंतही ऱ्हास, हीनत्व, व सामान्यपणा हीं जशीं त्यांस दिसतात त्याचप्रमाणें त्या सर्वांतील नैसर्गिक श्रेष्ठत्व व चांगुलपणा हींही दिसतात कारण ते ह्मणतात त्याप्रमाणें " पदार्थ कितीही हीन असला तरी तो चैतन्यमय असतो. चैतन्याची एक बिभूति

४ शार्लमेन किंवा चार्लस दि ग्रेट—( ७४२-८१४ ) फ्रान्सचा राजा व जर्मन बादशाहीचा मूळ संस्थापक. याचें बहुतेक आयुष्य लढायांत गेलें. तो उत्कृष्ट योद्धा असूनही उत्तम कायदेकार विद्वान लोकांचा पुरस्कर्ता होता.

५ पुराणी—टोंकाशीं अणीदार खिळा बलविलेली बैलांस हाकतांना टोंचण्याची काठी.

६ या गोधड्यांत ( कंथामध्यें ) कांहीं अद्भुत गुण आहे असें हे लोक इतरांस भासविण्याचा प्रयत्न करितात.

" ह्मणजेच तो पदार्थ. अर्थात त्याहून श्रेष्ठ काय असणार! त्याचप्रमाणें जी
" वस्तु दृश्य आहे, अगर जिची कल्पना करितां येते, किंवा जी नुसती
" कल्पना करण्यासारखी आहे असें वाटतें; ती ती केवळ **वस्त्रच** नव्हे
" काय? ती त्या **अविज्ञेयाचें वस्त्रच**. कारण तो **अविज्ञेय** पाहूं जातां
" आपल्या दृष्टीच्या पोहोंचा पलीकडे, **अकल्प्य** अतर्क्य व इतका **तेजः-**
" **पुंज** आहे कीं त्याच्या तेजानें आपल्या डोळ्यांस काळोखी मात्र येते;
" असें असतां तो या **दृश्य** व **कल्प्य** वस्तूंचे साह्यानेंच आपणास गोचर
" होतो " असो आमच्या ग्रंथकाराचा हाच गुण पुढें दिलेल्या विलक्षण
अर्थाच्या विलक्षण वाक्यांत स्पष्ट दिसण्यासारखा आहे.

ते ह्मणतात, " कोणत्याही **ज्ञानाचा** उदय होण्यास आपण एकाग्र
" दृष्टीनें या **वरील कपड्यांकडे** पाहिलें पाहिजे; तें इतकें कीं आपल्या
" दृष्टीच्या तीव्रतेमुळें हे कापडे **पारदर्शक** होऊन त्यांच्या आड अस-
" लेली **सत्यवस्तु** आपणांस दिसेल. हल्लींचे युगांतील अप्रतिम ज्ञाता
" ह्मणतो कीं **तत्वचिकित्सक** जो असेल, त्यानें वस्तूच्या अगदीं मध्यांत
" प्रवेश केला पाहिजे, तरच त्यास **तत्व** दिसेल. आणि हें ह्मणणें अगदीं
" यथार्थ आहे. सर्वांत जो श्रेष्ठ, तो जर याच्या दृष्टीनें खालीं आला,
" आणि सर्वांत जो नीच तो जर याच्या दृष्टीनें वर चढला, तरच तो
" खरा तत्त्ववेत्ता. कारण सर्वांशीं समतेनें व दयेनें वागणें हा जो तत्व-
" वेत्यांचा धर्म, तो असें झाल्यावांचून संभवतच नाहीं.

" ( लौकिकी दृष्ट्या जो श्रेष्ठ आहे त्या संबंधानें पाहतां ) कोष्टयानें
" विणलेल्या वस्त्ररूप जाळ्यांचा, ( ह्मणजे श्रेष्ठ भपकेदार पोषाखाचा )
" किंवा आपल्या डोक्यांत कल्पनारूप कोळी आपलें कांहीं चालूं न देतां
" शांतपणें जीं (बडेजावीचीं) जाळीं सारखीं विणीत असतो त्यांचा आपणां-
" वर इतका पगडा असावा काय? उलट-पक्षीं ( लौकिक दृष्ट्या जो अति
" नीच त्या संबंधानें पाहतां ) सर्वच सृष्टी परमेश्वरानें केली आहे. ह्मणून
" आपण प्रेम करूं नये असें तींत काय असणार आहे.

७ वास्तविक पाहतां वस्तूंत जें श्रेष्ठत्व किंवा नीचत्व आहेसें आपणास वाटतें तें केवळ आपल्या कल्पनेनें उत्पन्न केलेल्या बाह्य डौलामुळें वाटतें. ह्मणून नुसत्या बाह्यस्वरूपावरून वस्तूंस नीच अगर श्रेष्ठ मानणें बरोबर नाहीं. आतां अंतःस्वरूपाकडे जर दृष्टि दिली तर प्रत्येक वस्तु परमेश्वरानें केलेली व परमेश्वरमय असल्यामुळें तीस नीच असें समजणें बरोबर नाहीं.

" मनुष्यांच्या सर्व कपड्यांतून ( ह्मणजे शरीरावरील लोंकरी अगर " सुती कपड्यांतून, श्रीमंती अगर बँकबुकें नावांच्या कपड्यांतून, " अधिकार अगर सरकारी दसरें नांवाच्या कपड्यांतून, आणि अखेरीस " त्यांच्या शरीररूप कपड्यांतून ) त्यांच्या आड प्रत्यक्ष आत्मरूप **मनुष्य** " आहे त्याकडे दृष्टी पोहोंचवून त्यांच्यांत जे शरीरसंपर्कानें आलेले **दोष** " असतील ते, आणि जें **अनिर्वाच, पूज्य** व **गूढ तत्व** आहे तें, अशीं " दोन्हीही ज्याला स्पष्ट दिसतात तोच धन्य होय.

या ग्रंथांत मधून मधून **आश्चर्य** व **विस्मय** यांविषयीं वारंवार उल्लेख आला आहे; व तो टच्यूफेल्सड्राक साहेबांसारख्या पुरुषास टाळतांही याव-याचा नाहीं. त्यांच्या मतें सर्व सृष्टपदार्थांविषयीं **आश्चर्य** व **विस्मय** हे विकार उत्पन्न होणें हेंच आपणा पार्थिव प्राण्यांस योग्य असून या आश्चर्यास व विस्मयास आपण फारच श्रेष्ठत्व दिलें पाहिजे. ते ह्मणतात कीं " **साश्चर्य विस्मय** हेंच **भक्तीचें बीज** असून त्याचा मनुष्यावरील अंमल कधींच नाहींसा होत नाहीं. प्रसंगविशेषीं मात्र तो थोडा वेळपर्यंत **अश्रद्धेच्या** क्षणिक स्वरूपाखालीं गुप्त असतो." अर्थात ज्या ( पदार्थविज्ञान) शास्त्राच्या योगानें सामान्यतः **आश्चर्य** व **विस्मय** यांचा अंमल कमी होऊन त्यांचे ऐवजीं **गणिताचा** व **आंकड्यांचा** अंमल होतो, त्या संबंधानें टच्यूफेल्सड्राक साहेबांस विशेष कौतुक वाटत नाहीं. पण यावरून **गणिताविद्ये**विषयीं किंवा **शास्त्रविद्ये**विषयीं त्यांना पूज्यबुद्धि नाहीं असें मात्र समजूं नये.

या संबंधानें ते ह्मणतात, " आतां ही **शास्त्रविद्या** मनुष्यांचे मनास " **जात्याचे** पद्धतीस आणणार कीं काय न कळे! आणि मग **तर्कशास्त्राच्या** " भुयारांतील कारखान्यांत हीं **स्मृतिरूप** तोंडांचीं **जातीं, अनुभवाच्या** तुट-" पुंज्या उजेडांत घालून त्यांतून **गणित** रूपी दाणे दळून अनेक प्रकारचीं " **गुणोत्तरें**, व **अर्थशास्त्रादिकांचें** व्यावहारिक **सिद्धांत**रूप पीठ काढाव-" याचें, एवढाच का आमच्या डोक्यांचा उपयोग ? कल्पना करा कीं " तुमच्या शास्त्रज्ञाचें **डोकें धड**ापासून वेगळें करून, ते सचेतन व तरतरीत " राहण्याकरितां एका अरबी गोष्टींतल्या डाक्टराच्या डोक्याप्रमाणें एखाद्या " रक्ताच्या भांड्यांत ठेवून ( **भक्ति, प्रेम,** व **श्रद्धा** यांचें वसतिस्थान जें

" **अंतःकरण** त्या ) **अंतःकरणा**पासून त्याचा संबंध तोडला, तर त्या
" डोक्यानें जें **शास्त्र** तयार व्हावयाचें त्याची योग्यता एखाद्या **यंत्राच्या**
" कामापेक्षां किंवा हातकामापेक्षां तुह्मांस तरी अधिक वाटेल काय ? आणि
" **अंतःकरण** असलेल्या **सचेतन** शास्त्रज्ञाचें डोकें असल्या भिकार कामांत
" वायां जाण्यापेक्षां खचितच जास्त योग्यतेचें असतें असें मला वाटतें. माझ्या
" लिहिण्यांतला भावार्थ असा कीं **श्रद्धा** व **पूज्यबुद्धि** ज्यांत नाहींत तें
" शास्त्र निष्फळ किंबहुना सविषच असावयाचें. फारच झालें तर अशा शा-
" स्त्राचा उपयोग शिजलेल्या अन्नासारखा तात्पुरता मात्र होईल. शिजलेलें
" धान्य पेरून उगवेल, व पुढें कालांतरानें लोकांस त्याचा उपयोग होईल
" हें ह्मणणें व्यर्थ होय. परंतु ज्याप्रमाणें सजीव धान्यें पेरितां येऊन त्यांवर
" अनंत युगें आबादानी होते, तद्वतच खऱ्या शास्त्रांची योग्यता असून खरीं
" शास्त्रें हीं **भक्ति, प्रेम** व **श्रद्धा** यांनीं विरहित अशा डोक्यांतून कधींही
" निघावयाचीं नाहींत."

याप्रमाणें टच्यूफेलसड्राक साहेब हळू किंवा जोरानें, साधेल तसे एक-सारखे कोरडे ओढीत असतात. तरी असें करण्यांत त्यांचा सद्धेतूच असतो असें वाटतें. तशांत जे **पाखंडवादी** व **आश्चर्यविस्मयांचे द्वेष्टे** गस्त घालणाऱ्या पोलिसाप्रमाणें शास्त्रशाळेभोंवतीं डिंडत राहून जरा कांहीं झालें कीं डांगोरा पिटूं लागतात; आणि कधीं कधीं तर दिवसा ढवळ्या चोहोंकडे शांतता असून, पापभीरु लोकांशिवाय रस्त्यांत कोणी नसलें तरी ललकाऱ्या मारीत कंदीलाच्या उजेडानें तुमचें रक्षण करण्याचा आंव घालितात, त्यांचा तर त्यांस विशेषच संताप येतो. हा पहा आपल्या लिहिण्याचा मथितार्थ त्यांनीं किती कळकळीनें सांगितला आहे.

" ज्या मनुष्यास **साश्चर्य विस्मय** होत नाहीं, किंवा **साश्चर्य विस्म-**
" **यानें ईश्वरचिंतन करणें** ज्याच्या परिपाठांत नसतें, तो मनुष्य राजाश्रया-
" खालीं असणाऱ्या अनेक शास्त्रीय परिषदांचा जरी अध्यक्ष असला, आणि
" त्याच्या एकट्या डोक्यांत सर्व पदार्थविज्ञान व अध्यात्मज्ञान जरी वागत
" असलें तरी तो मला नुसत्या ( डोळ्यांस न लाविलेल्या ) चष्म्या सारखाच
" वाटतो. त्याचाही उपयोग होईल, पण तो केव्हां ? **आश्चर्य** व **श्रद्धा हे**
" डोळे असलेला मनुष्य तो चष्मा लावून पाहील तेव्हां."

" गूढ व अविज्ञेय परमात्मा नाहीं असाच तुह्मी आग्रह धरणार
" काय ? आणि पाखंडाच्या काजव्यास सत्यसूर्य मानून त्याच्या उजेडानें
" एक तर तुह्मी सर्व गोष्टींचें कारण दाखवीत बसणार; नाहीं तर ज्याचें
" कारण व भावार्थ समजत नाहीं तें नाहींच असें ठरवून दुसऱ्याची टर उडवूं
" पहाणार काय ? आणि ज्यावर आपल्या हातापायांचे सर्व खेळ चालले
" आहेत तें अगाध सर्वव्यापी, अविज्ञेय, आत्मतत्त्व ज्याला खरें वाटतें;
" ज्याला ही सर्व सृष्टि ईश्वराचे देवालयाप्रमाणें प्रसादरूप दिसत असून
" नुसत्या भटारखान्यासारखी किंवा तबेल्यासारखी वाटत नाहीं; त्यालाच धर्म-
" वेडा ठरवून फाजीलपणानें परोपकाराचा डौल दाखवून तुमच्या काजव्याच्या
" उजेडानें त्यास वर्तवूं पाहणार काय ? आणि तुमचें पाखंड तो झुगारून
" देऊं लागला ह्मणजे उलट तुह्मींच त्याला शिव्या देणार ना ? कोण ही
" कलीची हीनता ! अहो बैलापासून प्रजोत्पादन कसें होतें, आणि तुमची
" गाय कशी विते, तुह्मींच स्वतः कसे जन्मला व अंतीं कसे मरणार, एवढें
" एकच कोडें मला समजून सांगा ह्मणजे मी ह्मणेन ! आणि हें जर तुमचे
" हातून होत नसेल तर या दोहोंपैकीं कोणची तरी एक गोष्ट तुह्मीं पतकरली
" पाहिजे. एकतर आपलें पाखंड गुंडाळून एकीकडे जाऊन खुशाल बडबडत
" बसावें नाहीं तर ही बडबड अजीबात सोडून देऊन, साश्चर्य विस्मयाचा व
" श्रद्धेचा काळ गेला नसून हें ईश्वराचें जगही हीन झालें नाहीं; परंतु आपण
" मात्र केवळ अर्धवट अंधळे आहों' असें ह्मणत स्वस्थ एकीकडे रडत
" बसावें."

---

# भाग अकरावा.

## पुढील आशा.

आह्मीं पूर्वीं भविष्य केल्याप्रमाणें या वस्त्ररहस्य ग्रंथानें आजला वाचकांपुढें अति अफाट देखावा मांडला असून जरी त्यांतील बहुतेक भागावर दुर्बोधतारूपी ढगाचें आवरण पडल्यामुळें पहाणारास कांहींसें भेसुर वाटतें, तरी पुष्कळ जागीं स्वच्छ निळें आकाश व त्यावर दिव्य तेजाच्या छटा हीं

स्पष्ट दिसत आहेत. आणि या सर्वांचा इंगितार्थ व फळश्रुति हीं वाचकांस व्यक्त करून दाखविण्याची आमच्यावरील जबाबदारीही त्या मानानें वाढत आहे. किंबहुना या तेजाच्या छटा दिसतात त्या स्वर्गभुवनाचे दिव्य तेजाच्या परावर्तनामुळें दिसतात कां यमपुरींतील अग्निकुंडाचे प्रतिबिंबामुळें दिसतात, आणि त्यांचे धोरणानें आपण गेलों असतां तेजःपुंज इंद्रभुवनाकडे जाऊं कां यमपुरींतील भयंकर ज्वालामुखीकडे जाऊं अशी या ग्रंथाटवींतील कित्येक मार्गस्थांस पंचाईत पडून त्याचा निवाडा करून घेण्याकरितां ते आज आमचा धांवाही करीत असतील.

परंतु बहुतेक गूढधर्मप्रतिपादकाप्रमाणें आमच्या प्रोफेसर साहेबांनीं तर मस्तकभ्रमामुळें ह्मणा, किंवा ईश्वरी स्फूर्तीच्या तीव्रतेनें ह्मणा, आह्मां प्रकाशकांची कामगिरी अत्यंत बिकट करून सोडली आहे. आह्मांस हातीं धरून ते भराऱ्या मारूं लागले कीं आह्मांस देहभान नाहींसें होतें आणि आमच्या दृष्टीचे टप्प्यांत आलेले देखावेही चित्तवेधक व सर्वव्यापी आहेत असें पाहून आह्मांस निवळ बावरल्यासारखें होतें. उदाहरणार्थ ही **सृष्टि संबंध एकरूप** व्यक्ति असून केवळ निरनिराळ्या वस्तूंची रास नाहीं अशा आशयाचे पुढील उतारे पहा.

प्रोफेसर साहेब ह्मणतातः—" एका हिंदू कवीनें ह्मटलें आहे कीं अरु-
" णाचे गाडींत बसून या सृष्टीच्या अत्यंत दूरच्या भागांतही गेलें तरी **देव**
" नाहीं असें स्थळ सांपडणार नाहीं! हें ह्मणणें किती अक्षरशः खरें आहे! हे
" सुशिक्षित वाचका, बहुधा जरी तूं कवी नसलास आणि तुझें **ईश्वरासंबंधी**
" ज्ञान जरी एकींव असलें तरीं शक्ति अथवा चैतन्य जगांत अमुक एका
" ठिकाणीं नाहीं, असें असेल असें तुला वाटतें काय? तूं आपले पाण्यानें
" भिजलेले हात झाडल्यावर जे शिंतोडे पडतात, तेथें चैतन्य नसून ते तेथल्या
" तेथेंच राहतात असें तुला वाटतें काय? छे, छे; ते शिंतोडे उत्तरेकडील
" वाऱ्याच्या रथावर बसून त्रिपुराकडे चालले आहेत. हे शिंतोडे तेथेंच स्थिर
" न राहतां त्यांची वाफ व्हावी हें काय गूढ आहे? हेंही असो, पण ज्यांत
" चैतन्य नाहीं, ज्यांत शक्ति नाहीं, जें अगदीं मेलेलें, असें कांहीं तरी असेल
" असें तुला वाटतें काय?

" एके दिवशीं मी आपल्या घोड्यास नालबंदी करण्याकरितां श्राईम्-

" वाल्ट ( नांवाच्या जंगला ) मधल्या लोहाराकडे जात असतां आपल्या
" भट्टीसमोर तो लोहार ऐरणीवर घणानें लोखंड ठोकतो आहे असें पाहून मी
" आपल्याशींच ह्मटलें, अरे ही जागा अगदीं पृथक, वेगळी, व या सृष्टी-
" पासून अलग अशी आहे, कां ती या सृष्टीची अंशभूत, व तिजपासून
" वेगळी करितां न येण्यासारखी आहे? अरे मूर्खा, या भट्टींतला अग्नि
" मूळ **सूर्या**पासून घेतलेला असून, जी हवा ध्रुवाच्याही पलीकडे पसरली आहे
" तीवर **कालारं**भापासून आजपर्यंत न विझतां राहिला असून त्यावर लोखं-
" डांतील **चैतन्य**, कोळशांतील **चैतन्य**, व मनुष्याचे डोळ्यांतील हें विलक्षण
" **चैतन्य** यांचा **संयोग व लढाया** झाल्या आहेत; आणि ही जागाही या
" अनादि सृष्टींतील चैतन्याच्या विशिष्ट स्थानाप्रमाणेंच आहे. ही भट्टी ह्मणजे
" सृष्टिव्यक्तीच्या पृष्ठभागावर नकळत पेटलेलें **चैतन्याग्नीचें होमकुंडच** आहे
" असेंही ह्मणण्यास हरकत नाहीं. त्यांत होणारा लोहहोम, व त्यांतून निघणारा
" लोहधूम्र तयार झालेल्या लोखंडी कामाचे फलश्रुतीनें आजही सर्वभर भास-
" मान आहे. या होमांतील हा काळा होता ( होम करणारा ) तोंडाच्या
" शब्दांनीं नव्हे, तर **स्नायूंच्या** जोरानें व **मेंदूच्या** शक्तीनें **अनादि चैतन्याचे**
" गूढ तत्वाविषयीं उपदेश करीत आहे; आणि मनुष्याचें **चैतन्य** अधिकारा-
" रूढ असून एके दिवशीं तें सर्वाधिकारसंपन्न होईल " हें सद्धर्मतत्त्व
" सर्वांस समजे अशा रीतीनें प्रतिपादन करीत आहे.

" या सृष्टींतील अमुक वस्तु बाकीच्या वस्तूंपासून अलग आहे असें
" कधींच आढळणार नाहीं. प्रत्येक वस्तूचा इतर सर्व वस्तूंशीं साक्षात् संबंध
" असून, आपणांस जरी समजलें नाहीं तरी प्रत्येकीचें काम इतरां सर्वांचे
" साह्यानेंच चाललें आहे. आणि या **कर्मरूप** अथांग, अपार समुद्रावर रूपां-
" तराचे द्वारां प्रत्येक वस्तूची सारखी प्रगति होत आहे. एक वाळलेलें शुष्क
" पान घ्या; तें निर्जीव झालें अगर नाहींसें झालें असें कधींच होत नाहीं.
" त्याच्यामध्यें व त्याच्या भोंवतीं असलेल्या इतर पदार्थांत ज्या अनेक
" प्रकारच्या शक्ति आहेत त्यांचें कार्य त्यावर सारखें चाल असतेंच; मग तें
" उलट दिशेनें कां असेना! एरवीं तें पान कुजतें कसें? ज्या चिंध्यापासून
" आपण कागद करितों, अगर ज्या उकिरड्यापासून पृथ्वी धान्य उत्पन्न
" करिते, त्यास तिरस्कृत करणें व निर्जीव समजणें कधींही योग्य होणार नाहीं.
" वास्तविक पाहिलें तर कितीही क्षुल्लक वस्तु झाली तरी ती तिरस्कारार्ह नाहीं.

" **सर्वच वस्तु** मग त्या कशाही कां असतना, त्या खिडक्यांसारख्या असून
" **तत्त्वज्ञांचे** डोळ्यांस या खिडक्यांतूनच **अनंत परमात्मा** गोचर होतो."
असो; ही श्वाईझ्वाल्टच्या लोहाराची विलक्षण भटी एकीकडे टाकून, इकडे हवेंत उंच चाललेलीं विमानें कशाचीं आहेत व तीं आपणास कोठें नेतात हें पाहूं.

" सर्व दृश्य वस्तु लिंगरूप अगर चिन्हरूप होत. जें तुला दिसतें
" तें आपण होऊन तेथें आलेलें नाहीं. वास्तविक पाहतां तें तेथें नाहींच. **सत्ता**
" अगर पदार्थांचें **अस्तित्व चित्स्वरूपानें** ( चैतन्यरूपानें ) मात्र असून
" एखादी **कल्पना** व्यक्तित्वानें निराळी करून दाखविण्याकरितां, ह्मणजे
" तिला पदार्थरूप देण्याकरितां मात्र ती **सत्ता** साधनीभूत आहे. ह्मणूनच कपडे
" किती जरी तिरस्कारार्ह असले तरी त्यांमध्यें फारच महत्वाचा अर्थ ध्वनित
" होतो. राजाच्या **झग्यापासून** तों अतिनीच शेतकऱ्याच्या **पटकुरापर्यंत** सर्व
" वस्त्रें केवळ **उणीव** किंवा दारिद्र्य व्यक्त करितात, इतकेंच नसून, त्या उणी-
" वीचा ज्या अनेक प्रकारांनीं आपण **प्रतिकार** केला आहे त्या प्रकारांसही
" **कपडेच** व्यक्त करितात. त्याचप्रमाणें उलट पक्षीं ज्या ज्या वस्तु **लिंगरूप**
" अगर **चिन्हरूप** आहेत त्या सर्व **कपडेच** होत, मग हे कपडे हातांनीं
" विणलेले असोत अगर मनाच्या कल्पनारूप मागावर झालेले असोत. कारण
" एरवीं, या कल्पनेनें केलेल्या वस्त्रांचे साह्यावांचून, ही सर्व चिन्मय सृष्टि,
" व विवेकानें दिलेल्या स्फूर्ती आपणांस इंद्रियग्राह्य कशा झाल्या असत्या ?

१ पदार्थांविषयींची आपली कल्पना केवळ आपल्या इंद्रियांच्या शक्तीवर अवलंबून आहे. या इंद्रियांस जे पदार्थांतील धर्म गोचर होतात, त्यांविषयीं कांहीं एक प्रकारची कल्पना करून ते पदार्थ असे आहेत असें आपण ह्मणतों. या सर्व सामान्य समजुतीस जें बाह्य कारण ती त्या पदार्थांची **सत्ता** होय. ही पुढें खुर्ची आहे, ती मला व इतरांना कांहीं विशेष धर्मांनें भासते. मी तिजवर बसतों; पाखरांजनावरांनाही ती आहे असें वाटतें व ती वाटेंत आडवी आली तर तिला टाळून चालणें अगर उडणें वगैरे व्यवहार तींही त्या समजुतीप्रमाणें करितात. या सर्व सामान्य समजुतीस आधारभूत असें जें कांहीं त्या खुर्चींत आहे ती त्या खुर्चीची सत्ता. पण तें काय आहे, किंवा तें अमुक आहे, हें आपणास कांहींच कळत नाहीं. तात्पर्य जें कांहीं आपणास भासतें तें त्या खुर्चीचें स्वरूप केवळ चैतन्यमय आहे. चैतन्यांहून निराळें असें जडस्वरूप हा केवळ आपल्या कल्पनेचा भ्रम होय.

" अर्थात् त्यांस व्यक्त करण्याकरितां मनानें कल्पनेचे मागावर पदार्थरूप वस्त्रें
" करून तीं चिन्मयसृष्टीस घातलीं तर कांहीं वावगें नाहीं. तशांतून मनास
" हातांचें साह्य होऊन पूर्वीं नसलेले लोकरीच्या अगर कापसाच्या वस्त्रा-
" सारखे पदार्थ उत्पन्न केले असले ह्मणजे तर हे पदार्थ केवळ कल्पनारूप
" मागावरील **वस्त्रें** होत हें जास्तच स्पष्ट दिसतें."

" अधिकार, लावण्य, गुण वगैरे मनुष्याचीं **भूषणें** आहेत असें जें ह्मण-
" तात तें केवळ लाक्षणिक नसून अगदीं **यथार्थ** आहे. इतकेंच नव्हे तर,
"लक्ष्यपूर्वक्ष पाहिलें असतां स्वतः **मनुष्य** व त्याचा ऐहिक जन्म तरी काय
" आहे? तोही केवळ लिंगरूप अगर चिन्हरूप असून ज्या **दिव्य आत्म-**
" **ज्योतीस** उद्देशून तो आपणांस '**मी**' ह्मणतो त्या ज्योतीस घातलेलें
" तें एक दिव्य वस्त्र होय. आणि ह्मणूनच या देहास **वस्त्र** ह्मणण्याचा
" परिपाठ आहे."

" **भाषेस**ही विचाराचें **वस्त्र** असें ह्मणण्याचा प्रघात आहे. परंतु वास्त-
" विक पाहतां भाषा ही विचाराचें **विभूषकवस्त्र** नसून तीस विचाराचें
" **शरीरवस्त्रच** ह्मटलें पाहिजे. हें शरीरवस्त्र ( भाषा ) कल्पनामागावर
" विणलें आहे असें जें मी वर ह्मटलें तें यथार्थ नाहीं काय? तें तयार करण्याचें
" मुख्य साहित्य **रूपक** नांवाचे अलंकार होत. पाहिजे तर **भाषेचें** क्षण-
" भर निरीक्षण करा ह्मणजे ही गोष्ट स्पष्ट होईल. भाषेस आधाररूप झालेले
" थोडेसे स्वाभाविक (अनुकरणानें झालेले) शब्द सोडून बाकीचे सर्व शब्द
" केवळ **रूपकमय** किंवा लाक्षणिक असतात; मग आज ते रूपककोटींत
" गणले जावोत अगर न जावोत व त्यांची मूळची तरतरी, शोभा व लवचीक-
" पणा हीं आज त्यांस असोत अगर नसोत. असो; याप्रमाणें अनुकरणानें
" भाषेंत आलेले जे स्वाभाविक शब्द, त्यांस भाषाशरीराचीं हाडें असें
" पाहिजे तर ह्मणावें. मग मांस, स्नायु, मज्जा वगैरेच्या जागीं रूपकें आहेत
" असें होईल. रूपकें नसलेली भाषा शोधल्यानेंही सांपडावयाची नाहीं.
" सहज प्रचारांतले शब्द पाहिले तरी रूपकावांचून एकही सांपडणार नाहीं.
" फरक इतकाच कीं कांहीं लेखांतील भाषा शुष्क असून तिचे मांस व स्नायु
" हींच हाडांसारखीं दिसतात; कांहीं लेखांतील भाषाशरीरें अगदीं फिकट
" पडलेलीं, क्षीण, व मृतप्राय असतात; कांहींना तर माझ्या भाषेसारखा अप-

" स्मार झालेला असतो; कांहीं भाषाशरीरें खोट्या रूपकांनीं उगीच फुगलेलीं,
" मागें सांगितलेल्या दिखाऊ फुगीर कपड्यांसारखीं असून मूळ शरीरास उणेंपणा
" मात्र आणितात. वास्तविक पाहतां असलें हीनता आणणारे भाषेचे कपडे
" ज्याला दिसतील त्यानें आगोदर ते जाळून टाकिले पाहिजेत."

रूपकावरील या पारिग्राफाइतका विलक्षण **रूपकमय** पारिग्राफ आमच्या वाचकांच्या कधीं तरी आढळांत आला होता काय? असो; पण यांत कांहीं नवल नाहीं. या विषयाचे अखेरीस आमचे प्रोफेसर साहेब काय ह्मणतात तें पहा :—

" आतां जास्त उदाहरणें देण्याची काय जरूर आहे. आपल्या पवित्र
" शास्त्रांत सांगितलें आहे कीं, 'या (कल्पांताचे) वेळीं **स्वर्गभुवनें** व पृथ्वी
" हीं सर्व **वस्त्रांप्रमाणें** नाहींशीं होतील. अर्थात हींही **वस्त्ररूपच** असून हीं
" **वस्त्रें काळानें** त्या **अनाद्यंताकरितां** केलेलीं आहेत! तात्पर्य, आपणांस
" समजे अशा रीतीनें जें कांहीं आहे, ज्याच्या योगानें चैतन्यमय भूतमात्रें
" परस्परांच्या अनुभवास येतात, ते सर्व **कपडे** अगर पोषाखच असून ते
" तात्पुरते घातलेले, व अर्थात पुढें टाकून द्यावयाचे आहेत. याप्रमाणें योग्य
" विचार केला असतां **कपडे** या सर्वव्यापी विषयांत, मनुष्यानें जें जें कांहीं
" केलें असेल, जें कांहीं **योजिलें** असेल, जें **मनांत आणिलें** असेल, जें
" जागृतींत अगर स्वप्नांत **पाहिलें ऐकिलें** अगर इतर इंद्रियांनीं **अनुभविलें**
" असेल, ह्मणजे अर्थात् ही **सृष्टि** व तिजमध्यें असेल नसेल तें सर्व या एका विष-
" यांत येत असून एकंदर शास्त्रांचा मथितार्थ या **वस्त्ररहस्यांत** आहे."

जो **अतींद्रिय** व **अव्यक्त** त्याच्या अगदीं जवळ जाऊन ठेपलेल्या प्रकृत विषयाच्या या अथांग व अपार सागरांत कसें तरी जीव धरून फिरत असतां मध्यें अनेक अडचणीं व धोके येतात हें आतां वाचकांस सांगण्याची जरूर नाहीं. परंतु होफ्राथ ह्यूसक्रेक साहेबांनीं सदर ग्रंथकाराचे चरित्रात्मक लेख देऊन मदत करण्याचें आश्वासन दिलें होतें, त्या **आशाशुक्रा**वर धोरण ठेवून आजपर्यंत कसें तरी आह्मी मार्गक्रमण करीत होतों, तो **आशाशुक्र** आतां एकाएकीं मावळला असून पुढें **ज्ञानारुणो**दयाची प्रभा फांकणार कां भ्रमांधःकाराची रात्र वाढून जिकडे तिकडे अंधार होणार हें कांहींच कळत नाहीं. ह्यूसक्रेक साहेबांनीं लिहिलें होतें त्याप्रमाणें ट्यूफे-

सल्ड्राक साहेबांचे चरित्रलेख गेल्या आठवड्यांत आमचे हातीं पडले. **हॅमबर्ग** येथील एका **स्काच** व्यापाऱ्याच्या ( हा व्यापारी सर्वत्र महशूर असल्यामुळें त्याचें नांव आह्मीं देत नाहीं ) कृपेनें विसिनिचूटचो येथील फारच मोठा कागदाचा एक गठ्ठा आमचेकडे येऊन दाखल झाला. त्या गठ्ठावर आह्मांस ठाऊक नसलेल्या एका भाषेंत कांहीं मजकूर लिहिला असून गांठीगांठीवर मोहरा केल्या होत्या. गठ्ठयाचे बाह्यस्वरूपावरून लांबच्या प्रवासानें त्याची फार हबेधुबे झाली असावी असें स्पष्ट दिसतें. सदर व्यापाऱ्यानें या गठ्ठयाचे भाड्याबद्दल आह्मावर खर्च न पाडतां गठ्ठा आमचेकडे पावता केला हा खरोखरच त्याचा मोठा उपकार आहे. कारण व्यवहारदृष्ट्या पाहिलें तर आह्मी एक यःकश्चित् लेखक. आमचें एवढें काम करण्याची त्यांना काय जरूर ? पण त्यांचा स्वभावच चांगला असून आमचेवर मेहेरबानीचा हा पहिलाच प्रसंग नाहीं. असो, हा गठ्ठा आमचेकडे येऊन पडल्यावर तो आह्मी किती घाईनें फोडला असेल, किती आशेनें चाळून पाहिला असेल, व किती हिरमोड होऊन वरचेवर निराशेनें तो ठेवून पुन्हां पुन्हां आमचा आशा तंतु सजीव करण्याकरितां कितीदा उघडला असेल याची वाचकांनींच कल्पना करावी.

या गठ्ठयाबरोबर आलेल्या लांबलचक पत्रांत आमची यथेच्छ स्तुति आणि विसिनिचट्टो येथील राजकीय गोष्टी, मेजवान्या, समारंभ, वगैरेचें यथास्थित वर्णन झाल्यावर आह्मांस माहीत असलेल्या गोष्टीचीच पुन्हां सुचना करून ह्यूसक्रेक साहेब ह्मणतात " नुसत्या एकांत विचारानें उत्पन्न " होणाऱ्या **वेदांत**, **गणित**, वगैरे शास्त्रांसंबंधीं काय स्थिति असेल न " कळे; परंतु **वस्त्ररहस्या**सारख्या अनुभवजन्य शास्त्रांविषयीं पाहिलें तर " तीं शास्त्रकाराचे स्वभावविशेषापासून उत्पन्न झालीं असून मनुष्यजातीच्या " सामान्य स्वभावास उद्देशून तीं लिहिलेलीं असतात. ह्मणून ग्रंथकर्त्याच्या " स्वभावाची माहिती होईपर्यंत वाचकांस त्यांतील विषयाची फोड नीट- " पणें होणार नाहीं. ह्मणून सदर ग्रंथकर्त्यानें जगाकडे कोणच्या दृष्टीनें " पाहिलें व त्याच दृष्टीनें सृष्टीचें अवलोकन करण्यास त्यास काय काय " कारणें झालीं, हें समजल्यावांचून, ह्मणजे अर्थात् त्याचें चरित्र शास्त्ररीत्या " लिहिलें वांचलें गेल्यावांचून या ग्रंथांतील विषयाचा नीट उलगड

" होणार नाहीं. बरें, या ग्रंथांतील शास्त्रीय व अध्यात्मिक तत्वांचा उलगडा
" अशा चरित्रावांचून होईल अशी जरी घटकाभर कल्पना केली तरी या
" चिकित्सक काळांत हा ग्रंथ लिहिला कोणीं? कसा? कशाकरितां?
" वगैरे प्रश्न येणारच; व ते आल्यावर ग्रंथकर्त्याचा व ग्रंथाचा समग्र इति-
" हास लोकांस न मिळाला ह्मणजे कांहीं तरी स्वकपोलकल्पित दंतकथांनीं
" जो तो ती उणीव भरून काढण्यास पहाणार! पण टद्यूफेल्सड्राक साहे-
" बाच्या चरित्राचे उपयुक्ततेविषयीं इतकी चर्चाही करण्याची जरूर नाहीं.
" आमचे विख्यात प्रधान **गीट साहेब**[२] यांनीं मोठ्या चाणाक्षपणानें एके
" ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं "वास्तविक पाहतां मनुष्यानें व्यासंग
" करण्यास योग्य विषय मनुष्याचें चरित्र हा एकच आहे." व आज विसि-
" निचट्टी येथें आमचाही अनुभव असा आहे कीं येथें बहुतेक संभाषण
" चरित्रें किंवा आत्मचरित्र याच विषयावर चालतें. तात्पर्य सर्वांस उपयो-
" गाची आणि सर्वांचें चित्त ओढून घेणारी चरित्रासारखी, विशेषतः ऐति-
" हासिक पुरुषांच्या चरित्रासारखी दुसरी गोष्टच नाहीं.

" **वस्त्ररहस्याचे** अतिगहन भागांत बहुतकरून आजपर्यंत आपण
" पोहोंचलां असाल, आणि इतर वाचकांप्रमाणेंच तेथले प्रदेश पाहून
" आश्चर्यानें थक्क होऊन या वेळेस आपणही भांबावल्यासारखे चोहोंकडे
" पहात असाल असें मला वाटतें. या ग्रंथापैकीं जे भाग वाचून व समजून
" घेऊन आपण आपल्या देशभाषेंत लिहिले असतील, तेवढ्यावरून ज्या
" विलक्षण पुरुषाच्या डोक्यांतून हें ज्ञानामृत आलें आहे त्याच्या चरित्रा-
" विषयींची जिज्ञासा अलबत आपले मनांत उत्पन्न झाली असेल. टद्यूफे-
" ल्सड्राक साहेबांस आईबाप होते कीं नाहीं; तोंडांतील लाळ कपड्यांस
" लागू नये ह्मणून लहान मुलांच्या आया एक फडकें त्यांचे गळ्यास
" बांधितात, तसें टद्यूफेल्सड्राक साहेबांच्या गळ्यास बांधिलें होतें कीं
" नाहीं, बोंडल्यांतून ते कधीं दूध प्याले होते कीं नाहीं; आनंदाश्रूंनीं
" युक्त होऊन त्यांनीं एखाद्या जिवलग मित्रास आलिंगन दिलें होतें कीं
" नाहीं; जेथें वाऱ्याचीच सोबत असून वाऱ्याशींच जेथें संवाद व्हावयाचा
" अशा एखाद्या विस्तीर्ण स्मशानभूमींत जाऊन गत गोष्टींची आठवण करून

२ गीट—पु० १ भा० ८ टीप ११.

" गतकालाकडे कधीं त्यांनीं मोठ्या आतुरतेनें पाहिलें असेल काय; त्यांनीं
" कोणाशीं कुस्त्या, झोंब्या, केल्या असतील काय; आणि नाजुक प्रेम-
" पाशांत सांपडल्यावर त्यांनीं कसें वर्तन केलें असेल; याप्रमाणें जन्मल्या
" पासून जुन्या कपड्यांच्या बाजारांत[3] येईपावेतों त्यांच्या मनांत आनंद
" व दुःखाचे पर्वत उभे करण्यासारख्या काय काय गोष्टी झाल्या; त्याविषयीं
" खचितच आपणास जिज्ञासा झाली असेल.

" लोकवार्तेवरून या प्रश्नाविषयीं अजून कांहींच उलगडा होत नाहीं.
" हा पुरुष उत्पन्न झाला असून जिवंत आहे. तो दूर देशांतून यात्रेकरू
" अथवा प्रवासी या नात्यानें आलेला आहे. प्रवासामुळें त्याचे पाय थोडेसे
" दुखत असून तो काळा झाला आहे, कित्येक प्रसंगीं रस्त्यांत
" त्यास चोरांनीं गांठलें होतें. कदान्नामुळें त्याजवर विषाचे परिणाम झाले
" आहेत. डासांनीं व ढेंकणांनीं चावल्यामुळें त्यास गलांडें झालीं आहेत व
" प्रत्येक मुक्कामावर खाणावळीचा हिशेब त्यास चुकता करावा लागला
" आहे ( एरवीं खाणावळवाल्यांनीं त्यास जाऊंच दिलें नसतें ) एवढी
" त्यांचे संबंधाची माहिती मात्र लोकवार्तेवरून निःसंशय होते. परंतु
" त्यांच्या रस्त्याविषयीं, हवेच्या फेरबदलाविषयीं, रस्त्यांत जे उत्कृष्ट
" देखावे त्यांनीं उतरून घेतले असतील किंवा पाहिले असतील त्यांविषयीं
" लोकवार्तेवरून कांहीं माहिती मिळावयाची नाहीं. त्याविषयीं कांहीं
" इतिहास नाहीं का ? असा प्रश्न येणारच.

" पण माझे प्रिय मित्रा, हा इतिहास उपलब्ध नाहीं असें समजूं नको.
" आमचे तत्ववेत्त्याची तुजवर पूर्ण मेहेरबानी असल्यामुळें त्यांनीं स्वहस्तें
" लिहिलेलें आत्मचरित्र, निदान त्यांच्या चरित्राचीं साधनें या पत्रासोबत
" मला पाठवितां आलीं आहेत. व माझा अजमास खरा झाला तर मूळ
" ग्रंथांतील विषयाचा उलगडा करण्यास आपल्या तीक्ष्ण दृष्टीस त्यांची
" बरीच मदत होईल; आणि मग हें वस्त्ररहस्य व त्याचा कर्ता यांची साग्र
" माहिती आपले मार्फत इंग्लंडांतील लोकांस झाल्यावर तेथून अमेरिका,
" हिंदुस्थान, आस्ट्रेलिया वगैरे देशांत ती पसरण्यास मार्ग होईल "

आह्मांस वाटतें कीं या पत्रांतील प्रौढ भाषा ह्यूसक्रेक साहेबांनीं आमच्या

---

३ जुन्या कपड्यांचा बाजार—पु० ३ भा० ६ पारिग्राफ ७, व त्यावरील टीप पहा.

प्रोफेसर साहेबांचे येथूनच घेतली असावी, एरवीं त्यांच्या लिहिण्यांत इतकी प्रौढ भाषा कशी आली असेल याचा आह्मांस उलगडा होत नाहीं. असो; या पत्राबरोवर आलेला गट्ठा सोडून पाहतां त्यांत सहा मोहोरबंद जंगी पुडकीं सांपडलीं. त्यांवर अनुक्रमें तूळ, वृश्चिक, धन, मकर, कुंभ, व मीन या दक्षिणेकडील सहा राशींचीं चिन्हें आहेत. मोहोरा फोडून आंत पाहतां प्रत्येक पुडक्यांत या सहा राशिचक्राखालीं व वरती असलेल्या खऱ्या व काल्पनिक गोष्टींविषयीं चर्चा असलेलीं अगदीं निष्काळजीनें भरकटलेलीं, मोठमोठ्या तावांपासून अगदीं लहान चिटोऱ्यापर्यंत आकाराचीं भाराभारा टिपणें मात्र सांपडलीं असून त्यांत आत्मचरित्राचा उल्लेख फारच थोड्या टिपणांत असून तोही अत्यंत संदिग्ध भाषेंत मात्र आहे.

या कागदांत कांहीं प्रकरणें सबंधही आहेत; परंतु त्यांत खुद्द प्रोफेसर साहेबांचें नांव किंवा फिरस्ता या नांवानें ते आपला तृतीय पुरुषीं उल्लेख करितात तो फिरस्ताही कोठें आढळत नाहीं. बरें उलटपक्षीं कांहीं धर्मसंबंधी व वेदांताविषयक टिपणांतून आणि '**वाफेचें इंजन**' '**भविष्याचे सत्यतेची शक्यता**' वगैरे निबंधांतून प्रोफेसर साहेबांच्या चरित्रांतील कांहीं अत्यंत महत्वाच्या गोष्टी आल्या आहेत ! कांहीं कागदांवर आत्मचरित्रांतील गोष्टींशीं कांहीं पूर्वापार संबंध नसतां नुसतीं स्वप्नेंच टिपलेलीं आहेत; मग तीं खरीं खोटीं देवजाणे. कांहीं कागद मोकळेच असून त्यांवर मुक्काम तारीख

---

४ दक्षिणेकडील सहा राशी—क्रांतिवृत्त विषुवाचे दक्षिणोत्तर आहे; आणि या सहा राशी सूर्य क्रांतिवृत्ताच्या दक्षिणेकडील भागावर असतांना भुक्तमान होतात. ज्योतिषाचे ग्रथांत व खगोलाचे नकाशांत राशींची अर्थदर्शक चिन्हें लिहितात; उदाहरणार्थ—मेष राशीचें चिन्ह नागाच्या फणीवर दहांचा आंकडा असतो तसें ह्मणजे एडक्याच्या शिंगाचे दर्शक, धन राशीचे चिन्ह तीरकमटा, वगैरे. पूर्वी या राशींचे प्रदेश त्या त्या आकृतींच्या तारकासमूहावर होते. ह्मणजे कांहीं तारे मिळून मेंढयासारखी, कांहीं तारे मिळून बैला सारखी, वगैरे आकृती होतात त्यामुळें त्या भागांस मेष, वृषभ, अशीं नावें दिलीं; आणि सूर्य त्या भागांत असतांना त्या कालासही तींच नांवें दिलीं होतीं. परंतु तेव्हांपासून विषुवबिंदु मागें पडत पडत हल्लीं सुमारें तीस अंश ह्मणजे सुमारें एका सबंध राशीनें मागें पडला आहे. त्यामुळें हल्लींच्या राशी त्या त्या आकृतींच्या तारकासमूहापासून सुमारें तीस अंशांनीं पूर्वेकडे सरकल्या आहेत. ह्मणजे मेष राशीच्या तारका हल्लींच्या मेषराशीच्या पश्चिमेस सुमारें ३० अंश वृषभ राशींत आहेत. या विषुवचलनाचा उत्कृष्ट उपयोग करून रा. बाळ गंगाधर टिळक यांनीं वेदांतील वर्णनांच्या आधारें ओरायन नांवाच्या ग्रंथांत ऋग्वेदाचा कालनिर्णय केला आहे.

कांहीं नसतां चरित्रांतील नुसत्या गोष्टीच आहेत. कित्येक ठिकाणीं भले लांब लांब आत्मचरित्रपर लेख आहेत. परंतु त्यांतील गोष्टींचा परस्पर संबंध कांहींच नाहीं; इतकेंच नव्हे तर आगोदरची कोणची, मागली कोणची, याचाही कांहीं थांग लागत नसून त्या इतक्या क्षुल्लक व इतक्या बारकाईनें वर्णिल्या आहेत कीं कांहीं पुसूं नये. याप्रमाणें कांहीं ठिकाणीं माहितीची अगदींच उणीव आहे, तर कांहीं ठिकाणीं तिची इतकी चंगळ आहे कीं तिचें काय करावें हेंच कळत नाहीं. निवड किंवा व्यवस्था ही आमच्या प्रोफेसरांस नाममात्रेंही ठाऊक नसावी असें वाटतें. प्रत्येक पुडक्यांत येथून तेथून अव्यवस्था! फरक इतकाच कीं मकर राशीच्या आणि धन व कुंभ याही राशींच्या पुडक्यांत अव्यवस्थेची अगदीं कमाल झाली आहे! "**आह्मांस किताब मिळाला त्याविषयीं**" या लेखाजवळच परटाचीं आदा केलेलीं बिलें आहेत. या पुडक्यांतून जगांत प्रचलित असलेल्या बहुतेक भाषांत लिहिलेल्या असंख्य जाहिराती पसरल्या आहेत, त्यावरून मात्र प्रोफेसर साहेब कोठें, कधीं गेले होते हें कळण्यास मार्ग आहे.

असो; या वस्त्ररहस्य ग्रंथांत आधींच अव्यवस्था, आणि ती दूर होईल ह्मणून ज्या चरित्ररूप सूर्याचे आशेवर आह्मी होतों त्याची अगदीं पक्की निराशा होऊन त्याचे ऐवजीं, मूळग्रंथांत व्यवस्था असती तरी त्यांत अव्यवस्था उत्पन्न करण्यासारखा सैतानाचे आत्मज्योतीप्रमाणें हा कागदांचा भारा मात्र आह्मांस प्राप्त झाला आहे! हीं कागदांचीं सहा पुडकीं आमचें काम झाल्यावर **ब्रिटिशम्युझियम** नांवाच्या ग्रंथसंग्रहालयांत ठेवण्याचा आमचा विचार आहे; ह्मणून आजच त्यांचें विशेष वर्णन अगर चिकित्सा करणें बरोबर नाहीं. या कागदांतील मजकूर जुळून ग्रंथकाराच्या चरित्राची संगतवार माहिती मिळणें तर शक्य नाहींच. पण कदाचित् आमची बुद्धि व कल्पनाशक्ति यांस आमच्या वाचकांच्या बुद्धीचें व कल्पनाशक्तीचें चांगलें साह्य झालें तर या कागदांपासून मोठ्या प्रयासानें त्यांच्या चरित्राचें अर्धवट व अस्पष्ट चित्र मात्र काढतां येण्यासारखें आहे. मूळ ग्रंथास जर आपण अव्यवस्थित जलाशयाची उपमा दिली तर या कागदांच्या भाऱ्यास अव्यवस्थित बाष्पाशयाचीच उपमा दिली पाहिजे; व तितकाच त्याचा आह्मांस प्रकृत ग्रंथाविषयीं माहिती देतांना उपयोग होईल.

---

५ ब्रिटिश म्युझियम—पु० १ भा० २ टीप २ पहा.

हे अकल्प्य कागदपत्र लावून पाहण्यांत आह्मांस रोज अहोरात्र खपावें लागत आहे. (अर्थात् आह्मी हिरवी अस्तरशी लावूनच हें काम करितों.) आतां यांतील वेंचे या अकल्प्य छापील ग्रंथांतील स्थलविशेषाशीं ताडून पाहून, दोन्ही ठिकाणीं उच्च नीच, शीत उष्ण, ओलें कोरडें जें सरसकट भरलेलें आहे तें निरनिराळें करून, सारख्या सारख्यांचा मिलाफ घालून, ब्रिटिश लोकांना ग्रंथकर्त्यानें दाखविलेल्या चिद्रत्नखाणींचे देशांत जाण्याकरितां भक्कम पूल बांधावा ह्मणून आमची धडपड चालली आहे. आपल्या पवित्र शास्त्रांत सांगितलें आहे कीं पूर्वीं मृत्यु व पातक यांनीं मिळून प्राण्यांस यमपुरींत पोहोंचविण्याकरितां एक पूल बांधिला होता. तेव्हांपासून आजपर्यंत असला पूल इतर कोणी बांधला असेलसें वाटत नाहीं. त्या आद्यपुलासारखाच हा पूल आहे. फरक इतकाच कीं आमचा हा पूल प्राण्यास यमपुरीकडे न नेतां वैकुंठाकडे नेईल! अशी निदान आज तरी आह्मांस आशा आहे. बाकी, त्या पुरातन पुलाप्रमाणेंच आमच्याही पुलाचें साहित्य ( वाहतें पाताळ, शिजती हवा वगैरे ) अव्यक्त आणि अपरिस्फुट तत्वांतून येथला एक गोळा, तेथला एक गोळा, असें जमा करावयाचें असून हीं तत्वें शिजत असतांच त्यांस योग्य लुकणानें जोडकाम करावयाचें आहे. तो पूर्वींचा पूल बांधला तेव्हां कांहीं दिव्य शक्ति तरी साह्यास होत्या. तेंही साह्य आम्हांस नाहीं. तात्पर्य सतत उद्योग व अल्पस्वल्पविचारशक्ति

---

६ मृत्यु व पातक—पातक या पदार्थाची कल्पना सर्व देशांत व सर्व धर्मांत आहे. पातक ह्मणजे आपणांस पाडणारी किंवा पदच्युत करणारी गोष्ट; आपला **स्वभाव** किंवा मनुष्यपणाची श्रेष्ठ पदवी, किंवा आपलें सत्व, (भा० १ टीप ३०) यापासून भ्रष्ट करणारी गोष्ट. अर्थात् आपली गणना हीन कोटींत व्हावी असें कृत्य. आणि बारीक दृष्टीनें पाहणाऱ्यास आपणांस पातक या नांवानें प्रचलित असणाऱ्या प्रत्येक गोष्टींत असें कांहीं तरी विवेकविरुद्ध दिसतेंच कीं ज्यानें मनाच्या नैसर्गिक श्रेष्ठपणास व सत्वास न्यूनत्व येतें. ही मनुष्यास हीनत्व आणणारी एक गोष्ट झाली. दुसरी गोष्ट मृत्यु. मनुष्यास जर मृत्यु नसता तर त्यानें आपल्या ज्ञानाचा, अनुभवाचा व विवेकाचा उपयोग करून ईश्वराचे सादृश्याकडे किती भराऱ्या मारल्या असत्या! परंतु मनुष्याच्या प्रगतीस मृत्यु आडवा आहे. आणि त्याच्या अधोगतीस पातक कारण आहे. ह्मणजे मृत्यु व पातक यांनीं मिळून मनुष्यास ईश्वराचें सादृश्य मिळण्याची जी कल्पित जागा वैकुंठ तिचे विरुद्ध दिशेस ह्मणजे नरकलोकीं पोंचविण्याचें साधन किंवा पूल बांधून ठेविला आहे हा भावार्थ.

यांच्या योगानें मी एक इंग्रज लेखक, जर्मन भाषेंत छापलेल्या ग्रंथांतील आणि लिहिलेल्या लेखांतील तत्वविचारांचे खिचडींतून व्यवस्थित ग्रंथ छापून काढण्यास कंबर बांधीत आहें. ही गोष्ट आमचे हातून पार पडणें ईश्वराधीन आहे. असल्या घोंटाळ्यांतून कार्यकारणांची सांगड घालण्याचे खटपटींत आमची सर्व बुद्धि व आत्मा हीं कदाचित् गडपच झालीं तर ईश्वरेच्छा!

याप्रमाणें अव्याहत परिश्रम व मनाची चलबिचल यांचे योगानें आमचें धडधाकड शरीरही क्षीण झालें असून निसर्गतःच या देहास अवश्य जी झोंप तीही बहुतेक नाहींशी झाल्यामुळें आमचें डोकें भणाणून अंगही कसकसूं लागलें आहे. परंतु याचा आह्मास असंतोष नाहीं. कारण शरीरसंपत्ति व जिवाचें चैतन्य यांनीं जर कांहीं काम करावयाचें नाहीं तर त्यांचा उपयोग काय? बरें परभाषेंतील सुविचारवृक्ष स्वभाषेच्या शेतांत लावण्यापेक्षां श्रेष्ठतर काम कोणचें आहे? स्वविचाराचें नवें रोप लावण्याचें काम यापेक्षां श्रेष्ठ खरें, पण हें काम करण्यासारखें भाग्य फारच थोड्या पुरुषांचें असतें. शिवाय हें वस्त्ररहस्य जरी आज आपणांस घनदाट जंगलासारखें दुर्गम वाटतें, तरी त्यांतील इंगित व सखोल अर्थ आपणांस कळण्याइतकें जर आपलें सुदैव असेल तर केवढी मौज होईल बरें? मग या सृष्टीच्या इतिहासरूप नाटकांत, आज कोणाच्या ध्यानीं मनींही नाहींत असे अपूर्व प्रवेश दिसूं लागतील! अर्थात् त्या प्रवेशांचें संविधानक या आमच्या ग्रंथापासून उदयास येईल असें वाटतें. इतकें सत्फल देणारें हें काम जिवापाड परिश्रम करूनही करण्यासारखें नाहीं काय? ह्मणून शूर वाचकहो, आमच्या बरोबर तुह्मीही कंबरा बांधा. मग या कामांत अपयश आलेंच तर मला एकट्यासच आलें नाहीं एवढा तरी मला समाधानास आधार होईल. बरें, आमची आशा फलद्रूप होऊन यशच आलें तर त्यांतही तुमचा वांटा आहेच!

---

## पुस्तक पहिलें समाप्त.

---

७ इतिहास ह्मणजे लोकांच्या चरित्रक्रमाची इत्थंभूत हकीकत. या ग्रंथाच्या अध्ययनानें लोकांचें चारित्रच बदलेल व मग अर्थात् इतिहासाचें स्वरूप अगदींच निराळें होईल.

# पुस्तक दुसरें.

## भाग पहिला.

### जन्मवृत्त.

जन्म व कुल यांविषयीं कितीही बारीक शोध लागला, तरी त्याचा पुढील बुद्धिविकासाशीं कार्यकारणसंबंध जुळून त्या योगानें कोणत्याही पुरुषाचे चरित्रांतील गोष्टी जास्त स्पष्ट होतील कीं नाहीं याची वानवाच आहे. ह्मण आहे, कीं 'नदीचें मूळ आणि ऋषीचें कूळ पाहूं नये' त्यांतला तरी भावार्थ हाच. तत्रापि कोणच्याही गोष्टीसंबंधानें तिचे आदिबीजास जें महत्व असावयाचें तें असतेंच. ह्मणूनच कोणीही नामांकित पुरुष झाला, तरी त्याचा या ग्रहावर[1] उदय होतो त्या वेळच्या सर्व गोष्टींची चिकित्सा करून, त्या स्पष्ट होईपर्यंत आपण स्वस्थ बसत नाहीं; मग त्या गोष्टींचा शास्त्रियरीत्या उपयोग होवो, अगर न होवो. ह्मणून **वस्त्ररहस्य** ग्रंथ करणाऱ्या पुरुषाचे जन्मकथानाकडेच आपण या पुस्तकांतील पहिला भाग लावूं. परंतु वास्तविक पाहतां केवढी दुर्दैवाची गोष्ट, कीं या तत्त्ववेत्त्याचें कूळ अगदींच अप्रसिद्ध व संशयात्मक आहे! या भूतलावर होऊन गेलेल्या अमुक मनुष्यापासून त्याची उत्पत्ति झाली असेल असें अनुमान करण्यासही प्रमाण नाहीं! ह्मणजे अर्थात् त्याचे जन्मवृत्ताच्या उपलब्ध माहितीचा सारांश 'तो अव्यक्तस्थितींतून व्यक्तस्थितींत आला' याशिवाय कांहींच नाहीं.

---

१ ग्रह—पु० १ भा० १ टीप ६ पहा.

तूळराशीचे पुडक्यांतील अनेक प्रकारचे कागद ताडून पाहिले असतां ट्यूफेल्सड्राक साहेबांनीं लिहिलेलें आपलें जन्मचरित्र खालीं दिल्याप्रमाणें आढळतें. " एन्टेपफुल[2] नांवाच्या खेड्यांत अँड्रिसफुटरल[3] व त्याची " बायको हीं रहात होतीं. त्यांना पोरबाळ कांहीं नव्हतें; व जरी त्यांचें " उतारवय झालें होतें तरी तीं आनंदानें एकांतवासांत राहून काळक्रमण " करीत. अँड्रीस हा फ्रेडरिक[4] दि ग्रेट बादशहाचे फौजेंत ग्रनेडियर " सार्जेंट व पलटणींतील शाळेचा शिक्षक होता. परंतु आतां त्यांनीं " आपला परशु व छडी सोडून देऊन हातांत फावडें व कोयता घेऊन ते " एक लहानशी बाग करीत असत. आणि या फळबागेवरच सिन्सिनेटस[5]-

---

२ एंटेफुल ह्मणजे बदकांचें डबकें. "या संसारसरोवरांत मनुष्यें केवळ बदकांसारखीं आहेत. बदकें जशीं उपजतांच आपल्या आईचें अनुकरण करून बेधडक पाण्यांत जातात तशींच माणसें या संसारांत केवळ गतानुगतिकत्वानें वागतात." गीट.

३ अंड्रीसफुटरल ह्मणजे झांकणारी गवसणी. म्यान.

४ फ्रेडरिक दि ग्रेट—प्रशियाचा राजा—जन्म १७१२ राज्यारोहण १७४० मृत्यु १७८६. या राजाचा बाप विद्येचा मोठा द्वेष्टा असून त्याचा सर्व हुरूप लष्करी शिक्षणाकडे असे. यामुळें फ्रेडरिक यांस लहानपणीं फारच बेताबाताचें शिक्षण मिळालें. परंतु तो वयांत आल्यावर शिक्षणाविषयीं त्यास इतकी आतुरता झाली कीं त्यानें शिक्षणाकरितां कोठेंतरी पळून जाण्याचा बेत केला. परंतु ती मसलत फुटून त्याच्या बापानें त्यास एका किल्ल्यांत कैदेंत ठेविलें; व त्याचा सोबती कॅट यास तर त्याच्या समक्ष ठार मारिलें. फ्रेडरिक यासही मारण्याचा त्याचा विचार होता. परंतु जर्मनीचा बादशहा सहावा चार्लस याच्या मध्यस्तीनें त्याचे प्राण वांचले! गादीवर बसल्यावर फ्रेडरिकनें विद्या व संगीत यांचा चांगला व्यासंग केला. फ्रान्स देशांतील विख्यात तत्ववेत्ता व्हालटेअर हा १७५० त त्याचे दरबारीं आला तेव्हां त्याचें अत्यंत स्वागत करून त्यानें त्यास ठेवून घेतलें. या उभयतांचें प्रेम असे. परंतु हें प्रेम पुढें एकाएकीं नाहींसें होऊन व्हालटेअर तेथून चालता झाला. फ्रेडरिकनें एकंदर १९ ग्रंथ लिहिले. पैकीं चार तो असतांच प्रसिद्ध झाले होते. बाकीचे १५ त्याच्या मरणानंतर छापले. यांत "युद्धकला" या विषयावर एक काव्य आहे. व "आत्मकालीन इतिहास" आणि "सेव्हन इयर्सवार" हे ग्रंथ फार प्रसिद्ध आहेत. हा राजा इतका विद्याव्यासंगी असूनही राज्यकारभारांत दक्ष व युद्धकलेंत निपुण होता. यानें लोक नियंत्रणार्थ नवीन कायदे केले व आपलें राज्य फार वाढविलें.

५ सिन्सिनेटस—(ख्रि० पु० ५२०–४३५) एक विख्यात रोमन डिक्टेटर—हा आपलें शेत नांगरीत असतां लोकांनीं येऊन मुजरा करून त्यास सांगितलें कीं सेनेटनें आपणांस

" प्रमाणें ते आपली इभ्रत राखून असत. या बागेंत द्राक्षें वगैरे अनेक
" जातींचीं फळें ऋतूऋतूंत उत्पन्न होत असत, व तीं किफायतीनें
" विकण्यांत अंड्रीस याचा हातखंडा असे. सायंकाळीं चिलिम ओढण्यांत
" व पुस्तकें वाचण्यांत बराच वेळ घालवून, जे शेजारीपाजारी त्याच्या
" गोष्टी ऐकण्यास जमत त्यांना आपल्या शिपाईगिरीच्या गोष्टी सांगून तो
" मौजेंत वेळ घालवी. या गोष्टींत **रासबाक**च्या लढाईचें वर्णन बहुधा असा-
" वयाचेंच. शिवाय अंड्रीस हा एकवेळ रात्रीस पाहारा देत असतां बादश-
" हाची स्वारी आली तेव्हां नेहमींप्रमाणें शिबिरांत (छावणींत) येतेवेळीं
" सांगण्याचा सांकेतिक शब्द आपण विचारिला असतां बरोबरचे भालदा-
" रांनीं " सरकार सलामत ! " असें सांगण्याचे आगोदर खुद्द बादश-
" हानींच " चुप बस कुत्र्या " असें ह्मणून आपली संभावना केली तीही
" गोष्ट सांगून **अंड्रीस** वरचेवर ह्मणे कीं "**कुनर्सडार्फ**चा धूर अजून त्याचे
" डोळ्यांत झोंबत होता, तरी पण राजा ह्मणण्यासारखा राजा तोच."

" त्याच्या बायकोचें नांव **ग्रिचेन** असें होतें. आणि **डेसडिमोनानें**
" जसें नुसत्या गुणावरूनच आपल्या **अथेल्लोस** वरिलें होतें, तद्व-
" तच **ग्रिचेननें अंड्रीस**च्या स्वरूपाकडे विशेष लक्ष न देतां त्याचे गुणाकडे
" पाहूनच त्यास वरिलें होतें. ती नेहमीं पतीच्या अर्ध्या वचनांत असे असें
" नाहीं; व तिच्या स्वभावावरून खुद्द **अंड्रीस**ही वरचेवर ह्मणे, कीं हुकूम-

---

राज्यपदीं नेमलें आहे. त्यावेळीं रोमवर शत्रूंनीं स्वारी केली असून सिन्सिनेटस सारखा दुसरा योद्धा नव्हता- या नेमणुकीप्रमाणें त्यानें अधिकार घेतला व फौज घेऊन सोळा दिवसांत शत्रूचा मोड करून परत आल्यावर राज्यसुख तुच्छ मानून आपल्या राज्यपदाचा राजीनामा दिला व लागलाच आपल्या शेतकामास लागला !

६ रासबाक हें ठिकाण सॅक्सनींत आहे. तेथें फ्रेडरिक दि ग्रेट यानें १७५७ त फ्रेंच लोकांचा पराभव केला.

७ कुनर्स डार्फ—हें ठिकाण ब्रॅडेन्बर्ग परगण्यांत असून तेथें रशियन व आस्ट्रियन सैन्यांनें १७५९ त फ्रेडरिक दि ग्रेटचा पराभव केला.

८ ग्रिचेन ह्मणजे मारगारेट; हें कार्लाइल साहेबांच्या आईचें नांव होतें. या कथानकांत कार्लाइल साहेबांनीं स्वतःच्या इतिहासांतील बराच अनुभव गोंविला आहे.

९ डेसडिमोना—शेक्सपियरच्या अथेल्लो नाटकांतील नायिका; अथेल्लो हा त्या नाटकांत नायक आहे.

" बंदेपणाचा विलक्षण सद्गुण बायकांत येणें अशक्य आहे. तथापि तिचें
" त्याजवर अकृत्रिम प्रेम असे. आणि शौर्य व शहाणपणा यांत आपल्या
" पतीची बरोबरी करणारा कोणीच नसेल असें तिला वाटत असे. पर्शि-
" यन फौजेंतील ग्रेनेडियर सार्जंट व पलटणींतील शिक्षक ह्मणजे तिला
" **वीरभद्र** व **बृहस्पती** किंवा सिड्[१०] व सिसेरो[११] यांसारखाच वाटे. कारण
" उघडच आहे, कीं ज्याचा पार दिसत नाहीं तें अपारच नव्हे तर काय ?
" बरें अनुभवांतही अंड्रीस हा व्यवस्थित, धैर्यवान, व निर्भीड असे. शिवाय
" त्यास **बुशिंगचा** भूगोल पाठ येत असून रासबॅकच्या लढाईत तो जय
" मारून आला होता; व **हाकर्क**[१२]च्या लढाईत तर त्यास मेला ह्मणून
" रणांगणांतच टाकिलें होतें. याही गोष्टी तिचे कानावर होत्याच. ह्मणून
" **ग्रिचेनचे** स्वभावानुसार जरी आदळणें आपटणें असे, तरी **अंड्रीसची**
" ती फारच काळजी घेत असे. शिवणकाम, स्वयंपाक, भांडींकुंडीं घासणें

---

१० सिड—( १०४०–१०९९ ) हा स्पेनचा अति नामांकित योद्धा. परंतु कवींच्या अतिशयोक्तीच्या दुर्गुणामुळें त्याचें खरें चारित्र अगर इतिहास दंतकथांतून वेगळा करणें अशक्य झालें आहे. आमचेकडील सर्व वीरपुरुषांची चरित्रेंही या कविलाघवामुळें याच स्थितीस आलीं आहेत. वास्तविक पाहतां राम, सीता, रावण, कृष्ण, पांडव, कौरव, नल, हरिश्चंद्र वगैरे केवळ कल्पित पुरुष नव्हत. परंतु कविलाघवामुळें त्यांचें मनुष्यत्व अजीबात नष्ट होऊन त्यांपैकीं कांहीं देवकोटींत, तर कांहीं असुरकोटींत जाऊन बसले. आपला अगदीं अलीकडील योद्धा शिवाजी व साधु रामदास, तुकाराम; पण तेही त्याच पंथास लागून सशरीर स्वर्गारोहणासारख्या दंतकथांत गुरफटून गेले आहेत. त्यामुळें अनुकरणास आज आह्मांस कोणीच नाहींसें होऊन आह्मी उघडे पडलों आहों. या पुरुषांपेक्षां आह्मी निसर्गतःच कमी कोटींतले आहों अशीच समजूत झाल्यावर त्यांचें अनुकरण आमच्या हातून व्हावें कसें ? ते आपल्यासारखेच पुरुष होते व आपण मनांत आणिलें तर आपणांसही त्यांचें अनुकरण शक्य आहे; हा विश्वास उत्पन्न झाला नाहीं तर राम राम, कृष्ण कृष्ण, ग्यानबातुकाराम ग्यानबातुकाराम, वगैरे भजनांनीं; व रामनवमी, गोकुळ अष्टमी, शिवजयंती वगैरे उत्सवांनीं मात्र त्यांचें स्मरण कायम ठेवणें यांतच लोकांस त्या पुरुषांसंबंधीं व आपल्याही संबंधानें आपलें कर्तव्य संपलें असें वाटणें साहजिक आहे.

११ सिसरो—हा रोम येथील अति विख्यात वक्ता व राजकारणी पुरुष ( ख्रि० पू० १०६–४३ )

१२ हाकर्क—हें ठिकाण सॅक्सनींत असून तेथें १७७८ त आस्ट्रियन फौजेनें फ्रेडरिक दि ग्रेटचा पराभव केला.

" वगैरे कामें अगदीं वेळच्या वेळेस व तत्परतेनें ती करी. ह्मणून अँड्री-
" सची तलवार व शिपाइगिरीची टोपी तर चकचकीत असेच, पण घर,
" परूस, भिंती सर्वच चकचकीत व नीटनेटकीं असत. त्यांची झोंपडी
" प्रशस्त असून पोतलेली असे. तिचे भोंवतीं फळझाडें व रायवळ झाडें
" दाट लागलीं असून मधून मधून फुलझाडें व सर्वदा हिरव्या राहणाऱ्या
" वेली यांची दाटी असे. परसांतील हिरवें चार गवत नेहमीं जमिनीबरो-
" बर कातरून गालिच्यासारखें ठेविलें असे. झोंपडीस एक खिडकी होती
" तींतून आंत येण्याकरितां फुलांची जशी कांहीं चढाओढ असे. झोंपडीच्या
" वळचणी लांबवर बाहेर गेल्या असून त्यांचे निवाऱ्यास बागेंतील कामाचीं
" हत्यारें व्यवस्थेनें लावून ठेवलीं असत. अंतरा अंतरावर खुर्च्याही ठे-
" विल्या असत. याप्रमाणें हें स्थळ इतकें रमणीय व शांत असे कीं तेथील
" एका खुर्चीवर संध्याकाळीं, विशेषतः उन्हाळ्यांत, निवांतपणें बसून हवा घेत
" असतां 'हा विश्राम आपला आहे' असें वाटून एखाद्या राजासही आनंद
" वाटता. ही सुंदर जागा ग्रिचेनच्या माहेरची आंदण मिळाली असून
" अँड्रीसनें आपल्या सशक्त हातांनीं व बागशाईच्या कसबानें तिला हें
" मोहक रूप आणिलें [13] होतें.

" एके दिवशीं संध्यासमयीं या भूतळावरील एनटेपफूल गावांतून जरी
" सूर्यनारायण दिसत नव्हता, तरी संध्याप्रभेवरून दिव्य तुळेवर (तूळ
" राशीवर[14]) तो फिरत असल्याचें स्पष्ट दिसत होतें; अशा वेळीं त्या
" सच्छाय आश्रमांत तें दंपत्य बसलें असतां एक गंभीर मुद्रेचा पुरुष
" एकाएकीं आंत आला, व मोठ्या आदबीनें मुजरा करून त्या आश्चर्य-
" चकित स्त्रीपुरुषांसमोर उभा राहिला. त्याचें सर्व अंग एका प्रशस्त
" झग्यांत गुरफटलेलें असल्यामुळें बाहेर दिसत नव्हतें. जास्त कांहीं भाषण

१३ हें सुंदर वर्णन जरी एका कल्पित स्थळाचें आहे, तरी इतकी टापटीप व सृष्टि-सौंदर्याची आवड गोऱ्या लोकांत बहुधा सार्वत्रिक आहे. या वर्णनाशीं आमच्याकडील शेतकऱ्यांच्या व बागवानांच्या झोंपड्यांची तुलना केली असतां आपणांत किती उणीव व गलिच्छपणा आहे याचें अनुमान सहज होईल. याचीं मुख्य कारणें दोन आहेत. एक रिकामपणाची आवड व अज्ञान; आणि दुसरें आपल्या लोकांस असलेली सर्वांत मोठी पोट भरण्याची काळजी. या दोहोंसही उपाय आहेत, पण ते केले तर !

१४ तूळराशींत सूर्य २३ सप्टेंबरपासून २३ अक्टोबरपर्यंत असतो.

" न करितां त्या नवख्या पुरुषानें एका उत्तम हिरव्या रेशमी कपड्यांत गुंडा-
" ळलेलें टोपलीसारखें कायसेसें आपल्या झग्यांतून बाहेर काढून त्यांचे पुढें
" ठेविलें आणि ह्मणाला "ख्रिस्तानुयायी सज्जनांनो! ही एक अमोल्य ठेव
" तुमचेपाशीं असूं द्या; होईल तितकी हिची काळजी घ्या, व मोठ्या
" दक्षतेनें हिचा उपयोग करा. एके दिवशीं ही ठेव तुह्मांजवळून परत
" घेतली जाऊन तिचा तुह्मी जसा उपयोग केला असेल त्या मानानें तुह्मांस
" उत्तम बक्षीस किंवा भयंकर शिक्षा मिळेल[15]. हे विलक्षण शब्द कधीं विस-
" रणार नाहींत अशा मृदंगासारख्या गंभीर ध्वनीनें स्पष्ट उच्चारून तो
" नवखा मनुष्य मोठ्या आदबीनें पण एकदम निघून गेला. त्यास कांहीं
" प्रश्न करावा अगर उत्तर द्यावें इतकाही वेळ अंड्रीस यास अगर त्याचे
" बायकोस मिळाला नाहीं. दाराबाहेरही तो दिसेना, किंवा त्याचा शोधही
" लागेना. त्या झाडींतून व अंधारांतून तो कोणीकडे गेला त्याचा पत्ता
" नाहीं. भोंवतालीं सर्व झाडी पूर्ववत् शांत होती. हिंवाळच्या त्या शीतळ
" समयीं संधिप्रकाशांत हा सर्व प्रकार इतक्या लौकर व शांतपणें झाला
" कीं, तो सर्व काल्पनिक, पिशाच्याचा खेळ असावा, असेंच त्या नवरा
" बायकोस वाटलें असतें. परंतु समोर ती हिरवी टोपली होती; ती नुसत्या
" कल्पनातरंगानीं किंवा पिशाच्याचे खेळानें प्रत्यक्ष तेथें कशी येईल,
" याचें त्यांस कोडें पडलें! मग मेणबत्ती लावून घाईघाईनें तीं दोघेंही त्या
" टोपलींत काय आहे ह्मणून मोठ्या उत्सुकतेनें वरचें हिरवें रेशमी कापड
" काढून पाहतात, तों आंत हिरे माणकें काहींच नसून एक गाढ झोंपीं
" गेलेलें तांबडेंलाल मूल मात्र दृष्टीस पडलें. जवळच कांहीं मोहोरांची रास
" होती, तिची नक्की रक्कम किती होती हें कांहीं सांगतां येत नाहीं. नाम-
" करण व बापातिस्म्याचा[16] विधी झाल्याबद्दल एक सरटिफिकेटही जवळ

१५ ह्मणजे मृत्यूनंतरच्या एखाद्या पुण्यप्राप्य किंवा पापभोग्य ठिकाणीं. वास्तविक पाहतां कोणचें ही मूल झालें तरी तें त्याच्या आईबापाजवळ ईश्वराची ठेव याच नात्यानें असतें. त्याच्या जीविताचा सदाचरणानें व सत्कार्याकडे उपयोग होईल अशा रीतीची त्यास दिशा लावून त्याचें संगोपन करणें एवढेंच आपलें काम आहे. आणि हें काम जर आपण न केलें, जर आपल्या मुलांचा आपण दुरुपयोग करून त्यांस दुर्वर्तनी व मग अर्थातच दुःख–भागी होऊं दिलें, तर त्याबद्दल आपणास ईश्वराजवळ जाब द्यावा लागेल. आईबापांस मुलांकडून मिळणारी मुक्ती व अधोगती ईश्वराच्या याच निवाड्यावर अवलंबून आहेत.

१६ बापतिस्मा—ख्रिस्ती धर्म घेण्याचे वेळचा मंत्राभिषेक.

" होतें. परंतु त्यांत त्या मुलाचे नांवाशिवाय दुसरें अक्षरही लागेना. या
" शिवाय त्या मुलाचा पत्ता लागण्यासारखी खूण, किंवा कागदपत्र वगैरे
" कांहींच नव्हतें.

" त्या वेळेसच काय, पण पुढेंही त्या उभयतांनीं नुसतें आश्चर्य व कल्पना
" करीत बसणें निरर्थक होतें. कारण दुसरें दिवशीं किंवा तिसरेही दिवशीं
" त्या विलक्षण नवऱ्या गृहस्थाची कांहीं बातमी लागेल ह्मणून तीं बिचारीं
" सारखीं खटपट करीत होतीं; पण व्यर्थ. त्या दिवशीं कोणी परका
" गृहस्थ चार घोड्यांचे गाडींत बसून जातांना लोकांस दिसला होता खरा
" तरी त्याचा आणि या अदृष्टपूर्व नवऱ्या पुरुषाचा संबंध लावावा कसा?
" असो अंड्रीस व त्याची बायको यांस, या झोंपीं गेलेल्या तांबड्या पोराचें
" करावें काय, ही नवीन काळजी मात्र उत्पन्न झाली. आश्चर्य व चिकित्सा
" हीं लौकरच आपोआप दूर झाल्यावर त्या दयाळू व दूरदर्शी स्त्रीपुरुषांनीं
" या पोरास वरदूध घालून उर्जित दशेस आणण्याचा निश्चय केला; व
" ईश्वरासही हा त्यांचा उपक्रम आवडून पुढें त्या पोरास अन्नवस्त्र व
" हिंडणें फिरणें यांची सोय होऊन, तेंच पोर आकारानें, बुद्धिविशेषानें,
" व बऱ्या वाइटाचे ज्ञानानें संपन्न होऊन, विसिनिचट्टो येथील विश्व-
" विद्यालयांत डायोजिनिस ट्यूफेल्सड्राक या नांवाखालीं सामान्यतः
" पदार्थविज्ञानशास्त्राचें अध्यापकत्व करीत आहे, किंवा करण्याच्या
" बेतांत आहे.

" मी बारा वर्षांचा असतांना ग्रिचेन फुटरलनें या गोष्टी प्रथम मला
" सांगितल्या, त्या वेळीं माझ्या कोंवळ्या मनावर व बुद्धीवर जो ठसा उम-
" टला आहे तो कधींही जावयाचा नाहीं. तूळ राशींत सूर्य असतांना त्या
" बागेंतील झोंपडींत एकाएकीं येऊन जो पुरुष नाहींसा झाला तो कोण
" होता? या प्रश्नाचें उत्तर देण्यास तेव्हांपासून प्रेम व दुःख यांनीं युक्त
" होऊन आजपर्यंत मी झटत आहें. संकटें आलीं असतां व एकांतांत त्या
" अज्ञात बापाची मला एकसारखी आठवण होते; तो आज दूर असो
" अगर जवळ असो, मला अदृश्यच आहे; त्यानें मला आलिंगन देऊन
" आपल्या छायेखालीं घेतलें असतें तर किती तरी दुःखापासून आजला
" मी मोकळा असतों! हे प्रिय पित्या, आह्मांस जातां येईल अशा ठिकाणीं
" नुसत्या आकाशाचे पड्द्या आड सजीव प्राण्यांमध्येंच आज तूं आहेस,

" कां जेथें आमच्या इंद्रियांचा पल्ला कधींच पोंहचत नाहीं अशा ठिकाणीं
" अक्षय्य अंधःकाराच्या अगर अक्षय्य तेजाच्या अभेद्य पडद्याआड तूं आहेस ?
" काय करावें ? मला कांहींच उमज होत नाहीं, व कांहीं इलाजही चालत
" नाहीं ! कितीदा तरी एखादा भव्य नवखा पुरुष पाहून तोच तूं असशील
" अशा बुद्धीनें मीं त्याकडे मोठ्या आशेनें व निःसीम प्रेमानें धांव घेतली
" असेल; पण प्रत्येक वेळेस माझा हिरमोड होई व मग तो तूं नव्हेस
" असें कळून दर वेळेस माझी निराशा होई ! तत्रापि हे मनुष्यजातीच्या
" प्राण्या, तुझ्या आणि माझ्या स्थितींत फरक तो काय ? **अंड्रीज** झाला,
" **ग्रिचेन** झाली; किंवा **आदम हव्वा**[१७], कोणीही झालीं, ज्यांनीं तुला या
" संसारांत आणिलें व कांहीं काळपर्यंत तुला पाजिलें अगर वर दूध घातलें,
" ज्यांना तूं पिता व माता असें ह्मणतोस तीं तुझींही मातापितरें माझ्या
" सारखींच **पोसती आई पोसता बाप** नव्हत काय ? तुझाही **खरा बाप**
" किंवा **बीजप्रद पिता** स्वर्गातच असून तो या शारीरिक डोळ्यांस कधींही
" दिसावयाचा नाहीं, आत्मदृष्टीनेंच दिसेल."

याप्रमाणें नीतिपर विचार व विकारवशतेचे उद्गार काढीत काढीतच प्रोफेसर साहेब लिहितात, " तें हिरवें कापड अजून मी जपून ठेविलें आहे;
" व **डायोजिनिस ट्यूफेल्सड्राक** हें माझें नांव तर त्याहूनही बळकट
" धरून ठेविलें आहे. या कापडापासून कांहींच अनुमान करितां येण्यासा-
" रखें नाहीं. रेशमी कापडाच्या इतर हजारों तुकड्यांसारखेंच तेंही असून
" त्याचा रंग जाऊन तें आज अगदीं फिकें झालें आहे. नांवाविषयींही
" बरेच वेळ विचार करून कांहीं अनुमान करण्यास प्रयत्न करितों तों
" तेथेंही मति कुंठित होते. हेंच माझ्या पित्याचें नांव होतें असें वाटत
" नाहीं. जर्मन बादशाहींत, व जर्मन बादशाहीच्या बाहेरही जितक्या प्रका-
" रच्या नांवनिशीच्या यादी प्रयत्न करून मला मिळाल्या तितक्या सर्व
" धुंडाळून पाहिल्या. सरदारांच्या नांवनिशा, सैन्यांतील लोकांच्या नांवनिशा,
" कर देणाऱ्या लोकांच्या नांवनिशा वगैरे सर्व पाहून दमलों. परंतु **ट्यूफे-
" ल्सड्राक** ( कलिपरित्यक्त ) हें नांव माझ्याशिवाय दुसऱ्या व्यक्तीस लावि-
" लेलें कोठेंही आढळत नाहीं. बरें **डायोजिनिस** (देवपुत्र) हें नांवही ख्रिस्ती

---

१७ पुढें टीप २२ पहा.

१८ यूरोपांत लेकांस बापाचेंच नांव ठेववण्याची क्वचित वहिवाट आहे.

" नांवांतलें नाहीं! असे असतां तें नांव मला देण्यांत त्या टोपलीवाल्याचा
" हेतु काय होता न कळे; या नांवानें माझ्या भावी चरित्राचें दिग्दर्शन
" करावें असा कांहीं हेतु होता ह्मणावें, कां आपली ही त्याची त्या वेळची
" हुकी असेंच समजावें? कदाचित् हें दुसरें कारण असेल, न जाणों दोन्ही-
" ही असतील. हे दुर्दैवी पित्या, शहामृगास जसें आपलें अंडें फोडून
" ऊर्जित दशेस पिलें आणण्याचें काम हवेवरच सोडावें लागतें, त्याप्रमाणें
" ज्या तुलाही या दुर्दैवी पोरास जन्मापासून हवेवर सोडावें लागलें, त्या तुझा
" तरी इहलोकचा प्रवास सुखावह झाला असेल काय? तुझीहि पाठ अनेक
" संकटांनीं पुरविली असेल यांत संशय नाहीं. न जाणो, सर्व संकटांत
" पहिल्या प्रतीचें संकट जें **दुर्वर्तन** तेंही तुझ्या पाठीस लागलें नसेल
" कशावरून? तुझ्याविषयीं कल्पना करितांना अनेक वेळां माझ्या मनांत
" येतें कीं या कठीण संसाराचे झोंबींत तुला कोणी गोळी घातली असेल
" किंवा जखमी केलें असेल, किंवा हातबेड्या घातल्या असतील, न जाणों
" मुसक्याही बांधल्या असतील! याप्रमाणें सर्व प्राण्यांत संचार करणाऱ्या
" व अर्थात् तुझ्याही शरीरांत असणाऱ्या काळपुरुषाकडून तुला त्रिविध
" ताप पोहोंचला असेल, व मग जीवात्म्यास कडेलोट राग येईपर्यंत तुझे
" हाल झाले असतील. अशा वेळेस **भविष्यकाळाकडे** फिर्याद करण्या-
" वांचून तुला इलाजच नव्हता. मग मला उत्पन्न करून ही जिवंत बोलती
" चालती फिर्यादच करून तूं निघून गेलास काय? असो. मला वाटतें ही
" तुझी फिर्याद अगदींच फुकट गेली नाहीं. एवढें तरी मला नम्रपणें
" ह्मणतां येईल.

" कारण **वॉल्टरशँडी**[१९] ह्मणतो त्याप्रमाणें **नांवाचा प्रभाव** कांहीं लहान
" सान नाहीं. वास्तविक पाहतां सर्व प्रभाव नांवाचाच आहे. '**मी**' शब्दानें

---

१९ वाल्टर शँडी—स्टर्न (पु० १ भाग ९ टीप १२) च्या ट्रिस्ट्रॅम शँडी ग्रंथांतील ट्रिस्ट्रॅमचा बाप.

२० नामप्रभाव—या संबंधीं आमच्या लोकांत फारच मोठा व अगदीं सार्वत्रिक गैर-समज आहे. लोकांची अशी समजूत आहे कीं ईश्वराच्या नामस्मरणापासून पातकें नाहींशीं होऊन मोक्ष सुलभ होतो. आणि या भ्रमानें कितीतरी लोक आपले कर्तृत्वाचे अमोल्य दिवस फुकट घालवीत आहेत. नाम हें पदार्थाचें विशेष स्वरूपच होय. नुसत्या नाम-निर्देशानें पदार्थाचें स्वरूप आत्म्याचे मनोरूप नेत्रांस गोचर होतें, तें नांवाच्या याच प्रभावामुळें.

" कळणारा पदार्थ जेव्हां या पृथ्वीवर व्यक्त होतो, तेव्हां त्यास पहिल्यानें
" आपण **नांवाचा** पेहराव घालतों. आणि चमत्कार पहा कीं, **शरीर**रूपी
" **नैसर्गिक वस्त्रा**पेक्षांही हें नामवस्त्र जास्त दिवस टिकतें ! कितीएक **नांवें**
" तीन तीन हजार वर्षें राहिलेलीं आपण पहातों ! या **नांवाच्या प्रभावानें**च
" अत्यंत गूढ असे बाह्य शक्तींचे परिणाम अगर विकार या **शरीरवस्त्रास**
" भेदून अगदीं अंतरंगापर्यंत जाऊन पोहोंचतात. जेव्हां बाल्यावस्थेंत मनास
" नवीन वळण मिळतें आणि बाह्यशक्तीचें विज्ञानरूप अदृश्य बीज अंत-
" रंगांत रुजून सर्व वस्तूंवर छाया पाडण्यासारखा त्याचा ज्ञानवृक्ष [२१] होतो,
" तेव्हां विशेषतः ही गोष्ट नजरेस येते. नावें हीं दिसण्यांत अगदीं क्षुल्लक
" दिसतात; परंतु एकंदर वस्त्रांत **नामवस्त्रच** अत्यंत महत्वाचें असून त्याचा
" प्रभाव वर्णन करण्यास प्रत्यक्ष शेषही पुरणार नाहीं. सामान्य भाषा तर
" राहोच, परंतु शास्त्रें, काव्यें, ह्मणजे तरी सूक्ष्म विचाराअंतीं योग्य
" नांवानें वस्तुनिर्देशच नव्हे काय ? **बाबा आदमचें** [२२] पहिलें काम पदार्थांस
" नावें देण्याचें होतें. आणि आपलेंही मुख्य काम तोच क्रम चालू ठेव-
" ण्याचें आहे; मग हे पदार्थ बाह्य सृष्टींतले असोत किंवा आपल्या अंत-
" रंगांतील असोत. उद्भिज, प्राणी, गतीवाचक पदार्थ, तारे, नक्षत्रें व

उलट पक्षीं नामांत जें महत्व आहे तें त्या पदार्थाच्या महत्वावर अवलंबून आहे. ह्मणून ज्या नामोच्चारानें मनांत तो पदार्थ प्रत्यक्ष उभा रहात नाहीं तो नामोच्चार निरर्थक होय. जन्मभर सतत जरी रामाचें नांव घेतलें तरी ज्या गुणांवरून राम देवत्व पावले ते गुण जोंपर्यंत त्या नामोच्चारानें आपणांस भासमान होत नाहींत, जोंपर्यंत ते गुण आपल्या वर्तनांत आणण्यास आपण झटत नाहीं तोंपर्यंत रामनामजपापासून बिलकुल पुण्य नाहीं. रामनाम-जपाबरोबर जर आपल्या वर्तनांत रामचरित्राचा कित्ता वळविण्याचा प्रयत्न झाला तर मात्र त्यापासून योग्य फलश्रुती होईल.

२१ विज्ञान ह्मणजे बाह्य वस्तूंचें व त्यांच्या गुणधर्मांचें ज्ञान. हें आपणांस नांवांच्या किंवा शब्दांच्या मार्गानें होतें; व मग या विज्ञानाचा विचाराशीं संपर्क होऊन तें ज्ञानरूप पावून त्या ज्ञानाचे चष्म्यांतून आपण वस्तुमात्रांचें अवलोकन करितों. तात्पर्य या सर्वांचें मूळ नांवांत आहे.

२२ पाश्चात्य पुराणांप्रमाणें ईश्वरानें सृष्टि निर्माण केल्यावर आदम व हव्वा हें मनुष्याचें पहिलें जोडपें उत्पन्न केलें; मग बाकीच्याही प्राण्यांचें एक एक जोडपें उत्पन्न करूव त्या सर्वांचा योग्य उपयोग करण्याची त्यास आज्ञा केली. त्यानें प्रथम त्या सर्वांचीं व इतर पदार्थांचींही नांवें ठेविलीं आपणांत मनूविषयींही अशीच हकीकत आहे.

" त्यांच्या गति, सद्गुण, विकार, ईश्वराचे गुण, देव वगैरे सर्व पदार्थांस,
" आणि त्यांच्या संबंधी पदार्थांस नांवें देण्याचेंच आपलें काम आहे. एक
" ह्मण आहे कीं एखाद्यास चोर ह्मटलें कीं लागलाच तो चोरी करूं लागतो.
" तशाच अर्थानें आपणास असेंही ह्मणतां येणार नाहीं काय, कीं एखाद्यास
" **डायोजिनिस टयूफेल्सड्राक** असें नांव दिल्यास तो **वस्त्ररहस्य** नांवाचे
" तत्वज्ञानाचा पाया घालील !

" असो; इकडे **डायोजिनिस** हा इतर मुलांप्रमाणेंच आपण **कोठून** आलों,
" **कसे** आलों, व **कोठें** जावयाचें, याविषयीं अगदींच अज्ञानांत असून
" नुकते आपले डोळे उघडून परमेश्वराची **दयारूप** तेजोविभूति अनुभवूं
" लागला; हातांपायांचीं बोटें हवेंत वेडींवांकडीं नाचवूं लागला. शब्द, रस,
" स्पर्श यांचाही अनुभव घेऊं लागला. तात्पर्य पंच कर्मेंद्रियें व सर्वांत तीक्ष्ण
" अशी सहावी भूक व आंतील दिव्य सूक्ष्म ज्ञानेंद्रियें यांचे योगानें, ज्या
" विलक्षण जगांत तो आला होता त्यांतील कांहीं कांहीं अनुभव घेऊन ज्ञान संपादूं
" लागला; मग या जगांत त्याची कामगिरी काय असेल ती असो. याप्रमाणें
" ज्ञानमार्गांत अतर्क्य रीतीनें गती होतां होतां सुमारें पंधरा महिन्यांत
" वाणीचा[२३] विलक्षण चमत्कार तो दाखवूं लागला. पहा या उद्भुत[२४] आत्म्याची
" उत्पत्ति किती विलक्षण आहे ! एखादें दिव्य अंडें उबून फुटून जसें पिलूं
" बाहेर यावें तशीच ही उत्पत्ति नाहीं काय ? पहिल्यानें आकार, शक्ति
" कांहींच नसते. पण क्रमाक्रमानें अंड्यांतील त्या पातळ बलकांतूनच अवयवें
" शिरा, वगैरे बनत बनत **शरीर** तयार होतें. मग अस्पष्ट इंद्रियज्ञानापासून
" **विचार** उत्पन्न होतो. **कल्पना** व **दुसऱ्या शक्ती** उत्पन्न होतात. व

---

२३ आपल्या प्रमाणें इतर प्राण्यांत पदार्थांचे गुणधर्म व क्रिया दर्शवितां येण्याजोगी भाषा आहे कीं नाहीं हा मोठा गूढ प्रश्न आहे. पण आपणास जर भाषा नसती तर आपली स्थिति आज आपणांस जी पशूंची स्थिति आहेशी दिसते तशीच असती असें वाटतें.

२४ आत्मा हा सर्वत्रच पसरला आहे. कांहीं ठिकाणीं तो उद्भुत किंवा परिणाम रूपानें व्यक्त असतो; व बाकीच्या ठिकाणीं अव्यक्त असतो. आत्म्याचें सर्वांत उत्कृष्ट उद्भुत-स्वरूप मनुष्य हें होय. हें उद्भुत किंवा व्यक्त स्वरूपही दिवसेंदिवस जास्त विकास पावतें. हा विकास किती विलक्षण आहे !

" अखेरीस मोठमोठीं शास्त्रें, मोठमोठीं नामांकित घराणीं इतकेंच नव्हे तर
" काव्यें, व धर्म, हींही आपणांस त्यापासूनच मिळतात!

" असो, याप्रमाणें तो तान्हा डायोजिनिस सहज, पण मोठ्या वेगानें
" या बुद्धिविकासाकडे धांव घेत होता. त्या फुटरल नवरा बायकोनें
" त्याचें लाडकें नांव निशेन असें ठेविलें होतें. आणि त्या पोरासंबंधीं
" गांवांत उगीच वाच्यता होऊं नये व विशेषतः ती मोहोरांची रास सुरक्षित
" रहावी ह्मणून हें आपल्या बहिणीचें नातवंड असून त्याची आई अंह्री-
" सच्या मूळ गांवीं रहात होती, ती अकस्मात् वारली असें तीं लोकांत
" सांगूं लागलीं. अर्थात् या मुलाच्या कल्पित आईविषयीं व तिच्या विधुर
" नवऱ्याविषयीं खरी माहिती तेथें कोणासही नव्हती; ह्मणून लोकांनाही ही
" फुटरलनीं रचिलेली गोष्टच खरी वाटली, यांत नवल नाहीं. इकडे हें मूल
" दूध पीतपीत वाढूं लागलें. त्या बिचाऱ्याला हें आपल्या संबंधानें काय
" काय चाललें होतें, तें कांहींच कळत नव्हतें! असें ह्मणतात कीं हें मूल
" अगदीं शांत असून बिलकुल रडत नसे—न जाणो, वेळ ही फार महत्वाची
" असून नुसत्या आरडण्या ओरडण्यापेक्षां तींत आपणांस दुसरेंच कांहीं
" करावयाचें आहे, असें तेव्हांही त्याला वाटत नसेल कशावरून?"

या प्रमाणें या कागदांच्या गबाळांतून मोठ्या प्रयत्नानें कागदांचा मेळ घालीत घालीत टयूफेल्सड्राक साहेबांच्या कुळाचा वृत्तांत उपलब्ध होतो. आह्मांस तर तो फारच अपुरा व गूढ वाटतो. जों जों पहावें तों तों प्रोफेसर साहेबांचे खोंचून (उपरोधिक भाषण) बोलण्याची संवय व चेष्टा करण्याची प्रवृत्ति हे गुण जास्तच दृष्टोत्पत्तीस येतात. तरी हे आत्मचरित्रात्मक लेख त्यांनीं इतिहासदृष्टीनें लिहिले असल्यामुळें ते ह्मणतात तेंच खरें धरून चालूं. परंतु हा जन्मवृत्तांत सांगतांना ग्रिचेन फुटरलनें किंवा इतर कोणीं संबंधी मनुष्यानें फायद्यावर दृष्टि देऊन मूळीं प्रोफेसर साहेबांसच बनावट गोष्ट सांगितली नसेल ना? हे आमचे लेख भाषांतर होऊन किंवा तसेच जर एन्टेपफुल येथील सरक्युलेटिंग लायब्ररींत दैवयोगानें गेलेच तर

---

२५ सरक्युलेटिंग लायब्ररी—ह्मणजे फिरतें पुस्तकालय. यांतील ग्रंथ व वर्तमानपत्रें वर्गणीदारांस आळीपाळीनें देण्यांत येतात. आपल्या देशांत प्रत्येक तालुक्यांत अशी लायब्ररी होऊन तिचें काम सुरळीत चालेल तो सुदिन. पण केल्यावांचून कोणचीही गोष्ट व्हावी कशी?

यांतला खरा इतिहास प्रसिद्ध करण्याची कोणास तरी इच्छा होणार नाहीं कशावरून ? कारण पुस्तकें हीं सांप्रत अदृश्य हेरांसारखीं असून जेथें ह्मणून मनुष्याची वस्ती आहे, तेथें तेथें त्यांचा प्रवेश होतो. **तिंबकतु**[२६] हें शहर कोणीकडे, परंतु इंग्रजी भाषेंत छापलेले ग्रंथ तेथेंही जातात ! अशा स्थितींत न जाणो, हें पुस्तक त्या विलक्षण नवख्या टोपलीवाल्या पुरुषाचेच हातांत पडून जरी तो आज वार्धक्यानें पराधीन झाला असला तरी त्याच्याही मनांत या मुलाचा बाप ह्मणून प्रसिद्धीस येण्याची प्रेरणा होणें अशक्य नाहीं. कारण असल्या मुलाचा बाप ह्मणवून घेण्याचें तरी नशीबीं पाहिजे !

---

# भाग दुसरा.

## बाल्यदशा.

**ट्यूफेल्सड्राक** साहेब ह्मणतात, " **बाल्यावस्थेचा** काळ किती सुखाचा !
" हे **सृष्टिमाते**, उदार मातेसारखेंच तुझें सर्वांशीं वर्तन असतें. गरीब
" मनुष्याच्या झोंपडीला हिरव्या गार वेलींच्या सतेज फुलोऱ्यानें तूंच शोभा
" आणितेस. त्याचप्रमाणें तान्ह्या पोरांना **प्रेम** आणि अपार **आशा** यांच्या
" गाद्यागिरद्या मिळून गाढ झोंपेंत उत्तमोत्तम स्वप्नें पडावीं ही तुझी किती
" तरतुदीची व्यवस्था आहे बरें ! या **बालपणीं** वडिलांच्या घराची आह्मांस
" कैद असते खरी. तरी पण त्याचीच सांवली आमचें रक्षण करिते ना ?
" त्या वेळेस आमचा **बाप** हाच आह्मांस देवाचे ठिकाणीं असून आमचा
" **धर्मोपदेशक** व **राजाही तोच** असतो; आणि त्याच्या आज्ञांकितपणांतच
" आह्मांस उत्कृष्ट स्वातंत्र्यसुख मिळतें. हा **बालजीवात्मा अनाद्यंतांतून**
" नुकता जागा झाला असून **वेळ** ह्मणजे काय याचें त्या वेळेस त्यास कांहींच
" ज्ञान नसतें. अजूनपर्यंत वेळ ही त्याला त्वरेनें वाहणाऱ्या **नदी**सारखी
" दिसत नसून सूर्यकिरणानीं श्रृंगारलेल्या व तरंगांगुलींनीं खेळणाऱ्या **महा-**
" **सागरा**सारखी दिसत असते. लहान मुलांस **वर्षें** व **युगें** सारखींच

---

२६ तिंबक्तू—आफ्रिकेंत साहरा मैदानाचे वायव्यदिशेस मोटें व्यापाराचें ठिकाण—व्यापाराचे मुख्य जिन्नस सोनें व खाणींतील मीठ.

" वाटतात. अगदीं कठिण **पाषाणाच्या** डोंगरापासून तों **मनुष्यापर्यंत** व
" नाजुक **मशकापर्यंत** या सृष्टिवस्त्राचा **धागान्धागा** कमीजास्त वेगानें
" सारखा रगडला जाऊन त्याच्यांत जो विलक्षण विपर्यास होत असतो,
" त्या ऱ्हासाचें इंगित जो **काळ** तो आपणास अजून ठाऊकही नसतो.
" आणि विलक्षण वेगानें फिरणाऱ्या या सृष्टिचक्रांत जें सुख पुढें आपणांस
" कधींच मिळत नाहीं तें शांतिसुख सृष्टि अचल आहे अशा कल्पनेनें
" या वेळेस आपण यथेच्छ अनुभवितों! नीज **बाळा**! सुंदर **मुला**, आतां
" निजून घे. कारण लौकरच तुलाही या बिकट व कंटाळवाण्या वाटेंत
" प्रवास करावयाचा आहे. थोडीशी **वेळ** गेली ह्मणजे तुला सुद्धां हें **निद्रा-**
" सुख कधीं मिळावयाचें नाहीं. मग तुला स्वप्नेंही लढायांचींच पडूं लागतील
" आणि ह्मातार्‍या **आरनाल्ड**सारखें[1] कठोर होऊन तूंही शांतपणें ह्मणूं
" लागशील कीं, " काय ह्मणतां, **झोंप**? **विश्रांति**? आतां **झोंप** नको,
" **विश्रांतिही** नको! मेल्यानंतर पुढें **अनंतकाळ झोंपच** घ्यावयाची नाहीं
" काय?" **झोंप** ही सर्व दुःखहारक दिव्य वल्ली होय. परंतु **पिऱ्हसनें**[2]
" जरी राष्ट्रेंच्या राष्ट्रें जिंकिलीं आणि शिकंदर[3] बादशहानें सर्व जग पादा-

---

१ अरनाल्ड—पोर्ट रायल मताचा फ्रेंच धर्मोपदेशक व तत्त्ववेत्ता. (१६१२-१६९४) यानें स्वमताचे मंडणार्थ व जसूट नामक भोंदू शब्द पंडितांचे खंडणार्थ पुष्कळच लेख लिहिले आहेत. या त्याच्या वादांमुळें त्याचा फारच छळ झाला तरी त्यानें आपला क्रम मरेपर्यंत चालविला. तो ह्मातारा झाल्यावर त्याचा मित्र निकोल यानें त्यास सांगितलें कीं "आतां या वादांस निरोप देऊन विश्रांती घ्यावी." यावर हें वर दिलेलें उत्तर आहे.

२ पिऱ्हस—एपिरसचा राजा—त्याच्या बापाचे वेळेस राज्यांत बंड होऊन बंडखोरांनीं त्याच्या बापास ठार केलें. तरी कांहीं विश्वासू लोकांनीं त्यास पळवून नेऊन इलिरियन लोकांच्या राजाजवळ आश्रयास ठेविलें. त्यानें त्याचें संगोपन करून त्यास त्याच्या बापाची गादी मिळवून दिली. पिऱ्हसनें नंतर मासिडोनियाचा बराच भाग जिंकला, रोमन लोकांचा पराभव केला, कार्थेजिनियन लोकांस हांकून लाविलें व स्पार्टा शहरास वेढा दिला. त्याचा कित्येक ठिकाणीं पराजयही झाला व अरगासवर हल्ला करींत असतां एका शूर स्त्रीनें आपल्या घरावरून एक कौल त्याचे डोक्यांत मारून त्याचा प्राण घेतला. अतितृष्णेचा शेंवट बहुधा असाच होतो. जन्मकाल निश्चित नाहीं. मृत्यु ख्रिस्तीशकापूर्वी २७३ वर्षी.

३ शिकंदर बादशहा—मासिडोनचा अलेक्झांडर दि ग्रेट—हा प्राचीन काळीं अति-दिग्विजयी पुरुष होऊन गेला. यूरोपांतील आद्यतत्ववेत्ता आरिस्टाटल हा त्याचा गुरु. त्याची

" क्रांत केलें तरी, हे निद्रे, तूं त्यांनाही वश झाली नाहींस. तीच तूं कांहीं
" काळपर्यंत प्रत्येक मुलाच्या डोळ्यांस व हृदयास सुखद स्पर्श करून
" त्यांस त्या सुखांत तल्लीन करितेस ! त्या वयांत **झोंप** व **जागृति** दोन्ही
" गोष्टी सारख्याच असून सभोंवतीं **संसाराचें** दिव्य **उद्यान** पसरलेलें असतें;
" त्यांतून जिकडे तिकडे शीतल सुगंधाचा घमघमाट सुटून **आशावल्ली** कोमल

वीरश्री लहानपणींच अनेक प्रसंगीं व्यक्त झाली होती. आलिंपसच्या चातुर्वार्षिक जत्रेच्या खेळांत अनेकप्रकारच्या शर्यतींत सामील होण्यांत मोठमोठ्या राजांसही भूषण वाटे. एकदा शिकंदर याचे बापानें त्यास विचारलें कीं मुला, तूं आलिंपसच्या मर्दुमकीच्या खेळांत कां जात नाहींस ? तो म्हणाला माझी परीक्षा या खेळांत काय होणार आहे ? मी राजे लोकांबरोबर समरंगणावरच खरे डाव करीन. एकदा त्याच्या बापानें एक संस्थान काबीज केल्याचें ऐकून तो म्हणाला " आमच्या बाबांच्या पुढें एखादा तरी मुलूख मला काबीज करण्यास उरतो कीं नाहीं न कळे " ! तो आपल्या तेहतिसावे वर्षीं मरण पावला पण तेवढ्या अवधींत त्यानें सर्व ग्रीस, इराण पंजाब व दर्म्यानचे सर्व मुलूख पादाक्रांत केले. हा राजा मोठा गुणज्ञ व उदार अंतःकरणाचा होता. हिंदुस्थानांत पोरस यानें त्यास लढाई दिली तींत जरी पोरसचा पाडाव झाला तरी त्याचे उदात्त आचरण पाहून शिकंदरानें पुन्हां त्याचा मुलूख त्यास परत देऊन शिवाय गऱ्हानदीच्या उत्तरेकडील सर्व मुलूख त्यानें काबीज केला होता तोही त्यास दिला. हिंदुस्थानांतून परत जात असतां वाटेंत तो बॅबिलोन येथें तापानें मरण पावला. इराणचे स्वारींत इराणचा बादशाह डेरिअस पराभव पावून पळून जात असतां त्याच्याच एका कृतघ्न सरदारानें त्यास ठार मारिलें. त्या सरदारास शिकंदरानें पकडून त्यास त्याच्या कृतघ्नपणाबद्दल देहान्त शासन दिलें. व स्वतः डेरिअसचें प्रेत शोधून त्यावर त्यानें आपल्या अंगावरील झगा घालून तें प्रेत पार्सिपोलिस येथील इराणाच्या बादशहांच्या कबरस्थानांत पुरण्यास पाठविलें. याच स्वारींत कांहीं गुप्त बातमीवरून त्याचा प्रधान पारमिनिओ यानें त्यास लिहून पाठविलें कीं आपले वैद्यास शत्रूनें आपणांस विषप्रयोग करण्याकरितां लांच दिला आहे. हें पत्र पोहोंचलें तेव्हां तो फारच आजारी होता. मग त्याचे वैद्यानें कांहीं जलाल औषध तयार करून आणिल्यावर त्यानें तें पत्र वैद्यास वाचावयास दिलें व आपण निःशंकपणें तें औषध घेतलें, व त्या निष्कपट वैद्याच्या औषधानें तो लागलाच बरा झाला. इराणच्या बादशहाची आई बायको व मुलें हीं लढाईत त्याचे हातीं पडलीं तरी त्यांचा त्यानें उत्तम पाहुणचारकरून त्यांस सोडून दिलें. त्यानें ग्रीस देश जिंकल्यावर थीब्स संस्थानानें बंड केलें, तेव्हां त्यानें सर्व थीब्स शहर जमीनदोस्त केलें व बहुतेक सर्व लोक जिवें मारिले. फक्त पिंडार कवीचें घर मात्र शाबूद व नांदतें ठेविलें. यामुळें त्याचा इतका वचक बसला कीं मग एकंदर संस्थानें त्याच्या अर्ध्या वचनांत असत. जन्म ख्रि० पू० ३५६ मृत्यू ३२३ )

" कळ्यांनीं मुसमुसूं लागते. मग ह्या कळ्या तारुण्यांत जरी उमलल्या तरी
" पुढें त्यांस कांट्यांनीं भरलेलीं, कडू सालाचीं, व दगडासारखीं कठिण
" फळें मात्र आलीं तर येतात; आणि त्यांतला रस तर फारच थोड्या लोकांस
" चाखण्यास सांपडतो !

कवींच्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें आमचे प्रोफेसर साहेब आपल्या बाल्यावस्थेचें सिंहावलोकन असले गुलाबी रंगाचे चष्मे घालून करितात. त्यांतील वाक्पांडित्याच्या मोहगम गोष्टी जरी एकीकडे ठेविल्या तरी त्यांतील ऐतिहासिक गोष्टींचेंही वर्णन प्रोफेसर साहेबांनीं इतकें बारकाइनें केलें आहे कीं तें कंटाळवाणें होईल कीं काय अशी भीति वाटते :—जसें एखादें लष्कर शत्रूचा वचक नसला ह्मणजे अव्यवस्थितपणें छावणी देऊन उतरलेलें असतें, तशीच एंटेपफुलची वस्ती असून ती एका उतरणीवर दाट झाडींत असे. अंड्रीसचा मळा या झाडीच्या अगदीं खालच्या बाजूस होता. जवळच कुबाक नांवाचा ओढा झुळझुळ वाहत बीच झाडांच्या दोन दाट रांगांमधून जात जात एका नदींतून दुसरींत, दुसरींतून तिसरींत याप्रमाणें ओघा ओघानें दोणा नदींत जातो, तेथून काळ्या समुद्रांत, तेथून वातावरणांत, व तेथून सर्व जगभर पसरतो. गांवांतील मुख्य चौकांत सुमारें पाऊणशें हात विस्ताराचें एक लिंडेनचें झाड असून तें या सृष्टियुवतीच्या नाजुक छत्रीप्रमाणें सरळ व सर्व झाडांपेक्षां उंच वाढलें होतें. तेथें शिळोप्याचे वेळीं गावांतील ह्मातारे कोतारे गप्पा मारीत बसत, त्या निशेल हा नेहमीं आतुरतेनें ऐकत बसे. श्रमलेले बिगारी लोक तेथें विश्रांतीस बसत; व ज्यांना श्रम कधीं माहीत नाहींत अशीं पोरेंही तेथेंच खेळत; आणि तरुण कुमार व कुमारिका पांव्याच्या नादावर तेथें नृत्य करीत असत. तात्पर्य " मनुष्यरूपी दासजनापासून सक्तीनें काम घेणारा मालक भगवान सूर्य-

---

४ आशावल्लीच्या हेतुरूप कळ्या कृत्यरूपानें विकास पावतात. यांपैकीं कांहीं कृत्यें निष्फळ होतात. कांहींचीं फळें मिळतात परंतु त्यांचा उपभोग मिळेपर्यंत अति यातायात त्रास व दुःख होऊन त्यांचा उपभोग घेण्याच्या संधीसच मृत्यु येतो. उपभोग मिळण्याचें भाग्य फारच थोड्यांचें आहे.

५ अमेरिकेंत व यूरोपांतही गुलामांकडून चाबकानें मारून बैलासारखें काम घेत असत. इंग्लंडनें या गुलामांची कींव करून जेवढे गुलाम इंग्रज सरकारच्या प्रजेजवळ होते त्यांस बंधमुक्त केलें. याकामीं गुलामांचे मालकांना मोबदला देण्याकरितां १८३२ त इंग्लंडनें दोन कोट पौंडांची रकम आपल्या तिजोरींतून खर्च केली ! या औदार्याबद्दल इंग्लिश

" नारायण उन्हाळ्याच्या रमणीय संधिप्रकाशांत सप्तरंगरूपी आपल्या
' लवाजम्यासुद्धां पाठमोहरा झाल्याबरोबर बिचारे भागलेले दास त्याची
" नजर चुकवून तेथें खेळत. त्यावेळेस पहाऱ्यावर थोडेसे नक्षत्ररूप शिपाई
" असत, पण तेही बिचारे त्याकडे कानाडोळा करीत!"

याप्रमाणें एंटेपफुलचें वर्णन देऊन पुढें बागांतील फळफळावळ शेतांतील कोपी, नाताळचा सण, वगैरेचें लांब लचक वर्णन झाल्यावर एंटेपफुल येथील पोरांच्या खेळांचें वर्णन दिलें आहे. हे सर्व प्रकार प्रत्यक्ष आज पाहण्यांत येत असल्यामुळें या वर्णनांत वाचकांस कांहीं विशेष वाटणार नाहीं. अजून आमचा तत्ववेत्ता मुग्धस्थितींतच असून त्या वयांत त्यानें त्या लिंडनच्या झाडांखालीं जरी कांहीं डाव जिंकिले असले, तरी आजमित्तीस जगाला त्याची काय किंमत आहे? त्याचप्रमाणें पुढें दिलेल्या अनुभविक विचारांसारख्या विचारांचाही काय उपयोग आहे तें आह्मांस कळत नाहीं. ट्यूफेल्सड्राक साहेब ह्मणतात " पोरांच्या प्रत्येक खेळांत—मग ते खेळ एककल्लीपणानें
" मोडतोड व नासधूस करण्याचे कां असत ना, त्यांतही मनुष्यांतील स्वाभा-
" विक कर्तृत्वशक्तीचें बीज दिसून येतें. त्यास लहानपणींही वाटत असतें
" कीं आपण झालों तेव्हांच बाप्ये झालों असून आपण काम केलें पाहिजे.
" त्याला पाहिजे ती वस्तु द्या, तिचा तो साधन या दृष्टीनें कांहीं तरी उप-
" योग करील. मग तो चाकू असो, भेंडाची बंदुक असो. तिचा उपयोग
" कांहीं नवीन करण्याकडे होवो अगर जुनें नष्ट करण्याकडे

लोकांची स्तुति करावी तितकी शोभणार आहे. हल्लींच्या आपल्या हीन स्थितीबद्दलचा दोषही आपल्या राज्यकर्त्यांकडे नसून सर्वथैव लोकांकडेच आहे; आणि अयोग्य वर्तन व आळस टाकल्यानें तीही दूर होईल.

६ प्रत्येक खेळाची मीमांसा करून पाहिल्यास त्यांतील चोर, राज्य, भोग्या वगैरे शब्द केवळ निरर्थक किंवा कांहीं तरी भलत्याच कल्पित अर्थाचे नसून या खेळांत मोठेपणांतील संसाराच्या दंग्याचाच आव आणिला असतो असें दिसून येईल. उदाहरणार्थ, आटयापाटयांचा खेळ घ्या. राज्याचा बंदोबस्त हवा तसा नसून जेव्हां पुंडावा असे तेव्हां देशावरील लोकांस समुद्र कांठचें मीठ (लवण-लोण) आणितांना तेथील पुंड लोकांशीं किती हमरीतुमरी करावी लागत असे, व मीठ आणणाऱ्या लोकांपैकीं एकाचें तरी मीठ पदरांत पडतां पडतां कोण मारामार होत असे तिचें या खेळांत हुबेहुब चित्र आहे. तेव्हांचा इतिहास असता तर किती मौज झाली असती! पण तो आमच्या इतिहासपराङ्मुखतेमुळें व कवींच्या लाघवामुळें नष्ट झाला आहे. ( भाग १ टीप १० पहा )

" होवो. कसेंही असलें तरी तिच्या योगानें तो कांहीं तरी **काम**
" करणार; असलेल्या स्थितींत कांहीं तरी बदल करणार. पुष्कळ
" मुलें जमून कुशलतेचे व आंगबळाचे जे खेळ खेळतात त्यांतही तीं
" आपणांस लढाईंत अगर शांततेंत, राजा अगर प्रजा या नात्यानें उपयोगीं
" पडणारें शिक्षणच घेत असतात. इकडे मुलींची स्थिति पाहिली तरी त्याही
" आपणांस संसारांतील गृहकृत्यांचा गाडा ओढावयाचा आहे, असें समजूनच
" कीं काय, त्याही लहानपणांत बाहुल्यांच्याच नादीं लागतात."

असल्या उद्गारांचा आह्मांस तर कांहीं उपयोग दिसत नाहीं. तशांतलाच हा पुढील मजकुर आहे. पण तो कोणीं[७] लिहिला आहे त्याकडे लक्ष्य गेलें ह्मणजे तो उतरून घ्यावाच असें वाटतें. आमचे प्रोफेसर साहेब ह्मणतात,
" माझे पहिले कपडे पिंवळ्या फलाणीचे होते. पण त्यांना कपडे ह्मणण्या-
" पेक्षां कपडा असें एकवचनी नांवच दिलें पाहिजे. कारण तो येथून
" तेथून—गळ्यापासून पायांच्या घोटच्यांपर्यंत एकच असून त्यास चार अव-
" यव मात्र असत. या कपड्याची विशेष प्रकारची बेतणीही मला त्या-
" वेळेस ठाऊक नव्हती. मग त्याच्या कार्यकारण संबंधाची कल्पनाही नव्हती
" हें सांगावयास नको.

ही पुढील गोष्ट जास्त मोहक आहे. " संध्याकाळीं हवा चांगली असली
" ह्मणजे मी आपली शिदोरी घेऊन जाऊन बागेंत खात असें. ही शिदोरी
" ह्मणजे दुधांत शिजविलेली भाकरी. आमच्या बागेच्या भिंतीवर चढून तेथें
" मी आपली ताटली ठेवीं. या भिंतीवर चढण्यास मला कांहींसे प्रयास पडत
" पण अंड्रीस बाबांनीं आपली बागकामाची शिडी भिंतीस लाविली तर जास्त
" सोईनें मला वर जातां येई. या भिंतीवर बसून पश्चिमेकडील डोंगरावरून
" सूर्यास्ताची मौज पहात पहात किती तरी वेळां मीं मोठ्या आनंदानें

---

७ कोणीं?—वस्त्ररहस्यकार व वस्त्रद्वेष्टया ट्यूफेल्सड्राक साहेबांनीं!

८ यूरोपियन लोकांत अनेक **कोरडीं** अन्नें तयार करून मग आयतेवेळेस थोडक्यांत त्यास मऊपणाचे वगैरे अवश्य गुण देण्याची फार चाल आहे; व ती फार सोयस्करही आहे. कारण या योगानें अन्नास शिळेपणा न येतां तें तयार करण्यास जी विशेष मेहनत व साहित्य लागते त्यांची जरूर आयते वेळीं न पडतां प्रवासांत वगैरे फार सोय होते. आह्मांत पोहे, लाह्या चुरमुरे, डाळें व पापड, पापड्या, सांडगे वगैरे किरकोळ पदार्थ मात्र आहेत. प्रसंग पडल्यास दहापांच दिवस सारखे खाऊन निभण्या सारखा एकही पदार्थ नाहीं.

" भाकरी खाली असेल ! सूर्यास्ताचे ते सोनेरी व निळे रंग, व दिवस
" गेल्यामुळें सर्व जगांतील कामाची आवराआवर होऊन सध्यास-
" मयास आवळीच्या पानांच्या टवटवी बरोबरच जगांतील हुरूपही नाहींशी
" होते ती कां व्हावी याचें इंगित समजण्याइतकें माझें तेव्हां वय नव्हतें.
" पण या नुसत्या वरील देखाव्यानेंच माझें चित्त दंग होऊन जाई ! "

**जनावरें** व **पांखरें** यांची या मुलास जी आवड असे तिची आपणास जरूर नाहीं. कदाचित् या गोष्टीमुळेंच **प्रोफेसर** साहेबांचे ठायीं जीवमात्रा-विषयीं जी अत्यंत सहानुभूति दृष्टीस पडते, ती उत्पन्न झाली असावी असें वाटतें. परंतु चरित्रात्मक लेखांत या खालच्या उताऱ्यासारखा मजकूर कोणाच्या तरी पाहण्यांत आला असेल काय ? " प्रातःकाळीं डुकरेंराख्याचें
" शिंग ऐकून हीं इतकीं सुखी जनावरें कुरणांत न्याहरी करण्याकरितां
" घाई घाईनें त्या ( डुकरेंराख्या ) कडे धांवत जात; हें पाहून माझे चित्तास
" फारच समाधान होत असे. त्याचप्रमाणें संध्याकाळीं तीं हळू हळू,
" डुरक्या देत देत अगदीं कवाइतीच्या थाटानें, गांवापर्यंत येऊन मग
" तेथून वाट फुटेल त्याप्रमाणें डावी उजवीकडे आपआपल्या घराच्या गल्यांत
" तीं गेल्यावर, तो म्हातारा डुकरेंराख्या चावडीजवळ एकटाच राहून आपलें
" शेवटचें शिंग वाजवी, व रात्रीच्या विश्रांतीकरितां आपल्या झोंपड्यांत
" शिरे. आह्मां लोकांत डुकराचें प्रेम त्याच्या फऱ्यांतील मांसापुरतें असतें.
" तथापि या राठ केसांच्या व जाड कातड्याच्या प्राण्यांनाही **बुद्धि** व
" **स्वभावविशेष** आहेत; किंवा निदान तीं **प्रेमपूर्वक विश्वासानें** मनु-
" ष्यास नमून असतात, एवढें तरी स्पष्ट होत नाहीं काय ? मग तो मनुष्य
" लोखंडासारख्या किंवा दगडासारख्या कठीण काळ्याढुस्स कातड्याच्या
" विजारी, व ठिगळें लावलेले राठ अंगरखे घालणारा डुकरेंराख्या कां
" असेना ? "

---

९ यूरोपांत डुकरें व बदकें पाळण्याचा फार प्रचार आहे; आणि आपलेकडे गाई, म्हशी बकरीं वगैरे जशीं रानांत चरावयास जातात तशींच तिकडे डुकरें रानांत व बदकें पाण्यावर चरावयास जातात, व त्यास नित्य चारून आणून पोहोंचविण्याचा धंदा करणारे गुराख्यासारखे लोकही आहेत. या जनावरांचा उपयोग कोंबड्यांप्रमाणें फक्त खाण्याकडे मात्र होतो.

हेलवेटिअस व त्याचे अनुयायी यांचें असें ह्मणणें असे कीं बुद्धिमान पुरुष इतर पुरुषांसारखाच असून त्याच्या आयुःक्रमांत, विशेषतः त्याच्या बाल्यावस्थेंत, त्याच्या मनावर कांहीं विशेष प्रकारचे संस्कार झाल्यानें त्याच्या बुद्धींत तीव्रता येते; व बाकीच्या लोकांस तसे अनुकूल संस्कार न झाल्यामुळें ते तसेच ठोंबे राहतात. ज्यांचीं फुप्पुसें बंदुकीच्या नळी-पेक्षां जास्त योग्यतेचीं नसून जो केवळ शिकार राखण्याच्या मात्र उपयोगाचा, त्यांत, आणि मोठ्या बुद्धिमान कवींत, किंवा ईश्वरीस्फूर्तीनें बोलणाऱ्या ऋषींत जो एवढा फरक दिसतो तो याच कारणामुळें; एकाचे आत्म्यास संस्कार होऊन त्याचा विकास होतो, व दुसऱ्याचा आत्मा पचनादि शारिरीक क्रिया उत्तम रीतीनें व जोरानें चालल्यामुळें ह्मणा, किंवा अशाच दुसऱ्या कांहीं कारणांनीं संकोचित होऊन नाहींसा होतो; किंवा फार झालें तर त्याच्या कोठ्याखाली निर्बळ व निश्चेष्ठ होऊन दबून राहतो. ट्यूफेलसड्राक साहेब ह्मणतात कीं "हें मत कबूल करावयाचें ह्मणजे एखाद्या सागवानाचे बीस "बरी वाईट जमीन अगर हवा मिळाल्यानें कोबीचें रूप येईल व कोबीच्या "बीस सागवानाचें रूप येईल हेंही कबूल करावें लागेल.

"तथापि पूर्ववयांतील शिक्षणाचा व संगोपनाचा फारच मोठा परिणाम "होतो ही गोष्ट मलाही कबूल आहे. शिक्षणाचा व संगोपनाचा परिणाम "जातींत भेद करण्याइतका जरी नसला, तरी त्याच्या योगानें जें सागवा-"नाचें झाड उंच वाढून विशाळ वृक्षाचे स्थितीस यावयाचें, तेंच संगो-"पनादिकांचे अभावानें खुरटून गुडघ्याइतकें वाढून मरेल. त्याचप्रमाणें "जें कोबीचें रोप फोंफावून हिरवें चार रहावयाचें तेंच खुरटून पिंवळें "पडेल. ह्मणून वास्तविक पाहतां सर्व लोकांचें, आणि त्यांतही सर्व तत्वज्ञ "लोकांचें कर्तव्य हें आहे, कीं त्यांनीं आपल्या शिक्षणासंबंधीं सर्व गोष्टी "काळजीनें इत्थंभूत लिहून ठेवाव्या. कोणच्या गोष्टीनें शिक्षणास साह्य "झालें, कोणचीनें अपाय झाला, कोणचीमुळें शिक्षणाची दिशा बदलली,

---

१० हेलव्हेटिअस—( १७१५-१७७१ ) एक फ्रेंचतत्ववेत्ता यानें १७५८ त आपला डेस्प्रिट नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध केला तो आंतील नास्तिक मताबद्दल फ्रान्सच्या पार्लमेंटानें त्याज्य ठरविला. मग हेलव्हेटिअस इंग्लंडांत व तेथून प्रशियांत गेला. तेथें फ्रेडरिक दि ग्रेट यानें त्याचा चांगला आदर केला. पुढें फ्रान्सांत परत आल्यावर तो एकांतांत राही. तेथें त्यानें एक काव्य व "मनुष्य" या विषयावर एक तात्विक ग्रंथ लिहिला आहे.

" वगैरे सर्व गोष्टी टिपून ठेविल्या पाहिजेत. आह्मां जर्मन आत्मचरित्र-
" लेखकांस तर ही गोष्ट सांप्रत फार अगत्याची आहे. ह्मणून मीही आतां
" त्याच कामास लागतो. " काय लबाड मनुष्य! लहानपणची तांबड्या
फलाणीचीं अंगडींटोपडीं, किंवा डुकरेंराखणाऱ्याच्या शिंगाचा आवाज, यांनीं
बुद्धिमान पोराचे बुद्धीचा विकास होतो काय? कदाचित् हें इतकें भारूड
लिहून त्याच्या घोंटाळ्यांत आह्मी पडलेले पाहून मनांतल्या मनांत आमची
गंमत करण्याचा तर त्यांचा विचार नसेल ना? कां खरोखरच बाष्कळ-
पणाच्या भरांत त्यांनीं हें लिहिलें असावें? कारण ते पुढें ह्मणतात. " या
" जादूनें भारलेल्या सृष्टिफलकावर लहानग्या निशेनच्या पाहण्यांत, ऐकण्यांत
" व सुखदुःखाच्या अनुभवांत, ज्या अनंत गोष्टी आल्या त्यांतल्या कांहीं
" वेंचक गोष्टी पाहिजे असतील तर त्या खालीं दिल्या आहेत.

" ज्याप्रमाणें पोरपणच्या खेळांनीं बुद्धि व तरतरी ह्या अंगीं येतात,
" त्याचप्रमाणें अंड्रीस बाबांच्या गोष्टी सांगण्याच्या संवयीमुळें या मुलाची
" कल्पनाशक्ति जागृत होऊन त्याचे आंगीं इतिहासज्ञानाविषयीं लालसाही
" उत्पन्न झाली. अंड्रीसबाबा आपल्या लढाईच्या गोष्टी सांगू लागले ह्मणजे
" त्यांच्या गंभीरपणामुळें ते मोठ्या प्रतापी दैदीप्यमान पुरुषासारखे दिसत
" आणि आगटीभोंवतीं त्यांच्या गोष्टी ऐकत आमचे शेजारी मजा करूं
" लागले, ह्मणजे मीही मोठ्या आतुरतेनें त्या ऐकत बसें. या संकटाच्या
" व प्रवासाच्या गोष्टी ऐकून माझ्या मनांत साहसाचे अनेक कल्पनातरंग
" उचंबळूं[११] लागले. त्या लिंडेनच्या झाडासाठीं जमणाऱ्या वृद्ध लोकांच्या
" गोष्टी ऐकूनही मला बरेंच ज्ञान झालें. कारण जरी हें अफाट जग मला
" अजून नवेंच होतें; तथापि या बोलक्या वयोवृद्ध आजोबांनीं सुमारें पाऊ-
" णशें वर्षें त्याचें निरीक्षण करण्यांत घालविलीं असून त्यांच्या अनुभवांचा
" सहज मला फायदा होत होता. त्यांच्या गोष्टी ऐकून आमचें एंटेपफुल
" एका मोठ्या देशाच्या मध्यभागीं आहे, त्याच्या भोंवतीं अफाट पृथ्वी
" पसरली आहे, इतिहास, चरित्रें वगैरे कांहीं पदार्थ असून पुढें मागें आपणासही
" हातानें अगर जिव्हेनें इतिहास व चरित्रप्रथनाचा आपला वांटा उच-

११ लहानपणीं मुलांच्या कानावर स्वदेशवीरांच्या साहसाच्या व पराक्रमाच्या गोष्टी पडत राहिल्यानें मुलांमध्यें साहसंप्रियता व पराक्रम हीं उत्पन्न होतात याच तत्वावर पुराणादिकांचा उपक्रम आमचे देशांत केला होता.

" लावा लागेल या गोष्टी जसजशा माझ्या मनांत येऊं लागल्या तसतसें
" मला जास्तच कौतुक वाटूं लागलें.

" अशीच गोष्ट टपालाच्या गाडीची. पर्वतप्राय ओझीं व माणसें घेऊन
" टपालगाडी रोज आमच्याकडे हळूहळू येत असे. उत्तरेकडील टपाल
" अगदीं मध्यरात्रीं जाई. पण दक्षिणेकडे जाणारी टपालगाडी रोज संध्या-
" काळीं नेमानें दिसे. आठव्या वर्षापर्यंत मला असें वाटे कीं जसा आका-
" शांत एक **चांदोबा** आहे तसाच हाही पृथ्वीवर हिंडणारा नैसर्गिक
" स्वशक्तीनें चालणारा **चांदोबाच** असावा! फरक इतकाच कीं हा **माण-**
" **सांनीं** केलेल्या सडकेवरून लांब लांबच्या शहरांतून येऊन पुढेंही तसाच
" लांब लांबच्या शहरांस जातो. आणि मागावर फिरणारें धोटें ज्याप्रमाणें
" कापडांतील सर्व तंतूंचा संबंध जुळवून आणितें त्याचप्रमाणें सर्व शह-
" रांचा संबंध वाढविणारें हें एक धोटेंच आहे असें मला आठव्या वर्षीं वाटूं
" लागलें. त्यावेळेस **शिलरच्या**[१२] 'विलहेलमटेल' या ग्रंथाशीं माझा परिचय
" नव्हता तरी **कोणचाही रस्ता, मग तो या एटेपफुलवरून जाणारा**
" **साधा रस्ता कां असेना तोही आपल्याला या जगाचे अखेर टोंकास**
" **नेईल,** हा विचार त्याचवेळेस माझे मनांत जागृत झाला.

" आमच्या चिमण्यांची गोष्ट सांगितली पाहिजे असें नाहीं. मी मोठा
" झाल्यावर मला कळलें कीं त्या **आफ्रिकेतून समुद्र** व **पर्वत** ओलांडून
" मोठमोठीं **शहरें,** व एकमेकांशीं लढाई करणारीं अनेक **राष्ट्रें** ओलांडून दरवर्षी
" मे महिन्या बरोबर येऊन आमच्या माळ्यावर घरटीं करून चैनींत रहात
" असत[१३]. अंड्रीसबाबा जात्या फार दयाळू असून घरांतील जागा स्वच्छ
" राखण्याकरितां त्यांच्या घरट्यांखालीं ते एक शिपतरासारखें ओळिंबें
" बांधीत. त्या ओळिंब्यावर घरटीं करून तीं पाखरें अंडीं घालीत व माशा
" धरून एकसारखी चिवचिव करीत. त्याजवर सर्वांचें, विशेषतः माझें, मना-

१२ शिलर—जर्मन कवी व नाटयाचार्य (१७५९-१८०५) याचीं काव्यें जर्मन लोकांत फार नामांकित आहेत.

१३ हीं पाखरें अतिथंड प्रदेशांत नेहमीं रहात नाहींत. परंतु इतर ठिकाणीं हवा अति उष्ण झाली व अन्नपाण्याची ददात पडूं लागली ह्मणजे त्यांचें कळपचेकळप परदेशीं जाऊन तेथें कडक थंडी पडेपर्यंत गुजारा करितात. आपल्या देशांत जोंधळ्यावर धाड टाकणारीं भोरडी वगैरे पांखरें सर्वांस ठाऊक असतीलच. तींही अशाच प्रकारें वर्षास देशांतर करणारीं आहेत.

" पासून प्रेम असे. सुरेख चपळ पांखरांनो! तुह्मांस हीं घरें बांधण्याची
" कला कोणीं शिकविली? पण यांत कांहीं विशेष नाहीं; तुह्मांस समाज-
" व्यवस्थेनें राहण्यास कोणीं शिकविलें? कारण दैवयोगानें एखादे वेळीं
" तुमचें घरटें पडलें, आणि प्रसंग बेतला तर दुसऱ्या दिवशीं तुमचे चार
" पांच शेजारी तुमचे बरोबर कामास येऊन मोठ्यानें लांबलांब स्वर
" काढून चिंवचिंव करीत, पांखरांनाही अवघड, इतक्या विलक्षण लगबगीनें
" व चपळाईनें रात्रीच्या आगोदर पुन्हां तें घरटें तयार करितांना मीं
" पाहिलें नाहीं काय?

" एंटेपफुलच्या बालशिक्षणाचें सर्वस्व गुरांच्या वार्षिक जत्रेंत जणूं
" काय एकवटलें होतें. ती जत्रा अनेक ठिकाणचें व अनेक प्रकारचें ज्ञाना-
" मृत एकवट करून आमचे आंगावर पाडणाऱ्या नरसाळ्यासारखेंच
" मला वाटे. तेथें अनेक जातीचे विलक्षण चमत्कार चोहोंकडून येऊन
" एकत्र झालेले दिसत. या जत्रेंत उन्हानें काळसर झालेले पण सर्वांग
" स्वच्छ असलेले, मोठ्यानें खिदळणारे, उत्तम उत्तम पोषाख घातलेले,
" तरुण बांड पुरुष व युवती नाच रंग वगैरे करून बनेल तितकें सुख
" घेण्याकरितां फार लांबलांबच्या देशांतून येत. उत्तरेकडले लांबलांब बूट
" घातलेले खिलारी लोक, स्वित्झर्लंडचे दलाल, इतलींतील गुरांचा
" व्यापार करणारे गुढग्यापर्यंत उंच बुट घातलेले हेडकरी वगैरे लांबलांबचे
" लोक येत. त्यांचे बरोबर त्यांचे नोकर अंगांत कातड्याचे कोट, कात-
" ड्याच्या टोप्या व विजारी घालून हातात लांबलांब पिराण्या[१४] घेऊन येत.
" ते तोंडानें आह्मांस समजण्यासारखे कांहीं शब्द बोलत. परंतु त्यांचें
" बहुतेक बोलणें कुत्र्यांच्या भोंकण्यासारखें व बैलांच्या डुरकण्यासारखेंच
" आह्मांस वाटे. इकडे सॅक्सनीतून आलेले कुंभार लोक आपआपलें
" कुंभारकाम हारीनें मांडून बसत. इकडे नरेनबर्गचे फेरीवाले ओळीनें
" आपलीं दुकानें मांडून बसत. तीं दुकानें मला त्या वेळेस उरमुझच्या
" दुकानांहूनही अधिक सुंदर दिसत. लागोमॅग्युओर येथून नाटकवाले
" व तमासगीर मंडळी येत. व्हिएन्ना येथून पैलवान व कोलाटी येत. त्या
" वेळेस गाणीं व पोंवाडे ह्मणणारांचे घसे फुटत; लिलांव बोलणाऱ्याचा
" आवाज ओरडून ओरडून इतका घोगरा होई कीं पुसूं नये. ताजी सस्ती

१४ पिराण्या—पु० १ भाग १० टीप ५.

" दारू पाण्यासारखी खपून जिकडे तिकडे आधींच उल्हास त्यांत फाल्गु-
" नमास असें होई. व त्यांतच अंगास चित्रविचित्र रंग लावून त्या जत्रेचें
" जीवनसर्वस्व होऊन बसलेला, व बरोबर पोरांचाघोळका घेऊन गर्दी
" तून नाचत बागडत हिंडणारा बहुरूपी तर जिकडे तिकडे मजाच मजा
" करून सोडी.

" या प्रमाणें हें मूल दिवसानुदिवस वाढत असून **चैतन्याचें गूढतत्व**
" त्याच्या सभोंवार चोहोंकडून त्याचें प्रोत्साहन करीत होतें; आणि त्याच्या
" डोक्यावर हें अपार आकाशकटाह असून त्याच्या सेवेंत सहाही उदार ऋतु
" तत्पर होते. ते कालमानाप्रमाणें आपआपल्या देणग्या त्यास देत. भयंकर
" हिंवाळाही दुसरें कांहीं नाहीं तर स्केटीवर धावण्याच्या शर्यती[15], निशाण
" मारण्याच्या शर्यती, बर्फांचीं तुफानें[16], व नाताळचीं गाणीं, यांचा तरी
" करभार त्यास देई. यांच्याही निरीक्षणाचे योगानें त्यानें ज्ञानसंचय-
" केला. हे **सृष्टिचमत्कार** केवळ **मूळाक्षरां**प्रमाणें असून त्यांचे ज्ञानानें
" पुढें या मुलास या विशाळ **जगद्रूप** अतर्क्य ईश्वरी **ग्रंथाचें**[17] परिशीलन
" करावयाचें होतें! आपलीं मूळाक्षरें सुंदर वर्खी शाईनें मोठमोठीं लिहिलीं
" असोत, किंवा बिनवर्खी शाईनें अति सूक्ष्म प्रमाणावर काढिलीं असोत,
" तीं आपणास वाचतां येत असलीं ह्मणजे झालें. आणि **निशेनची** स्थिति
" पाहतां त्याला ज्ञानाची इतकी आतुरता असे कीं या **सृष्टचमत्कार**रूपी
" मुळाक्षरांकडे त्यास पहावयास सांपडलें कीं तेवढ्यानेंच आनंदाचा वर्ख
" आपोआप उत्पन्न होऊन त्या अक्षरांवर चढून तीं अक्षरें त्यास अत्यंत
" सुंदर दिसूं लागत. **शेक्सपिअरचे** एका नाटकांत जादूनें भारलेल्या
" बेटावर जसे अनेक चमत्कार एकामागून एक आपोआप दिसत असत,
" तसेच अनेक चमत्कार या मुलाच्या उज्वल व सुखावह **आनंदतत्वा-**
" **त्मक** जीवितांतूनही उत्पन्न होऊन त्याच्या मनास वेधून अनायासेंच
" त्यास **ज्ञानामृताची** जोड करून देत.

---

१५ स्केटीवर धांवण्याच्या शर्यती—उत्तर यूरोपांत हिवाळ्यांत जमिनीवरील सर्व पाणी घट्ट होतें व त्याचा पृष्ठभाग अगदीं सपाट व गुळगुळीत होतो. त्यावरून स्केटी नांवाचे लोखंडी जोडे घालून काठीच्या साह्यानें इतकें लवकर व स्वल्पप्रीतीनें घसरतां येतें कीं अति चपळ घोड्यासही तितकें धांवतां येत नाहीं.

१६ वर्फांचीं तुफानें—त्या प्रदेशांत तुफान होऊन हिवाळ्यांत आकाशांतूनही बर्फ पडतें.

१७ जगद्रुप ईश्वरी ग्रंथ—पु० १ भाग ८ टीप ९ पहा.

" परंतु त्याही वेळेस मला नेहमीं निवळ सुखच असे, असें ह्मणणें
" वस्तुस्थितीस अनुरूप होणार नाहीं. मी स्वर्गलोकांतून पतन पावून भू-
" लोकांत आलों तो आलोंच, व त्यामानानें माझ्या सुखांत त्याही वेळीं
" दुःखाची मिसळ असे. माझ्या मनोविकाररूप क्षितिजाभोंवतीं आनंद-
" रूपी जी सप्तरंगांची बहार दिसे,[१९] तिजवर सुद्धां काळजीरूप काळी
" छटा होतीच. अजून पर्यंत ती अगदीं बारीक होती हें खरें; व कधीं
" कधीं इतर तेजांच्या अतिरेकानें ती दिसेनाशीही होई. परंतु तेवढी वेळ
" गेली कीं पुन्हां ती दिसूं लागे. आणि दिवसेंदिवस मोठी होत जाऊन
" अखेरीस ती इतकी वाढली कीं त्या अगाध तमांत मी गडप होतो कीं
" काय अशी मला भीति पडली. ही काळजी, हा तम कशाचा ह्मणाल
" तर प्रकृतिवशतेचा,-सृष्टिधर्मांच्या अनिवार्य प्रबलतेचा. या प्रकृति-
" वशतेनें येथें आपणांसर्वांस कसें घेरून टाकिलें आहे! ज्या कोणास ही
" प्रकृति कर्तव्यरूपानें भासते ह्मणजे ज्याला आपला हेका कर्तव्य-

---

१८ स्वर्ग लोकाच्या सुखाप्रमाणें मृत्यूलोकीं निवळ सुख अशक्य आहे.

१९ सूर्याच्या उदयास्तांचे वेळीं, विशेषतः अभ्राच्छादित प्रदेशांत क्षितिजाशीं सप्तरंगाचे देखावे दिसतात.

२० प्रकृतिवशता—आपल्या हातून जीं कर्में होतात त्यांस आपली इच्छा हें एक कारण आहे खरें; तरी त्याचा अंमल फारच थोड्या ठिकाणीं होतो व तेथेंही सृष्टिधर्मांच्या अनिवार्य प्रबलतेचा दुजोरा असतोच. परंतु आपण होऊन केल्यावांचून होणार नाहींत अशीं जीं कित्येक कर्में आपल्या मनांत नसतांही आपण करितों त्याचें कारण काय? त्याचें कारण या सृष्टीची प्रकृति. या सृष्टींतील सर्व पदार्थांचे गुणधर्म इतके ठरींव आहेत आणि या सृष्टींतील घडामोडी एकमेकींवर इतक्या कांहीं अवलंबून आहेत कीं या क्षणीं कोणकोणच्या गोष्टी व्हावयाच्या तें आजपर्यंतच्या गोष्टींवरून बहुतेक अगदीं खचित झालेलें असतें. ह्मणून कांहीं गोष्टी जरी आपल्या मनांत नसल्या, व त्या जरी आपण केल्यावांचून होण्यासारख्या नसल्या तरी सृष्टिधर्मांपुढें आपलें कांहीं चालत नाहीं ह्मणून आपणच त्या करितों. याचें कारण प्रकृतिवशता. प्रारब्ध, कर्मधर्मसंयोग, दैव वगैरे शब्दांचा खरा अर्थ हाच आहे. आपली इच्छा व प्रयत्न हेही सृष्टिधर्मच आहेत. व त्यांचा अंमल झाल्यावांचून रहातही नाहीं. परंतु त्यांचा परिणाम अगर अंमल जितका असावा अशी आपली कल्पना असते तितका नसतो. पण तेवढ्याकरितां सत्कर्माविषयीं इच्छा व प्रयत्न सोडणें वाजवी होणार नाहीं. आपली प्रकृतिवशता ओळखून सन्मार्गाची व विवेकाची कास होईल तोंपर्यंत सोडावयाची नाहीं अशा निग्रहानें चालणें हाच आपला सत्व धर्म होय व तो आपण आचरला असतां हळू हळू ही अनिवार्य प्रकृतीच आपणांस साह्य होईल.

" बुद्धीच्या प्रबलतेमुळें सोडून द्यावा लागतो तोच धन्य होय. परंतु **प्रकृ-**
" **तीस** सर्वदा हेंच स्वरूप असणें अशक्य आहे. कारण या ऐहिक **जीवि-**
" **तास आधार व मर्यादा** ह्मणून तरी तिचा जाच नेहमीं होणारच.[21]

" **सायुज्य**पदवी मिळविण्याकरितां हें ऐहिक जीवित **उमेदवारी-**
" दाखल आहे. या उमेदवारीच्या आरंभाच्या कांहीं वर्षेपर्यंत आपणास
" कांहींच करावयाचें नसून फुकट खाऊन ह्या **संसाररूप कारखान्यांत**
" स्वस्थ राहून या कारखान्यांतील हत्यारांचा उपयोग कळेपर्यंत उगीच
" आपल्याभोंवतीं लोक कसें काम करितात हें पाहण्याचेंच त्या वेळेस आपलें
" काम असतें. आणि बुद्धियोगांतील **उद्योगशीलता** व सांख्ययोगांतील
" **उदासीनता** (तटस्थ वृत्तीनें प्रकृतिधर्माप्रमाणें वागणें) हे दोन्ही सद्गुण
" जर अवश्य नसते, जर नुसत्या **उदासीनते**वरच भागण्यासारखें असतें,
" तर माझी लहानपणची स्थिति मला फार हितावह झाली असती. ज्ञानें-
" द्रियांची तीव्रता, प्रेमळ स्वभाव, शोधक बुद्धि, यांचे संबंधानें मला कोण-
" त्याही गोष्टीची उणीव नव्हती. बाकीच्या गोष्टींत मात्र माझें दैव इतकें
" अनुकूळ नव्हतें. माझी **उद्योगशीलता** उपयोगांत येण्यास कांहीं मार्गच
" नव्हता. आणि या दुर्दैवाचीं फळें अजून माझे चारित्रांत दिसत आहेत.
" ज्या नीटनेटक्या घरांत पोराबाळांची धामधूम व वर्दळ खपत नाहीं, त्या
" घरांत आपलें शिक्षण फारच कडक असतें. अशा घरांत आपण होऊन
" कोणतीही गोष्ट करण्याचे ऐवजीं मनोनिग्रह, व सोशीकपणा, हे गुण मात्र
" अंगीं येतात. पुष्कळच गोष्टी न करण्याविषयीं मला ताकीद असे. अर्थां-
" तच एखादी गोष्ट करण्याविषयीं मला कितीही आतुरता असली तरी तिचा
" निमूटपणें मला त्याग करावा लागे; व प्रत्येक गोष्टींत आज्ञाधारकतेचे
" जुंवाखालीं मला मान वांकवावी लागे. याप्रमाणें या कोंवळ्या वयांतही **हेका**
" व **प्रकृतिवशता** यांचा विरोध येऊन माझ्या डोळ्यांतून टिपें पडत; आणि
" **जीवितास** विरजणरूप जें **दुःख** त्याचा मला अनुभव येई.

" या आज्ञाधारकतेच्या शिक्षणांत माझी अशी स्थिति होती कीं चूक
" झालीच तर ती फाजील आज्ञाधारकपणानें झालेली पुरवली परंतु आज्ञा
" मोडून यत्किंचितही होतां कामा नये. हें जगच असें आहे कीं त्यांत

---

२१ निवळ प्राणधारणार्थ, आणि शारीरिक सुखदुःखांचे रूपानें तरी ही प्रकृति सदैव आपल्या अनुभवास येणारच.

“ **आपला हेका सोडून** वागणें हें आपलें नुसतें कर्तव्यच नव्हे, तर येथील
“ जीवितासच अवश्य गोष्ट आहे. या मर्यादेस न जुमानतां अज्ञाधारकपणानें
“ जर आपण लव्हाळ्याप्रमाणें नमून वागलों नाहीं तर ताठर वृक्षाप्रमाणें
“ उन्मुळूनच पडावें लागेल. या जगांत आपला हेका सोडून आपण
“ केल्याच पाहिजेत अशा इतक्या गोष्टी आहेत कीं त्यांच्याशीं ताडून
“ पाहतां आपल्या मर्जीवर राहणाऱ्या गोष्टी अगदींच नाहींत ह्मटलें तरी
“ चालेल. बरें ज्या गोष्टी आपले मर्जीवर असतात त्यांतही आपल्या
“ हेक्यानें करितां येण्यासारख्या फारच थोड्या असतात. बहुतेक दुस-
“ ऱ्याच्या इच्छेमुळें अगर कालमानाच्या धोरणामुळेंच आपणास कराव्या
“ लागतात! हें तत्व जितकें लौकर व जितकें निखालस आपल्या ध्यानांत
“ येईल तितकें बरें. प्रापंचिक गोष्टींतील विवेक व नीतिमार्ग यांचा पाया मीं
“ याच तत्वावर रचिला. ह्मणून माझ्या शिक्षणांत मला उद्योगशीलतेची
“ दिशा मिळाली नाहीं ह्मणून वाईट वाटून घेणें योग्य नाहीं. मला लहान-
“ पणीं असलेली कैद अत्यंत कडक, माझे लाड फारच बेताचे, माझा संचार
“ एकांतांत, वगैरे सर्व गोष्टी शिक्षणक्रमास अनुकूळ नव्हत्या खऱ्या; परंतु
“ या मानवजन्मास येऊन जें उत्कृष्ट फळ प्राप्त करून घ्यावयाचें त्याचें
“ झाड जो मनांतील **खोल विचार** त्याचें जीवनच या कडकपणांत व
“ एकांतवासांतच नसेल असें कशावरून! शिवाय सर्वांत विशेष गोष्ट ही
“ कीं माझें शिक्षण कितीही अविचारीपणाचें असलें, तरी तें माझ्या हिता-
“ करितांच माझ्या वडीलांनीं निष्कपट प्रेमानें दिलें होतें; आणि या गोष्टीनें
“ हवी तसली उणीव क्षम्य होते. **ग्रिचेन** ही जरी माझी जन्ममाता नसली
“ तरी तिजविषयीं माझे मनांत मातृप्रेम सदैव जागृत रहावें अशीच ती
“ होती. त्या माझ्या दयाळू आईनें मजवर एक फारच अपरिमेय उपकार
“ केला आहे. तो हा कीं, तिनें आपल्या शुद्धवर्तनानें व धर्मशीलतेनें मज-
“ मध्यें **धर्मतत्व** जागृत केलें. **अंड्रीस** बाबाही प्रार्थनामंदीरांत जात. परंतु
“ आपण कवाईत केली तरच पगार मिळेल ह्मणून जसा एखादा शिपाई
“ कवाइतीविषयीं तत्पर राहतो तशांतलीच त्यांची धर्मश्रद्धा असे. आपणांस
“ परलोकीं पुण्यफल पाहिजे ह्मणूनच ते धर्मसंबंधी उपद्व्याप करीत. पण
“ आईची स्थिति तशी नव्हती. खरी **धर्मश्रद्धा** जिला ह्मणावयाचें, जिचा
“ उदय मनाचे **कोमलपणांत** व **प्रेमरसांत** होतो, तशी श्रद्धा देवाचे

" ठिकाणीं माझ्या आईची होती. काय चमत्कार आहे! दुष्कृत्यांनीं भर-
" लेल्या या जगांतच सुकृताचे अक्षय्य रोप रुजून त्याचाही फैलाव होतो.
" जिला या जगांत सर्वांत मोठी असें मी समजत होतों, तीच माझी आई
" मोठ्या लीनतेनें व निखालसपणानें स्वर्गांत जो तिच्यापेक्षां व सर्वां-
" पेक्षांही **श्रेष्ठ** आहे, त्यास वंदन करिते, हें पाहून माझे मनांत काय येत
" असेल त्याची वाचकांनींच कल्पना केली पाहिजे. तिनें आपल्या भक्ति-
" रसानेंच शब्दांचे साह्यावांचून मजमध्यें धर्मतत्व रुजविलें. अशा गोष्टी
" पाहिल्या ह्मणजे त्या आपल्या अगदीं अंतरंगांत शिरून त्या **अनिर्वाच्य**
" व **सखोल जागीं** जी **परम पवित्र वस्तु** आहे तिचा उदय होऊन
" मनुष्यांतील **श्रद्धा** किंवा **पूज्यबुद्धि** नांवाचा गुण भीतीच्या भिकार
" आवरणांतून बाहेर फुटून कायम होतो. तशांत असल्या गोष्टी बाल्या-
" वस्थेंत पाहाण्यांत आल्या ह्मणजे तर त्यांचा अंतःकरणावर होणारा परि-
" णाम फारच विलक्षण असतो! तूंच पहा, एखाद्या सरदाराचें पोर होऊन
" प्रपंचांत गिरके मारणें हें बरें, कां एखाद्या गरीब शेतकऱ्याचा मुलगा
" होऊन **स्वर्गांत** व **मनुष्याच्या हृदयांत जो देव** वास करितो **त्यास**
" ओळखणें हें बरें?

**टच्यूफेल्सड्राक** साहेब, आपण धर्मश्रद्धेची इतकी घमेंड मारितां पण सावध असा; इतकीच त्यांस तूर्त इशारत करून आह्मी हा भाग आटोपतों.

---

# भाग तिसरा.

## विद्वत्ता.

आतांपर्यंत **निशेन** हा आपल्या एकलंगी पिंवळ्या गवसणींत असलेलाच आपल्यापुढें असून तो दयाळू **सृष्टिदेवीच्या** कडेवर बसूनच वावरत आहे. अर्थात् तो आपल्या ह्मणण्याप्रमाणें हा कारखाना पहात बसला असून अजून त्याच्या निळ्या डोळ्यांवांचून इतर इंद्रियांची हालचाल करण्याची जबाब-

दारी त्याचेवर आलेली नाहीं. तेव्हांही त्याचे डोळे दिव्य तेजानें प्रकाशत असतील यांत आह्मांस शंका नाहीं. परंतु एखादा तत्ववेत्ता अगर कवी आपल्या अलौकिक गुणांमुळें प्रकट होईपर्यंत जसा नुसता सामान्यत्वें-करून लेखिला जातो, त्याचप्रमाणें आमच्या **प्रोफेसर** साहेबांचें स्वरूप त्या वेळेस असेल; आणि त्यांच्या आजपर्यंतच्या चरित्रांत प्रत्यक्ष **ह्यूसक्रेक** साहेबांना सुद्धां **वस्त्ररहस्याचें** मूळ दिसेल असें आह्मांस वाटत नाहीं. भावी पुरुषाचें रंगरूप बाळपणींच दिसतें. निदान पुढील चरित्राचें साहित्य मुग्ध दशेंत तरी पोरांत असतें; ही गोष्ट इतरांप्रमाणें **निशेन**लाही लागू होती. तथापि, मनुष्याच्या कर्तृत्वाचें अर्धांग मात्र लहानपणीं दिसतें. **प्रकृति-वशतेनें** जेवढें गुण दृष्टीस पडण्यासारखे असतात तेवढे मात्र लहानपणीं दृष्टो-त्पत्तीस येतात. मुद्दाम होऊन एकादी गोष्ट करण्याचा जो गुण तो लहानपणीं दृष्टिगोचर होत नाहीं. या गुणांत **प्रोफेसर** साहेबांची प्रगती कशी झाली, ते ह्मणतात त्याप्रमाणें या विशाळ कारखान्यांतील हत्यारांचा उपयोग कळून ती चालवितां येऊं लागल्यावर या कारखान्यांत त्यांनीं आपलें काम कसें बजाविलें, हेंच पाहण्याची आह्मांस उत्कंठा आहे.

परंतु आमच्या तत्ववेत्त्याच्या चरित्रांत हुबेहूब **हिंदू** मनुष्याच्या चरि-त्रासारखें कांहीं आढळतें, हें बहुधा येथेंच सांगितलें पाहिजे. त्याचे बाळप-णांत **उद्योगशील**तेचें रोप मुळांतच खुरटून **उदासीन**तेचें रोप मात्र चांगलें जोगवलें असें वर लिहिलें आहे. परंतु मोठेपणीं नामांकित होऊन आमच्या **प्रोफेसर** साहेबांनीं ज्या गुणानें आज सर्व जगास थक्क करून टाकिलें आहे, त्याचें बीज या **उदासीन**तेंतच आहे. जे वरवर पाहणारे आहेत त्यांना **ट्यूफे-ल्सड्राक** साहेबांचे चरित्रांत तरतरीचा अगदींच अभाव दिसत असून उद्यो-गशील प्राणी या नात्यानें ते या जगांत आहेत असेंही वाटणार नाहीं. परंतु बारीक रीतीनें खोल पाहणाऱ्यांना याच **ट्यूफेल्सड्राक** साहेबांत विलक्षण उद्यो-गशीलता दिसून येईल. पण ती उद्योगशीलता इतकी अध्यात्मविषयक, गुप्त

१ हिंदु लोकांच्या चरित्राचें विशेषस्वरूप शारीरिक उद्योगहीनता हें आहे. मनाच्या उद्योगानें ही उणीव भरून निघत असेल असें सदरील ग्रंथकारानें सामान्यतः मानिलें आहे परंतु हें ह्मणणें खरें नाहीं. आपल्या प्रकृतींतील उद्योगहीनता मोठमोठ्या तात्विक ग्रंथांत दाखल्याकरितां उपयोगीं पडण्याइतकी जगप्रसिद्ध असावी याचें हिंदूलोकांस केवढें लांछन आहे याचा वाचकांनींच विचार करावा.

व गूढ आहे कीं ती फलद्रूप होईल असें कोणासही वाटलें नसतें; व आज ती फलद्रूप झाली असतांही तिचें खरें मर्म कोणाच्या लक्ष्यांत येत नाहीं. आधुनिक यूरोपियन मनुष्यांत असा स्वभाव असणें कांहींसें विचित्र असून उपयोगीही नाहीं. आणि एखाद्या चरित्राच्या नायकांत तर असला स्वभाव फारच गैरसोईचा असतो. असो. आमचें काम आह्मांस केलें पाहिजे, मग तें साधेल तसें साधो. इतिहासकार या नात्यानें आमचें काम ह्मटलें म्हणजे असलेल्या गोष्टी जशाच्या तशाच लोकांपुढें मांडण्याचें आहे. त्या बदलून सांगितल्यानें जरी आमच्या चरित्रनायकास जास्त शोभा येत असली तरी आह्मांस तसें करितां येत नाहीं.

मनुष्याच्या हातांत, व त्यांतही विशेषेंकरून विद्याव्यासंगी मनुष्याच्या हातांत लहानपणीं ह्मणण्यासारखीं जीं **हत्यारें** पडतात, तीं त्याचीं शिकण्याचीं पुस्तकें होत. आपल्या चरित्राच्या या भागास **प्रोफेसर** साहेब फारसें महत्व देत नाहींत असें दिसतें. आपण वाचावयास शिकलों, हें त्यांना आठवतच नाहीं; जणूं काय वाचनाची कला त्यांस जन्मतःच अवगत असावी. या भागासंबंधानें त्यांनीं एक सरसगट शेरा मारून टाकिला आहे. ते ह्मणतात " शाळेंत जें माझें अल्पशिक्षण झालें, त्या संबंधानें विशेष " लिहिण्याची जरूर नाहीं. दुसरे जें शिकतात तेंच मी शिकलों, व " त्याचा तूर्त कांहीं उपयोग नसल्यामुळें तें मीं आपल्या डोक्याच्या एका " कोपऱ्यांत सांठवून ठेविलें होतें. माझा शिक्षक आपल्या इतर व्यवसाय- " बंधूंप्रमाणें, वांकलेला, निराश झालेला, व लोकांनीं कस्पटप्राय मानलेला " असा होता. त्यानें माझ्या शिक्षणार्थ ह्मणण्यासारखें कांहींच केलें नाहीं. " परंतु या पोराचे शिक्षणासंबंधानें आपणांस विशेष कांहीं करितां यावयाचें " नाहीं. " असें तो वरचेवर ह्मणे. हा मोठा बुद्धिमान् मुलगा असून " कोणच्या तरी सुशिक्षित ( लोकांच्या ) धंद्यांत शिरण्यास योग्य आहे.

२ सुशिक्षित लोकांचे धंदे—ह्मणजे शिक्षण, वकिली, व वैद्यकी. हे तीन पवित्र धंदे होत. शिक्षणानें लोकांस सन्मार्गास लावावयाचें; वकिलीनें अन्यायापासून लोकांचें रक्षण करावयाचें; आणि वैद्यकीनें त्यांच्या शारीरिक व्याधी दूर करावयाच्या. वास्तविक पाहतां या तिन्ही धंद्यांतील लोकांस राजाश्रय असून त्यांनीं आपलीं कामें प्रजेपासून पैसा न घेतां करावीं असा बंदोबस्त असला तरच तीं प्रजेस हितप्रद व या धंदेवाल्यांस भूषणप्रद होतात; आणि असा बंदोबस्त पूर्वीं होताही. हल्लींचे शिक्षणाविषयीं ग्रंथकारानेंच काय तें

" असें त्या बिचाऱ्यास वाटून 'याला प्रथम पाठशाळेंत शिकवून मग
" एखाद्या युनिव्हर्सिटींत अभ्यासास पाठवावें' असें तो ह्मणे. त्याचे हाता-
" खालीं असतांना छापलेलें ह्मणून जेवढें कांहीं माझ्या दृष्टीस पडलें, तेवढं सर्व
" मीं वाचून टाकिलें. शिवाय माझ्या हातखर्चाच्या नेमणुकीचीं जीं थोडींशीं
" तांब्याचीं नाणीं असत तींही मी पुस्तकें विकत घेण्यांत खर्च करीं.
" आणि हीं पुस्तकें जसजशीं जास्त होत तसतशीं तीं मी आपल्या हातानें
" शिवून ठेवीं. यामुळें **खऱ्या व नामधारी** वस्तूचेंही मला बरेंच ज्ञान
" झालें. मी वाचलेल्या पुस्तकांत इकडे कांहीं भाग खऱ्या इतिहासाचे होते,
" तर इकडे कल्पनातरंगांनीं भरलेल्या कांहीं दंतकथा होत्या. एकंदरींत
" पाहतां मी वाचलेलीं पुस्तकें फोलकट व निर्जीव नसून कोंवळ्या मनास
" **अन्नरूप** होऊन त्यास चांगली **पुष्टी** व शक्ति देण्यासारखीं तीं होतीं."

**एनटेपफुल**च्या शाळामास्तरानें या मुलाचे बुद्धिमत्तेविषयीं जी कल्पना केली तीच खरी होती असें आज आपणास ह्मणण्यास हरकत नाहीं. आणि खरोखरच तरुण **निशोन**मध्यें बाह्यात्कारी कितीही शांतता दिसत असली तरी त्याच्या अंतरंगीं पुढें उत्कृष्ट रीतीनें फलद्रूप होण्यासारखी तरतरी असल्याचीं

---

लिहिलें आहे. पण त्यांत थोडी अतिशयोक्ति आहे. वैद्यकी संबंधानें पाहतां, अनुभवानें नवीन शोध लावण्याचें काम कितपत होत असेल न कळे. परंतु आमचें पूर्वीचें वैद्यक अगदींच नष्टप्राय झालें असून नवीन डाक्तरांस विलायतेंतून ज्या बाटल्या येतात तेवढ्या औषधांवरच बहुधा भागवावें लागतें. तीं तयार करण्याचेंही काम येथें होत नाहीं. यामुळें हिंदुस्थानांत ज्या अनेक गुणकारक वल्ली आहेत त्या असून नसून सारख्याच झाल्या आहेत. शिवाय पूर्वी हाकेसरसा डाकतर मिळत नसल्यामुळें घरांतील वृद्ध माणसांस जीं कांहीं अनुभविक औषधें माहीत असत तींही आतां नाहींशीं झालीं आहेत. तान्ह्या मुलाला नियमानें बाळकडू घालावयाचें तेंही अलीकडील पिढीच्या बायकांस ठाऊक नाहीं! आतां वकिलीकडे पाहिलें तर वकिलांच्या योगानें अन्यायास आळा बसावयाचा. परंतु व्यवहारैकदृष्टि वकील झाल्यामुळें कोणाचीही गोष्ट कशीही असली तरी ती **शाबीत** अगर **नाशाबीत** करणें आणि कायद्याच्या **शब्दांतून** जेवढी सौलत अन्यायास मिळेल तेवढी घेणें हाच वकिलीचा धोपट मार्ग झाला आहे. ह्मणून साक्षिदारांस शिकविण्याचें वगैरे काम अगदीं चालत नाहीं असें जरी धरिलें तरी आपल्या पक्षास सत्य अनुकूळ नसून कोर्टांत जबानी घेतांना सत्याचीच अपेक्षा करणारा वकील फारच दुर्मिळ झाला आहे. याप्रमाणें हे तिन्ही धंदे पैसे मिळण्याचें साधन या कोटींत आल्यामुळें " मोलें घातलें रडाया। नाहीं असूं आणि माया" असें होऊन राष्ट्राचें व लोकांचेंही नुकसान झालें आहे.

चिन्हें निःसंशय दिसत असतील; व त्यावरून तो किती विचारी, किती कल्पक, व किती कुशाग्रबुद्धीचा असावा, हें स्पष्ट दिसत असेल. तो आपल्या बागेच्या भिंती वर जेवावयास बसे ही गोष्ट व इच्यासारख्याच लहानपणांतील दुसऱ्याही चमत्कारिक गोष्टी जरी एकीकडे ठेविल्या, तरी बारा वर्षांच्या वयांत खालील विचारासारखे उदात्त विचार एखाद्या पोरास सुचल्याचें आमच्या वाचकांपैकीं कितीकांस ठाऊक असेल बरें ? प्रोफेसर साहेब ह्मणतात "एके दिवशीं "भर दुपारीं जिकडे तिकडे सामसूम असतां मी कुबाक नदीवर बसलों "होतों. तेव्हां ती नदी शांतपणें झुळझुळ वहात आहे असें पाहून मला "वाटलें :—हीच नदी अशीच झुळझुळ करीत अगदीं आदिकाळापासून वहात "असेल; व अनेक प्रकारची हवा आणि नदीस येणाऱ्या सर्व स्थिति[3] यांचा "अनुभव तिनें घेतला असेल. जोशुआ[4] जेव्हां जार्डन[5] नदी उतरून गेला, "जेव्हां सीझर[6] भर दोन प्रहरीं आपल्या ग्रंथास पाणी लागूं न देतां

---

३ नदीस येणाऱ्या स्थिति—पूर, शुष्कता, भरती, ओहटी, जलस्थलचरांकडून व वनस्पति वगैरे कडून उपभोग वगैरे.

४ ख्रिस्ती शकापूर्वी १६०८ मध्यें जोशुआ (मोझेस नामक राजर्षीचा प्रधान) इस्त्राएल लोकांस घेऊन जार्डन नदी उतरून ईश्वराज्ञेनुसार दिग्विजयास गेला तेव्हां जार्डन नदीस पूर आला असून ती त्यास वाट देण्याकरितां दुभंग झाली अशी बायबलांत कथा आहे.

५ जार्डन नदी—ही सीरिआ प्रांतात पालेस्टैन प्रांतांच्या पूर्व सीमेवर असून सुमारें १५० मैल लांबीच्या प्रवाहानंतर मृत समुद्रास मिळते.

६ सीझर—रोमचा विख्यात मुत्सद्दी व सरदार ( इ. स. पू. १००-४३ ) यास जुपिटरच्या देवळांतील औपाधिकाच्या हेतूनें प्रथम शिक्षण दिलें होतें. परंतु त्याच्या सासऱ्याचा शत्रू सिला यानें तो बेत फसविला व त्याची सर्व जिंदगी जप्त करून त्यास बहिष्कृतही केलें. सिलाच्या मृत्यूनंतर पुन्हां त्यास रोम येथें आश्रय मिळाला, आणि ग्रीसच्या कारभारांत अव्यवस्था केल्याबद्दल डोलाबेलावर खटला चालला होता त्यांत त्यानें आपलें वक्तृत्व प्रकट केलें. नंतर मेरियसचे पक्षास मिळून सिसरोच्या मदतीनें त्यानें मनिलियाचा कायदा सुधारला त्यामुळें पांपे याचें त्याजवर प्रेम जडलें. पुढें वाढतां वाढतां तो प्रीटर झाला व नंतर स्पेनचा गव्हरनर झाला. नंतर सीझर, पांपे, व क्रासस या तिघांनीं मिळून पहिलें ट्रायमव्हरेट किंवा राजत्रयी ह्मणजे तीन राजांचा समकालीन अंमल सुरू केला. आणि गाल ( सांप्रतचे फ्रान्स व जर्मनी ) वर स्वारी केली आणि ब्रिटनी व जर्मनीमध्यें अनेक मोठमोठ्या लढाया मारून नांव कमाविलें. पुढें दोन स्वाऱ्या इंग्लंदवर करून त्यानें इंग्लंड सर केलें. या जयशालित्वामुळें पांपे हा त्याचा द्वेष करूं लागला व सेनेटनें त्यास राज्याधिकारावरून दूर केलें. यामुळें त्यास राग येऊन आपल्या सैन्याच्या मदतीनें

" नाइल७ नदी पोहून गेला. तेव्हांही ही लहानशी कुबाक नदी, टैबर८ वगैरे महा-
" नद्यांप्रमाणेंच सतत ओघानें वहात असेल; त्यावेळीं येथें बहुधा निर्जन अरण्य
" असून, तेव्हां या नदीला कोणीं नांवही दिलें नसेल. यूफ्रेतीस भागीरथी वगैरे
" नद्यांप्रमाणेंच हीही या जगाचे शरीरांत शिरे सारखी जलरूप रक्तानें
" जगाच्या आरंभापासून वाहत असून हिच्याही लहान लहान जलवाहिन्या

या घरांतील शत्रूंचा सूड उगवावा असा त्यानें विचार करून रोमवर स्वारी केली. त्यास एकसारखे जयच येत गेले; व तो रोममध्यें आला तेव्हां पांपे व माजिस्ट्रेट लोक पळून गेले. रोममध्यें फौजेवांचून शिरूनच त्यानें खजिना हस्तगत केला. त्यायोगें या आपसांतील कलहांत त्यास जास्तच मदत होऊन लढाई सर्व राष्ट्रांत पसरली. डिरेचियम येथें त्याचा पराभव होऊन तो म्यासिडोनियांत शिरला, व फारसेलिया येथें त्यानें टालेमीचा मोड केला. पांपे तेथून पळाला तो इजिप्तमध्यें जहाजावरून उतरतांना त्यास कोणीं ठार मारिलें आणि त्याचें शिर सीझरकडे नेलें. सीझरनें पांपेच्या मृत्यूबद्दल पुष्कळ शोक केला व त्या मारणाऱ्यास देहान्त शासन दिलें. अलेक्झांड्रा येथें टालेमीची बहीण क्लिओपाट्रा (पु० १ भाग ७ टीप ६) इच्याशीं त्याचा संबंध होऊन तिच्या मसलतीनें त्यानें टालेमीशीं युद्ध केलें! याच लढाईंत अलेक्झांड्रा येथील ग्रंथालयास आग लागून चार लक्ष ग्रंथ जगांतून अजीबात नाहींसे झाले! अखेरीस इजिप्शियन लोकांचा पराभव होऊन टालेमी बुडून मेला. पांपेच्या मृत्यूचें वर्तमान समजल्यावर रोमच्या सेनेटनें सीझरला पांच वर्षांकरितां कान्सल नेमलें आणि त्यास डिक्टेटर करून सर्वसत्ता त्याचे हातीं दिली. नंतर एशियामायनरमध्यें मिथ्रिडेटिस दि ग्रेट याचा मुलगा फारनेसिस याचा पराभव केला. त्यावेळीं त्यानें सीनेटला एक पत्र लिहिलें ते लहानपणाबद्दल जगप्रसिद्ध आहे. त्या सर्व पत्रांत "मी आलों" "मी पाहिलें" "मीं जिंकलें" या अर्थाचे तीनच शब्द होते! या प्रमाणें ग्रीस देशांत बंदोबस्त करून त्यानें आफ्रिकेंत स्वारी केली. या युद्धांत सिपिओ लेबिनस व जुबा यांस जिंकून केटोची इतकी पाठ पुरविली कीं त्यानें आत्महत्या करून घेतली. मग रोममध्यें आल्यावर त्यानें लोकांस मोठ्या उदारपणानें वागविलें; अनेक चांगले कायदे केले; पंचांगांत सुधारणा केली, व पांपेच्या दोन पुत्रांनीं बंडावा माजविला होता तो मोडला. यापुढें तो स्वतंत्र बादशाहाप्रमाणें वागूं लागला. यामुळें त्याच्या पक्षाचे बरेच लोक नाखूष होऊन प्रजासत्ताक पक्षाच्या कटांत सामील होऊन त्यास सेनेटमध्येंच ठार मारिलें. हा पुरुष खरा गुणी व बुद्धिवान् होता व तो वक्ता या नात्यानेंही उदयास आला असता ही गोष्ट सिसरोनेंही कबूल केली आहे. तो मोठा गणिती होता व त्यास इमारती बांधण्याचें शास्त्रही चांगलें अवगत असून रोममध्यें जरी त्याचें वास्तव्य कमी असे, तरी तेवढ्या अवधांत त्यानें तेथें कित्येक सार्वजनिक इमारती स्वतःच्या देखरेखीखालीं बांधल्या.

७ नाइल—आफ्रिकेंतील अति मोठी, उपयुक्त, व इतिहासप्रसिद्ध नदी लांबी ३३०० मैल.

८ टैबर—इतलींतून रोमशहरावरून जाणारी नदी—लांबी २५० मैल.

" वातावरणांत पसरल्या आहेत. अर्थात् ही नदी **जगाशीं समकालीन**
" आहे व तितकीच टिकणार. याप्रमाणें या सृष्टीची **अनाद्यंतता** पाहिली
" असतां तिच्या मानानें नेहमीं दिमाख मारणारी आपली **शिल्पकला** ही
" केवळ ज्याला कुणबी अळिंबें[९] ह्मणतात त्यासारखीच क्षणभंगुर दिसते. अरे
" तूं बसलेला हा स्तब्ध **दगड** जरी पाहिला तरी तो सुद्धां सुमारें सहा
" हजार वर्षांचा[१०] असेल." **काळाच्या** उदात्त व गूढ स्वरूपाविषयीं आणि **काळाचा** जो **अनाद्यंत परमेश्वराशा** संबंध आहे त्याविषयीं जे अनिर्वाच्य व सखोल विचार **वस्त्ररहस्य** ग्रंथांत अनेक ठिकाणीं आले आहेत त्यांचें मूळ या लहानशा विचारांत स्पष्ट दिसत नाहीं काय?

पाठशाळेंतील व कालेजांतील शिक्षणासंबंधाचें वर्णन आपल्या **प्रोफेसर** साहेबांनीं बाळपणच्या वर्णनासारखें आनंदानें व उल्हासानें केलेलें नाहीं. यांतही आनंदभरित स्थळें आहेत, परंतु त्यांतून दुःखाश्रूंच्या नद्या वहात असून जागजागीं उदासपणाच्या दलदली व डबकीं दिसतात. " **हिंटर-**
" **श्लागची**[११] पाठशाळा पाहिल्या दिवसापासून माझ्या दुःखास आरंभ झाला.
" त्या दिवशीं **'अंड्रीस** बाबांचा हात धरून **हिंटरश्लाग** येथील चौकांत
" प्रथम गेलों तेव्हां सकाळचे आठ वाजले होते. तेव्हांची मला पक्की आठवण
" आहे. त्या वेळेस पांढरपेशे लोक व मजूर लोक न्याहारीच्या तयारींत होते.
" एका लहानशा कुत्र्याच्या शेपटीला कांहीं मानवी माकडांनीं जस्ती डबा
" बांधल्यामुळें तो बिचारा गर्भगळित होऊन इकडे तिकडे धांवत आणि
" मोठ्यानें केंकटत गांवभर हिंडून प्रसिद्धीस येत होता. अहाहा! मोठ-
" मोठ्या विजयांची इच्छा करणाऱ्यांची हीच दशा नाहीं काय? **इंद्रिय-**
" **ज्ञान** व **कल्पनातरंग** यांची सांगड घालून या लोकांच्या पाठीस **दैवानें**
" **महत्वाकांक्षा** व तृष्णारूप जस्ताचा डबाच बांधला नसतो तर काय?

---

९ अळिंबें—यास कोणी कुत्र्याचें मूत ह्मणतात. त्याचा देंठ व पान (छत्री) अति जाड असून तें इतकें नाजुक व कुरचुक असतें कीं अति लहान धक्यानेंही त्याचे तुकडे तुकडे होतात. त्याच्या नांवांत गर्भित असलेली त्याच्या उत्पत्तीची कल्पना केवळ निराधार आहे.

१० यूरोपियन पुराणावरून पाहतां ही पृथ्वी उत्पन्न होऊन सुमारें ६००० वर्षें झालीं. भूगर्भशास्त्रावरून पाहतां ती उत्पन्न होऊन कितीएक लक्ष वर्षें तरी झालीं असतील. इजिप्तच इतिहासचा ९००० वर्षांपर्यंत सांपडतो व तोही रानटी दशेंतला नाहीं.

११ हिंटर-श्लाग ह्मणजे मागून थप्पड.

" मग तो विजयाची महत्वाकांक्षा धरणारा पुरुष जसजसा जोरानें व वेगानें
" आपला क्रम चालवील त्याप्रमाणें हें डब्याचें लोढणेंही मागून मोठा शब्द
" करीत त्याचे पाठीस लागतें! मग त्या पुरुषास दम कोठचा ? मलाही
" ज्या स्थितींत हें आयुष्य या दुःखकारक पाठशाळारूप कारागृहांत व त्या-
" नंतर जगद्रूपी मोठ्या कारागृहांत कंठावयाचें होतें त्या स्थितीचें हें निद-
" र्शक चिन्हच होतें.'

" हाय, हाय! एंटेपफुल येथील बीचवृक्षांच्या रांगा मला नेत्रसुख व
" छायासुख देत होत्या. त्या आतां दूर अंतरामुळें माझ्या दृष्टीआड
" झाल्या! आणि कठोरपणानें, निदान परकेपणानें मला वागविणाऱ्या
" अनोळखी लोकांत मी येऊन पडलों! मी पोरका व एकटा आहें असें
" मला प्रथम त्या वेळेस वाटलें. पाठशाळेंतील इतर मुलांनीं तर मला परा-
" काष्ठेचा त्रास दिला. त्यांच्याकडे तरी काय बोल? मुलें तीं! येथून
" तेथून आडदांड पोरें! वास्तविक पाहतां तीं आपल्या स्वभावप्रवृत्ती-
" प्रमाणें वागलीं. सृष्टिक्रमच असा आहे. एखाद्या हरणास कांहीं दुखापत
" झाली कीं कळपांतलि सर्व हरणें त्याच्या पाठीस लागून त्याचा प्राण
" घेतात. हीच गोष्ट बदकांमध्येंहीं दिसून येते. तात्पर्य, सृष्टीचा क्रमच असा
" आहे कीं, बळी तो कान पिळी. माझ्या आंगीं जरी विलक्षण मानसिक
" धैर्य होतें, तरी भांडणांत मला त्याचा विशेष उपयोग होत नसे; व भांडणाचा
" मला उत्साहही नसे. याचें कारण माझा बांधा लहान होता हें नव्हे.
" कारण रागाच्या वेळेस मला कोठली तरतरी येई कोण जाणें. परंतु भांड-
" णाचे कामांत माझें नीतितत्व मला आडवें येई. कारण जरी आपला पाडाव
" होणें ही गोष्ट लाजिरवाणी आहे, तरी मूळ कज्जा करणें हीही गोष्ट लाजि-
" रवाणी नाहीं काय? ही कांहीं थोडीशी कमी लाजिरवाणी असेल इत-
" केंच असा विवेक होऊन माझ्या मनाची दोहोंकडे ओढाताण होई. व
" विद्यार्थी दशेच्या या विशेष भागांत मला फारच दुःख होत असे." एकं-
दरींत ट्यूफेल्सड्राक साहेबांच्या बाल्य दशेंत ज्या उत्कृष्ट उदासीन-
तेच्या तत्वाची इतकी चंगळ उडाली होती त्यास पुन्हां येथेंही पोषक
पथ्य मिळतच होतें! " तो फारच वेळां रडत असे. इतका कीं त्याच्या
" सोबत्यांनीं त्याला दिलेलें 'रडका' हें टोपण नांव तेराव्या वर्षापर्यंत त्यास
" चांगलेंच शोभत असे. फारच क्वचित् प्रसंगीं त्याला राग येई. पण अशा

" वेळीं त्याचे डोळे विस्तवासारखे लाल होऊन तो त्या छळवादी पोरांच्या " अंगावर तुटून पडून त्यांचा सूड घेई. व इतरांप्रमाणें मनुष्यांचे हक्क[१२], " निदान पोरांचे तरी हक्क आपणांस आहेत असें स्पष्ट व्यक्त करी. अशा " वेळेस त्याच्या छळवाद्यांपैकीं जे अगदीं शूर शूर होते त्यांचीही त्रेधा " उडे." जसा एखादा सुंदर दालचिनीचा वृक्ष अनेक औषधांचे उपयोगीं पडणारा असून शिवाय त्याच्या फुलांस अप्रतिम सुवासही असतो; परंतु भोंपळयाचे वेल, एरंडाचीं झाडें, फड्या निवडुंग वगैरे कमजात झुडपांनीं दाटी केल्यामुळें त्या बिचाऱ्याच्या विस्तारास जागा न सांपडून तो नुसता उंच मात्र होतो, त्याचप्रमाणें ट्यूफेल्सड्राक साहेबांचीही स्थिति होऊन त्यांची प्रवृत्ति उदासीनतेच्या तत्वाकडेच वाढली आणि त्यांच्या उद्योगशीलतेस बहुतेक अजीबात फांटा मिळाला असें या वर्णनावरून कोणास वाटणार नाहीं!

त्यांचें लॅटिन व ग्रीक भाषेचें शिक्षण केवळ पोपटपंचीच्या तोडीचें होतें. हिब्रयू भाषेचें तर तितकेंही नव्हतें. इतिहास, सृष्टिज्ञान, तत्वज्ञान, वगैरे विषयांत त्यांस तेथें शिक्षण मिळालें होतें असें ह्मटले, तर शोभणारही नाहीं. मात्र सृष्टीचीं कार्यें चालू असून तो तीं बारकाईनें पाहून त्याही वेळेस पुष्कळ ज्ञान मिळवीत असे. शिवाय तो आपल्या बिऱ्हाडीं थोडींशीं चमत्कारिक पुस्तकेंही वाची. परंतु हें त्याचें आत्मशिक्षण जर एकीकडे ठेविलें तर या पाठशाळेंत घालविलेलीं त्याचीं सर्व वर्षें निवळ पाण्यांत गेलीं, असेंच ह्मटलें पाहिजे; आणि ही गोष्ट प्रोफेसर साहेबांचे मनास फारच खात आहे. हल्लीं आपण वृश्चिकराशीच्या पुडक्यांत आहों; या सबंध पुडक्यांत व धनराशीच्याही पुडक्यांत प्रोफेसर साहेबांनीं आपल्या शिक्षणाविषयीं बराच मजकूर लिहिला असून त्यांत रागाचा बराच आवेश दिसून येतो. ते ह्मणतात,

" माझे शिक्षक सिंहाचें कातडें पांघरलेल्या गाढवासारखे पंडितंमन्य " असून त्यांना मनुष्याच्या स्वभावाचें, किंवा पोरांच्याही स्वभावाचें बिल-

१२ मनुष्याचे हक्क—फ्रान्समध्यें १७८९ त राज्यक्रांती झाली तिजविरुद्ध इंग्लंडांतील प्रसिद्ध मुत्सद्दी बर्क यानें खरमरित टीका लिहिली तिला प्रत्युत्तर ह्मणून टामस पेन यानें " मनुष्याचे नैसर्गिक हक्क " या विषयावर एक ग्रंथ लिहिला आहे त्यास उद्देशून हें लिहिलें आहे.

" कुल ज्ञान नव्हतें. इतकें कशाला ? कोश व पगाराचा जमाखर्च यांच्या " पलीकडे त्यांना कांहींच कळत नव्हतें. आह्मांस त्यांनीं पुरातन भाषा शिक- " वावयाच्या; पण ह्मणण्यासारखें भाषाज्ञान त्यांनाच नाहीं! तेव्हां अर्थरूपी " **प्राण** नसलेले असंख्य निर्जीव शब्द **घोकंपट्टी**च्या साह्यानें ते आमच्या " डोक्यांत कोंबीत आणि ह्मणत कीं 'आह्मी यांच्या **मनाची उन्नती** " **करितों.**' नुसत्या घोकंपट्टीनें लिंगवचनांची रूपें तयार करणाऱ्या यंत्रासारखे " ते होत. मनाची उन्नती तर लांबच राहिली; परंतु असल्या लोकांच्या " हातून कोणच्याही इतर प्रकारची उन्नती तरी होईल कशी ? असलीं लिंग- " वचनांचीं रूपें सांगणारी लांकडाचीं किंवा कातड्याचीं बाहुली उद्यां **नरे-** " **नबर्गच्या** कारखान्यांतही तयार होतील; त्यांचे हातून मनाची उन्नती " कशी व्हावी ? मनाची वाढ कांहीं भाजीसारखी नाहीं; तर तिला खत " खुरपण केल्यानें ती वाढेल ? मन हें **आत्मरूप** असून त्याची उन्नती " **आत्म्याशीं** अनिर्वाच्य संयोगानें मात्र होईल. **विचाररूपी** दिव्याची " जोत लावणें झाल्यास ती प्रज्वलित विचाररूप ज्योतीशींच लाविली पाहिजे. " ज्याच्या अंतरंगांत विचाराग्नीच प्रज्वलित नसून थंड राखेच्या रूपानें मात्र " व्यक्त होतो, तो जरी नाममात्रें शिक्षक असला तरी ज्वालादानाची शक्ति " त्यास यावी कशी ? आमच्या शिक्षकांना वाक्यरचनेचे नियम मुखोद्गत " असत. परंतु " मनुष्यास स्मरणशक्ति आहे व तिजवर वेताच्या छडीनें " आणि स्नायूंच्या जोरानें अंमल करितां येतो," या एका गोष्टीशिवाय " मनुष्य स्वभावाचें ज्ञान त्यांस कवडीइतकेंही नव्हतें.

" हाय हाय ! किती दुःखाची गोष्ट ही ! पण सगळीकडे हीच रड आहे. " आणि जोंपर्यंत शिक्षकांचे जागेवर असलेले हमाल लोक हमालीचे कामास " लावून, त्यांचे ऐवजीं, ही मनुष्यरूप इमारत तयार करणारे लायक कारा- " गीर नेमून त्यांस उत्तेजन देण्याची तजवीज होत नाहीं, तोंपर्यंत ही " स्थिति अशीच राहणार. जोंपर्यंत बंदुकीच्या गोळ्यांनीं मनुष्याचीं शरीरें " नष्ट करण्याचे कामापेक्षां मनुष्यास ज्ञानामृतानें सजीव करण्याचें काम " जास्त महत्वाचें वाटत नाहीं, तोंपर्यंत ही स्थिति अशीच राहणार. सेना- " पती, कर्नल, वगैरे लोक माणसें मारण्याकरितां जसे आपण ठेवितों, तसेंच " शिक्षणाचे कामाकरितांही जगमान्य मानकरी व ईश्वरप्रणीत धर्म शिक- " विणारे शिक्षक ठेविले तरच ही स्थिति सुधारेल. आजच्या स्थितींत तर

" शिपाई लोक मनुष्यें मारण्याचीं हत्यारें बाळगून निःशंकपणें रस्त्यांतून
" चालतात, इतकेंच नव्हे तर डौलानें मिरवितातही ! परंतु एखादा शिक्षक
" आपलें शिक्षणाचें हत्यार घेऊन डौलानें रस्त्यांत मिरवितांना माझ्या
" सगळ्या प्रवासांत मला कोठेंच दिसला नाहीं. आणि जर एखादा शिक्षक
" आपली वेताची छडी कमरेस लटकावून लोकांपासून सन्मान मिळवि-
" ण्याचे हेतूनें रस्त्यांतून हिंडू लागला, तर रिकामटेकडे लोक त्याच्या
" कुचेष्टा मात्र करूं लागतील !"

पाठशाळेंतील शिक्षणाच्या तिसऱ्या वर्षी अंद्रीस मरण पावला असावा असें वाटतें व या तरुण विद्यार्थ्यास दुसरीकडे इतका त्रास होत असतांच या अरिष्टामुळें सूतकदर्शक बाह्य चिन्हें व आंत विलक्षण खिन्नता याचाही तो प्रथम विभागी झाला. तो ह्मणतो, " ज्या मृत्युच्या तोंडांत
" आपण केव्हां पडूं याचा नेम नाहीं, तो मृत्यू माझे पुढें त्यावेळीं प्रत्यक्ष
" उभा राहिला; आणि गत व नष्ट या शब्दांचा खरा अर्थ काय तो प्रथम
" मला त्या दिवशीं कळला. माझ्या आईचें दुःख रडून हलकें झालें, परंतु
" माझ्या अंतरंगांत जिकडे तिकडे उदासवाणें होऊन शोकसमुद्रच भरला अस-
" ल्यामुळें बाहेर येणाऱ्या अश्रूंनीं तो कितीसा हलका होणार ? तत्रापि
" तारुण्याचे भरांत अंगांत धमक असून त्या वेळचें जीवनामृत इतकें
" सतेज असतें कीं या वयांत मृत्यूसमक्षही जीवनकला[13] वाढत असते !
" ह्मणूनच मी त्यांतून निभावलों. परंतु त्या वेळीं या दुःखानुभवाचें बीज
" माझे मनांत रुजलें तें तेथें एखाद्या विशाळ विषवल्लीप्रमाणें पोसलें. तें खेद-
" दायक तर खरेंच, परंतु विलक्षण सौंदर्ययुक्त असून, तारुण्याच्या लांब
" लांब वर्षांत व पुढें मोठेपणांतही अत्यंत आनंदाच्या भरांत सुद्धां आपल्या
" सौंदर्यानें व सखेद मोहकपणानें तें माझ्या चित्ताचें आकर्षण[14] करी. आतां
" तर मी आपलें ठाणें या मनोहर विषवल्लीखालींच दिलें आहे. आणि
" तेथें मृत्यूरूप अभेद्य किल्लचाचे आश्रयास राहून त्याच्या वेशीजवळूनच

---

१३ जिवनकला—पु० १ भाग ३ टीप १३ पहा.

१४ गत काळचें सौख्य आठवून सांप्रत काळीं जरी आपणांस खेद होतो, तरी त्या खेदांतच एक प्रकारचें समाधान असतें. मागील सौख्य गेलें खरें पण त्याची जी स्मृतिरूप छाया राहते तीही बऱ्याच अंशीं समाधानास कारण होते. पण ही छाया मनांत येण्यास वियोग दुःखाचेंही स्मरण अवश्य आहे.

" शत्रूच्या फौजेवर ( कलीच्या दुर्वर्तनरूप दासावर ) नजर ठेवून या
" कठोर आयुष्यांतील दुःखें व यातना बऱ्याच शांतपणें पाहतों. या संसार-
" राक्षसाच्या विलक्षण धमक्या ऐकून मला क्षणभर हंसूंही येतें. अहो गत-
" काळच्या प्रिय पुरुषानों, जे तुह्मी या किल्लयांत निश्चळ समाधीच्या शांत
" आसनावर बसले आहां, तुमच्या करितां या आयुष्यांत मीं अश्रू मात्र
" ढाळले, बाकी तुह्मास साह्य असें माझे हातून कांहींच झालें नाहीं ! त्याच
" प्रमाणें अहो जीवमान पुरुषांनों, या संसाररूपी राक्षसाच्या अरण्यांत
" तुमची दाणादाण झाली असून आज एकटे सैरावैरां हिंडत तुह्मी
" आपल्या रक्तानें या पाषाणमय पृथ्वीस न्हाणीत अहा; पण लौकरच
" तुमची आमची भेट होईल ! या किल्लयांत गेल्यावर जुलमाचें जूं, दुःखा-
" ग्नीचे कोरडे, व हे नेहमीं दांत खाणाऱ्या काळाचे अनुषंगी दूत, यांचें
" मग आपल्यावर कांहींएक चालणार नाहीं !

या उत्कृष्ट संबोधनाजवळच स्वर्गवासी **अंड्रीसफुटरल** याच्या स्वभा-वाचें तपशीलवार वर्णन आहे. त्यांत त्याचे नैसर्गिक गुण, प्रशियन सार्जंट या नात्यानें उपयोगांत आलेले गुण, व **फुटरल** घराण्याचा **हेनरी दि फौलर**[१५] पासूनचा इतिहास, हीं फार चटकदार रीतीनें वर्णिलीं आहेत. परंतु त्यांशीं आपणास कांहीं करावयाचें नसल्यामुळें तीं आपण बाजूस ठेवूं. तूर्त आपणांस अतिमहत्वाची गोष्ट ह्मटली तर **ग्रिचेननें** या आपल्या पोसलेल्या पोरास तूं आमच्या कुळांतला नाहींस असें कळविलें, ही होय. या संबंधानें **टयूफेलसड्राक** साहेब लिहितात, " याप्रमाणें मला हें दुसऱ्यानें मृतपितृकत्व प्राप्त झालें.
" कारण माझ्या जन्माबरोबर माझ्या मूळ मातापितरांचा मागमूस नाहींसा
" झाला तो झालाच, पण ज्यांना मातापितरें असें आजपर्यंत मी समजत
" होतों, तीं माझीं मातापितरें नव्हतशीं होऊन त्यामुळें या वडिलांच्या जिंद-
" गीला तर मी अंचवलोंच; पण नुसतें स्मृतिसुख होतें तेंही नाहींसें झालें;
" आणि दःख व आश्चर्य यांचा मिलाफ होऊन त्यापासून पुढें माझे मनांत
" अनेक विकार उत्पन्न झाले. अशा वेळेस असली गोष्ट कळल्यामुळें तिचा
" माझ्या सर्व स्वभावावर फारच मोठा व कायमचा परिणाम झाला. पूर्ण

---

१५ हेनरी दि फौलर—जर्मनीचा बादशाह (८७६–९३६) यानें जर्मनींतील संस्थानिकांत पुन्हां एकोपा केला, चांगले कायदे केले व पुष्कळ शहरें वसविलीं; आणि **बोहिमियन** व डेन्स लोकांस पादाक्रांत करून लारेनचें राज्य जिंकलें.

" वयांत मी येईपर्यंत माझ्या एकंदर विचारांत या गोष्टीचें विरजण होऊन
" जागृतींत व स्वप्नांतही येणाऱ्या विचारांत तेव्हांपासूनच ही गोष्ट आधारभूत
" झाली. या गोष्टीवरून कौतुकोत्पादक व कविजनांस आवडण्यासारखें एक
" प्रकारचें उच्चत्व मला प्राप्त झालें खरें; तरी पण तीमुळें संसारी लोकांच्या
" दृष्टीनें मला हीनत्वही आलें. आणि माझ्यासारखा मीच ही गोष्ट
" तेव्हांपासून माझ्या मनावर इतकी कायमची ठसली कीं तमुिळें कधीं कधीं
" फारच उत्कृष्ट, पण नेहमीं ह्मटलें तर अति भयंकर परिणाम होऊं लागले.
" मला वाटतें कीं माझ्या पुढील चरित्रांत ज्या ज्या इतक्या लक्ष्यांत ठेव-
" ण्याजोग्या गोष्टी झाल्या त्या सर्वांचें बीज या एका गोष्टींतच असेल.
" जन्मवृत्तासंबंधानें जसें या जगांत माझ्या बरोबरीला कोणी नाहीं, त्याचप्र-
" माणें जीं जीं कृत्यें मीं केलीं, जे विचार केले, समाजांत ज्या स्थितींत
" आयुष्य घालविलें, त्या संबंधानें पाहतांही माझ्यासारखे लोक थोडेच
" सांपडतील.[१६]"

अखेरीस **टच्यूफेल्सड्राक** साहेब पदवीधर झाल्याचा उल्लेख या **धन-राशीच्या** पुडक्यांत आढळतो. पण ते केव्हां कसे, व कोणत्या प्रतीचे पदवी-धर झाले याचा खात्रीलायक पत्ता कोठें लागत नाहीं. **टच्यूफेल्सड्राक** साहे-बांची व आमच्या वाचकांची आतांपर्यंत इतकी ओळख झाली आहे कीं घोंटाळा, अव्यवस्थितपणा वगैरेचे सदरांत येणारी कोणचीही गोष्ट आतां त्यांना आढळली तरी तिजविषयीं त्यांस चमत्कार वाटणार नाहीं. चरित्रात्मक लेखांत तारखा अवश्य असावयाच्या, पण त्याही नसल्याबद्दल आतां वाच-कांस विशेष नवल वाटणार नाहीं; इतकें त्यांचें गूढ व अव्यवस्थित स्वरूप आजपर्यंत आपल्या नजरेसमोर आलें असून या कागदांच्या पसाऱ्यांत पुढेंही येईल. परंतु या **धनराशीच्या** पुडक्यांत आमचे **प्रोफेसर** साहेबांनीं अगदीं कमाल करून सोडिली आहे. अमक्या जातीचा कपटा यांत नाहीं असें नाहीं. व्यवस्थित चरित्रात्मक लेख आहेत, कालेजांतील शिक्षणक्रमासंबंधीं कपटे आहेत; बेतबातांचीं टिपणें, सर्टिफिकिटें, लहान लहान पत्रें, वगैरे सर्व कांहीं आहे. त्यांपैकीं कांहीं पत्रें एखाद्या युवतीस उद्देशून लिहिलेलीं असावीं अशीं

१६ असाधारण जन्मवृत्त असणें या गोष्टीचा साक्षात् परिणाम जरी कांहीं होत नसला तरी या गोष्टीच्या कारणांचा व त्यामुळें झालेल्या दुःखादिकांचा पुढील चरित्रावर फारच मोठा परिणाम होतो.

दिसतात. हे कागद दैवयोगानेंच एकत्र झाल्यासारखे दिसत असून या काल-व्यामुळें एखाद्या शाहण्या इतिहासकारासही वेड लागेल. अशा स्थितींत या कागदांतील मजकूर जुळून प्रोफेसर साहेबांच्या कालेजांतील पुढील चरित्राची माहिती देणें, आणि **वस्त्ररहस्याचें** बीज त्यांतून शोधून काढणें, हें किती बिकट काम आहे, याची वाचकांनींच कल्पना केली पाहिजे.

नावेंतून जात असतां वाऱ्यानें हालणाऱ्या एखाद्या दाट वेलींतून तुरळक दिसणाऱ्या पलीकडील पदार्थाविषयीं जसें अनुमान करावयाचें, तद्वत् या कागदांच्या पसाऱ्यांतून इतकीच हकीकत समजते कीं :—**ट्यूफेल्सड्राक** हा जात्या विलक्षण बुद्धिमान् मुलगा असून त्याचें बाळपण आनंदांत गेलें. पोरपण जरी थोडें कमी आनंदांत गेलें असलें तरी तरतरींत गेलें, आणि अखेरीस आतां निर्जीव शब्दज्ञानांत तरबेज होऊन ते **चैतन्यानें** भरलेल्या जिवंत झऱ्याशीं बसले आहेत. त्या झऱ्यांतून **कर्तृत्व** व **सुविचार** प्राप्त करून घेण्याची त्यांची खटपट चालली आहे. आणि हें अमृत ते मोठ्या झपाट्यानें व आतुरतेनें काढीत आहेत. परंतु सदैव हें काम सारख्याच तत्परतेनें चाललें आहे असें नाहीं. कारण या झऱ्यांतील अमृत त्यांचे पारखीस उतरत नाहीं. शिवाय हें अमृत शेंदीत असतां[17] हिंमत खचणें, दोरीची गुंतागुंत होणें, भांडें हेलकावणें, वगैरे अडथळे येतात ते निराळेच. पैशाची अडचणही आहेच. कारण आपल्या पोळीवर तूप ओढण्याविषयीं तत्पर अशा आप्तजनांच्या शिकवणीस दाद न देतां जरी दयाळू **ग्रिचेननें** त्यास युनिव्हरसिटींत पाठविलें होतें तरी आतां नाइलाजास्तव तिला आपला हात आखडावा लागला. तथापि हा दारिद्र्याचा रोग व त्यापासून होणारा अनेकविध संताप सोसूनही या तरुण मनुष्यानें आपलें **आत्मस्वरूप** प्रकट केलें. पावसाच्या बुडबुडींत सूर्यकिरणें पडून जसे दिव्य रंग दिसतात व कधीं कधीं इंद्रधनुष्येंही दिसतात; त्याचप्रमाणें अशा प्रसगांत सुद्धां **काळा**-च्या व अनुभवाच्या साह्यानें व मिळेल तशी सवड साधून लहानपणच्या अल्पाकृतीच्या स्थितीपासून हा पुरुष भर ज्वानींत अशा पद्धतीस आला कीं हें दिव्य स्वरूप त्यांना कसें प्राप्त झालें असेल असा प्रश्न आमच्यासारख्यांसही येऊन त्याचें सप्रमाण समाधानकारक उत्तर न मिळाल्यामुळें खेदही

१७ शेंदणें—रहाटाचे साह्यावांचून विहिरींतील पाणी नुसत्या दोरानें काढण्याच्या कृतीस शेंदणें असें ह्मणतात.

होतो. असो; या पुडक्यांतील गबाळांत जे थोडेसे भाग आह्मांस समजले व काहीं महत्वाचेसे वाटले ते, अवश्य तितकी प्रस्तावना देऊन खालीं देतों.

वृश्चिक राशीच्या पुडक्यांत शिक्षकवर्गास शिव्या देण्याची आपली आवड पूर्ण न झाल्यामुळें, किंवा न जाणो धनराशींतील धनुष्य बाण पाहून आवेश येऊनच कीं काय, लिहिलेला हा मजकूर पहा. " जेथें माझें शिक्षण " झालें ती युनिव्हरसिटी अजून माझ्या डोळ्यांपुढें असून तिचें नांवही " मला वरचेवर आठवतें. परंतु सांप्रतच्या स्थितीकडे पाहिलें ह्मणजे तिचें " नांव प्रसिद्ध करण्यास धीर होत नाहीं. मोघमपणें अवश्य ह्मणून " इतकेंच लिहितों कीं, आमच्या युनिव्हरसिटीइतकी भिकार युनिव्हरसिटी " इंग्लंड किंवा स्पेन या देशांतही सांपडणें कठीण आहे. आणि वास्तविक " पाहतां सांप्रतचा काळच असा आहे, कीं त्यांत योग्य शिक्षण मिळणें " केवळ अशक्य आहे. परंतु कुशिक्षणाच्या वाईटपणाला मर्यादा घालतां " येत नाहीं. ह्मणून ज्याप्रमाणें उपासमरीपेक्षांही विषारी अन्नाचे परिणाम " दुर्धर असतात, त्याचप्रमाणें आमच्या युनिव्हरसिटीपेक्षांही वाईट युनिव्हर- " सिटीची कल्पना करितां येणार नाहीं असें नाहीं.

" 'अंधळ्याची काठी अंधळ्याचे हातीं, दोघेही धांवती कूपामध्यें,' असें ' ह्मणतात तें खोटें नाहीं. आणि अशा स्थितींत कांहीं प्रसंगीं तरी उभयतां " अंधळ्यांनीं स्वस्थ बसून रहाणेंच बरें नव्हे काय? असो. आमच्या युनि- " व्हरसिटीची कल्पना करावयाची झाल्यास, एखाद्या गांवढळ प्रदेशांत एक " मोठा विस्तीर्ण कोंडवाडा करून आंत सुमारें अकराशें अल्लड मुलें तीन- " पासून सात वर्षेंपर्यंत हवीं तशीं वागडण्यास अगर धरपडण्यास सोडिलीं " आहेत; या कोंडवाड्यांत कांहीं भिकार बुकांनीं भरलेलीं कपाटें ठेविलीं " आहेत, आणि दारावर कांहीं लोक प्रोफेसरांची पदवी आणि पगार देऊन " " ही युनिव्हरसिटी आहे " असें ओरडून सांगण्यास व जबर प्रवेश फी " वसूल करण्यास ठेविले आहेत; असें समजा, ह्मणजे आमच्या युनिव्हरसिटीचें " कांहींसें चित्र तुमचे डोळ्यांसमोर उभें राहील. एवढ्यानें तींतील अंत- " र्व्यवस्था कशी आहे हें जरी लक्ष्यांत आलें नाहीं, तरी तेथें मुख्य गोष्ट " काय आहे व तिचे परिणाम कशा प्रकारचे असतील याची थोडी बहुत " अटकळ होण्यास हरकत नाहीं. 'थोडी बहुत' असें ह्मणण्याचें कारण " इतकेंच कीं कोंडवाड्यापेक्षां आमच्या युनिव्हरसिटीची अंतर्व्यवस्था कांहीं-

" शीं निराळी असल्यामुळें त्या मानानें शिक्षणरूप परिणामांत कांहीं फरक
" होणारच. परंतु वास्तविक ह्मटलें तर आह्मी असल्या मागसलेल्या गांव-
" ढळ प्रदेशांत असतों तरी बरें झालें असतें! कारण मग युनिव्हरसिटीच्या
" नांवाखालीं त्या बिचाऱ्या अडाणी लोकांस फसविण्याकरितां इतका **उप-
" द्याप** तरी करावा लागताना! परंतु धुरानें व पातकांनीं भरलेल्या यूरोपां-
" तल्या एका मोठ्या शहरांत आह्मी होतों. तेथले लोक. नुसत्या **कोंडवा-
" ड्यानें** व द्वारपालकांच्या ललकाऱ्यांनीं कोठले फसायला?

" तरी पण थोड्या बहुत तजवीजीनें कसलाही समाज असला तरी त्यास
" फसवितां येतें. व सुधारलेल्या समाजाचे फसण्यानें किफायतही तशीच
" विलक्षण होते. अशा फसवणुकीचे किती मार्ग आहेत व कोणच्या मार्गा-
" पासून किती किफायत होते याची कोणी **जंत्री** केली असती ह्मणजे किती
" फायदा झाला असता! **फायद्याच्या** अमक्या एका उद्योगाची **साग्र
" माहितीची जंत्री** आमच्या **अर्थशास्त्रवेत्त्यां**कडून करावयाची राहिली,
" असें नाहीं. असें असतां सर्व फायदेशीर उद्योगांत लागणारा जो **लबा-
" डीचा** गुण[१८] त्याकडे कोणाचेंच कसें लक्ष्य पोहोंचलें नाहीं याचें राहून
" राहून मला नवल वाटतें. जणूं काय **राज्यकारभार, धर्मशिक्षण. वैद्यकी,**
" व लबाडीच्या सदरांत येणाऱ्या दुसऱ्या अनंत विद्या व गुप्तप्रकार **द्रव्यो-
" त्पादक उद्योगाचे** सदरांत येतच नसावे! उदाहरणार्थ, विद्येच्या संबं-
" धानें पहा, **खरें शिक्षण** किती मिळतें, व शिक्षण या नांवानें **फसवणूक**
" किती होते! त्याच प्रमाणें बाजारांत मिळणाऱ्या हरएक पदार्थासंबंधानें
" पाहिलें तरी त्यांत **खरा** माल किती असतो, **खोटा** अगर खोटच्या मा-
" लाची **मिसळ** किती असते, खऱ्यापासून पैसे किती मिळतात, खोटच्या पा-

---

१८ लबाडीचा गुण—आपलेकडेही सांप्रत लबाडी किती झाली आहे याचा जो विचार करील त्यास राहून राहून असेंही वाटेल कीं आपण पूर्वीच्या रानटी स्थितींत असतों तरी बरें होतें. एकमेकांवर सरशी करण्याविषयीं चढाओढ प्रत्येक युगांत असणारच; आणि सरशी करण्याचे योग्य मार्ग ह्मणजे **उद्योग, योग्य गुण, शरीरसामर्थ्य** व **बुद्धिवैभव** हीं जोंपर्यंत वाढणार नाहींत तोंपर्यंत लबाडी चालणारच. तांदुळांत गारगोट्या व खडे आणि दुधांत पाणी आपोआप येतें काय? पण खड्यागारगोटीशिवाय तांदूळ व पाण्यावांचून दूध मिळणें शहरांत तरी अशक्य झालें आहे. व हीच गोष्ट इतर सर्व मालांची व उद्योगांची आहे.

" सून किती मिळतात, याचा कांहीं तरी आजमास कोणास करितां येईल
" काय? **खरा व खोटा** माल कोण कोणच्या लोकांत खपतो, तो **कसा**
" खपविला जातो, त्याचें **उत्पन्न** किती होतें व तें कोणच्या मार्गांनीं खर्च
" होतें, याची नक्की **अटकळ** कोणी करील काय? असो; आजपर्यंत जरी
" या महत्वाचे विषयाकडे कोणाची नजर गेली नसली तरी निदान पुढच्या
" करितां, समाजांत जे अनेक प्रकारचे धंदे आहेत त्यांत ह्मणजे **राज्यका-**
" **रभारांत, शिक्षणांत, कलाकौशल्याच्या कामांत, हातकामांत,** व **डो-**
" **क्याच्याही कामांत** मनुष्यास ज्या ज्या गोष्टींची जरूर लागते, त्या त्या
" **खऱ्या** किती मिळतात ह्मणजे प्रत्यक्ष माल किती कोणच्या रीतीनें
" मिळतो, व त्याचे ऐवजीं किती **लबाडी** होते, व त्याचा परिणाम कसा
" होतो याची तपशीलवार माहिती लोकांस अवश्य आहे. सध्यां या आपल्या
" यूरोपांतच खऱ्या मालाची लबाडीशीं तुलना करूं गेल्यास त्याचें प्रमाण
" **एकास शंभर** धरिलें तरी फारशी चूक होणार नाहीं; **कारण** हें प्रमाण
" काढितांना **पोपसाहेबांचा**[१९] मुशाहिरा **बादशाहाचा** मुशाहिरा, इंग्लंडांतील
" शिकार राखण्याकरितां ठेवलेल्या लोकांचा मुशाहिरा, वगैरेंचा विचार केला
" पाहिजे. लबाडीच्या मालाची तपशीलवार माहिती मिळाल्यास ही इतकी
" बूड कमी होऊन, खरा माल हळू हळू जास्त पैदा होत जाईल आणि
" त्या मानानें खोट्या मालाची तितकी जरूर लागणार नाहीं.

" पण ही गोष्ट पुढील सोनेरी सत्ययुगांत होईल तेव्हां होवो. या आमच्या
" लोखंडी कलियुगांत तर **शिक्षण, राज्यव्यवस्था, धर्म** वगैरे गोष्टींत खऱ्या
" मालाची पुष्कळच उणीव असून पाहिजे तितका खरा माल अजून मिळत
" नाहीं; तेव्हां खोट्या मालानें तरी आपली फसवणूक होऊन समजूत होते
" हेंही एक प्रकारचें सद्भाग्यच समजलें पाहिजे! कारण कल्पना करा कीं
" आज आपल्या **लढाईच्या नाड्या** आंखडल्या; आज खजिन्यांत तूट
" पडून घासदाण्याची नड पडूं लागली; यामुळें फौजेंत बंडावा माजून
" शिपाई लोक आपसांत एकमेकांच्या व आपल्याही माना कापण्याच्या
" बेतांत आले, ह्मणजे मग यक्षिणीची कांडी फिरवून आपल्या मंत्रविद्येनें

१९ पोप साहेबांचा मुशाहिरा, बादशहांचा मुशाहिरा व शिकार राखणाऱ्या लोकांचा मुशाहिरा—ह्मणजे पोकळ डौलाकरितां, रिकाम्या ऐषआरामाकरितां व चैनीकरितां होत असलेला अवाढव्य खर्च.

" **कागदांचा पैसा** ( नोटा ) करून त्याच्या साह्यानें नासलेलें अन्न व
" कसलें बसलें पाणी यांनींच जर लोकांचीं निमुटपणें समजूत झाली, व
" खऱ्या मालाचा पुरवठा होईपर्यंत लोक स्वस्थ बसले तर मग आणखी काय
" पाहिजे ? ईश्वरानें आपणांस जो फसविण्याचा व फसवून घेण्याचा गुण
" दिला आहे, त्यांत त्याचा हेतु असल्या अडचणींची तरतूद करावी असा
" तर नसेल ? कारण अमुक एक नैसर्गिक गुण उपयोगी नाहीं असें कधींही
" व्हावयाचें नाहीं !

" तशांत हा विलक्षण गुण किती तरी थोड्या कळेवर आपलें काम
" करितो ! किंबहुना आपल्यास चालविणारी कळ सुद्धां तोच स्वतः करितो !
" हेच आमच्या निनांवी कालेजाचे प्रोफेसर पहा, ते नुसत्या लौकिकावर
" खाऊन पिऊन खुशाल आरामांत आहेत. हा लौकिक तरी **पूर्वीं**च्या काळीं
" झालेला असून तोही **तिऱ्हाइतांनीं** मिळविलेला. जसें **पानचक्कीचें** चाक
" वर्षांस एकदां थोडेंसें रोगण दिलें ह्मणजे चांगलें नीटनेटकें राहून पाटाच्या
" पाण्यानें सारखें फिरून मोठ्या तत्परतेनें काम करीत असतें तसाच यांचा
" लौकिकही यांना कांहीं एक त्रास न पडतां यांच्या पोटाचें काम हाकीत
" असतो. खरोखरच या चक्कीवाल्यांसारखे सुखी प्राणी धन्य होत. काम
" असें त्यांना कांहींच करावें लागत नाहीं. शिक्षक या नात्यानें आमचे
" प्रोफेसर लोक जें कांहीं काम ह्मणून करीत त्याची आजही आठवण झाली
" ह्मणजे विलक्षण विस्मय होतो !

" इतकें होतें तरी आह्मांस असा अभिमान असे कीं " आमच्या युनि-
" व्हरसिटींत अयुक्तिक असें कांहींएक दिसावयाचें नाहीं, व युक्तिविरुद्ध
" गोष्टीवर विश्वासही कोणी ठेवीत नाहीं." अर्थात् आमच्या नवीन पिढीच्या
" पोकळ डोक्यांत 'पूर्वींचीं अज्ञानांधःकाराचीं युगें,' 'युक्तिविरुद्ध वि-
" श्वास' व 'सांप्रतची सुधारणा' वगैरे विषयीं कल्पनाव्यूह बनूं लागले;
" आणि सर्वांचींच माथीं पोकळ तर्कशास्त्रानें इतकीं फिरून गेलीं कीं त्यांत
" जे कांहीं शहाणे ह्मणून होते, त्यांसही खरें कोणचें, खोटें कोणचें, याचा
" विवेक नाहींसा होऊन श्रद्धेस आधार असा कोठेंच राहिला नाहीं. बाकी-
" च्यांना गर्वामुळें स्वर्गही ठेंगणें झालें. तात्पर्य, अध्यात्मविचाराची वास्त-
" पुस्त करण्यास कोणीच राहिला नाहीं ! असो. हाही मनुष्यजातीचा दैव-
" योगच समजला पाहिजे. हें युगच जर पाखंडाचें आहे तर त्याबद्दल

" वाईट वाटून तरी काय उपयोग? दुसरा काळ येईलच, छे छे येऊन
" ठेपला! जसे हृत्पिंडाचे संकोच व विकास अळीपाळीनें एकसारखे चालले
" आहेत, तद्वतच अश्रद्धा आणि श्रद्धा यांची मुदत आळीपाळीनें चालली
" आहे. जशी हिंवाळ्याच्या उदासपणाच्या आगोदर व मागूनही सुंदर वसं-
" ताची नवी सृष्टि असते, त्याप्रमाणेंच हें रहाटगाडगें आहे. कारण मनु-
" ष्याचें सर्व **जीवितच काळावर** अवलंबून आहे; व मनुष्याचें सर्व **चरित्र,**
" **प्रयत्न** व **दैव** हीं त्याचेकरितां **काळच** करीत असतो. आपल्या जीवि-
" ताचा मूळ पाया जो **अनंत** तोही या भरभर लोटणाऱ्या **काळानें** के-
" लेल्या **चिन्हांनींच** आपणांस व्यक्त होतो. तथापि या अश्रद्धारूप हिंवा-
" ळ्यांत जन्मास येऊन जागेपणीं दिवस कंठावे लागणें हें सुमनुष्यास
" कांहींसें जड जातें. कांहीं प्राणी सबंध हिंवाळ्यांत कोठें तरी आडोशास
" उबेंत स्वस्थ निजून राहतात; आणि मग हिंवाळचें बर्फ वगैरे चट नाहींसें
" होऊन वसंताची मौज दिसूं लागली ह्मणजे पुन्हां बाहेर पडतात; त्याच-
" प्रमाणें जे शंख असतात त्यांना अशा दिवसांत **सालामांका** युनिव्हर-
" सिटींत किंवा **सिबारिस** सारख्या इष्कबाजीच्या शहरांत कोठें तरी
" राहून, मग ईश्वरास करुणा आल्यावर चांगले चांगले लोक बळी घेऊन
" हा अश्रद्धेचा काळ गेला ह्मणजे सत्ययुग सुरू होतें, तों त्याची मजा
" घेण्याकारितां तेथून बाहेर येण्यास सांपडलें, ह्मणजे त्यांची चैनच नव्हे
" तर काय?"

सदरील प्रमाणें वर्णिलेल्या विलक्षण स्थितींत **ट्यूफेलसड्राक** साहेबांस चैन पडलें नसेल यांत शंका नाहीं. ते ह्मणतात:—"तीं अध्यात्मज्ञानाक-
" रितां हापापलेलीं मुलें शिक्षकरूप आपल्या दायांकडे मोठ्या आशेनें पहात.
" परंतु अन्नाचे ऐवजीं पूर्वेकडील वारा खाऊन त्यांना रहावें लागे. व्युत्पत्ति
" व वादविवादांत उपयोगी पडणाऱ्या अध्यात्मशास्त्रांतील घटपटादि निर-
" र्थक शब्दांची बडबड एवढें मात्र ज्ञान तेथें मिळण्यासारखें होते.[२०] तें बहु-
" तेकांपेक्षां मला चांगलें झालें. अकराशें मुलांत शिकण्याची कळकळ अक-
" रांना असली तर कांहीं नवल नाहीं. व अशांच्या सहवासानें मला एक
" प्रकारचा संस्कारही झाला. सुदैवानें दंगामस्तीकडे माझ्या मनाचा कल

२० हल्लींही काशींत प्रसंगविशेषीं सभा होतात त्यांत या पोपटपंचीं ज्ञानाची मजा पाह-ण्यास सांपडते.

" नसल्यामुळें विचाराकडे व वाचनाकडेच मी आपला बहुतेक वेळ घालवी,
" व वाचावयास मला मोकळीकही असे. त्या पुस्तकालयांतील अडगळींतच
" मला कांही चांगलीं चांगलीं पुस्तकेंही सांपडलीं. पण तीं त्या प्रोफेसर-
" रूपी द्वाररक्षकांस ठाउकही नव्हतीं! याप्रमाणें विद्वतेचा पाया झाला;
" आणि स्वतःच्या उद्योगानेंच कोणत्याही भाषेंतील कोणच्याही विषया-
" वरील ग्रंथ समजून साफ वाचण्याइतकी शक्ति माझे अंगीं आली. तसेंच
" मनुष्यानें अभ्यास करण्यासारखा अत्यंत महत्वाचा विषय ह्मटला ह्मणजे
" मनुष्याचें चरित्र होय. ह्मणून ग्रंथावरून मनुष्यचारित्राचें व विचारावरून
" लेखकाच्या अंतरंगाचें अनुमान करण्याचाही पाया मी घातला होता. त्य
" वेळीं सर्व सच्चिद्रूप सृष्टि मला केवळ यंत्रासारखी वाटत असून त्याच
" वेळेस हा मनुष्यत्वाचा सर्वोत्कृष्ट पाया मीं होऊन बुद्धिपुरःसर घातला!
" ही त्या वेळची गोष्ट पाहिली असतां मला फारच कौतुक वाटतें. आतां
" त्यावर उभारण्याच्या इमारतींत पुढें बरेच फेरबदल होतील खरे, परंतु
" त्यांचें स्वरूप पुढील अनुभवावर अवलंबून राहणार आहे."

याप्रमाणें जे खरे जोमदार असतात ते अशा संकटावस्थेंत सुद्धां या ऐहिक संपत्तीपेक्षांही अत्यंत महत्वाची जी ज्ञानसंपत्ति ती मिळवितात. आपल्या पुराणांत इस्माएलची[21] गोष्ट आहे त्याप्रमाणेंच आपल्या प्रोफेसर साहेबांनीं उजाड रानांत आपल्या तरतरीनें सर्वांत उत्तम जी स्वावलंबनाची दौलत ती प्राप्त करून घेतली. तथापि कसेंही असलें तरी, त्यांनीं तो काळ कंठिला तें स्थळ राक्षसांच्या आरोळ्यांनीं भरलेलें उजाड रानच होतें. तेथें असतांना संशयज्वराच्या भरांत आपली किती त्रेधा होत असे, अद्भुत चमत्कार व श्रद्धेची सकारणता याविषयीं आपण किती विचार केला, वगैरेबद्दल ट्यूफेलसड्राक साहेबांनीं बरेंच तपशीलवार वर्णन दिलें आहे. शिवाय ते ह्मणतात, " रात्रीच्या वेळीं जिकडे तिकडे काळोख पडला असतां
" व अंतरंगांत त्याहीपेक्षां निबिडतर संशयांधःकार पसरला असतांना
" जिकडे तिकडे सामसूम आहे, अशा वेळेस सर्वद्रष्ट्या परमेश्वरास काया-
" वाचामनें शरण जाऊन मृत्यूपासून रक्षण होण्याकरितां व ज्ञान
" तेजाचा लाभ व्हावा ह्मणून मी आर्त स्वरानें करुणा भाकून रडत असें.

---

२१ इसमाइल—अब्राहामचा दासीपुत्र; हा अरण्यांत एकटा असून स्वावलंबनामुळें धनुर्विद्येंत निपुण झाला अशी बायबलांत कथा आहे.

" या **संसाररूपी काळझोंपेंत अश्रद्धारूप** स्वप्नें पाहून **ईश्वरी चैतन्यानें**
" भरलेलें हें **जग** यमसदनाप्रमाणें मानण्याचें अघोर पातक करण्यास बरींच
" वर्षेंपर्यंत माझी छाती झाली नाहीं; आणि तेव्हांही माझ्या श्रद्धाळू जीवास
" अश्रद्धेला हार जातांना फारच क्लेश झाले. परंतु या नरकयातनांतून
" आपण एकदां गेलेंच पाहिजे असा ईश्वरी संकेत दिसतो. खऱ्या **श्रद्धेचा**
" **अंकूर** या संसाररूप प्रेतगृहांतून उद्भवण्यास पूर्वीच्या श्रद्धाहीन व पो-
" कळ झालेल्या धर्माचें बाह्य शरीर नष्ट झालें पाहिजे. तरच या **नवीन**
" रूपास तरतरी येऊन त्याचे अंगीं चित्तास समाधान देण्याची शक्ति
" येईल."

असो. इकडे या असह्य मानसिक यातना होत असतांच **ट्यूफेल्सड्राक** साहेबांचे पाठीस ऐहिक दुःखेंही हवीं तितकीं लागलींच होतीं. योग्य दिशा दाखविण्यास वडील माणूस नाहीं, कोणास त्याचेबद्दल सहानुभूति नाहीं, कोणास दया नाहीं, खर्चास पैसा नाहीं, आधारास आशा नाहीं; आणि इकडे तर त्यांचा तारुण्याचा भर असून अनेक कल्पनातरंगांमुळें इकडे जाऊं का तिकडे जाऊं अशी भुरळ पडलेली, तशांतच मनःसमुद्रांत कामनारूप लाटा उचंबळत असून साधनें तर अगदींच नाहींत. याप्रमाणें नवीन अनुभव घेणाऱ्या या नवीन **जीवास** चोहोंकडून अडचणी होत्या. तात्पर्य, त्यांच्या बुद्धिरूप कोंवळ्या ज्वालेवर हे ओल्या सरपणाचे पर्वतप्राय ढीग पडल्यामुळें ती अगदीं गुदमरून जाऊन अजूनपर्यंत स्पष्ट उजेडाची प्राप्ती न होतां जिकडे तिकडे कडू व कुबट धूर मात्र पसरत होता.

**ट्यूफेल्सड्राक** साहेब हे जरी अगदीं एकांतवासी भिडस्त, व शांतप्रकृतीचे होते, तरी त्यांची माहिती कांहीं मोठमोठ्या प्रसिद्ध पुरुषांस होती असें या पुडक्यांतील पत्रांवरून व इतर कागदांवरून स्पष्ट होतें. या लोकांनीं त्यास हातभार लाविला नाहीं ही गोष्ट निराळी; परंतु त्याकडे त्यांचे डोळे लागले होते हें उघड आहे.

याप्रमाणें इतक्या भयंकर व्यग्रतेंत असतांही **ट्यूफेल्सड्राक** साहेबांनीं कायद्यांचा अभ्यास करून परिक्षा दिली व नंतर कायदेपंडित या नात्यानें ते लोकांपुढेंही आले. परंतु त्यांच्या मिळकती संबंधाची जी तुटपुंजी व अर्धवट माहिती येथें आहे, ती तूर्त एकीकडे ठेवून कांहीं नीतिविषयक माहिती

येथें सांपडते ती देऊन सदर माहितीचा वाचकांनीं उपयोग करावा अशी विनंती करून आम्ही हा भाग संपवितों.

टच्यूफेलसड्राक साहेब ह्मणतात "या विश्वविद्यालयांत (युनिव्हरसिटींत) " असतांना **टाऊगुड** साहेबांची व माझी ओळख झाली. हे इंग्लंडांतील " मध्यप्रदेशापैकीं एक वजनदार गृहस्थ आहेत. जर्मनीच्या या भागांत " त्यांचा **काऊंट झाडार्म**[23]च्या घराण्याशीं कांहीं स्नेहसंबंध व नातेंही आहे. " व त्या योगें माझाही सदर **कौंट** साहेबाशी थोडासा परिचय झाला. " **टाउगुड** साहेबांची बुद्धि चांगली होती, पण तिला वळण कसें तें बिल- " कूल नव्हतें. त्यांचा स्वभाव मन मिळाऊ असून इंग्लंडांतील जे इतर " लोक इकडे येतात त्यांच्या सारखा तोरेबाज व हेकेखोर नव्हता. मात्र " त्यांचे मध्यें अज्ञान तुडुंब भरलें असून थोडेंसें व्याकरण व गुद्दागुद्दीची " तालीम याशिवाय ते तिसरें कांहींएक शिकले नव्हते. इंग्रजी भाषेची व " इंग्रज लोकांतील व्यवहाराची प्रत्यक्ष माहिती मला त्यांजपासूनच झाली. " त्यांचे डोळ्यांत कुशाग्रता नव्हती असें नाहीं. परंतु त्या डोळ्यांनीं काम " करण्यास योग्य दिव्याची मदत त्यास मिळाली नाहीं. आपला विद्याभ्यास " पुरा करावा या हेतूनें झाडार्म घराण्यांतील लोकांच्या ओळखीनें ते इकडे " आले होते. इकडे पाहिलें तर बाल्यदशेंत जेवढा अभ्यास होतो तेव- " ढाच त्यांचा झाला असून ते अभ्यास पुरा करण्याकरितां आले कोठें, " तर जेथें पूर्ण शिक्षणाची कल्पनाही नाहीं, मग तदर्थ प्रयत्न तो कोठला, " अशा आमच्या युनिव्हरसिटींत! या युगांतील मुलांची भाग्यहीनता व " दुर्दैव याविषयीं त्यांचें माझें नेहमीं बोलणें होई कीं इतके आह्मी परिश्रम " करूनही जेव्हां आपणांस या युनिव्हरसिटच्या जगांत सोडून देतात त्या " वेळेस आह्मांस दाढीमिशा आल्या असतात हें खरें पण त्याशिवाय " माणुसपणांतील कोणचाही गुण अंगीं आला नसतो. अमुक एक वस्तु " घेऊन तिजवर आह्मी काम करावें असें आह्मांस कांहींच शिकविलें नसतें.[24]

---

२२ टाउगुड=टफगट=चिवटस्नायूंचा—योग्यायोग्य मानापमान वगैरे न पाहतां आपला हेतु साधून घेण्याकडेच ज्याची चिकाटी आहे तो.

२३ झाडार्म—टीप २२ चाच अर्थ.

**२४** शाळेंतील अगर कालेजांतील शिक्षण क्रमांतून बाहेर निघाल्यावर ज्याची त्याची प्रवृत्ति नोकरीकडे असते याचें एक कारण या शिक्षणांत साक्षात व्यवहारास उपयोगी

" शिवाय अमुक एका गोष्टीवर श्रद्धा ठेवावी असेंही शिक्षण नसतें. **टाउगुड**
" साहेब ह्मणत, 'आमच्या डोक्यांच्या बाहेरून किती उत्तम व झगझगीत
" टोप्या असतात. पण आंत पहावें तो सर्व पोकळ असून वकिली तर्क-
" शास्त्र व शब्दांचा फेस यांहून दुसरें कांहींच दिसत नाहीं! एखाद्यास
" जोडे शिवण्याचें काम किती थोड्या खर्चानें येतें. पण माझी स्थिति
" पहा. इतका पैसा ओतून अखेरीस मला अमुक एक गोष्ट करितां येते
" असें आहे का? मित्रा, मी ईश्वरास स्मरून सांगतों कीं, येथें असतांना
" नुसत्या अन्नवस्त्रांत जितका माझा पैसा खर्च झाला तितका जर एखाद्या
" धर्मार्थ दवाखान्यास दिला असता, तर तेथें बऱ्याच अनाथ गरीब लोकांस
" अन्नपाणी व औषधोपचार सतत चालले असते!" याप्रमाणें त्याचें भाषण
" ऐकून मी त्यास ह्मणें, "बाबारे मनुष्याचे अंगीं पचनक्रियेची शक्ति
" आहे, व तिचा उपयोग सारखा झाला पाहिजे; मग तेवढ्याकरिता चोरी
" करावी लागली तरी हरकत नाही; आतां आपल्या शिक्षणाच्या वाझफळ-
" पणाबद्दल पाहिलें असतां माझें तर मत असें आहे कीं, आपलें वस्त्र फाटलें
" ह्मणून त्याच्या चिंध्या फाडीत बसणें हें कांहीं शहाणपणाचें काम नाहीं!
" येथें उत्तम फळें मिळतील या आशेनें आपण आलों. आतां, हें कांटे-
" झाड ठरलें, ह्मणून आपल्या पदरीं आहे त्यांतलेंही आणखी आयुष्य
" खर्चून त्या काट्यांस लाथा मारीत बसण्यांत काय जीव आहे? ही येथें
" हवीं तितकीं पुस्तकें आहेत, व तीं वाचण्यास ईश्वरकृपेनें आपणांस
" बुद्धिही आहे. ही सर्व सृष्टी आपणापुढें आहे, आणि तिजकडे पाहून
" अनुभवज्ञान करून घेण्यास आपणांस डोळेही आहेत. मग त्या कामास
" एकदम आपण लागावें हेंच बरें नव्हे काय?

" पुष्कळ प्रसंगीं आमचे भाषणास विलक्षण रंग येई; व कधीं कधीं तर
" आह्मी त्यांत अगदीं तल्लीन होत असूं. या संसारचित्रांत चोहोंकडे
" भयंकर शूळ पुरले असून त्यांचे भोंवतीं रायविनोद[२५] नाचत आहेत,

---

असें कांहीं नसतें, दुसरें असें कीं संसाराचा लकडा पाठीस लागला असून नोकरीशिवाय ताबडतोब साह्य मिळण्याचा दुसरा मार्ग नाहीं, तिसरें स्वतंत्र धंद्यास भांडवल नसून त्यास लागणारें ज्ञान या देशांत दुर्मिळ झालें आहे; चौथें इतर मार्गांनीं सचोटीनें निभाव लागत नाहीं; निदान सचोटीच्या माणसास इतका साक्षात फायदा इतरत्र होत नाहीं.

२५ रायविनोद—विदूषक, खुषमस्कऱ्या.

" आणि त्यांत असंख्य माणसांची कत्तल होऊन कांहीं आंतडीं इकडे कांहीं
" तिकडे अशीं पसरलेलीं आहेत असें पाहून आह्मास मोठा विस्मय होई. हें चित्र
" चटकदार रंगाचें व अत्यंत भयंकर आहे. पण मोठ्या शूर पुरुषांसारखे
" आह्मी तें निरखून पाहण्यास भीत नव्हतों ! माझ्या एकट्या संबंधानें
" पाहिलें तर असले प्रसंग मला फारच आनंदाचे वाटत; व त्यामुळें या
" प्रेमळ, पण हेकेखोर आणि आड वाटेंत शिरणाऱ्या **टाउगुड** साहेबासंबं-
" धानें मनांतील **स्नेह**विकारास भरतें येऊन त्यांच्याशीं मैत्री करावी
" असेंही प्रसंगवशात् मला वाटत असे. आतां हा स्नेहविकार अगदींच नष्ट
" झाला आहे- पण त्या वेळेस मी अगदींच धर्महीन असून मला वाटे कीं
" कांहीं शर्तीवर या **टाउगुड** साहेबांशींही बंधुत्वाचें नातें करून प्रेमपुरः-
" सर त्यांस आपल्या हृत्कमलीं ठिकाण द्यावें. पण हळू हळू तो भ्रम
" नाहींसा झाला; हें नवीन युग व त्यांतील उणीवी मला कळूं लागल्या.
" कारण नीतिशास्त्रांतील **परिणामवादी**[२६] लोकांचे मताप्रमाणें हा **जीव**
" ह्मणजे केवळ **अन्नपचनाचें यंत्र** होय व **फिनिश** भाषेंत तर जीवाला
" अन्नपाचक अशा अर्थाचाच शब्द आहे. तेव्हां दोन मनुष्यांचा संबंध
" ह्मणजे नुसता भोजनसंबंध होय. ह्मणून पुढें आह्मीं स्नेहबद्ध मित्र
" होण्याचे ऐवजीं भोजनमित्र मात्र झालों; आणि पोकळ कल्पनातरंगांचा
" जो मला सर्वत्र कंटाळा वाटतो तो मीं येथेंही आपल्या वर्तनानें व्यक्त
" करून दाखविला. "

याप्रमाणें हें छोटेंसें गूढ कथानक येथें अर्धवटच पुरें केलेलें सांपडतें. यानंतर या शूर **टाऊगुड** साहेबाचें काय झालें असावें बरें ! तो या आत्मचरित्रपर लेखांचे पसाऱ्यांत कोठें गडप झाला त्याचा पत्ता लागत नाहीं. आमच्या वाचकांपैकीं कोणास हा मनुष्य इंग्लंडच्या मध्यप्रदेशांत आढळला असल्यास नजाणों !

---

२६ नीतिशास्त्रांतील परिणामवादी लोक—कांहीं लोकांचे ह्मणणें असें आहे कीं एखाद्या कृत्याचे नीतिदृष्ट्या बरें वाईट पण ईश्वरी स्फूर्तीमूळें अंतःकरणप्रवृत्तीनें आपोआप कळतें व तें ठाम ठरलेलें आहे. यांच्या विरुद्ध, परिणामवादी लोक ह्मणतात कीं एकंदर परिणाम पाहतां ज्या कृत्यापासून सुख होतें तें सत्कर्म; ज्यापासून दुःख होतें तें दुष्कर्म. या लोकांतही दोन तट आहेत: एकाचें ह्मणणें हा परिणाम आपले पुरता पाहिला ह्मणजे झालें; दुसऱ्या पक्षाचें ह्मणणें सर्व मानवजातीवर काय परिणाम होईल याचा विचार करून जर तो चांगला होत असला तर तें सत्कर्म वाईट होत असला तर दुष्कर्म असें ह्मणतां येईल.

# भाग चवथा.



## उद्योग.

आमचे **प्रोफेसर** साहेबांचा पुढील आत्मचरित्रपर लेख बहुधा कालेज सोडण्याचे वेळचा असावा. ते म्हणतात, " याप्रमाणें माझ्या शिक्षणापासून " एकंदरींत कांहीं तरी निष्पन्न झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. झालें " म्हणावयाचें एवढेंच कीं ह्या मीं, डायोजिनिस ट्यूफेल्सड्राकनें, या नाशवंत " शरीराचे योगानें कांहीं घन अवकाश व्यापिला असून, त्यामध्यें **आशा,** " **विकार, विचार,** वगैरे कांहीं **आत्मिकशक्ति** व **चलनवलनात्मक** " कांहीं **शारीरिक शक्ति** आल्या; आणि ज्या **अनिर्वाच्य वस्तूस मनुष्य** " म्हणावयाचें त्याचें बरें वाईट जें कांहीं ऐहिक सामान व साहित्य असा- " वयाचें तें हेंच. यांचे योगानें **अज्ञानतमाबरोबर** थोडी बहुत तरी लढाई " देण्याचें सामर्थ्य मजमध्यें आलें. यांत विशेष म्हणण्यासारखें कांहीं नाहीं. " कारण नुसत्या कुदळी खोऱ्यानें काम करणाऱ्या मजुराचे आंगीं सुद्धां " खांच खळगे कांटे वगैरे नाहींसे करून पूर्वीं जेथें अव्यवस्था असते तेथेंच " व्यवस्था करण्याचें सामर्थ्य नसतें काय ! तेंही असो. नुसतें एखादें घुंगुरटें " घेतलें तरी त्याच्या आंगीं सुद्धा असें कांहीं सामर्थ्य असतेंच. बाह्यसृष्टींत " जरी त्याचे हातून कांहीं होत नसलें, तरी जे पदार्थ पूर्वीं त्याच्या शरी- " रांत नव्हते, ते आंत घेऊन त्यावर एक प्रकारची क्रिया करून त्याच्या " योगानें, पूर्वीं हवेंत जें जिकडे तिकडे सामसूम होतें, त्याच हवेंतून तें " कर्ण मधुर गुंजारव करीत नाहीं काय ?

" तेव्हां ज्याचे आंगीं **विचारसामर्थ्य** आहे, जो **विचाररूप किमया** " करण्याची विद्या शिकत आहे किंवा शिकला आहे, त्याचे सामर्थ्याची " काय गोष्ट विचारावी ? याला मी **किमया**[१] ह्मणतों., याचें कारण इतकेंच " कीं आजपर्यंत जे जे अनंत चमत्कार झाले आहेत ते ते सर्व या **विचार** " **सामर्थ्यानेंच** झाले असून पुढेंही जे होणार असतील तेही **विचारा-**

---

१ किमया—रसायणक्रियेनें नवीन सोनें तयार करण्याची काल्पित विद्या.

" मुळेंच होतील. त्यांपैकीं आज आपणांस कांहीं तर प्रत्यक्ष दिसत आहेत.
" कवींच्या व ऋषींच्या कर्तृत्वानें या जगांत किती उलथापालथ व नवीन
" सृष्टि होते तिचें वर्णन मी करीत बसत नाहीं. परंतु वाफेच्या इंजनाची
" शिटी होते ती तर सर्वांना ऐकूं येतेना? स्काटलंडच्या एका यःकश्चित्
" कासाराचे डोक्यांत एका यंत्राची कल्पना आली. तीच आज आगीचे
" पंख लावून महासागरावरून वावरून असंख्य खंडी माल नेण्याआण-
" ण्याचा खटाटोप करीत नाहीं काय? कोणच्या जादूगाराच्या मंत्रांत
" याहून जास्त सामर्थ्य आहे? ही कल्पना देशांत नुसते कपडे विणूनच
" राहिली नाहीं; तर जगांतील **सर्व समाजाची** उलथापालथ करून **मांड-**
" **लिक राज्यव्यवस्था, शिकारखान्याचें रक्षण,** वगैरे वेडगळ गोष्टी
" नाहींशा करून त्यांचे ऐवजीं **उद्योग व शहाण्या लोकांचें सम्राज्य** यांचा
" अंमल होण्याकरितां हळू हळू आपल्यास नकळत आपली तयारी करीत
" आहे. मनुष्य जातीचें सत्व नष्ट करण्याची सैतानाची खटपट सदैव
" चालली असून सर्व मनुष्यें त्याचे शत्रु होत. तथापि विचारी मनुष्यांतलें
" जातिगत सत्व इतरांपेक्षां जास्त असल्यामुळें दुष्ट सैतानाचा शत्रु विचारी
" मनुष्यासारखा दुसरा कोणी नसेल. असा विचारी मनुष्य उत्पन्न होऊन
" आपल्या सामर्थ्याचें आविष्करण करूं लागला, कीं या **तमोराजाचें**

---

२ जेम्स वॅट—वाफेच्या इंजनाचा विख्यात शोधक (१७३६–१८१९) हा मूळ दुर्बिणी नीट करणारा होता. तो अत्यंत उद्योगी व कल्पक असून त्यानें मनुष्याची शक्ति विलक्षण प्रकारें वाढवून आपल्या देशास लक्ष्मीचें माहेरघर केलें.

३ सैतान—ईश्वराचा व सदाचाराचा शत्रु. आपल्या पुराणांत कोणी तरी दैत्य प्रत्येक काळांत ईश्वराचा व सदाचाराचा शत्रु असल्याविषयीं वर्णन आहे. त्याचप्रमाणें विश्वामित्र याजकडेही अंशत्वें हा अधिकार असे. सांप्रतचें त्यांचें स्वरूप कली हें आहे. याशिवाय वेताळ, पिशाच्यें हींही आहेत. परंतु या विभूती ईश्वरेच्छेनें व ईश्वरी हेतु साधण्याकरितांच झालेल्या आहेत व त्या ईश्वराकडून मुक्ति घेत असतात अशी आपली कल्पना आहे. सैतान या विभूतींतील कल्पना थोडीशी निराळी आहे. सैतान हा देवाचा कट्टा वैरी असून देवाचे हेतु हाणून पाडावे हीच त्याची कामगिरी आहे. त्यानें मनुष्यास मोह उत्पन्न करून ईश्वराज्ञेविरुद्ध ज्ञानवृक्षाचें फळ मनुष्याकडून चाखवून त्याच्या पाठीस मृत्यु व नरकयातना या शिक्षा लाविल्या असें बायबलांत वर्णन आहे. अर्थात् मनुष्य हा देवानें सन्मार्गवर्ती व विवेकी प्राणी ह्मणून उत्पन्न केला आहे; व तो सन्मार्गानें व विवेकानें चालेल तर ईश्वरास संतोष होईल, ह्मणून सैतान हा नेहमीं त्यास आडमार्गी नेण्याकरितां झटत असतो.

१५४

" अंतःकरण खचितच खडबडत असेल, व या नवीन उदयास आलेल्या
" पुरुषाचा पाडाव करण्याकरितां किंवा त्यास बलहीन करण्याकरितां त्यास
" आपले नवे दूत नव्या कवाइतीनें तयार करावे लागत असतील.

" असो या सृष्टींतील एक प्राणी या नात्यानें मजवरही विलक्षण काम-
" गिरी आली. परंतु एक मात्र अडचण राहिली. कारण वर लिहिल्याप्रमाणें
" जरी आपण ज्ञानराज्याचे पूर्ण हक्कदार असून दुष्ट काळाशीं साम,
" दाम, दंड, भेद या उपायांनीं लढण्याचा जरी आपला अधिकार आहे, तरी
" दुर्दैवाची गोष्ट ही आहे कीं आपल्या राज्याभिषेकास फारच त्रास पडतो,
" आणि आपला राजदंड आपल्या हातीं पडतां पडतां मारामार होते. कधीं
" कधीं तर हा राजदंड आपल्या दृष्टीसही न पडतां आपण त्यास मुकतों.

या विलक्षण दृष्टांतांत टच्यूफेलसड्राक साहेब यांचा एवढाच अर्थ आहे काय कीं मनुष्याला योग्य उद्योगास लावण्यास अनंत अडचणी असतात? ते म्हणतात, "वास्तविक पाहतां माझें कर्म [ कर्तृत्व ] हेंच माझें खरें
" राज्य होय; माझे नैसर्गिक धर्म व इतर प्रकारची जिंदगी हें नव्हे.
" प्रत्येक मनुष्यास कांहीं विशेषगुण व विशेष प्रकारची परिस्थिति हीं
" ( दिलेलीं ) असतात; आणि या दोहोंच्या मिश्रणानें होणारा कांहीं तरी
" उत्कृष्ट क्रियारूप परिपाक असतो. आपण जन्मास येऊन जें कांहीं करा-
" वयाचें असतें तें हेंच कर्म. परंतु मूळारंभीं अत्यंत कठिण कोडें हें येऊन
" पडतें, कीं हें आपल्या हातून होण्याजोगें उत्कृष्ट कर्म कोणचें हें आप-
" णांस कळावें कसें! आपले आंगीं गुण कोणचा आहे, व आपल्या
" सभोंवारची परिस्थिति कशी आहे याचें बिनचूक ज्ञान होऊन या दोघांचे
" संयोगापासून घडून येण्यासारखें उत्कृष्ट कर्तव्य कोणचें हें आपणांस
" समजावें कसें? कारण हा तरुण प्राणिवृक्ष कर्तृत्वरूप अनंत कळ्यांनीं
" भरलेला असतो. ( त्याचे हातून होण्यासारख्या पुष्कळच गोष्टी असतात )
" त्या सर्वांमध्यें अत्यंत महत्वाचें आपलें खरें कर्तव्य कोणचें हें त्यास
" कळूं नये हें किती वाईट आहे? इतर कोणा पुरुषाच्या चारित्राचें अनुकरण
" करीन ह्मटलें, तर हा पुरुष एकतर पूर्वींच्या कोणच्याही पुरुषाहून भिन्न
" असून त्याचे गुणधर्मही निराळे असतात. त्याचप्रमाणें त्याची परि-

४ ह्मणजे या देहाचें पूर्ण सार्थक्य होण्याजोग्या कृत्यांचा समूह.

" स्थितीही इतर सर्व परिस्थितीपासून भिन्न असते. ह्मणून कोणच्याही
" पुरुषाच्या चारित्राची अस्सल बरहुकूम नक्कल करूं ह्मटलें तर घडत नाहीं.
" त्याच्या हातून होण्यासारखें जें कांहीं उत्कृष्ट कर्म असेल तें त्याच्या
" **विशेष स्वभावास** व त्याच्या **विशेष परिस्थितीस अनुरूपच** असलें
" पाहिजे. दुसरें असें कीं त्याची परिस्थिति त्याचे आंगचे कर्तृत्वास जुळ-
" ण्यासारखी फारच क्वचित् असते. जरी तो विलक्षण बुद्धिमान् असला
" तरी गरीब असेल, सहाय्यहीन असेल, अशक्त असेल, लाजाळू असेल.
" पण सर्वांत शोचनीय गोष्ट ही कीं त्याचे अंगीं थोडें बहुत मूर्खत्वही
" असतें. या अनेक कारणांमुळें आपले हातून होण्यासारख्या ज्या अनंत
" गोष्टी असतात, त्यांच्या अडगळींत खरोखर आपण करण्यास **योग्य**
" अशी **मुख्य महत्वाची गोष्ट** कोणची ती शोधण्याकरितां चाचपीत असतां
" बिचाऱ्याचा हात भलतीवरच पडतो. याप्रमाणें आपल्या हातून होण्या-
" सारखी उत्तम गोष्ट कोणची हें कळेपर्यंतच आपल्या टीचभर आयु-
" ष्याचा बराच भाग जातो. आणि मग संवयीनें आपल्या डोळ्यावरची
" अंधेरी जाऊन, जवळ, लांब वगैरे गोष्टी कळूं लागून मग आपलें विशेष
" कर्तव्य कोठें सांधींत पडलें असेल तें सांपडलें तर सांपडतें. बहुतेकांचें
" तर सगळें आयुष्य अशा खटपटींतच जातें; व हेंच काम आपलें असें
" समजून कांहीं तरी हातीं घ्यावें, व मग तें होत नाहीं ह्मणून सोडून
" दुसरें घ्यावें, मग तिसरें, याप्रमाणें करीत करीत सत्तर वर्षें झालीं, ह्मणजे
" त्रासून बिचारा बाल्यदशेंतच आपलें शेवटचें ह्मणजे मरण्याचें काम
" करितो, व तेंही करण्यांत त्याला चूक करितां येत नाहीं, तें त्याचे हातून
" बिनसण्यासारखें नाहीं, ह्मणून!

" हा जबरदस्त नेत्ररोग सर्वांसच थोडाबहुत असतो, आणि एका
" गोष्टीची जर आपणांस अनुकूलता नसती तर बहुतेकांचा शेवट असाच
" झाला असता. ती गोष्ट ह्मणजे **क्षुधा**. त्या बिचारीनें आपणांस इतपत
" तरी वांचाविलें आहे. कारण तिचा स्वभाव पराकाष्ठेचा कडक असल्या-
" मुळें आपणांस आपल्या कामाची निवड ताबडतोब करावी लागते. तिचे
" करितांच उनाड तरुण मुलांसाठीं उमेदवाऱ्या, करारपत्रकें, वगैरे पुढील
" तरतुदीचे मार्गदर्शक उपाय केले आहेत. त्यांचे साह्यानें कर्तृत्वास ज्य
" अनेक मोघम दिशा असतात त्या योग्य वेळीं आपोआप सुटून मनुष्य

" कोणचा तरी एक धंदा पतकारितो. त्यांतही त्याचें थोडें बहुत कर्तृत्व
" फुकट जातेंच, तरी सर्वांत मोठी जी **काळाची** हानी ती तरी होत नाहीं.
" याप्रमाणें **आधिभौतिक** गोष्टींत व्यवस्था लागते. **आध्यात्मिक गोष्टींत**
" तर हा पुरुष जन्मतः अंधळाच असून मांजरें वगैरे कांहीं प्राण्यांस जसे
" उपजल्यावर नऊ दिवसांनीं डोळे येतात तशी सुद्धां त्याची स्थिति नसते.
" **आध्यात्मिक दृष्टि** बराच काळ लोटल्यावर येते. कधीं कधीं तर ती
" अगदींच येत नाहीं. अशा स्थितींत आपणाकरितां **शास्त्रें** ( ह्मणजे धर्म,
" कायदा, व वैद्यक, हीं कालेजांतून शिकविलीं जाणारीं पोटभरू शास्त्रें )
" केलीं आहेत ही तरी मोठीच सोय नाहीं काय? जसा एखादा घाण्याचा
" बैल–त्याला एका डोळ्यानें किंबहुना दोन्हीं डोळ्यांनीं दिसत नसलें तरीं
" गैरसोय नसते तद्वतच हे पोटभरू लोक एका जागेभोंवतीं गिरके घेत घेतच
" आपण किती तरी मजल मारिली, असें मनांतल्या मनांत समाधान मानि-
" तात. इकडे फायदाहीं कांहीं थोडा थोडका होत नाहीं. स्वतःला भाकरी
" मिळते; आणि **समाजरूपी घाण्याला** एका बैलाचें काम होतें. या
" प्रमाणें मलाही आधारास एक दोरी मिळाली होती. पण तिनें मला
" आधार न होतां उलट फांस मात्र बसला, आणि ती मीं तोडिली नसती
" तर बहुतेक प्राणच घेऊन बसती. त्यानंतर **पिस्टोलनें** म्हटल्याप्रमाणें
" माझी शिंपींतल्या किड्यासारखी अवस्था झाली. शक्तिनें म्हणा, युक्ती-
" नें म्हणा, ही **संसाराची शिंप** उकलल्यावांचून तर मला गत्यंतर नव्हतें,
" आणि ती उकलण्याची मला शक्तीही होती. तरी ती उकलितां उकलेना
" आणि तिच्यांतच माझा शेवट होतो कीं काय अशी मला धास्ती पडली."

या उताऱ्यांत आपल्या आत्मचरित्रकारावर पुढें जे प्रसंग गुदरावयाचे होते त्यांचें दिग्दर्शन आहे. दुर्दैवेंकरून पुढें ते प्रसंग गुदरले. तेव्हांचें बरेंच तपशीलवार पण अव्यवस्थित वर्णन या **मीन** राशीचे पुडक्यांत आहे. जसा एखादा छानदार घोडा, दुवासण पायबंद तोडून, तबेल्यांतून पळून जावा, परंतु जिकडे जावें तिकडे भक्कम कुंपण त्याच्या आड येऊन वाट सांपडूं नये; मग पलीकडे उत्तम हरळीचें गवत दिसूनही उपयोग काय? एक तर त्या हरळीकडे पहात झुरून झुरून त्यानें मरावें, नाहीं तर इकडे

५ पिस्टोल—शेक्सपियरच्या एका नाटकांतील एक भूमिका.

घूस, तिकडे घूस, असें करावें. याप्रमाणें हजारों प्रयत्न करून कुंपणावर कपाळ अपटून अपटून, व पायांना जखमा लागून, घायाळ झाल्यावर कांहीं ईश्वरी चमत्कार होऊनच कीं काय त्याची उडी अकस्मात अचानक पलीकडे जाते. पलीकडे गेल्यावर त्या टवटवीत, चवदार, हरळींत जावयास सांपडलेंच नाहीं! तरी पण एका अफाट जंगलांत, जेमतेम जीव वांचण्यापुरतें खावयास मिळून स्वातंत्र्याचाही उपभोग होईल, अशा ठिकाणीं तो घोडा जाऊन पडावा; तशीच स्थिति आमच्या प्रोफेसर साहेबांची झाली. त्यांनीं आपला कायद्याचा धंदा टाकून दिला; मग काय करावें हें त्यांचें त्यांनाही सुचेना; मार्ग दाखविण्यास कोणी नाहीं, यामुळें अंतरंगांतील वाटाड्या जो विश्वास, त्याचा अभाव त्यास पूर्वींपेक्षांही जड जाऊं लागला. परंतु काळ हा पाठीस लागलाच होता; तो कांहीं केल्या थांबेना. अर्थात् प्रोफेसर साहेबांस थांबण्यास सवड नव्हती. कांहीं तरी काम केल्यावांचून गत्यंतर नव्हतें. इकडे मनांत विकारांचें प्राबल्य होऊन समाधानांस आधार बिलकूल राहिला नाहीं; उत्कृष्ट गुण अंगीं असून त्यांचा उपयोग करण्यास जागा नाहीं! यामुळें त्यांचें चित्त अस्वस्थ होऊन त्यांस समाधान नाहींसें झालें. आणि 'करावयास कांहीं नाहीं आणि विश्रांतीस क्षण नाहीं' हें एकपात्री नाटक त्यांनाही करावें लागून त्यांतले जे अनेक दैवयोग होते त्यांशीं अखेरपर्यंत सामना करून मग निघेल तो तथ्यांश काढावा ही कामगिरी त्यांचेकडेही आली!

तथापि सर्व दोष ट्यूफेल्सड्राक साहेबांकडेच आहे असें ह्मणतां येत नाहीं. या दाव्याचा त्यांना फारच त्रास झाला असून तें दावें तोडणें अखेरीस त्यांना भाग पडलें. त्या निनावी युनिव्हरसिटींतून त्या निनावी शहरांत आल्यावरची त्यांची सामाजिक स्थिति कोणासही चांगली वाटण्यासारखी नव्हती. त्यांची कायद्याची पहिली परीक्षा फार उत्तम रितीनें उतरली व तिचा आपणांस उगीच बाऊ वाटत होता असें त्यांना वाटणेंही साहजिक आहे. या परिक्षेनें ते कायदेपंडित या सामान्य पदवीस चढले खरे; परंतु त्याचा उपयोग काय? अजून त्यांना कामाची ददात पूर्वींसारखीच होती. बिनवशिल्याच्या मनुष्याच्या आशा बहुधा फलद्रूप होत नाहींत व अशा स्वभावाच्या मनुष्यास कोणी आशाही लावीत नाहीं. ट्यूफेल्सड्राक साहेब ह्मणतात, "माझ्या बरोबरींचे कायदेपंडित व्यवहारदृष्ट्याही कायदेपंडित "होते. ते मोकदमे तयार करीत, त्यांचा गोषवारा काढीत, व समजण्यासारखें

" शब्दपांडित्यही करीत. पण याशिवाय दुसऱ्या कोणच्याही प्रकारची
" कार्यदक्षता त्यांचेमध्यें दिसून येत नसे. ज्या डोळ्यांनीं ते पहात त्यांत
" जास्त तरतरीच नव्हती. उदात्त गूढ अगर आध्यात्मिक विचार करण्यास
" साधनीभूत बुद्धि त्यांना नव्हतीच. बढतीचा थोडासा सुगावा लागला,
" ह्मणजे तेवढ्याकरितां मात्र ते तत्पर असत." या शब्दांवरून ट्यूफेल्सड्राक साहेबांचा आपल्या इतर व्यवसायबंधूंशीं असलेला बेबनाव तर दिसतोच, परंतु आपल्या मानहानीबद्दल रागाचा आवेशही त्यांत दिसत नाहीं काय? यावरून आह्मांस तर असें वाटतें कीं हे व्यवहारैकदृष्टि असलेले कायदेपंडित ट्यूफेल्सड्राक साहेबांच्या तऱ्हेवाईकपणाबद्दल त्यांची चेष्टा करीत असतील; आणि त्यांचा धिःकार करावयाचें जरी त्यांस साधलें नसलें, तरी त्यांचा द्वेष साधण्यास तरी ते प्रयत्न करीत असतील. एकंदरींत यांच्या त्यांच्यामध्यें स्नेहभाव असणें अशक्य होतें. आणि आपल्या चलतींत जी ही तफावत आहे ती आपल्या श्रेष्ठपणामुळें आहे कां आपल्या उणेपणामुळें आहे याचा त्यांस संशय होता तोंच तरुण ट्यूफेल्सड्राक साहेब त्यांच्यापासून अलग राहूं लागले.

कदाचित् त्यांना जें थोडेंबहुत वकिलीचें काम मिळे, तें त्यांचे हातून चांगलें होत नसेल; कदाचित् चांगलें झालें तरी मनाच्या उल्हासानें होत नसेल. अनुभवज्ञान आणि तरतरी यांविषयीं त्यांनीं या कागदांत बरीच वाचाळता केली आहे; परंतु आपल्या कर्तबगारीची वाजवीपेक्षां जास्त घमेंड त्यांस नसेल असें तरी कशावरून? कारण जरी ती त्यांचे भाषणांत दिसत नसली तरी त्याचें कारण ती कदाचित् त्यांचे मनांत फार खोल रुजली असेल. इतका अभिमानी व निस्पृह मनुष्य कधींच लोकप्रिय होत नसतो, आणि त्या वेळीं त्यानें आपल्या निस्पृहतेचें कसकसें प्रदर्शन केलें असेल, याची कल्पना आपणांस होण्यासारखी आहे; पण त्यांच्याच लेखांत असा कांहीं उल्लेख नाहीं काय? होय. ते काय ह्मणतात पहा, "एखाद्या नवशिक्या पोरा-
" प्रमाणें मला त्या वेळीं वाटत होतें कीं नेमलेलें काम झालें कीं आपली
" कामगिरी आटोपली. पण या संसारांत दुसऱ्या लोकांतील व आपल्यांतील
" पापवासना व मौर्ख्य यांच्याशींही आपणांस टक्कर दिली पाहिजे हें
" मला त्या वेळीं ठाऊक नव्हतें." कसेंही असो. दुय्यम वकील झाल्यापासून स्वतःचे नांवावर वकीली मिळेपर्यंतचा त्यांच्या क्रम फारच मंदगतीनें

चालला होता; आणि जे लोक पूर्वीं त्यांची पाठ थोपटीत, व पुढें त्यांस साह्य करतील अशी आशा होती, त्यांचे त्याजवरचें प्रेम हळू हळू कमी होऊन हा मनुष्य तत्वज्ञानी ( व्यवहार शून्य ) आहे असें ह्मणून त्याची त्यांनीं वास्तपुस्त करण्याचें टाकून दिलें. या कठोर वर्तनाबद्दल टीका करून प्रोफेसर साहेब ह्मणतात, "काय चमत्कार आहे पहा! जणूं काय तत्वज्ञा-
"नांत तदंशभूत जो व्यवहार त्याचा अंतर्भाव होतच नाहीं! जणूं काय
"आकाशगामी मनुष्यास पृथ्वीवर वाटचालीचेंही काम होत नसेल! परंतु हें
"जग एखाद्या ह्मातान्या बाईसारखें आहे. ती प्रथम एखादें मुलामा लाव-
"लेलें तांब्याचें नाणें सोन्याचें ह्मणून घेते; व याप्रमाणें बरेच वेळ फसल्या-
"वर मग ती खऱ्या सोन्याचे नाण्याचाही विश्वास न धरितां सगळा खुर्दाच
"जमा करीत बसते! तशांतलीच या जगाची रहाटी आहे."

'पृथ्वीवरील वाटचालीच्या' ही कामास या 'आकाशगामी पुरुषास' कोणी न पतकरल्यामुळें त्याचा कायमचें आकाशगमन करण्याचा प्रसंग कसा टळला असेल, हें या कागदांत कोठें व्यक्त होत नाहीं. सद्गुणी म्हातारी ग्रिचेन याच्या संसारांतून व कदाचित् या भूतलावरूनही नाहींशी झाली असावी असें वाटतें. बरें एखादा कल्पवृक्ष किंवा निदान कल्पकंथा तरी त्याला सांपडली होती असेंही कोठे दिसत नाहीं. अर्थात् क्षुधेचा कडक स्वभाव चांगला माहित असल्यावर अशा स्थितींत कोणासही चैन पडणार नाहीं. कितीही भाषा व शास्त्रें त्याला येत असलीं तरीं नुसत्या खाजगी शिकवणीपासून तादृश प्राप्ती होणें अशक्य होतें; व ते म्हणतात कीं ग्रंथरचनेचा गुण आपले मध्यें असेल असें त्या वेळीं आपणांस वाटतही नसून नुसत्या भाषांतरावर मात्र कसें तरी पोट बाहेर पडत असे. ते लिहितात "तशांतूनही मी जगलों हें खरें; कारण आज मी प्रत्यक्ष जिवंत आहें!" 'जिवंत प्राण्यांत जीव असतो' अशी एक जुनी ह्मण आहे. त्या ह्मणीची सप्रमाणता दाखविण्याकरितांच कदाचित् ट्यूफेल्सड्राक साहेबांनीं हें वाक्य लिहिलें असावें; एरवीं त्यांचा काय हेतु होता, नकळे.

या कागदांत कांहीं निकाल झालेल्या भाडेपट्याचे वगैरे हिशोबी कागद आहेत, त्यावरून त्यांचे हातांत थोडा तरी पैसा खेळत असावा असें दिसतें. आणि त्यांची स्थिति जरी एखाद्या घरंदाज मनुष्यासारखी नसली, तरी निदान बिऱ्हाडकऱ्या इतपत तरी असेल असें वाटतें. याच पुडक्यांत पत्रांच्या

गबाळामध्यें दोन पत्रें सांपडलीं आहेत त्यांवरून त्यांची समाजांतील स्थिति थोडीशी व्यक्त होते. त्यापैकीं एकावर तारीख किंवा लिहिणाराची सही वगैरे आढळत नाहीं. मात्र सहीचे जागेवर एक मोठा थोरला शाईचा डाग आहे. त्यांतील मजकूर असा आहे. " आह्मी पूर्वींच दुसऱ्याच्या वचनांत गुंतलों असल्यामुळें, आतां आपणांस सरकारी वकिलीची जागा देण्यास सवड नाहीं. जो पुरुष इतका बुद्धिमान् , व ज्याचे कर्तृत्वावर इतक्या गोष्टीं अवलंबून आहेत, त्यास साह्य करणें हें वास्तविकच आमचें कर्तव्य असून तशी सवड असती तर आह्मांस आनंदही झाला असता. परंतु आज आमचा नाइलाज आहे." दुसरें पत्र सोनेरी वर्ख लाविलेल्या कागदावर आहे. आणि जरी आज तें निरर्थक झालें आहे, तरी त्यांतच पूर्वी **प्रोफेसर** साहेबांचें कांहीं काळपर्यंतचें **प्राणतत्व** असून आपल्या चरित्रनायकाचे चरित्रावर त्याचा बराच परिणाम झाला असेल; ह्मणून त्याकडे आह्मांस कानाडोळा करितां कामा नये. तें पत्र आह्मी जसेचें तसेंच देतों. " गुरुवारीं आमचे वाडयांत विद्वान् लोकांकरितां चहाचा विशेष समारंभ आहे त्या वेळीं आपण आल्यानें बाईसाहेबांस मोठा आनंद होईल. "

वास्तविक पाहिलें तर **ट्यूफेल्सड्राक** साहेबाची ओरड कसदार भाकरीकरितां असून तिचे ऐवजीं त्यांस या ऐटदार भाषेत चहाचें मात्र आमंत्रण मिळालें. या वेळेस **ट्यूफेल्सड्राक** साहेबांची नशीबाशीं अगदीं अणीबाणीची झोंबी चालली असतां, गुणी व विद्वान् या नांवाखालीं मोडणाऱ्या या स्त्रीपुरुषांचे समाजांत त्यांची कशी काय स्थिति झाली असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. भुकेनें व्याकूळ झालेल्या सिंहास जसा चिमणचारा खाण्यास बोलवावें तद्वतच त्यांना हें चहाचें आमंत्रण होतें. **अशा** वेळेस बहुधा त्यानें अगदींच मूकव्रत धरून त्या चहाला कदाचित् तो शिवलाही नसेल. या वेळीं जर त्यानें तोंड उघडलेंच असेल तर चहासारख्या वायफळ गोष्टींची चिकित्सा करण्याकरितां तरी खचित उघडलें नसेल. असो हें पत्र **झाडामचे** वाड्यांतून बाईसाहेबांनीं पाठविलें असल्यामुळें ह्या बाईसाहेब ह्मणजे काउंट साहेबांचें कुटुंब व त्या घरची घरधनीण असावी असें वाटतें; व या पत्रावरून सदर बाईसाहेबांची विद्याभिरुची व **ट्यूफेल्सड्राक** साहेबांवरील प्रेम हीं दोन्ही व्यक्त होतात. मग तें प्रेम **टाउगुड** साहेबांच्या वशिल्यानें झालेलें असो किंवा **ट्यूफेल्सड्राक** साहेबांच्या अंगभूत गुणांचेंच फळ असो.

या बड्या सरदाराच्या घराण्याशीं आमच्या चरित्रनायकाचा, थोडाच कां असेना, पण कांहीं संबंध होता, अशाविषयीं आपणास इतरत्र स्पष्ट आधार मिळतो. अर्थात् या संबंधापासून कांहीं आत्मलाभ करून घ्यावा अशी जर त्यांची समजूत असेल तर ती व्यर्थ होती. परंतु त्यांस थोर घराण्यांतील रीतरिवाज माहीत होण्यास कांहीं साधन नसावें असें जें पूर्वी आह्मांस वाटलें होतें, तें चुकीचें होतें, एवढें मात्र या संबंधावरून निष्पन्न होतें. **ट्यूफेल्सड्राक** साहेब ह्मणतात, " झाडार्म घराण्यांतील माणसें इतर सरदार " लोकांप्रमाणेंच नाजूक व चैनी होतीं. कलाभिज्ञ व विद्वान मनुष्यें या " वाड्यांत बरींच येत असून कांहीं सदर सरदाराच्या संग्रहींही असत. " जशी एखाद्या उत्कृष्ट वस्त्रास झालर असावी त्याप्रमाणें हीं माणसें त्या " घराण्याच्या डामडौलास झालरीसारखीं असत. या वाड्यांत विद्या व " कला यांचा प्रवेश बाईसाहेबांमुळेंच झाला. ती मोठ्या प्रयासानें आपल्या " घराण्याकरितां ही झालर जितकी मिळेल तितकी जमा करी—मग ती भर- " जरीची मिळो किंवा नुसती कोळ्यांचीं जाळीं मिळोत; आणि जमा केल्या- " बरोबर ती लागलींच जेथल्या तेथें व्यवस्थेनें लावून टाकी." ह्यापैकीं **खुद्द ट्यूफेल्सड्राक** साहेब भरजरीच्या सदरांत होते किंवा कोळ्याच्या जाळ्यांच्या सदरांत होते, अगर ते यापैकीं कोणच्या तरी स्थितीस येतील या आशेवरच त्यांजवर बाई साहेबांची कृपादृष्टि होती, हें समजत नाहीं. ते ह्मणतात, " सुदैवानें काउंट महाराजांशीं संभाषण करण्याचाही योग मला " दोन तीन वेळां आला. हें संभाषण बहुधा सामान्य विषयावर, व जगाच्या " एकंदर रहाटीवर असे; व काउंट महाराजांचें वय जरी बरेंच झालें होतें, " तरी त्यांना संसारांतील गोष्टींचा तिटकारा नसे; आणि वर्तमानपत्रांचें " बीं या जगांतून नाहींसें करण्यापलीकडे सृष्टीचे सुधारणे करितां दुसरें " कांहीं अवश्य आहे असेंही त्यांस वाटत नसे. पण काउंट साहेबांची " प्रकृति कांहींशीं तापट असल्यामुळें कांहीं विषयांवर त्यांशीं भाषण न " करणें हेंच मला बरें वाटे. शिवाय त्यांचा उद्योग जमीनदारीचा असल्या- " मुळें, जमीनदारीच्या कामांत उपयोगास न येणारे कांहीं गुण त्यांच्यांत " अनुद्भूत असावेत असेंही वाटतें."

**ट्यूफेल्सड्राक** साहेबांना हें जग इतकें निर्दोष वाटलें नसून वर्तमान-पत्रांचा बीमोड करण्यापेक्षां त्यांत आणखी बऱ्याच सुधारणेच्या गोष्टी त्यांस

अवश्य वाटल्या असाव्या असें या लेखावरून साहजिक अनुमान होतें. त्यांच्या मनांत अनेक विचारांचें व कामनांचें काहूर उठलें असून बाहेर पाहिलें तर न्यायपंडितपणाच्या कोरड्या लौकिकापेक्षां कांहींच नव्हतें. अशा स्थितींत त्यांची व्यवस्था समाधानकारक असेल असें वाटत नाहीं. ते ह्मणतात, " हें जग स्फिंक्स यक्षाच्या प्रश्नासारखेंच मला होतें. तो प्रश्न तर " सुटेना व सोडविला नाहीं तर बळीच गेलें पाहिजे; अशी माझी अवस्था " झाली. या संसाराचित्रांत इकडे अप्रतिम मोहक रंग तर स्पष्ट दिसत आणि " त्यांतच जागजागीं महात्म्यांचे भयंकर रंगही दिसत; आणि त्यामुळें परस्पर " विरुद्ध असे अनेक विकार व विचार मजमध्यें उत्पन्न होऊन त्यांत तथ्य " काय याचा उलगडा मला होत नसे. वास्तविक पाहतां या दोन गोष्टींत " मेळ पडूनच जिवास शांति होते; आणि जसा लढल्यावांचून जय नाहीं " त्याच प्रमाणें वाइटावांचून बरेंही मिळावयाचें नाहीं हें तत्व मला त्यावेळीं " कळलें नव्हतें."

आणखी ते एके ठिकाणीं ह्मणतात " कांहीं परोपकारी लोक थट्टेतच असें " ह्मणतांना मीं ऐकिलें आहे कीं सर्व तरुण पुरुषांना एखाद्या मोठ्या पिपांत " कोंडून किंवा दुसऱ्या कांहीं युक्तीनें जगावेगळे करून तेथेंच त्यांस " दुःखाचा अनुभव व ज्ञान येईपर्यंत ठेविलें, तर त्यांत जगाचें हित होईल. " अर्थात ही कल्पना अनुभव घेऊन पाहतां येईल असें नाहीं; परंतु एवढें " खरें, कीं जशा तरुण स्त्रिया तारुण्यांत अत्यंत मोहक दिसतात त्याच " प्रमाणें पुरुष तारुण्यांत अत्यंत तिरस्कार्य असतात; इतके ते त्या वयांत " दुधखुळे व मूर्ख असतात; व तशांतच त्यांना स्वतंत्रतेनें वागण्याची परा- " काष्टेची हांव असते, ते फारच हटवादी, अभिमानी, आणि विनाकारण " गोंगाट करणारे असतात. स्वतः कांहीं करावयाचें नाहीं आणि दुसऱ्यांनीं " कांहीं जरी केलें तरी त्यांच्या मनास यावयाचें नाहीं. आपल्या जोगें जर

६ स्फिंक्स—पु० १ भाग ८ टीप ७.

७ दुःखाचा अनुभव ही आपल्या शिक्षणांत अत्यंत आवश्यक गोष्ट आहे. व एवढ्या च करितां माधुकरी मागून गुरूची सेवा करावी अशी आपल्या जुन्या शिक्षणपद्धतींत व्यवस्था होती. तशी हल्लीं कांहींच व्यवस्था नसल्यामुळें स्वभावांतील काटकपणा व ज्ञानांतील तरतरी लुप्तप्राय झालीं आहेत. आणि अनुभवाच्या अभावामुळें ज्या चुका व्हावयाच्या त्या आतां आपल्यास प्रत्यक्ष संसारांत शिरल्यावर कराव्या लागतात.

" हें काम असतें तर खचितच आपण तें फार उत्तम केलें असतें, असेंच
" या वयांत वाटत असतें. या वयांत संसार ह्मणजे केवळ साध्या त्रैराशिका
" सारखा सोपा वाटत असतो. प्रमाणांकास इच्छांकानें गुणून आद्यंकानें भागिलें
" कीं उत्तर तयार! आणि तें उत्तर जर तुह्मांस काढितां आलें नाहीं तर त्याचें
" कारण तुह्मी गाढव! या खुळ्यांना अद्यापपर्यंत अनुभवानें एवढेंही
" कळलें नसतें कीं या संसाररूपी त्रैराशिकांत उत्तर काढितांना जाचणारा
" असा एक अपूर्णांक नेहमीं असतोच व तोही आवर्त दशांश असल्यामुळें
" नक्की पूर्णांक भागाकार बहुधा अशक्य असतो.'

**ट्यूफेल्सड्राक** साहेबांस वर लिहिलेल्या बाह्य अडचणी असून शिवाय वयोमानाप्रमाणें त्याहीपेक्षां दुर्धर अडचणी त्यांच्या स्वभावांतच होत्या असें या पारिग्राफावरून स्पष्ट होत नाहीं काय? अर्थात् त्यांचे अंगींही तारुण्यातील अल्लडपणा व डोक्याचा अस्थिरपणा होताच. पूर्वीं सांगितलेल्या अडचणींतच बिचाऱ्याची कोण दशा होती; तशांत असला प्रकार असल्यावर मग काय विचारावयाचें? ते ह्मणतात " हा **यम** किंवा **काळ** पुरुष किंवा
" या भरभर लोटणाऱ्या वेळेला जें कांहीं तुह्मी ह्मणत असाल तो एखाद्या
" बोक्याप्रमाणें नेहमीं आपल्या **जीवरूप** पिलांस खात असतो, व फार
" झालें तर त्याच्या तावडींत सुमारें सत्तर वर्षें सुटण्याइतकें आपलें भाग्य
" असलेंच तर ती सुटका अश्रांत परिश्रमानें व सततोद्योगानें मात्र होते.
" पण शेवटीं तरी तो खाऊन टाकणारच. राजा झाला, मोठा बादशहा
" झाला, किंवा अनेक बादशहांनीं एकत्र जमून तट केला, तरी या **काळास**
" जरा दम धरण्यास आज्ञा करण्याची कोणासही शक्ति नाहीं. फार तर
" काय सांगावें, **काळाशीं** संबंध नाहीं अशा जीविताचीच कल्पना अशक्य
" आहे, मग अनुभवाची गोष्ट ती कशास पाहिजे? आपलें सर्व **ऐहिक**
" **जीवितच काळावर** उभारलेलें असून **काळमय** आहे. हें सर्व जीवित
" **गतिमय** असून, ही **गतीही काळाचे** धक्क्यानेंच उत्पन्न होते. **काळ** हाच
" तिचा **कर्ता** व **उपादानकारण**ही आहे; व या मुळेंच **इहलोकींचें** आपलें
" **कर्तव्य-सर्वस्व** ह्मटलें ह्मणजे **योग्य मार्गानें अश्रांत गमन** व **अश्रांत**
" **परिश्रम** हें झालें आहे. आपले मनांत असो अगर नसो; आपल्या शरी-

---

८ उपादान कारण—ज्या पदार्थांपासून एखादी वस्तु तयार करितात तो त्या वस्तुचें उपादान कारण होय. जसें कागद चिंध्याचे करितात ह्मणून चिंध्या हें कागदाचें उपादान कारण.

" रांचें व मनाचें सारखें चलन होत असून त्यामुळें जीवितास अवश्य अस-
" लेल्या शक्ति खपल्यानें त्यांचे ऐवजीं नव्यांची जरूर लागतेच. आपल्या
" शारीरिक व मानसिक इच्छा कितीही तृप्त झाल्या तरी ही तृप्ति केवळ
" क्षणिक असते; ह्मणजे जें जें कांहीं आपण करितों तें एकदा केलें कीं झालें;
" मग आपल्या संबंधानें पाहतां तें नष्टवतच होऊन आपणांस पुन्हां नव्याची
" जरूर लागते ! हे **काळपुरुषा,** किती विलक्षण तुझे पाश आहेत हे !
" त्यांनीं आह्मांस घट्ट जखडून **काळतत्वाच्या** भयंकर तमांत इतकें खोल
" टाकून दिलें आहे, कीं तेथून आमचें माहेर जें **परब्रह्म** तें एखादे वेळ
" तुरळक दिसलें तर दिसतें नाहीं तर या **काळधुंदीत** सर्व जन्मांत त्याची
" आह्मास आठवणही होत नाहीं. मीही **काळाचाच** पुत्र असून इतरांपेक्षां
" अधिक दुःखी होतों. थोडक्यांत चुकलें नाहीं तर **काळानें** मला कधींच
" ग्रासिलें असतें. कारण कितीही धांवलें तरी **माझ्या धावण्याला** व
" **काळाच्या चालण्याला** संगतच पटेना ! इतका माझा मार्ग खडतर
" असून माझे पाय भारावलेले होते." याचा अर्थ आमच्या ऐहिक भाषेंत असा असावासें वाटतें, कीं इतरांप्रमाणें **ट्यूफेल्सड्राक** साहेबांचेंही योग्य दिशेनें काम केल्यावांचून चालेना व तशांतच त्यांस कामही मिळेना. यामुळें त्यांस चैन पडेनासें झालें असल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. कारण इकडे दारिद्र्य दुरून त्याजवर किरण धरून टपत बसलें होतें, व इकडे तर त्याचा जोरकस जीव काम नसल्यामुळें गांगरला होता व जशी एखादी तरवार कोणाचा प्राण घेण्यास न मिळाल्यामुळें गंज खाऊन निस्तेज होते त्याचप्रमाणें तो अगदीं हताश झाला होता.

परंतु एकंदरीत त्याच्या उत्कृष्ट **उदासीनतेला** नेहमीप्रमाणें येथेंही उत्कृष्ट पोषण मिळतच होतें; आणि ज्या गुणाविषयीं **प्रोफेसर** साहेब आज विख्यात आहेत त्यांचें बीज व या '**वस्त्ररहस्याचें**ही बीज याच गोष्टींत असेल असे ह्मणण्यास काय हरकत आहे ? त्यांच्या संबधानें पाहतां, या **संसाराशीं** सामना करितांना साम, दाम, दंड, भेद वगैरे जोरानें व प्रसंगानुरूप उपयोग झाला असता तर बरें झालें असतें. परंतु **प्रोफेसर** साहेब या संसाराचे झोंबींत एव्हांपासूनच आत्मसंरक्षणापुरतें मात्र हत्यार चालवावें अशा बेतानें वागत होते. ते ह्मणतात, " आजपर्यंत समाजांतील
" माझ्या वर्तनावरून शांत स्वभावाविषयीं मात्र मी प्रसिद्ध असलों तर

" असेन; कारण माझी मित्रमंडळी मला या शांतपणाबद्दल नेहमीं फार
" रागावून ह्मणत असे कीं ' त्यामुळें तुझे दैदीप्यमान विचार दबून मात्र
" जात आहेत.' खरें पाहिलें तर माझे मनांत मनुष्यजातीविषयीं अत्यंत
" प्रेम व अतीशय भय वागत होतें. कांकीं सच्चिदानंदरूप परमेश्वर दिस-
" ण्यासारखे ज्याचे डोळे असतात, त्याला मनुष्य पदार्थ ह्मटला ह्मणजे
" दिव्य तेजानें युक्त अविज्ञेय चमत्कार अशाच रूपानें दिसेल. परंतु
" ज्यांना माझा स्वभाव पूर्णपणें ठाऊक नव्हता ते मला पाषाणहृदयी असें
" ह्मणत; आणि बोलण्यांत पर्यायानें बोलण्याची जी वहिवाट मीं घातली
" होती, तिजबद्दल आणि मनुष्यजातीविषयींच्या माझ्या औदासीन्याबद्दल ते
" मला नांवें ठेवीत. पण त्यांत माझा दोष नाहीं. विपरीतार्थबोधक वाग्बा-
" णरूपी शस्त्र मला ढालीसारखें उपयोगीं पडेल, व त्याचे योगानें माझें
" संरक्षण होऊन जनापवादाचे घायापासून माझा बचाव होईल असें वाटून
" मीं उपरोधिक भाषणाचा स्वीकार केला होता! सांप्रत उपरोधिक भाषण
" मला दैत्यभाषेप्रमाणेंच वाटत असून आतां तें बहुतेक मीं सोडिलेंच
" आहे. परंतु त्या वेळेस अशा उपरोधिक भाषणानें किती तरी शत्रु मीं
" आपल्यास करून घेतले असतील! वास्तविक पाहतां बाह्यात्कारीं शांत-
" पणा दाखवून आडून वाग्बाण मारणारा मनुष्य, मनुष्यजातीस अरिष्टरू-
" पच असतो; तशांत जर तो तरुण असला तर मग काय विचारावें?
" कारण, शांत स्वभावाचे तरुण पुरुषांत उपरोधिक भाषणाचा दोष असेल
" असें कोणासही वाटत नाहीं, व ह्मणूनच मोठमोठे नामांकित व वजनदार
" लोक अशा सर्पास यःकश्चित कीटक समजून त्यास चिरडून टाकावें
" ह्मणून त्यावर पाऊल टाकूं लागतात, तोंच विद्युत्स्फुलिंगासारखा त्याचा
" झटका बसून ते ताडदिशीं उडून आपटतात व मग विव्हळ स्थितींत
" त्यास डोलींत घालून नेण्याची पाळी येते; असें आपण नेहमीं पाहतों."

---

१ शुद्धिगतैरपि परामृजुभिर्विदित्वा । बाणैरजय्यमविघट्टितमर्मभिस्तम् ॥
मर्मातिगैरनृजुभिर्नितरामशुद्धै । र्वाक्सायकैरथ तुतोद तदा विपक्षः ॥

शिशुपालवध.

वाग्बाणाची तीव्रता काय वर्णन करावी! अत्यंत झगझगित व सरळ अशा आपल्या पोला-दाच्या बाणांचा कृष्णावर कांहीं परिणाम होत नाहीं असें पाहून शिशुपालानें अशुद्ध व वक्र अशा वाग्बाणांनीं त्यास जर्जर केलें

हाय, हाय! असा दैत्यस्वभाव असलेल्या मनुष्यास संसारमार्ग सुगम कसा होणार? कारण या संसाराची मुख्य किल्ली ह्मटली ह्मणजे आपण कोणाशीं तरी किंवा कशाशीं तरी एकजुटीनें राहिलें पाहिजे ही गोष्ट **टयूफेल्सड्राक** साहेबांसही कबूल आहे. परंतु त्यांच्या बहुतेक वर्तनक्रमांत जुटीचे ऐवजीं फूटच दिसून येते. त्यांचा ह्मणण्यासारखा संबंध काय तो **झाडार्मचे** घराशीं होता. पण तोही ह्मातार्‍या तापट काउंट साहेबाचे मृत्यूमुळें शिथिल होऊन त्यापासून पुढें तादृश उपयोग होण्याची कांहींच आशा राहिली नाहीं; हेंही येथेंच सांगितलें पाहिजे. ही काउंट साहेबांच्या मृत्यूची हकीकत या पुडक्यांतील 'समाधीवरील शिलालेख' नांवाच्या निबंधांत प्रसंगवशांत् आलेली आहे. या निबंधातील विद्वत्ता व खोल विचार बरेच प्रशंसनीय आहेत. त्यांतील भावार्थ एवढाच आहे कीं थडग्यावरील लेख कोणच्याही जातीचे असले तरी ते विशेष कर्णमधुर असण्यापेक्षां ऐतिहासिक माहिती देण्यासारखे असावे. **प्रोफेसर** साहेब ह्मणतात " काउंट " साहेबांचे वारसांनीं विनंति केल्यावरून काउंट साहेबांचे समाधीवर खोद- " ण्याकरितां शिलालेख तयार करण्याचें मीं पतकरिलें व हा पुढील लेख " तयारही केला. परंतु त्यांतील भाषेंत कांहीं चुक्या आहेत अशा सबबीवर " तो अजून खोदला गेला नाहीं. मला तर त्यांत कोठें चुक्या नजरेस येत " नाहींत." हा लेख आह्मी पुढें उतरून घेतों. अर्थात् **प्रोफेसर** साहेबांनीं समाधीवरील शिलालेखासंबंधाच्या आपल्या विशेष मतास अनुसरूनच हा लिहिलेला आहे ह्मणून त्यांत नुसत्या भाषाविशेषावांचून दुसराही कांहीं प्रकार पाहून आमचे वाचकांस विस्मय होईल.

## शिलालेख.

" या समाधींत, **फिलिप झाडार्म झाडार्मचे सरदार** ज्याचें टोपणनांव " **श्रेष्ठ** असें होतें; जो राजसभेतील सभासद, जो **सुवर्णकेशी** व **कृष्ण-** " **कपोत** मालिकांतील मुख्य सरदार, ज्यानें भूमंडळावर असतांना पांच

---

१० यूरोपियन लोकांत प्रेतें पुरल्यावर त्यावर समाधी बांधून त्या मृत लोकांच्या स्मारकार्थ त्यांचीं नांवें, स्मरणीय गुण, व जन्ममृत्यु काल देण्याची वहिवाट आहे.

११ या शिलालेखांतील मतलब असा आहे कीं हे झाडार्मे साहेब मोठे नामांकित सरदार होते. पण त्यांनीं केलें काय? ससाणे व गिधाडें यांचें अनुकरण मात्र उत्तम रीतीनें केलें. तें असें कीं त्यांनीं पांच हजार प्राण्यांची शिकार केली. (व तीही मर्दुमकीनें नव्हे, तर बंदु-

" हजार (५०००) पाखरांची शिशाच्या गोळ्यांनीं शिकार केली; आणि
" आपल्या द्विपाद व चतुष्पाद चाकरांसहवर्तमान ज्यानें अनेक प्रकारचें
" खंडोगणती अन्न प्रत्यक्ष विष्टेच्या सदरांत आणिलें तो आपल्या काम-
" गिरींतून मुक्त होऊन विश्रांति घेत आहे. त्याचें उत्कृष्ट स्मारक पाहिजे
" असेल तर या उकिरड्याकडे पहावें. जन्म शक (        ) मृत्यु
" शक (        )"

---

# भाग पांचवा.

## प्रेमप्रणय.

टयूफेल्सड्राक साहेब ह्मणतात, " याप्रमाणें हा भणग बरींच वर्षे
" रिकामा कायदे पंडितीचा खटाटोप करीत असतां त्यास एक वेळ असा
" प्रश्न आला कीं 'हा सर्व खटाटोप कशाकरितां करावयाचा ? अन्नवस्त्रा
" करितांच ना ? मग या अपार जगांत अशा खटाटोपीवांचून अन्नवस्त्र
" मिळण्यास दुसरा मार्गच सांपडणार नाहीं कीं काय ? काय होईल तें
" होवो, पण प्रयत्न करून पहावा असा मीं निश्चय केला."

याप्रमाणें टयूफेल्सड्राक साहेबांचा वर्तनक्रम बदलून त्यास नवीन दिशा लागलेली आपणांस दिसून येते. अर्थात पूर्वींच्या क्रमापेक्षां हा क्रम तसा सुखावह असेल असें ह्मणतां येत नाहीं. आतां आपल्या चरित्रनायकास धंदा नाहींसा झाला. सामान्य पोटभरू लोकांच्या ठरींव धंद्यांचें आरमार[1] आतां त्यांनीं सोडून देऊन आपलें जहाज मनःपूत दिशेनें व मनःकल्पित

---

कीनें ); आणि आपण आपले चाकर व जनावरें मिळून खंडोगणती अन्न फस्त करून उकिरड्याची मात्र धन केली. मोठ्या सरदाराच्या जीविताचे व त्याच्याकरितां इतके नोकर व जनावरें खपतात त्यांच्या जीविताचें सार्थक्य हेंच काय ? पण असल्या लोकांसच लोक मोठे ह्मणतात.

१ आरमार—अनेक जहाजांचा एक जुटीनें जाणारा समुदाय.

होण्याचे साह्यानें हाकारण्याचा त्यांनीं निश्चय केला. टच्यूफेल्सड्राक, तूं दुर्दैवी खरा कारण जरी सामान्य व्यवहार किंवा ठरीव धंद्यांचें आरमार तुला पसंत पडलें नसलें तरी तें आरमार होतें, व ठरींव दिशेनें जात होतें. अर्थात त्याचे आश्रयानें कांही तरी ठरींवच फलप्राप्ति व्हावयाची. शिवाय अरमारांतील जहाजें एक जुटीनें असतात, व एकमेकांच्या माहितीनें व साह्यानें तीं सर्व नीट रीतीनें पार पडतात. पण आतां तूं या गैरमाहित समुद्रांत कसा हिंडणार ? आणि ज्याची कल्पनाही नाहीं अशा इष्टस्थळाप्रत नेणारा जवळचा रस्ता तुला सांपडणार कसा ! अशा भयंकर समुद्रावर नौकाशास्त्राची इतपत माहिती असणारा मनुष्य सफर करण्यास निघाला ह्मणजे त्यास अडथळे येणारच. फार कशाला टच्यूफेल्सड्राक साहेबच या नवीन मार्गाचें अवलंबन करितात तोंच एक जलदेवता त्यांच्या मार्गांत आडवी आल्यामुळें त्यांनी आपल्या वाटेचें जें गणित वगैरे करून ठेविलें होतें तें सर्प फुकट गेलें असें आपणांस दिसेल.

ते एके ठिकाणीं ह्मणतात, " मनुष्याचे तारुण्यांत **सृष्टि** आपलें भव्य " स्वरूप त्याचे पुढें प्रकट करिते; व त्यामुळें या पृथ्वीवरही जिकडे पहावें " तिकडे त्यास स्वर्गच अवतरलेला दिसतो. त्यांतही **तरुण पुरुषास तरुण** " **युवतीच्या** रूपानें जें स्वर्ग भुवन दिसतें तसें दुसऱ्या कोणत्याही रूपानें " दिसत नसेल. काय चमत्कार आहे ? या विलक्षण संसारांत अशी गोष्ट " असावी असा ईश्वरी संकेतच दिसतो ! पुष्कळ ठिकाणीं मीं ह्मटलें आहे " कीं मनुष्य हा एकंदरींनें पाहतां मला पवित्र वस्तूप्रमाणें वाटतो. आणि " देवाच्या स्वरूपाची कल्पना मनुष्य रूपानें करून मूर्तिपूजा करणें हें " जरी आपण धर्महीन समजतों, तरी या मूर्तिपूजेचे तत्वावरच माझा " **आत्मा** ( माझ्यांतील '**मी**' शब्दानें समजणारा पदार्थ ) इतरांचे " **आत्म्याशीं** ( त्यांच्यांतील 'तूं' शब्दानें कळणाऱ्या पदार्थांशीं ) प्रेम " पाशानें बद्ध होतो. पण ही सामान्य[२] गोष्ट झाली. परंतु **धनऋणविद्यु**-" **ल्लते**प्रमाणें परस्पर भिन्न प्रकृतीच्या व्यक्तींचे सान्निध्यानें स्नेहाकर्षण सुरू " होऊन प्रेमरूप दिव्य ज्योत उत्पन्न झाली, ह्मणजे तो प्रकार कांहीं अपूर्व " आहे. एखादा अगदीं भिकारडा मनुष्य घ्या. त्याचे संबंधानें आपण

२ **व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपिहेतुः ।**
**न खलु बहिरुपाधीन्प्रीतयः संश्रयन्ते ॥**

" निखालस उदासीन असूं असें वाटतें काय ? उलट आपला त्याशीं स्नेह
" असावा असेंच आपणास वाटत नाहीं काय ? प्रेमानें, उपकारानें, निदान
" भीतीनें तरी त्यानें आपणांशीं मिळून रहावें, आणि हें जर न घडेल तर
" आपण तरी त्यांशीं मिळून रहावें असें आपणांस वाटत नाहीं काय ?
" पण हा संबंध स्त्रीपुरुषविषयक असला तर तो किती तरी बलवत्तर
" असतो ? **भिन्न शरीरांतील आत्म्याचें ऐक्य** ही गोष्ट जरी इतकी गूढ आहे,
" तरी ती या भूतलावर स्त्रीपुरुषांचे प्रेमबंधनाचे स्वरूपानें कांहीं अंशीं तरी
" आपल्या अनुभवास यावी अशी दयाळू ईश्वराची योजना आहे, व ती शक्यही
" आहे. आणि **धनऋण** विद्युत्प्रवाहांस योग्य वाहक तारा मिळाल्या म्हणजे
"त्यांच्या संयोगापासून जशी **विद्युल्लता ज्वालारूपानें** प्रकट होते, तद्वतच
" **मनोरूप वाहक साधन** मिळाल्यास सर्वव्यापी प्रेमरूप आध्यात्मिक
" विद्युल्लतेची ज्योत या स्त्रीपुरुषांचे स्नेहरूपानें प्रकट होते.

( **बायबलांत** सृष्टीची आदिकथा वर्णिली आहे. तींत सर्वांचा **आदि-पुरुष आदम** व **आदिमाता हव्वा** हीं एका **नंदनवनांत** असून तेथेंच एक **ज्ञानवृक्ष** होता, **आदमला** व **हव्वेला** ईश्वराची अशी ताकीद होती कीं त्या बागेंतील सर्व फळांचा त्यांनीं उपभोग घ्यावा परंतु ज्ञानवृक्षाचे फळास त्यांनीं शिवूं नये, अशी ताकीद असतां **हव्वेच्या** हट्टास्तव **आदमनें** ज्ञानवृक्षाचें फळ चाखून पाहिलें. हें देवास समजतांच " तुह्मांस व तुमच्या वंशजांस काबाडकष्ट करून भाकरी मिळवावी लागेल, आणि कल्पांतपर्यंत मृत्यु तुमचा छळ करील" असा शाप देऊन त्यानें त्यांस तेथून हांकून लाविलें, व तेथें पुन्हां त्यांचा प्रवेश होऊं नये ह्मणून नागव्या तरवारीचा देव-दूतांचा पाहरा ठेविला अशी कथा आहे तीस अनुलक्षून ) **प्रोफेसर साहेब** ह्मणतात. "मला वाटतें, प्रत्येक खाऊन पिऊन सुखी पुरुषापुढें त्याच्या तारुण्यांत

---

**विकसतिहि पतंगस्योदये पुण्डरीकं।**
**द्रवतिच हिमरश्मावुद्गते चंद्रकांतः॥**

आंतील कांहीं तरी अनिर्वाच्य कारणानेंच वस्तु परस्परांशीं प्रेमपाशानें बांधल्या जातात. प्रीतीच्या संबंधानें पाहतां बाह्य गोष्टी मुख्याच्या नाहींत. प्रखर किरणांनीं सूर्य प्रकाशला ह्मणजे कमलासारख्या नाजुक फुलांचा विकास व्हावा, व शीतकिरण चंद्र प्रकाशला ह्मणजे चंद्रकांतासारखा कठीण दगड पाझरूं लागावा या गोष्टी नुसत्या बाह्य प्रकारावरून शक्य तरी वाटतात काय ?

" **एखादें प्रफुल्लित नंदनवन** असून त्यामध्यें एखादी अतिरूपवती **हव्वाही**
" असतेच. मग त्यांतील एखाद्या भव्य राईंत किंवा एखाद्या उत्कृष्ट फुलझा-
" डांच्या ताटव्यांत अतिरमणीय परंतु भीतिप्रद असें **ज्ञानाचें** रोपही असून
" त्यावर झगझगीत तरवारी घेतलेल्या **देवदूतांचा** पहारा असल्यामुळें या
" नंदनवनांत शिरकाव न होतां जर त्या तरुण पुरुषास दुरून मात्र त्या
" बागेचा देखावा दिसत असला तर त्या बागेच्या मोहकपणास पारावारच
" नाहींशी होते. अहाहा ! नवीन तारुण्याची स्थिति किती तरी आनंददायी
" असते ! अजूनपर्यंत **लज्जेचा** उंबरा ओलांडण्यास त्याची छाती होत
" नाहीं; व **कल्पनारूप** पवित्र **गंधर्वनगरें** उपभोगानें कुडाच्या खोपटाप्र-
" माणेंही झालेलीं नसतात; आणि मनुष्याच्या मनाची नैसर्गिक अकुंठित
" गति अजून जशीच्या तशी कायम असून त्याचे पायांत प्रत्यक्ष अनुभ-
" वानें वस्तुस्थितीची बेडीही पडली नसते.[३]

" हा आपला **भणंग**, ( अर्थात् टयूफेल्सड्रॉक साहेब स्वतःस उद्देशूनच
" हें लिहीत आहेत ) हा आपला **भणंगही** या वेळेस ऐन तारुण्यांत असून
" शिवाय एकांतवासांत असे. ह्मणून वयोमानाप्रमाणें तीव्र झालेली त्यांची
" **कल्पनाज्योतही एकांतवासाच्या** कोंडलेल्या भट्टींत **श्वासोच्छ्वासाच्या**
" दुहेरी भात्यानें जास्तच प्रखर झाली; व तीमुळें या भूतलाचे तक्तावर
" विराजमान असलेल्या **स्त्रीरूप राण्या** पाहून त्यांस जें काय वाटलें
" असेल त्याचें यथार्थ वर्णन केवळ अशक्य आहे. प्रत्यक्ष देवत्वच त्यांचे
" मध्यें आहे; तशांत आपल्या या तरुण **मित्राला** तर सर्वच स्त्रिया दिव्य
" व पवित्र वाटत. अजून पर्यंत त्या अप्सरांप्रमाणें त्याचे समोर दुरून दुरूनच
" वावरत. फारच झालें तर एखादवेळ चहाच्या समारंभासारख्या प्रसंगीं
" कांहींशा जवळ पण असाध्य ठिकाणीं असत. पण याचें त्याला काय ? जसें कांहीं
" त्यांस पार्थिव शरीर नसून नुसतें रूप व आत्मा मात्र असावा इतक्या त्या
" त्यास मोहक वाटत. आणि आपणास स्वर्गांत नेण्याकरितां शिडी घेऊन

---

३ एखाद्या सुखाचा—विशेषतः एक वेळच होणाऱ्या लग्नादि सुखाचा अनुभव येण्याचे अगोदर त्याविषयीं आपल्या कल्पनेची धांव अकुंठित असते, व अमुक एका विशेष प्रकारास अगर व्यक्तीस आपण जखडलों नसतों; पण तो अनुभव एकदां आला ह्मणजे आपल्या कल्पनेस आळा बसतो व मग आपण प्रत्यक्षाच्या बेडीनें जखडलों जातों—आणि मग अर्थात् त्या मानानें सुखाचें सौरस्य कमी होतें.

" तिष्टत बसलेल्या त्या देवकन्याच आहेत कीं काय असा त्यास भास होई.
" या अप्सरांपैकीं एखादी त्यास वरील काय? धन्य दैवाची ! अशी आशा
" तरी त्यास कशी करितां यावी ! नुसत्या असल्या आशेच्या भारानेंच तो
" बिचारा चूर झाला असता. इतका या नुसत्या कल्पनेंतच मोह आहे !

" सामान्य लोकांस खरीं वाटणारीं भुतेंखेतें व दैवतें वगैरेवर जरी या
" तरुण गृहस्थाचा विश्वास नसे, तरी त्यांचे ऐवजीं ह्या स्त्रीरूप खऱ्या देवता
" त्यास नेहमीं प्रत्यक्ष दिसत व जिकडे तो जाई तिकडे त्यांचे मधुर शब्दही
" त्याचे कानीं पडत. आणि जरी त्यांस सामान्य मनुष्यांतील व्यावहारिक
" नांवेंच होतीं तरी त्याचे मनांत त्यांजविषयीं प्रत्यक्ष देवतांसारखीं पूज्य-
" बुद्धिही वसत असे. अशी एखादी दिव्यरूपधारी स्त्री अशा पुरुषासमोर
" प्रत्यक्ष उभी राहून त्याजवर एखादा कटाक्षविद्युत्स्फुलिंग फेंकून जर-
" असें सुचवील कीं प्रेमप्रणयास तूंही योग्य आहेस, तर अशा आश्वास-
" नानें त्याची प्रेमज्योत भडकून त्याचे मनांत सर्व भूमंडळ दणाणून टाक-
" णाऱ्या सर्वभक्षक ज्वालामुखीसारखा प्रेमाग्नीचा डोंब होणार नाहीं काय? "

आणि असा प्रेमाग्नीचा भडका पुढें प्रत्यक्ष झाला असून **डायोजिनिस टचूफेल्सड्राक** साहेबांचे अंतरंगास या भयंकर ज्वालामुखीचा थोडाबहुत अनुभवही आला, असें या कागदांवरून दिसून येतें. प्रोफेसर साहेबांची अलंकारिक भाषा अशीच कायम ठेवून आपणांस एवढें ह्मणतां येईल कीं यावेळेस इच्छारूप कोळसा, कामरूप सोरा व वासनारूप गंधक हीं तिन्ही कल्पनारूप जोड भात्याच्या भट्टीजवळच हवीं तितकीं पडली होतीं. याप्रमाणें दारूचे कोरडे ठणठणीत घटकावयव जेथें एकत्र झाले आहेत, तेथें नुसती एकादी फुणगी पडण्याचा अवकाश ! बरें, आपल्या या संसाररूपी मेघमंडळांत स्त्रीकटाक्षरूप विद्युत्स्फुलिंग तरी थोडे आहेत काय? अर्थात् एखादे दिवशीं कोणी तरी दिव्य स्त्री चहाच्या वगैरे समारंभांत आपल्या कटाक्षविद्युत्क्षेपानें एखादें दारूकाम पेटाविणारच. पण हें दारूकामच ठरून त्यांतून एकसारख्या आनंद तेजाच्या लाटा, एकींतून दुसरी, दुसरींतून तिसरी, याप्रमाणें निघून त्या तरुण जोडप्याचें प्रेम पूर्णपणें विकास पावून त्याचा चांगला शेवट होईपर्यंत राहिलें तर तें जोडपें खरोखरच धन्य होय. निदान या दारूचा एकदम भडका होऊन त्याच्या धक्क्यानें अंतरंगास घरे पडले नाहींत ह्मणजे मिळविली. नाहीं तर हृदयस्फोट होऊन मृत्यु

यावयाचा, अगर तो जोड भाता फुटून प्रेमज्वालांस कांहीं आडपडदा न राहिल्यामुळें त्यांनीं सैरावैरा हवें तिकडे धांवून त्या तरुण पुरुषास वेड लागावें असें तरी होईल; व अखेरीस त्या पुरुषाचे अंगांतील अनेक उत्कृष्ट गुण नष्ट होऊन थंड पडलेल्या ज्वालामुखी सारखी मात्र त्याची स्थिति होईल.

मकर व कुंभ राशींच्या पुडक्यांतील कागदांवरून असें दिसून येतें कीं हा तत्वज्ञ पुरुष जरी इतक्या कठोर व तुसड्या स्वभावाचा असा आपणास भासतो तरी तोही एका युवती संबंधानें खऱ्या व अनावर प्रेमांत सांपडला. त्याचें अंतःकरण दगडाचें आहे कां मांसाचें आहे असा जो आपणांस संशय होता तो येथें दूर होतो; कारण त्यानें प्रेमप्रणय एक वेळ केला हें उघड आहे. तो कदाचित् योग्य स्थळीं केला नसेल; परंतु निखालस मनापासून केला यांत संशय नाहीं, व तोही एक वेळच केला. मौजेकारितां उडविण्याचे जसे दारूचे बाण करितात तसेच कानग्रीस नांवाच्या योध्यानें किल्ले वगैरे फोडण्याचे कामीं लढाईत उपयोगी पडणारे पितळेच्या तोट्याचे बाण करण्याची कल्पना काढिली. या बाणांत दर एकास एक तोटा असतो. तो उडाला ह्मणजे पुन्हां भरितां येत नाहीं. त्याचप्रमाणें प्रत्येक पुरुषाचें मनांत खरें प्रेम प्रथमचें असून तें एका युवतीशीं मात्र शक्य *असतें. हें पहिलें प्रेम केवळ अपार असून तसा संबंध दुसऱ्या स्त्रीशीं अशक्य आहे; व एवढ्याच करितां आह्मांस अलीकडे असें वाटूं लागलें आहे कीं ट्यूफेल्सड्राक साहेब पुन्हां कधीं लग्न करणार नाहींत, इतकेंच नव्हे तर ते कोठें दुसरीकडे प्रेमपाशांत गुंतणारही नाहींत. साठीची नाटी बुद्धि प्राप्त होऊन पोरचेष्टांची पुनरावृत्ति सुरू झाली तरी त्यांचे डोक्यास इतःपर मंडावळ अशी लागणार नाहीं. या प्रथम प्रणयानंतर प्रोफेसर साहेबांस येथून तेथून सर्व स्त्रिया केवळ पुतळ्यांप्रमाणें वाटतात. त्या जरी ब्रह्मदेवाच्या दिव्य कारागिरीने तयार झाल्या असल्या तरी त्या पुतळ्याच. त्यांजकडे पाहून ते समाधान पावतात, परंतु यांपैकीं एखादीचा अभिलाष अगर संग्रह करावा असें त्यांस इतउत्तर कधींच वाटलें नाहीं.

मनुष्याच्या विचारांत कसकसा बदल होत जातो याचें बारकाईनें निरीक्षण करणाऱ्या वाचकांस, ट्यूफेल्सड्राक साहेब या अननुभूत (अपूर्व)

* हिंदू लोकांत पातिव्रत्य व एकपत्नीव्रत यांतील तत्व हेंच आहे. शिवाय या व्रतांनीं सर्वांचीं शक्य तितकी तरतूत होऊन प्रजेच्या फाजील वाढीस आळाही बसतो.

स्थितींत कसे वागले असतील व त्यांची प्रेमज्वाला भडकल्यावर तींतून वेळो-वेळीं कसकसे रंग उठत असतील हें कळण्याची फार: उत्कंठा झाली असेल. परंतु ही इच्छा तृप्त होण्यास येथें कांहींच साधन नाहीं, व ही गोष्ट **प्रोफेसर** साहेबांच्या व्यवस्थेस अनुरूपच आहे. या स्त्रीसंबंधीं स्तुतीपर कवनांनीं, शोकपर कवनांनीं व तत्संबंधीं दुसऱ्याही खर्ड्यांनीं भरलेल्या या पुडक्यांत सुवाच्य असें त्या स्त्रीचें नांवही कोठें आढळत नाहीं. या कागदांत तिला **ब्ल्यूमाइन** असें नांव दिलेलें आढळतें. परंतु त्याचा अर्थ पुष्पदेवता असा असून हें नांव केवळ काल्पनिक असावें असें वाटतें. तर मग तिचें नांव **कुसुमावती** असें होतें काय ? पण तिचें आडनांव काय होतें ? अगर तिला आडनांव होतें किंवा नाहीं याचाही पत्ता नाहीं ! मग ती कोणच्या स्थितींतली, कोणच्या कुळांतली, कोणच्या दर्जाची, कशा स्वरूपाची स्त्री होती याविषयीं तर बोलावयासच नको ! विशेषतः कोणच्या दैवयोगानें त्यांची तिची गांठ पडून त्यांचें भाषण वगैरे काय काय झालें असेल या सर्वच प्रश्नांचा उल्लेख चरित्रपर ग्रंथांत अति अवश्य आहे. परंतु त्याचा निर्णय आपणांस बहुतेक कल्पनातरंगांनींच करावा लागणार आहे. आमचे **प्रोफेसर** साहेब ह्मणतात "जशी पृथ्वी व चंद्र आपआपल्या कक्षांतून[४] फिरत
" असतां उभय कक्षांचे छेदनबिंदूत जशी त्यांची गांठ पडावी, त्याचप्रमाणें
" कांहीं ईश्वरी नेमानेमानें या आमच्या **भणंगाची** व **ल्ब्यूमाइनची** गांठ
" पडली. ईश्वरी संकेतच असा होता कीं तिच्या नेत्रांचें दिव्य तेज पाहून
" ही दिव्य तेजकालिकाच या भूमंडळावर अवतरली आहे कीं काय असें
" त्यास वाटावें व पुढें त्याची चूक त्याचे लक्षांत आल्यावर मागून त्यानें
" कंठशोष करीत बसावें !

ही स्त्री तरुण व सुरेख असून घाऱ्या डोळयांची होती व ती कोणाची तरी चुलत बहीण असून मोठ्या कुळांतली आणि अभिमानी अशी होती. दैवाची गति किती विचित्र आहे ! तिचे डोक्यावर कर्जाचा फारच मोठा बोजा असून ती परतंत्र होती. कदाचित् पोटाकरितांही ती आपल्या या श्रीमंत नातेवाइकाजवळ रहात असेल. एवढी मात्र तिजविषयीं संदिग्ध माहिती मिळते. पण या आपल्या फिरस्त्याची व तिची गांठ कशी पडली

४ सूर्यादि तारका, पृथ्वी वगैरे ग्रह व चंद्र वगैरे उपग्रह हे अंतरिक्षांतून आपआपल्या दीर्घवर्तुलाकार मार्गांनीं फिरत आहेत. या त्यांच्या मार्गांस कक्षा असें ह्मणतात.

असेल ? चहाच्या थाटमाटाच्या आर्द्रतेनें, किंवा कामकाजाच्या कोरड्या खटपटींत पडली असेल ह्मणावें ? टाउगुड साहेबांच्या ओळखीनें किंवा बाईसाहेबांस कलादिकांचा नाद असल्यामुळें या तिरसट मनुष्याची मौज पाहण्याकरितां त्यांनींच हा योग जुळवून आणिला नसेल ना ? अनेक कारणांवरून आह्मांस तर असें वाटतें की ही यांची गांठ केवळ यदृच्छेनें व सृष्टि देवीच्या कृपेनेंच पडली असेल.

आमचे आत्मचरित्रकार लिहितात, " हे सुंदरी मोहिनी, मांझ्यासारखा " एखादा कायदेपंडित वकीलीची हौस पुरवून अखेर त्या कामाची रजा घेतां " घेतां आपल्या शेवटच्या खटल्याच्या गोषवाऱ्याचे कागद घेऊन जाणारा " पुरुष असो किंवा दुसरा कोणीही असो. तुला प्रथम पाहून कोणचा पुरुष " आश्चर्यानें थक्क होणार नाहीं ? त्या पर्वतांच्या अर्धवर्तुळाकार रांगेच्या " मध्यभागीं वर शीतळ छाया व खालीं गुलजार हरळीचा उगवलेला " हिरवा गार गालिचा पसरला आहे; अशा शांत व एकांत स्थळीं तूं बसली " होतीस; किती भव्य ते डोंगर ! सगळे एकजात कुंदाचे होते; व त्यांजवर " पश्चिमेकडील सूर्याचीं किरणें पडून तो प्रदेश प्रत्यक्ष नंदनवनासारखा दिसत " असून त्यास अमोल्य धातूचे कोंदणच केलें आहे कीं काय असें वाटे ! " त्या सुंदर टेंकड्या त्या वेळीं तुझें रक्षण करीत होत्या. त्या प्रदेशाचा " पृष्ठभाग एकाद्या अफाट समुद्रासारखा असून त्यावरील नीचोन्नत भूमिभाग " या समुद्राच्या लाटांसारखे दिसत होते. जवळच एक झाड तुजवर आपली " छाया पसरून उभें होतें. या फिरस्त्याला हें कांहींच ठाऊक नसून " आड रानांत एकदम जसें एखादें देवालय भेटावें तसेंच तुला पाहून त्यास " झालें. काय दैवाची गति विचित्र आहे ! आनंद व दुःखरूपी त्या बिचाऱ्याचें प्रारब्ध त्याच जागीं लिहिलें होतें, मग तेथें त्यानें उभें राहून " तुजकडे निरखून पाहिलें यांत नवल काय ? त्या त्याचे पाहण्यांतच " त्याच्या सुखदुःखरूप भवितव्याचें पूर्व चिन्ह होतें."

असो. आतां अशी कल्पना करा कीं या भविष्यज्ञ कायदेपंडितानें आपल्या शेवटच्या खटल्याचा गोषवारा गुदरून तो मोकळा झाल्यावर खजील होऊन घशाला कोरड पडत शहरांतल्या आपल्या घाणेरड्या खोपटाकडे जावयास निघणार तों त्यास एका छोट्याशा मेजवानीचें आमंत्रण आल्यावरून एका वसंतगृहांत जातो व तेथील यजमानाचे इच्छेवरून तरुण विलासी,

सारख्या वयाच्या स्त्रीपुरुषांच्या समाजांत बसतो. येथें जरी चहाचा थाटमाटाचा समारंभ नसला, तरी शिळोप्याचे वेळीं मोकळ्या मनानें संभाषण करीत व संगीताचे मधुर ध्वनी ऐकत नुसती काफी पिण्यास हरकत नव्हती. कारण प्रोफेसर साहेब ह्मणतात " तेथें गायनाचें मधुर आलाप व संगीताचें " मधुर स्वर यांनीं त्या रमणीय शांत स्थळास जणों काय गुंगवून टाकिलें " होतें." आह्मी कल्पिलेलें वसंतगृह कमी योग्यतेचें असेल असें आह्मांस तर वाटत नाहीं. असो; प्रोफेसर साहेब पुढें ह्मणतात "दाट पालवीचीं झाडें, प्रफु-" ल्लित गुलाबांचे ताटवे, आणि हजारों फुलांवर विकासलेले अनेक प्रकारचे " रंग व सुगंध यांच्या गर्दींत तेथें आह्मी बसलों होतों. आमच्या बंगल्याचीं " दारें उघडीं असून त्यांतून बागेंतील फुलांची शोभा, अनेक प्रकारचीं " झाडें, मखमालीसारखीं हिरवीं गार मैदानें व निरानिराळ्या फळझाडांच्या " राया, अगदीं पर्वताच्या शिखरापर्यंत उंच नीच पसरलेल्या दिसत होत्या. " जिकडे तिकडे फुलांचे रंग खुलले असून त्यावरून झुळझुळ वारा वाहत " होता. त्यांतच पक्ष्यांचे व दुसऱ्या उपवनविहारी आनंदी प्राण्यांचें " मधुर आलाप ऐकूं येत. हें सर्व पाहून असें वाटे कीं वसंताचें सर्व ऐश्वर्य " तेथेंच कोंदलें आहे. हा सर्व प्रकार माहीत असून, आपल्या मनाची " स्थिति ठाऊक असून आपला फिरस्ता त्या विलासी यजमानाचें आतिथ्य " स्वीकारण्यास कसा गेला असेल न कळे. त्याच्या कठोर हृदयावर या " सौम्य वसंतविलासांचा परिणाम होणार नाहीं असें त्यास वाटलें होतें " ह्मणून कां दैवानें त्याची आणखी एक वेळ परीक्षा पाहण्याकरितां व " त्याची फजिती करून त्याचे आंगीं सहृदयत्वाचा गुण तरी आहे कीं " नाहीं तें पाहण्याकरितां त्यास तेथें नेलें ?

" तो तेथें गेल्याबरोबर लागलींच एकानें त्याचा इतरांशीं परिचय करून " दिला आणि ब्लूमाइनला तर त्याचें नांव गांव वगैरे सर्व कळविलें. तेथील " सर्व विवाहित व अविवाहित स्त्रियांत ब्लूमाइन ही फारच देखणी व

---

५ यूरोपियन लोकांत दोघांची ओळख होण्यास कोणातरी प्रौढ मनुष्याची मध्यस्ती लागते. जेथें मध्यस्ती शक्य नसते तेथें स्नेह होत नाहीं असें नाहीं; परंतु मुद्दाम जेथें ओळख करावयाची तेथें मध्यस्ती अवश्य आहे. या मध्यस्तीचे वेळीं मध्यस्थ उभयतांस परस्परांचीं नांवें व सामान्य वर्णन सांगतात व मग त्यांचा शेकह्यांड ( सलाम ) होतो. या मध्यस्तीचा गर्भितार्थ हा मनुष्य सदाचारी असून स्नेहास पात्र आहे असा असतो.

" लज्जाशील असून असंख्य दिव्यांत एखादा तारा चमकावा अशी दिसत " होती. काय त्या कुमारिकेची योग्यता? तिच्या पुढें आपला फिरस्ता तन- " मनधनेंकरून लीन झाला; परंतु तिच्याशीं बोलण्याचें धाडस त्याचें होईना. " कारण तिच्या सान्निध्यामुळें अत्यानंदानें त्यास इतकें गांगरून टाकिलें " कीं त्यास कांहींच सुचेना!

" ब्लुमाइनचें नांव त्याला पूर्वीं ऐकून माहित होतें. तिचे गुण, तिचे " लावण्य, तिची लहरीवृत्ति, यांबद्दल तिची सर्वत्र कीर्ती असे. या लोक- " वार्तेवरून आणि प्रसंगविशेषीं लोकांच्या बोलण्यांत तिची प्रशंसा व " निंदा होत असे त्यावरून त्यानें तिच्या स्वरूपाची कांहीं एक प्रकारची " कल्पना करून ती सर्व लोकांचे हृदयपीठावर देवतेसारखी विराजमान " असणारी कोणी अपूर्व स्त्री असेल, असें अनुमान केलें होतें. ही जरी " ऐहिक स्त्री होती तरी त्याचे मतें तिचें मोहकत्व देवांगनेंतही नसेल. " शिवाय कधीं कधीं समारंभांतून त्यानें तिला प्रत्यक्ष पाहिलेंही होतें. बांध्यानें " ती भव्य पण शहांगी[६] होती. तिचे काळे भोर कुरळे केश तिच्या सहास्य प्रफु- " ल्लित वदनास फारच शोभत. परंतु आजपर्यंत हें सर्व एखाद्या गारुड्याच्या " खेळांतील दृश्यमान व असाध्य प्रकाराप्रमाणेंच त्यास वाटून आपल्या " संबंधानें पाहतां नसल्या सारखेंच आहे असें तो समजे. कारण तिच्या " स्थितीशीं त्याच्या भिकार स्थितीचा मेळ बसावा कसा? आणि त्याचे " विषयीं तिचे मनांत प्रेमभाव उत्पन्न व्हावा कसा? फार तर काय, पण या " दोघांची योग्यस्थळीं गांठ पडणेंच मूळ असंभाव्य होतें. पण दैवगति फार " विचित्र आहे! तीच कुसुमावती आज त्याच्या संनिध बसली आहे! " तिचे डोळयांतील तेज आज त्याजवर प्रत्यक्ष पडत आहे; व तो जरी " हळूच बोलला तरी तिला ऐकूं जाईल इतकें तिचें सांनिध्य आहे. जसा " सूर्य नारायण अगदीं कोना कोपऱ्यांत सुद्धां आपलें दिव्य तेज फेंकितो, " त्याचप्रमाणें न जाणों प्रत्यक्ष ब्लुमाइनलाच हा सामान्य पुरुष विशेष " आदरानें पाहण्याची इच्छा झाली असेल. ज्याप्रमाणें तिचें स्वरूप तिच्या " निंदकांनींच त्याच्या मनांत भरविलें होतें, त्याचप्रमाणें याचेंही स्वरूप " याच्या निंदकांकडूनच तीस कळून तिचे मनांत त्याजाविषयीं प्रेम उत्पन्न " झालें नसेल कशावरून? तर मग ही अंतःकरणांतील खळबळ व स्नेहा-

६ शहांगी—सडपातळ—हा शब्द स्त्रियांस व घोड्यांस मात्र लावितात.

" कर्षण उभयपक्षींही होतीं काय ? जशा एखाद्या विद्युद्ग्राहक यंत्राच्या तारा
" जवळ जवळ आल्या ह्मणजे भेटण्याविषयीं आतुर होऊन स्फुरण पावूं
" लागतात, तद्वतच त्या उभयतांची स्थिति झाली होती ह्मणावें काय ? जसें
" चंद्राचे सांनिध्यानें सागरास भरतें येतें तसेंच त्या हृदयाधिष्ठात्री देवतेचे
" सांनिध्यानें त्याचें हृदय उचंबळूं लागलें असेंही ह्मटलें असतां चालेल.
" तात्पर्य, आपल्या फिरस्त्याची अशी स्थिति झाली होती. स्वर्गारोहणाचे
" उल्हासानें देवदूतांच्या मंत्रोच्चारासरसें जसें सर्व जीवात्म्यांचें अंतरंग कान्या
" कोपऱ्या सुद्धां खडबडून एकदम जागें व्हावें तद्वतच त्याची स्थिति होऊन
" सर्व सुख दुःख जें आंत सांठलें होतें, आणि भूत भविष्य काळचे जे जे
" प्रकार मुग्धरूपानें आंत वसत होते, ते सर्व आंतल्या आंत उचंबळून
" त्याचे अंतःकरणास भरतें येऊं लागलें.

" याहून फारच कमी चलबिचल झाली असतांही तो बावरून हताश
" होत असे; आणि मौन धारण करून व बाह्यात्कारी कठोरपणा दाखवून
" कसें तरी तो आपले विकार दाबून ठेवी. मग या वेळेसच त्याचें अंतः-
" करण मुळापासून खळबळलें असून तो हताश व निश्चेष्ट न होतां त्यास
" जास्त हिंमत व निर्भीडपणा येऊन न चाचरतां बोलण्याचें काम त्याचे
" हातून कसें झालें असेल कोण जाणे ! दैवानेंच त्यास या वेळीं विलक्षण
" स्फूर्ति दिली हेंच खरें. कारण नशीबांत जें असेल तें भोगिलेंच पाहिजे !
" तें दैवच त्यास ह्मणालें, कीं या वेळेस जर तूं आपलें स्वरूप प्रकट केलें
" नाहींस तर तें सदैव गुप्तच राहील ! कधीं कधीं आपल्या मनाची व्यग्रता
" निःसीम झाली ह्मणजे तींतून पार पडण्याचा मार्ग आपोआपच आपणास
" सुचून आपला आत्मा सर्व काळजीस मोठ्या शिताफीनें झुगारून देऊन
" शांत मनानें व जोमानें तो पुढील व्यवसायास लागतो. त्याचप्रमाणें या
" प्रसंगीं झालें. सांप्रत प्रसंगीं आपण हताश व स्तब्ध न राहतां संभाषणाचे
" प्रवाहांत किती खुबीदार रीतीनें चाललों होतों याचें या फिरस्त्यास राहून

---

७ ख्रिस्ती व महंमदी धर्मांत पुनर्जन्म नाहीं व असा एक सिद्धांत आहे कीं मृत्यूनंतर प्रत्येक मनुष्यजीवात्मा एका लिंबो नांवाच्या ठिकाणीं शेवटच्या न्यायाचे दिवसाची वाट पहात बसतो. मग या अखेर न्यायाचे दिवशीं परमेश्वर न्यायासनावर बसून एका देवदूताकडून सर्व मनुष्यजीवात्म्यांस पाचारण करून समोर आणील व मग त्यांस त्यांच्या पापपुण्याप्रमाणें स्वर्गांत अथवा नरकलोकीं योग्य सुखदुःखांत सदोदित ठेवील.

" राहून नवल वाटतें. फार काय पण हें सर्व संभाषण आपल्याच धोरणानें
" होतें असें ह्मणण्यांत आत्मश्लाघेचा दोष त्याजकडे येणार नाहीं. खरोखर
" त्यास त्या वेळीं दैवीस्फूर्तीच झाली होती; व अशी दैवीस्फूर्ती कडेलोट
" प्रसंगाचे वेळीं अद्यापही अनुभवास येण्यासारखी आहे. प्रस्तुत प्रसंगीं हा
" एकलकोंडा गृहस्थच प्रौढ भाषेनें व मोकळ्या मनानें आपले गंभीर विचार
" व्यक्त करीत होता. त्या वेळेस त्याचा आत्मा अफाट ज्ञानसमुद्राप्रमाणें
" होऊन सत्य व सुविचार यांचें माहेरघरच बनला असून त्यांतून इंद्र-
" धनुष्याच्या मनोहर रंगासारख्या अप्रतिम कल्पना एकामागून एक
" निघत होत्या."

या आनंदाचे प्रसंगीं एका वात्रट मनुष्यानें आपल्या रिकाम्या बडबडीनें तेथील सर्वच लोकांस अगदीं त्रास आणून सोडिला होता. त्या मंडळींत आपली कोणाशीं गांठ पडली आहे व तो आपणास कसा उडवून टाकील याची त्यास कांहींच कल्पना नव्हती. पण डायोजिनिसपुढें त्याचा काय टिकाव लागतो? त्यास कांहीं कोरडे बसल्याबरोबर बिचाऱ्यानें मौनव्रत धरून अखेरीस 'यःपलाय' केली! त्या वेळची डायोजिनिसचीं भाषणें प्रसंगानुरूप व फार मार्मिक आहेत, पण तीं आतां आह्मी देत बसत नाहीं. या वर्णनाचे अखेरीस टयूफेल्सड्राक साहेब ह्मणतात, " या वाग्युद्धांत त्या
" 'वात्रटाचा' पाडाव झाला ही गोष्ट तेथील सर्वच लोकांस रुचून त्यांनीं
" आपल्या फिरस्त्याची स्तुतीही केली, परंतु त्यामुळें ब्लूमाइनला जो
" आनंद झाला, व त्या कंटाळवाण्या गृहस्थाचें तोंड बंद केल्याबद्दल सुहास्य
" वदन करून तिनें जें त्याचें अभिनंदन केलें त्यापुढें इतरांनीं केलेली
" स्तुति काय पासंगास लागणार? असो यामुळें धीर येऊन त्यानें तिशीं
" लग्नसंधानाचें बोलणें लाविलें व तिनेंही तें शांतपणें ऐकून घेऊन योग्य
" उत्तर दिलें. इतकेंच नव्हे तर त्या वेळीं तिचा स्वर फारच मंजुळ व प्रेमा
" तिरेकामुळें सकंप झाला होता; व लज्जेची जी थोडी छटा तिचे गालांवर
" त्या प्रसंगीं आली होती, ती लोकांचे नजरेसही स्पष्ट आली असती; परंतु
" बरें झालें कीं त्या वेळेस संधिप्रकाश सर्वत्र फांकला असल्यामुळें लोकांचे
" दृष्टोत्पत्तीस ती आली नाहीं!

" उत्तरोत्तर या संभाषणांत परकीय भाव नाहींसा होत चालला; आणि
" एक कल्पना निघाली कीं दुसरी सुचावी या प्रमाणें संभाषणाचें स्वरूप

" खुलत चाललें. संभाषणांत परस्परांचे आत्म्यास पूर्ण स्वातंत्र्य येऊन
" बोलणारांचीं मनें सहृदयत्वानें ऐक्यभावास येण्याचे कांहीं समय असतात;
" तशांतलाच हाही समय होता. त्यामुळें परक्यांशीं बोलतांना संभाषणाचे
" नियमांची जी नेहमीं आडकाठी असते ती नाहींशी होऊन सर्वांचीं अंतः-
" करणें खुलास झालीं व त्यांतच एकमेकांचे मनोरंजनार्थ आनंदानें संवाद
" सुरू झाले; व संसार हा निवळ सुखांनीं भरलेल्या प्रेमदेवतेचे विहारवना-
" सारखा वाटूं लागला. देशकालादिकाच्या साह्यानुसार प्रेमळ अंतःकरणांत
" असाच ऐक्यभाव प्रसंगोपात उत्पन्न होतो. तथापि जसजसा संधिप्रकाश
" मावळत मावळत पर्वताच्या उंच शिखरावर मात्र दिसूं लागला, व त्या पर्व-
" तांची छाया दरींत लांबवर पसरूं लागली, तसतसें या उल्हासित लोकांस
" वाईटही वाटलें असेल. कारण ज्याप्रमाणें हा दिवस सरतो त्याचप्रमाणें
" मनुष्यांचा आयुर्दिवसही संपावयाचा असून, मग जिकडे तिकडे काळोख व
" धुकें पसरून ते सर्व आनंदाचे व शोकाचे आवाज व जिवापाड खटपटी
" बंद होऊन त्या अनाद्यंताचे ठायीं लीन होतील, ही कल्पना थोड्या बहुत
" मानानें प्रत्येकांत उत्पन्न झालीच असेल!

" असो. आमच्या फिरस्त्यास ते तास क्षणाप्रमाणें गेले. वाळून चाल-
" लेल्या शेतांस जशी अमृतवृष्टी व्हावी त्याप्रमाणें त्या अत्यंत मधुर ओठां-
" तून जे अमृतशब्द निघाले त्यांनीं त्याचा आत्मा धाऊन गेला. व त्याचे
" अंतरंगांतील सर्व उत्कृष्ट विकार येथें असेंच आनंदांत राहण्याविषयीं
" जणों काय त्याचें एकजुटीनें प्रोत्साहन करूं लागले; असो. शेवटीं फाटाफूट
" होण्याची वेळ आली. त्या वेळेस ब्लूमाइनचा हात त्याचे हातांत होता.
" मग त्या अमृतस्रावी संधिप्रकाशांत नक्षत्रांचे साक्षीनें त्यानें तीस पुन्हां
" भेटण्याविषयीं परवानगी मागितली; व तिनेंही ती नाकारिली नाहीं! नंतर
" तिचीं नाजूक चिमुकलीं बोटें हळुच दाबून (शेक ह्यांड करून) त्यानें
" तिचा निरोप घेतला. पण त्या वेळेस सुद्धां आपला हात झिडकारून
" किंवा अन्य तऱ्हेनें तिनें रागाचें कांहीं एक चिन्ह दाखविलें नाहीं."

अरेरे! गरीब बिचारा ट्यूफेल्सड्राक; पूर्ण पाशांत सांपडला खरा. अरे, जिनें आपल्या मोहिनीनें सर्व लोकांस वेडावून टाकिलें ती कसलाही बुद्धिमान् पुरुष असला तरी त्यालाही धायधाय रडूं लावण्यास कमी करणार नाहीं. अर्थात प्रसंग साधून तिनें आपल्या गारुडीविद्येनें तुला बद्ध करून टाकिलें

यांत संशय नाहीं. आमचे प्रोफेसर साहेब एके ठिकाणीं ह्मणतात, "प्रेम आणि "वेड हीं दोन्ही जरी अगदीं एकरूप नसलीं तरी प्रेमाचें आणि वेडाचें "बरेंच साम्य आहे. माझ्या दृष्टीनें प्रेम ह्मणजे व्यक्तींत अव्यक्तास ओळ-"खणें, व जी ( अव्यक्ताची ) निवळ कल्पना मात्र असते, तिला व्यक्त-"तेनें पाहणें होय. ईश्वराच्या कृपेनें प्रेम-स्फूर्ति होऊन जशी अव्यक्ताशीं "( अंशमात्रें ) खरी ओळख होते, तशीच दैत्यराजाचा प्रसाद जें वेड "त्यानें त्याच अव्यक्ताशीं खोटी ओळखही होऊं शकेल. खोट्या प्रेमांत "ज्याप्रमाणें प्रत्यक्षावर कल्पनेची भ्रमोत्पादक छाया येते त्याप्रमाणें खऱ्या "प्रेमांत सुद्धां प्रत्यक्षाच्या परिमेय स्वरूपावर कल्पना आपली छाया पाडि-"तेच. अरकिमेडिस ह्मणे कीं हें जग केवळ परिमेय गोटीसारखें असून "मला हवी तितकी लांब तरफ मिळाली व ती टेंकण्यास जागा मिळाली "तर मी तेंही हालवीन; त्याप्रमाणेंच हा जीवात्मा प्रत्यक्षाचे टेकूवर कल्प-"नारूप तरफ लावून अनंत ब्रह्मांडास कवळूं पाहतो! कारण 'मन एव "मनुष्याणां कारणं बंध मोक्षयोः' मन हें मनुष्यास बंधाचें व मोक्षाचेंही "साधन आहे. हें भासमान आयुष्य केवळ रंगभूमीप्रमाणें असून तीवरून "या बंधमोक्षांच्या कल्पनारूप वाटा एकमेकींवरून अनेक प्रसंगीं जातात; "व त्यामुळेंच या संसारांत आनंदपर्यवसायी व शोकपर्यवसायी नाटकें "दिसतात. वास्तविक पाहतां शरीरधारणास फार तर चार आणे रोज "मिळाला ह्मणजे बस आहे. परंतु मनाची भूक इतकी विलक्षण आहे "कीं त्याला या ग्रहमालेंतील एवढी पृथ्वीच प्राप्त झाली तर काय, परंतु "सूर्यासकट सबंध ग्रहमाला जरी मिळाली तरी त्याची हांव पुरी होणार नाहीं. "पिऱ्हसचें उदाहरण पहा. त्यानें सर्व पृथ्वी जिंकिली तरी पूर्वींपेक्षां अधिक "आनंदानें त्यास पाणीही पिण्यास सांपडलें नाहीं." त्याचे सारखीच या आपल्या डायोजिनीसचीही गोष्ट आहे. काय त्याची योग्यता? ज्ञानाग्नीचें अभेद्य कवच घालून जो स्वर्गास कवळूं पाहणार, तो या अभिमानी मोहि-नीच्या नादांत पडून त्यासही वेड लागावें काय? जणूं काय या भूतलावर अशी स्त्री एवढीच असावी!

ट्यूफेल्सड्राक साहेब ह्मणतात कीं त्या नंतर तिशीं त्यांचा शहरांत जास्त

---

८ पिऱ्हस—भाग २ टीप, २ पहा.

चय झाला. " मग दिवसानुदिवस एखाद्या विकसित कुसुमाप्रमाणें ती कुसुमावती रोज त्यावर कृपादृष्टी करी. फारच थोड्या दिवसांपूर्वीं या फिरस्त्यास जिकडे तिकडे तमोमय झालें होतें; व आपण एखाद्या सुंदरीच्या प्रेमास पात्र होऊं अशी त्यास आशाहीं राहिली नव्हती. सर्व वस्तूंविषयींच त्यास अविश्वास झाल्यामुळें आपणही कोणी ह्मणण्यासारखे असूं असें त्या बिचाऱ्यास वाटलें नव्हतें. अभिमानानें व भित्रेपणानें त्यानें जगाचा रस्ता सोडला असून मनुष्याच्या सहवासास त्यामुळें त्यानें आपणांस पारखें करून घेतलें होतें. तरी त्याची कल्पनासृष्टी त्यास जाच करीत असे, पण नाइलाज असें समजून अभिमानानें त्यानें संसारसुखाची आशा अगदींच सोडिली होती. तोच आतां काय प्रकार आहे पहा. 'ती लावण्यवती व सद्गुणी कुमारी आज तुजकडे प्रत्यक्ष पहात असून तिच्या काळ्या भोर डोळ्यांवरून तिचे मनांत तुजविषयीं यत्किंचितही तिरस्कारबुद्धि नाहीं हें स्पष्ट व्यक्त होत नाहीं काय? काय तिची योग्यता ! हे ईश्वरा तिचें सर्वथैव कल्याण होवो.' याप्रमाणें मंजुळ गुंजारव त्याचे अंतःकरणांतूनही एकसारखे निघत असून तिच्या वात्सल्याबद्दल आपण तिचे कसे उतराई होऊं असें त्यास झालें. अर्थात् आपणही मनुष्य असून आपणाकरितां ही परमेश्वरानें अनिर्वाच्य आनंदाची तरतूद करून ठेविली आहे, असें त्यास वाटूं लागलें.

" या वेळेस त्यांचा आयुष्यक्रम ह्मटला ह्मणजे मोकळ्या मनानें संभाषण मग तें गूढ विचारांनीं भरलेलें असो, अगर नुसतें विनोदपर असो; नेत्रांचें अस्थैर्य, हास्य, अश्रू व यांचे जोडीस अपरिस्फुट गायनाचे मधुर ध्वनि यामध्येंच त्यांचा वेळ जाई. अशा प्रोत्साहक विषयांनीं या तेजःपुंज स्त्रीरत्नाचे सांनिध्यांत या आपल्या फिरस्त्याची संभावना होऊन सृष्टिदेवीचें एक अज्ञातपूर्व स्वरूप त्याचे नजरेस पडावें असाच योगायोग होता! ब्लूमाइनसारखी सुस्वरूप स्त्री दुसरी नसेल. नक्षत्राप्रमाणें ती तेजःपुंज असूनही इतकी नाजुक होती कीं तेजाच्या निवळ रसानेंच तीस निर्माण केलें आहे कीं काय असें वाटे. त्याचे मतें तिचे दोष सुद्धां गुणमयच असून ते नसते तर तितका तिला कमीपणाच आला असता! ती त्यास केवळ अमृतवल्लीप्रमाणेंच होती; कारण तो मृतप्राय झाला असतां त्यास तिनेंच पुन्हां सजीव केलें नाहीं काय? ज्या संदेहानें

" त्यास पूर्वी गांजिलें होतें त्यानें आतां पळ काढिला असून पुन्हां हा संसार
" त्यास आनंद व आशा यांच्या तेजानें प्रफुल्लित दिसूं लागला. आतां
" गतकाळाच्या गोष्टी केवळ अस्पष्टपणें मात्र स्मरणांत येत. प्रत्यक्ष नंदन-
" वनांत असल्यावर ते दुःखमय प्रसंग दिसावेत कसे? त्याच्या कारागृ-
" हाच्या तमोरूप भिंती एकदम नाहींशा होऊन आज तो प्रतिबंधांतून
" मोकळा होऊन प्रत्यक्ष जीवनकलेचा अनुभव घेऊं लागला. बरें पण याला
" प्रेमप्रणय ह्मणतां येईल काय? काय सांगावें! त्याचें सर्व अंतरंग व
" आत्मा व जीवितच या पंचाक्षरिणीचे स्वरूपानें तन्मय झालें होतें. पण या
" स्थितीस त्यानें अद्याप प्रेम हें नांव दिलें नव्हतें. अजून ही प्रेमसृष्टी त्यास
" भासमान मात्र असून तिची मजल विचारापर्यंत पोहोंचलीच नव्हती."

तथापि सृष्टिधर्माप्रमाणें पाहतां या आनंदाचे स्थितीस विचाराचें स्वरूपही आलेंच पाहिजे. व पुढें तदनुरूप आचरणही झालें पाहिजे. कारण ही पंचाक्षरीण व पंचाक्षरीही झाला तरी तीं उभयतां काळाचींच अपत्यें असून तीं नुसत्या प्रेमसमुद्राच्या लाटांवर तरंगत राहणें अशक्य होतें. ह्मणून तिच्या त्या कोमळ व प्रेमभरित अंतःकरणांत हा सुखातिरेकाचा संबंध तोडून टाकावा असा निश्चय कसा झाला, हें बिचाऱ्या आपल्या प्रोफेसरास आजूनपर्यंतही उमगत नाहीं आणि जिच्या प्रेमविषयक कल्पना बाताबेताच्या व स्वार्थपर होत्या त्या तिच्या चुलत बहिणीनें कुसुमावतीचें हें प्रेमबंधन कसें तोडिलें असेल यांतही प्रोफेसर साहेबास राहून राहून मोठा विस्मय होतो. पण त्यांत कांहीं मोठेसें गूढ नसून जादुविद्येच्या साह्यावांचूनच त्याचें कारण आह्मांस इतक्या अंतरावरूनही सांगतां येईल. आमच्या तत्ववेत्त्यानें या एका प्रश्नाचें उत्तर दिलें कीं निकाल झाला! टच्यूफेल्सड्राक साहेबांशीं लग्न करून त्या स्त्रीस समाजांत कोणच्या स्थितींत वागतां आलें असतें? सोन्याचें नांव तर एकीकडेच राहिलें; पण नुसत्या पितळेच्या पत्र्यानें मढविलेली, किंवा निदान किमानपक्ष लोखंडाच्या कमानीची तरी बगी तिला बसावयास मिळाली असती काय? हे मूर्खा नामावशिष्ट कायदेपंडिता, तरुण स्त्रीपुरुषांच्या नुसत्या अंतःकरणधर्मानें कोठें चुलीवर भांडें चढत नसतें. तूं पुरुषासारखा पुरुष तत्ववेत्ता ह्मणवितोस परंतु तुझेपेक्षां ती तुझी दिव्य ब्लुमाइनच बायको असून शहाणी खरी. तुजविषयीं निराश होऊन कोणा तरी श्रीमंत पुरुषाशीं लग्न करण्याचा निश्चय करून खरोखरच तिनें आपली पोक्तबुद्धि व्यक्त केली!

हें प्रेमवेड मूळ उद्भवलें कसें व कोणच्या थाटानें तें वाढलें हें वाचकांनीं पाहिलेंच आहे. प्रेमाच्या ऐन बहारीचे वेळीं त्याची स्थिति कशी होती, व लागलींच पुढें जी तातातूट झाली तेव्हांची भयंकर स्थिति कशी होती याचें वर्णन करण्याविषयीं वाचकांनीं आतां आह्मांस आग्रह करूं नये. कारण एव्हांपासून या कागदांतील मजकुरास धरबंध कांहींच राहिला नसून या गोंधळांतून या प्रकरणासंबंधीं कांहीं तुटक तुटक उतारे देऊं ह्मटलें तरी अशक्य आहे. आणि इतकेंही करून फायदा काय? एखादें विमान उंच आकाशांत जाऊन तेथें एखाद्या ताऱ्यासारखें दिसतें आहे तोंपर्यंत त्याजकडे पाहण्यांत आनंद वाटतो. परंतु आंतल्या हवेच्या प्रसरणानें किंवा अग्निप्रकोपामुळें आंतील हवेची बुदली फुटली ह्मणजे त्यांत पाहण्यासारखें काय आहे? मग तो दुर्दैवी विमान चालविणारा आपल्या विमानाचे तुकडे वाळूच्या थैल्या व फाटके पारच्यूट यांच्या गबाळासह खालीं मृत्यूच्या दाढेंत पडलेला मात्र पहावयास सांपडणार! त्याचप्रमाणें टच्यूफेल्सड्राक साहेबांस स्वर्गमंदिराची शेवटची शिडी ढाळाढाळानें तिराप्रमाणें चढतांना आपण पाहिलें व आतां तेथें अडथळा झाल्यावर तिराप्रमाणेंच सरळ रेषेंत तेथून खालीं पडलेले पहाण्याचें उरलें आहे! आमच्या वाचकांपैकीं ज्यांनीं एखाद्या स्त्रीशीं स्वयंवराची इच्छा धरून पुढें ओंफस झालें असेल त्यांस टच्यूफेल्सड्राक साहेबांच्या स्थितीच्या सामान्य स्वरूपाची कल्पना करितां येईल. फरक इतकाच कीं आमच्या वाचकांची प्रियतमा केवळ सामान्य स्त्री असूनही जर तिच्या विरहानें त्यांच्या मनाची अशी स्थिति होते, तर जिला सगळ्या

---

९ विमानाची पूर्वीची सामान्य रचना अशी होती—एका पाळण्यास एक हवेची बुदली रेशमी जाळ्यांत घालून अशा रीतीनें बांधिली असते कीं तिच्या खालीं तो पाळणा समतोल लोंबत राहवा. ही बुदली फार लवचिक असून आंतील हवा जसजशी फुगेल तसतशी जास्त जागा व्यापिते. पाळण्यांत पुष्कळ वाळूच्या थैल्या असतात. मग त्या बुदलींतली हवा शेकानें उष्ण करून बुदली फुगवून ती मोठी झाली ह्मणजे वर जाऊं लागते व तिच्या बरोबर पाळणाही चढतो. जसजशी वर जाण्याची गती कमी होईल तसतशा वाळूच्या थैल्या खालीं टाकितात. खालीं येतांना बुदलींतली हवा बेताबेतानें निववीत बुदली लहान करून विशिष्टगुरुत्व वाढवितात. पारच्यूट = हवेची बुदली. आतां विमानास चांगलेंच व्यावहारिक स्वरूप आलें असून प्रसंगविशेषीं आकाशांतून स्थलांतरही करितात. रूसो जपानी युद्धांत पोर्ट आर्थरचे हल्ल्यांत विमानांचा उपयोग केला होता.

पृथ्वींत जोड नाहीं त्या ब्लूमाइनच्या विरहानें टच्यूफेल्सड्राक साहेबासारख्या प्रेमाग्निपूर्ण हृदयाच्या माणसाची कशी स्थिति झाली असेल तिची पूर्ण कल्पना स्वतःच्या अनुभवानेंही त्यांस करितां येणार नाहीं; असें वाटतें. ह्मणून आतां आह्मी शेवटचा प्रसंग मात्र देतों.

टच्यूफेल्सड्राक साहेब ह्मणतात, " एके दिवशीं आपला फिरस्ता पहातो " तों त्यांस आपला अमृतसूर्य अगदीं अंधुक व तेजोहीन झालेला दिसला. " ती सुंदरी स्तब्ध, बावरल्यासारखी, किंवा झोंपी गेल्यासारखी उभी " असून तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या होत्या; व तिचा चेहरा " अमृतसूर्यत्वापासून रूपांतर झाल्यामुळें विषरसानें परिपूर्ण अशा धूमकेतू " सारखाच दिसत होता. असो; ती कांपत कांपत ह्मणाली, "आतां आपली " शेवटची भेट हीच." या वेळेस आमच्या विमानगामी फिरस्त्याला विद्युदाघाताप्रमाणें धक्का बसल्यासारखें होऊन तो सुन्न झाला. तरी या कहराचे प्रसंगीही त्याचें प्रसंगावधान सुटलें नाहीं. पण त्याचा उपयोग काय? त्यानें मोठ्या कळवळ्यानें व कळकळीनें तिची मनधरणी केली. तिच्या हातापायां पडला, रागावून रुसून पाहिलें; पण कांहीं उपयोग झाला नाहीं. असा प्रणयभंग करण्याचें कारणही ती सांगेना! मग बाकीची काय कथा? तेव्हां आपला फिरस्ता ह्मणाला 'बरें तर, बाईसाहेब, मीही आपला आतां निरोप " घेतों' हे शब्द मोठ्या रागानें व निष्ठुरतेनेंच त्यानें उच्चारिलें; कारण " त्याच्या अभिमानी जीवास हें तिचें वर्तन फारच लागलें. या निरोपाचे " वेळीं तिनें आपला हात त्याचे हातांत घातला होता; आणि हे त्याचे " कठोर शब्द ऐकून अश्रुपूर्ण नयनांनीं ती त्याजकडे पाहूं लागली तों याचें " चित्त बेफाम होऊन यानें तीस दृढालिंगन दिलें. त्यांनीं एकमेकांचें

---

१० यूरोपियन लोकांत विवाहासंबधानें अशी चाल आहे कीं प्रथम पुरुषानें आपल्या गुणांनीं मुलीस वश करून घेऊन आपल्याशीं लग्न लावून घेण्याबद्दल तिची संमती मिळवावी व मग मुलीनें आईबापांची संमती मिळवावी. आमचेकडील स्वयंवरांत याच्या उलट व्यवस्था असे. उदाहरणार्थ द्रौपदीचे स्वयंवरांत कर्ण पुढें होऊन स्वयंवरांतील अटीप्रमाणें धनुष्य घेऊन बाण योजणार होता. परंतु तो कुलहीन आहे अशा सबबीवर त्यास एकीकडे केलें. आणि वास्तविक हीच गोष्ट बरोबर आहे. कारण वधू राजी होऊन जरी आईबापांचे हरकतीमुळें लग्न राहिलें तरी वास्तविक पाहतां त्या मुलीस स्वतःच्या संमतीनें विवाहितत्व आलेंच. मग तीस पुनर्विवाह मात्र शक्य आहे. व ती गोष्ट तर जुन्या हिंदूशास्त्रास असंमत आहे.

" चुंबन घेतलें आणि तेवढा एक क्षणभर त्यांचे आत्मे एकरूप झाले. हाच " पहिला प्रसंग; व शेवटचाही प्रसंग हाच!" याप्रमाणें टच्यूफेल्सड्राक साहेब एकाच चुंबनानें अजरामर झाले! आणि मग ? मग काय! " त्यांचा आत्मा " भयंकर तमोराशीखालीं चूर होऊन गेला व जणूं काय आतां कल्पांत " होत आहे कीं काय ह्मणून या नष्ट झालेल्या सृष्टींतून खालीं अनंत पाता- " ळांत पडावा, याप्रमाणें तो निस्तेज व खिन्न होऊन बसला!"

# भाग सहावा.

## दुःखाचे डोंगर.

आपल्या अनुभवास पूर्वींच आलें आहे कीं आपल्या प्रोफेसर साहेबा-सारख्या मनुष्यासंबंधानें घडणाऱ्या गोष्टी बहुधा सामान्य नियमांस अनुसरून नसतात. कारण असल्या मनुष्याच्या स्वभावांत इतकी कांहीं गुंतागुंत व वैचित्र्य असतें कीं त्यांत अमुक एक प्रकार संभवेल व अमुक संभवणार नाहीं असें कोणाही मानसशास्त्रवेत्त्यास कधींच खचित सांगतां येणार नाहीं. तात्पर्य, कोणत्याही मोठ्या अणीबाणीच्या प्रसंगीं—दुःखाच्या कहरांत व सुखाच्याही अतिरेकांत--असला मनुष्य अमुक रीतीनेंच वागेल, असें कोणासही सांगतां येणार नाहीं.

उदाहरणार्थ, सांप्रत सृष्टीचा चुराडा होऊन आपले विकारवश टच्यूफेल्स-ड्राक साहेब अशा विलक्षण रीतीनें खालीं पडले असतां आमच्या तत्त्वज्ञानशून्य वाचकांस असें वाटेल कीं आतां ते एक तर वेड्याच्या इस्पितळांत आपली स्थापना करून घेतील, किंवा अचकट विचकट कविता करून ज्याला त्याला शिव्या देऊं लागतील; किंवा आपलें डोकें फोडून प्राण देतील. यांपैकीं कोण-चीही गोष्ट झाली तरी ती असल्या वाचकांस अतोनात वेडगळ वाटेल. छाती बडविणें, कपाळ फोडून घेणें, आरडा ओरड करणें व मोठमोठ्यानें किं-चाळणें, शिव्या देणें, हातपाय आपटणें, मारहाण करणें, सामानाची आदळ-

आपट करणें वगैरे सर्व वेडगळपणाच्या गोष्टींचा वरील तीन गोष्टींत अंतर्भाव होत असून या तिहींच्या खालच्या प्रतींतच त्या लेखिल्या जातील. दुसऱ्यांचीं घरें जाळणें हें इतक्या कमी कोटींत येईल कीं नाहीं याची मात्र खात्री देतां येत नाहीं.

तरी आमच्या टयूफेल्सड्राक साहेबांनीं आपल्या वेडाचे भरांतही असलें कांहींएक केलें नाहीं. त्यांनीं मुकाट्यानें पूर्वींचा कामधंदा आटोपला, व वारीची पताका उचलून पृथ्वीप्रदक्षिणा व पृथ्वीपर्यटन करण्याकरितां ते निघाले. टयूफेल्सड्राक साहेबांची कुशाग्र बुद्धि, स्वभावाचा नाजुकपणा, कल्पनाशक्तीची तरतरी, भाषणांतील अतिशयोक्ति वगैरे सामाधानास आड येणारे गुण पाहिले ह्मणजे त्यांतच मिसळून इतका धिमेपणा व बाह्य गोष्टीविषयीं औदासिन्य हे त्यांचे गुण कसे नांदले असतील याचें मोठें आश्चर्य वाटतें. त्याचें प्रत्यक्ष उदारहण पहा. या कुसुमदेवतेशीं एकाएकीं विरह झाला त्या प्रसंगास कल्पांत व सृष्टीचा संहार असें त्यानीं ह्मटलें आहे; व टयूफेल्सड्राक साहेबास ही गोष्ट कांहीं अंशीं अशाच स्वरूपानें भासली असेल यांत संशय नाहीं. पण चमत्कार पहा कीं या कल्पांतप्रसंगीं त्यांचे स्वभावांत यत्किंचितही चलबिचल झाली नाहीं. उलट तो स्वभाव त्यामुळें जास्त दृढ मात्र झाला. त्यांचें अंतःकरण पूर्वीं कोणीं कुलूप लावून बंद केल्याप्रमाणें गूढ होतें, तें ब्लूमाइननें एक वेळ आपल्या जादूच्या किल्लीनें उघडल्याबरोबर आंतील गुप्त वस्तु ( अनेक प्रकारचे विकार ) इतक्या झपाट्यानें व अनिवार्य रीतीनें बाहेर पडल्या, कीं त्यास उपमा एका अरबी गोष्टींतील कुपींत बंद केलेला राक्षस बाहेर पडून त्यानें सर्व आकाश व्यापून टाकिलें त्याचीच शोभेल. परंतु ही जादूची किल्ली बाहेर निघाल्याबरोबर त्यांचे अंतःकरणकपाट जसेंच्या तसें पूर्ववत बंद झालें; आतां तें उघडण्यास दुसरी किल्लीही मिळण्याची आशा नाहीं. कारण आह्मीं पूर्वीं सांगितलेंच आहे कीं टयूफेल्सड्राक साहेबांचे हातून दुसऱ्या स्त्रीशीं प्रेमप्रणय होणें अशक्य आहे. काय विलक्षण पुरुष हा ! हा हृदयमर्मभेदक प्रकार झाला न झाला तोंच ही गोष्ट केवळ अशीच व्हावयाची, व ती संबंधानें आतां जास्त चर्चा करण्यासारखें कांहीं नाहीं, असेंही बाह्यात्कारीं दाखविण्याचा त्यांनीं आव घातला आहे. ते ह्मणतातः—

" त्या देवांगनेच्या नेत्रकटाक्षांत जी आशामृताची लाट दिसत होती तिनें या
" फिरस्त्यास मृत्यूच्या दाढेंतून सोडवून स्वर्गसुखांत घातलें होतें, परंतु

" तिच्या तोंडावर नरककुंडाची छटा दिसूं लागली; त्यामुळें तो त्या स्वर्ग-
" सुखांतून बाहेर उडाला व भूतांच्या किलकिलाटांत येऊन पडला. हा सर्व
" भ्रमाचा खेळ असून त्या भ्रमामुळें आपल्या **फिरस्त्यास** जेथें पर्वतप्राय
" लाटांनीं भरलेला समुद्र होता तेथें नंदनवन दिसलें. परंतु तो सर्व भ्रमच
" होय. तरी तो सर्व प्रकार मीं स्वतःच पाहिला असल्यामुळें सर्वथैव तो
" भ्रमच असेल असेंही ह्मणवत नाहीं." परंतु या प्रकारानंतर त्यांस जें काय वाटूं लागलें, त्याचें अंतःकरण खवळून तेथें जी उदासता नांदूं लागली, तीवर मौनरूप झांकण घालून त्यांनीं ती बाहेर अगदीं व्यक्त होऊं दिली नाहीं. यांत त्यांचा खरोखर मोठेपणा आहे. अर्थात् तो सर्व प्रकार आह्मांस स्पष्ट दिसत आहे. हा निराशे नंतरचा पहिला वेडाचा भर गेल्यावर आमच्या शूर निशेननें आपल्या तत्त्वज्ञानाच्या सर्व चिंध्या गोळा करून त्या आपल्या भोंवतीं घट्ट गुरफटून घेतल्या. तो अगदीं नम्र व गरीब झाला. व कडकडीत मौनव्रत धरून कांहीं बोलण्याचा प्रसंगच आला तर कोठें हवामान, कोठें वर्तमानपत्रांतलि गोष्टी, यांवर कशी तरी वेळ मारून नेई. त्यांच्या दाट भुंवयांवर जी एखाद वेळ आंठी पडे व डोळे लालभडक होऊन त्यांतून अग्नि-रसासारखी दीप्ति दिसे तीवरून मात्र यांचे अंतरंगांत कांहीं भयंकर काहूर चाललें असून सैतानाचे दूतांनीं तेथें गुप्तपणें विलक्षण थुयथुयाट चालविला आहे असा एखाद्यास तर्क होई. शाबास ट्यूफेल्सड्राक साहेबांची! कारण जशा कांहीं चिमण्या (राकेलच्या दिव्यावरच्या काचेच्या नळया) आंतला धूर सर्व गट्ट करितात, याप्रमाणें आपला क्रोधाग्नि आपण गिळून टाकून सैतानाच्या दूतांनीं अंतरंगांत चालविलेला धुमाकूळ बाहेर कळूं न देणें हा सांप्रत काळीं कांहीं लहानसान गुण नव्हे!

तथापि हा पृथ्वीप्रदक्षिणेचा विलक्षण उपक्रम करितांना ट्यूफेल्सड्राक साहेबांचे मनांत कांहीं वेड उद्भवलें नसेल असें ह्मणण्याची जबाबदारी आह्मी आपणावर घेत नाहीं. कारण **मकर** व **कुंभ** राशींच्या पुडक्यांतील कागदांची स्थिति पाहतां ती अशा वेडाची द्योतक असावी असें वाटतें. त्यांनीं अंगिकारिलेलें कायमचें प्रवासव्रत फारच परिश्रमाचें असून त्याचें कारण कोठेंच कांहीं सांगितलेलें नाहीं; व त्यास कांहीं कारण अगर उद्देश असेल असेंही वाटत नाहीं. अंतःकरणांत जी खळबळ चालली होती तीमुळें स्थिर बसवेना ह्मणून वाट फुटेल तिकडे हिंडावें एवढाच त्यांचा संकेत दिसतो,

जणूं काय कोणा ऋषीचा शाप होऊन त्यास चक्ररूपत्व आल्यामुळेंच तो याप्रमाणें फिरफीर फिरत असावा ! या आमच्या संशयास या पुडक्यांतील कागदांच्या अव्यवस्थितपणानें चांगलीच बळकटी येते. उदाहरणार्थ, हा पुढें दिलेला उतारा कांहींएक प्रस्तावने वांचून अचानक आमचे दृष्टीस पडतो तो पहा.
" वाटेनें जातां जातां एका टेंकडीवरून वळल्यावर जेव्हां पुढील प्रदेश या
" फिरस्त्याचे नजरेस पडला तेव्हां त्याचे मनांत एक विलक्षणच विकार उत्पन्न
" झाला. तसा दुसऱ्या कोणच्याही गोष्टीनें होणें अशक्य आहे. त्याच्या पुढें
" तें सुंदर शहर दुरून एखाद्या करंडीसारखें दिसत असून तेथील लो-
" कांची अनेक प्रकारची हालचाल त्याच्या कल्पनादृष्टीनें त्यास प्रत्यक्ष दिसूं
" लागली. त्याच्या भोंवतालीं फळझाडांच्या राया, व जमिनीवरील गवता
" हिरवे चार झालेले उंचवटे, हे जणूं काय त्याचे रक्षणार्थ उभे आहेत
" तेथील देवळाचें शिखर स्वर्गाची वाट दाखविणाऱ्या एखाद्या देवदूताच्या
" करांगुलीसारखें दिसत आहे; वर धुराचें निळें छत लागलें असून तें त्या
" शहराच्या प्राणवायूच्या वातावरणाप्रमाणें भासत आहे. शहराचा प्राणवायु
" ह्मणण्याचें कारण आत्मा हा एकरूप असल्यामुळें जी जी वस्तु तो
" प्रेमदृष्टीनें पाहतो ती ती त्यास सात्मवत् दिसते ! वास्तविक पाहिलें
" तर ती लहानशी वस्ती ह्मणजे केवळ कांहीं झोंपड्यांचा समुदाय, याहू-
" कांहीं जास्त नाहीं. तथापि या कारणामुळें ती आपणास एखाद्या आत्म
" वान् पुरुषाप्रमाणें वाटते ! तशांत जर त्या जागेंत आपणांस पूर्वी आनंदाचे
" व शोकाचे प्रसंग आले असतील, तेथें जर आपल्या लहानपणचा प्रवास
" किंवा इष्टमित्र अगर वाडवडिलांच्या समाधी असतील तर आणखी परंतु
" प्रकारचे विलक्षण विचार आपल्या मनांत येतात बरें !" आमच्या
या टिपणावरून असें वाटतें कीं हें एंटेपफुलचेंच वर्णन असून जसा एखादा गरुडपक्षी जखमी झाला असतां आगोदर आपल्या घरट्याकडे धांव घेतो; किंवा लढाईतून पळ काढलेले शिपाई, अगर लोकांनीं वेवतावून सोडलेले बाहिष्कृत लोक आपोआप आपल्या जन्मभूमीकडे धांव घेतात, तशीच या प्रसंगीं टय़ूफेल्सड्राक साहेबांची स्थिति होऊन ते प्रथम आपलें मूळगांव जें एंटेपफुल त्याकडे वळले असावे. मग मोठ्या आशेनें त्या जन्मभूमीचें दुरून दर्शन घेतल्यावर तेथें तरी आपला परामर्श घेणारा कोण आहे, असा विचार येऊन तेथूनच ते दुसरीकडे वळले असावे.

त्यांची पुढील धांवही जास्त सुखावह झाली असेल असें दिसत नाहीं. ही दुसरी धांव त्यांनीं एका भयंकर व सृष्टिसौंदर्यानें मुसमुसलेल्या अरण्याकडे घेतली होती. तेथें जाण्यांत त्यांच्या मनांतला हेतु हा कीं, भूमातेच्या या हृदयफलकावर तरी आपल्या जिवास शांति मिळेल. हाच त्यांचा हेतु असेल असें नक्की सांगतां येत नाहीं पण या पुढें दिलेल्या टिपणावरून असा आमचा अजमास होतो. हें टिपण मागें दिलेल्या टिपणापासून बऱ्याच अंतरावरचें आहे. परंतु या मधल्या अवधींत विशेष कांहीं ह्मणण्यासारखें झालेलें नाहीं. त्या टिपणांतील मजकूर येणें प्रमाणेः—

" पर्वत कांहीं त्याला पूर्वीं माहीत नव्हते असें नाहीं. परंतु एथल्या " प्रमाणें भव्यपणा व शोभा हीं दोन्ही असलेले पर्वत फार क्वचित् दृष्टीस " पडतात. खनिजशास्त्रवेत्ते ज्यास पूर्वकालीन दगड ह्मणतात त्या दगडाचे " हे पर्वत होते. हे दगड बहुधा ओबडधोबड असून फारच मोठे असतात. " परंतु त्या स्थळाच्या हवाशीरपणामुळें व आसमंतांतील प्रदेशाच्या सौंदर्या- " मुळें व भव्यतेमुळें हा ओबडधोबडपणा कांहींसा कमी भासत होता. " या प्रदेशांत सर्वत्र किर्र्र् झाडी आहे. व त्या ओलाव्यामुळें हिरवाचार " झालेला एक काळ्या दगडाचा कडा दाट पालवीच्या झाडांतून उंच डोकें " काढीत आहे. त्या खडप्याच्या आजूबाजूस झाडांच्या आश्रयानें कांहीं " पांढऱ्या स्वच्छ झोंपड्या आहेत. या ठिकाणीं **सृष्टिदेवी** क्षणभर अत्यंत " मोहक, क्षणभर अत्यंत भव्य, अशीं अनेक रूपें धारण करून आपल्या " समोर येते. तथापि या डोंगरांतील सरळ खिंडी खिंडींनीं घोड्यावर बसून " जातां येतें. मधून मधून दोहों थडींस उंच कडे तुटलेले स्वच्छ निर्झरोदकाचे " प्रवाह आडवे येतात. व एखाद्या ठिकाणीं खोल भुयारासारख्या दगडाच्या " पोकळींत वळणा वळणांनीं जाऊन ते पडतात. एखाद्या ठिकाणीं खोल " दरींत ते एकदम दृष्टीस पडून तेथेंच त्यांचें रमणीय सरोवर बनतें व त्यांचें " सांनिध्यास मनुष्यांस पुन्हा आश्रय सांपडतो! या ठिकाणीं असें वाटतें कीं " **शांतता व शक्ति** ह्या दोन्ही **सृष्टिविभूती** तेथें नांदून सदैव विहारच " करितात कीं काय?

" पण या **शांततेच्या** माहेरघरांतही या **काल-पुत्रास** शांततेचें कसें तें " नांव नाहीं! उघडच आहे, गतकालापैकीं एखादें भूत पुढें नाचत असून " भविष्यस्थितीच्या तमोमय कल्पनातरंगांत त्या शांततेचा गंध कोठून

" मिळणार ? या **भूतलावरील सुखाचीं द्वारें** तुला सर्वथैव बंद झालीं नाहींत
" काय ? वेडगळ दिसणार नाहीं अशी एक तरी सुखाची आशा तुला
" उरली आहे काय ? तथापि अशा स्थितींतही समाधानासारखा एक
" विचार सुचतो. अरे, प्रत्यक्ष **मृत्यु** समोर असतांही जो डगत नाहीं त्यास
" बागुलबोवाची भीति ती काय वाटणार ? पण हा विचार तुला रुचला तर !

" असल्या विचारांत गुंग असतांच आपल्या **फिरस्त्याचें** चित्त दुसऱ्या
" एका बाह्य विषयाकडे वेधलें. कारण ती दरी एकाएकीं संपून पुढें एकदम
" एक मोठा डोंगर लागला. तो निबळ दगडाचा असून वरील पाणलोटा-
" मुळें त्याच्या चढणीवर घोड्याचे पाय ठरण्यासारखे नसल्यानें घोड्यावर
" बसून तेथून जाण्याची सोय नव्हती. वर गेल्यावर अस्तमानचें कोंवळें ऊन्ह
" आपले आंगावर पडलें आहे, असें पाहून तेथें अमळ थांबून सृष्टिशोभेचें
" क्षणभर अवलोकन केल्यावांचून त्याच्यानें राहवेना ! आसमंतात् एक मोठें
" पठार असून त्यावर दाट अरण्य आहे; व त्यावरून अनेक दऱ्याचे पाण.
" लोट गेलेले क्षितिजांत दिसत आहेत. जवळच्या डोंगरांच्या ओळीपेक्षां
" हा प्रदेश फारच उंच असून येथून ते डोंगर एकमेकांत गुरफटल्यसारखे
" दिसतात. कांहीं उंच उंच शिखरांवरून मात्र हें पठार खालीं दिसण्या-
" सारखें होतें. जवळच कांहीं सरोवरें स्वच्छ पाण्यानें भरलेलीं असून
" एकांतरमणीय होतीं. येथें मनुष्याचें वारेंही नव्हतें. ज्यानें एका प्रांतास
" दुसरा प्रांत जोडण्याकरितां मोठ्या प्रयासानें या डोंगरावर चढून ही सडक
" बांधिली तोच काय येथें आला असेल तो असेल ! पण या पूर्वदिशेकडे
" तर पहा ! इकडे पर्वतांची गर्दीच गर्दी असून ते एकावर एक कसे मनोरा
" रचल्याप्रमाणें दिसत आहेत ! या सर्व पर्वतमालिकेचा हा केवळ मध्य-
" बिंदू किंवा मेरूच असावासें वाटतें. या वेळेस हीं शेकडों शिखरें मावळ-
" तच्या उन्हानें सुशोभित झालेलीं, सोन्यानें मढविल्यासारखीं दिसत आहेत.
" जलप्रलयानंतर नुकतीच जमीन वाळल्यावर जसे तीवर दैत्य दिसत
" ह्मणून पुराणांत वर्णन आहे तशींच हीं शिखरें या शांत एकांतांत दिसत
" आहेत. असा हा प्रदेश आपल्या **फिरस्त्यास** सुंदर व अप्रतिम मनोहर
" वाटला; व तो या विलक्षण मोठमोठ्या पर्वतसमूहाकडे पहात स्तब्ध
" उभा राहिला. या वेळेपर्यंत **सृष्टीचें** खरें स्वरूप त्यास कळलें नव्हतें.
" आतांप्रमाणें ती **एकरूप** आहे, ती **दिव्य** आहे, व ती आपली **माता**

" आहे असा त्याचा भाव कधींच झाला नव्हता. याप्रमाणें विकारवश
" होऊन तो आतुर दृष्टीनें पहात आहे तोंच आकाशांतील लाल छटा हळू
" हळू नाहींशा होऊन सूर्य अगदींच दिसेनासा झाला. आणि **स्थलाचें** व
" **कालाचें** अनाद्यंत स्वरूप आणि **मृत्यु** व **चैतन्य** यांची छाया हळूच
" त्याचे मनावर येऊन "**चैतन्य व मृत्यु** हीं एकरूपच आहेत आणि ही
" **पृथ्वी जडरूप** नसून **चैतन्यमय** आहे अशा विचारांत तो निमग्न
" झाला; व या **पृथ्वीचा आत्मा** त्या सौंदर्यातिरेकाचे दिव्य सिंहासनावर
" विराजमान झाला असून **आपला आत्मा** त्याशीं संवादसुख अनुभवीत
" आहे, अशी त्याची चमत्कारिक भावना झाली.

" परंतु या समयास गाडीच्या चाकांचा आवाज ऐकून त्याची चित्त-
" वृत्ति एकदम बदलली. उत्तरेकडील प्रदेश दृष्टीआड होता. त्यांतून हळू
" हळू एक चार घोड्यांची बगी त्याचे दृष्टीचे टप्यांत आली. ती उघडी
" असून बरोबरच्या चाकर व मोतद्दार लोकांना लग्नसमारंभांत घालण्याचे
" उत्तमोत्तम पोषाख दिले होते; व गाडींतील स्त्रीपुरुषांचें जोडपें आपला
" लग्नसमारंभ देवळांत उरकून आल्याचीं चिन्हें स्पष्ट दिसत होतीं.
" थोड्याच वेळांत ती गाडी जवळ आली व आपला फिरस्ता आंत पाहतो
" तों, त्यास एका बाजूस **टाउगुड साहेब** बसलेले दिसले. बरें ती युवती
" कोण असावी बरें ? शिव शिव! ती **ब्लूमाइन** होती!! मग जणूं काय
" त्यांची या **फिरस्त्याची** ओळख नसावी याप्रमाणें त्यांनीं उगीच थोडेंसें
" रामराम केल्यासारखें करून तें जोडपें समोरून गेलें व दक्षिणेकडील
" झाडींत शिरून दिसेनासें झालें. व आपला हा **फिरस्ता** मागें एकटाच
" तेथें तमांधःकारांत राहिला ! "

टचूफेलसड्राक साहेबांनीं आपल्या वस्त्ररहस्यावरील ग्रंथांत एक पारिग्राफ लिहिला आहे, तो येथें देणें कांहींसें कठोरपणाचें काम होइल खरें; परंतु

---

१ कारण मृत्यु हाही चैतन्याचेंच स्वरूपविशेष आहे. मृत्यूनें चैतन्य नष्ट होतें ही समजूत चुकीची आहे. परंतु मृत्यूनंतर जें चैतन्य असतें तें देहांत मृत्यूचे **अगोदर दिसण्यांत येत नाहीं**, व त्याचा या व्यवहारांत नेहमींप्रमाणें उपयोग होण्याजोगा नाहीं इतेंकच. सायंकाळीं दिवसाच्या नाड्या आंखडलेल्या पाहून मृत्यूची छाया मनावर येते असें वर्णन मागें पृष्ठ १७९ मध्यें आहे.

अप्रासंगिक होणार नाहीं. मूळ ग्रंथांत या पारिग्राफांतील इंगितार्थ निराळा आहे. पण आपणांस प्रस्तुत स्थळीं त्याच्या वाच्यार्थाचीच जरूर आहे. तो पारिग्राफ आह्मी पुढें देतों.

" देवी काढण्याची युक्ति निघून आंगच्या देवींचा भयंकर प्रळय नाहींसा
" होण्याचे सुमारास एक नवीनच मानसरोगाची सांथ आमच्या यूरोप
" खडांस जडली. ती पूर्वीं सर्व मुलखावर होती, पण अलीकडे ती कांहीं
" विशेषस्थळीं मात्र दिसते. हा रोग कोणचा ह्मणाल तर, सृष्टिसौंदर्याचे
" देखावे पाहण्याची हांव! पूर्वींचे कवि मर्मज्ञ असल्यामुळें सृष्टिसौंदर्याचा
" ते उपभोग घेत. पण तो किती, तर बऱ्यावाईट दारूनें भरलेल्या पैलूदार
" गलासाचा जितका आपण उपभोग घेतों तितका. ह्मणजे मुकाट्यानें
" त्याकडे पहावयाचें व फार झालें तर प्रसंगोपात त्याचें थोडेंसें वर्णन
" करावयाचें. पण आंतली दारू पिऊनच्या पिऊन "चट गलासही खाऊन
" टाकूं" असें ह्मणणारे गृहस्थ **वरटरचें दुःख** या कादंबरीचे प्रसारापर्यंत
" कधीं भेटलें नव्हते. इतका हा रोग अलीकडे वाढला आहे. परंतु देवीचे
" रोगास जसा जेनर साहेब वस्ताद भेटला तसा या रोगास अजून कोणी
" भेटत नाहीं!" प्रोफेसर साहेब, आपण लिहितां तें अगदीं अक्षरशः
" खरें आहे.

---

२ जेनर—( १७४९-१८२३ ) इंग्लंडांतील अति विख्यात शस्त्रवैद्य. यानें देवी काढण्याची युक्ति काढून व नंतर तिचा प्रसार होण्याकरितां निरपेक्षबुद्धीनें झटून मनुष्य जातीवर फार मोठा उपकार केला आहे. प्रथम हा एका शस्त्रवैद्याच्या घरीं उमेदवारीस होता. नंतर दोन वर्षें औषधीं संबंधीं अभ्यास करून त्यानें आपल्या गावांत वैद्यकीचा धंदा सुरू केला. एकेदिवशीं एक गवळण त्याच्याशीं बोलतां बोलतां ह्मणाली कीं "मल आतां कधींही देवी येणार नाहींत कारण मला गाईच्या फोड्यांपासून देवी आल्या आहेत.' या बोलण्याचें जेनर यास मोठें आश्चर्य वाटलें व त्यानें ही गोष्ट आपल्या ओळखीच्या बऱ्याच मोठमोठ्या शस्त्रवैद्यांस विचारली. परंतु त्यावर कोणाचाही विश्वास न बसतां जो तो त्याचा उपहासच करूं लागला. परंतु अशा उत्तरांनीं जेनरचें समाधान होईना. त्यास यांतील तथ्य शोधून काढण्याचा ध्यास लागला. याप्रमाणें सहा वर्षें परिश्रम केल्यावर त्यास असें कळून आलें कीं गाईच्या देवीपासून देवी आल्यावर पुन्हां आंगच्या देवी येत नाहींत ही गोष्ट खरी आहे. परंतु या गोष्टीस कांहीं अपवादक गोष्टीही त्यास आढळल्या. त्यावरून जास्त शोधा अंतीं त्यास असें आढळून आलें कीं गाईच्या कांसेंत पुष्कळ प्रकारच्या

आपल्या प्रोफेसर साहेबांच्या कठोर व तिरसट स्वभावांतूनही जी त्यांज-बद्दल थोडीशी माहिती मिळते, तीवरून पाहतां आतां त्यांच्या फिरण्यास मनःपूत ह्मणा, कशीही ह्मणा, पण खरी कायमची दिशा लागली, हें येथें सांगितलें पाहिजे. त्या चार घोड्यांच्या वगीरूप काळसर्पिणीचे दर्शनानें त्यांचे मनांत ऐहिक हेतूचा जो कांहीं मागमूस राहिला असेल तो सर्व आतां नष्ट झाला. यापुढें हें सर्व जग त्यांस केवळ तमोरूप होऊन आपल्या पाठीस लागलेल्या समंधापासून पडत झडत पळण्याची मात्र त्यांना कामगिरी उरली. आणि या पळापळींत जरी लगबग विशेष दिसते, तरी त्यांची मजल जितक्यास तितकीच होणार हें उघड आहे.

या पृथ्वीप्रदक्षिणेच्या विलक्षण वारींत आतां त्यांच्या मागून जाणें ह्मणजे निवळ वेडेपण होय. इतक्या प्रवासाचा जर सर्व इतिहास उपलब्ध असता तर त्याचे अनेक ग्रंथ झाले असते. परंतु जीं टिपणें आहेत तीं इतकीं असंबद्ध आहेत कीं त्यांपासून कांहींच बोध होत नाहीं, व बाकीच्या चरित्राबद्दल कांहीं पत्ताही लागत नाहीं ! यापुढें ते एका देशांतून दुसऱ्या देशांत, त्यांतून तिसऱ्यांत याप्रमाणें अनेक स्थितींतून वाहवत असून एका ठिकाणीं गडप झाले कीं मग कोणत्या ठिकाणीं केव्हां कशा स्थितींत निवतील

---

फोड्या येतात. त्यांपैकीं एक प्रकारच्या फोड्यांची लस लागून फोड्या आल्यानें मात्र मनुष्यास देवी येत नाहींत. ही लस टोंचून देवीचा बराच प्रतिबंध होईल असें त्याच्या लक्ष्यांत आल्यावर त्यानें बरेच अनुभव घेऊन पाहिले. मग या काढलेल्या देवींची लस टोंचून त्या इसमास खऱ्या देवींच्या संसर्गानें कांहीं उपद्रव होतो कीं काय याचा त्यानें अनुभव घेतला. तोही सफल होऊन गाईच्या अगर मनुष्याच्या देवींची लस टोंचून देवी काढिल्यावर मग आंगच्या देवी येत नाहींत आणि आल्याच तर अगदीं हलक्या जातात अशी त्याची खात्री झाली. या शोधाची लोकांत प्रसिद्धि न करितां गुप्तपणें त्याचा उपयोग करून द्रव्यसंचय करण्याविषयीं व याकरितां एखाद्या मोठ्या शहरांत दवाखाना घालण्याविषयीं त्यास पुष्कळ लोकांनीं उपदेश केले, परंतु त्यानें असें कांहीं एक न करतां उदार व निरपेक्ष बुद्धीनें त्यानें या शोधाची प्रसिद्धि केली. तरीही त्यावर कोणाचा विश्वास बसेना. पण सुमारें सोळा वर्षांनीं अखेरीस लोकांची खात्री होऊन पुढें हळू हळू देवी टोंचण्याचा प्रचार होत होत सर्व पृथ्वीवर पसरला. ज्यानें बंदुकीची युक्ति काढिली त्यांत आणि या पुरुषांत जरी कदाचित् सारखीच बुद्धिमत्ता असली तरी त्यांच्यांत केवढें महदंतर आहे पहा. एक आपल्या बुद्धिमत्तेनें अनंत लोकांस जीवदान देत आहे; व एक अनंत बळी घेत आहे ! जेनरच्या निरपेक्ष उपकारबुद्धीबद्दल पार्लमेंटनें त्यास तीन लक्ष रुपये बक्षीस दिले.

याचा कांहीं नेम लागत नाहीं. या प्रवासांत जगाचा अमका कोंपरा राहिला किंवा अमक्या समाजांत ते गेले नाहींत असें नाहीं. जर एखाद्या ठिकाणीं ( अर्थात् असलें ठिकाण भूगोलशास्त्रदृष्ट्या नक्की समजणें बरेंच जड जाईल ) पण जर अशा ठिकाणीं प्रोफेसर साहेबांनीं कांहीं दिवस वस्ती करून तेथें स्नेही, इष्ट, मित्र जोडले तरी तेथून अकस्मात पुढेदिशीं केव्हां तरी ते नाहींसे होतात ! आज जर यूरोपांतील एखाद्या राजधानींत खासगी विद्यार्थी या नात्यानें राहिले असले तर लौकरच त्यांचा मागमूस नाहींसा होऊन पुढें कदाचित् मक्केमध्यें हाजी[३] साहेब होऊन ते आपणास आढळतील. प्रोफेसर साहेबांचा प्रवास ह्मणजे आतां केवळ जादूचा खेळ झाला असून त्यांत बदल इतका लौकर व इतका अकस्मात होतो कीं कांहीं पुसूं नये. जणूं काय या आपल्या **फिरस्त्यास** सडका वाटांवरून पायानें चालावें लागत नसून एखाद्या कल्पकथेच्या साह्यानें अंतराळांतूनच इच्छामात्रें त्यांचें गमन होत असावें ! या सर्व प्रवासाचें कथानक आपणापुढें कांहीं अस्पष्ट खुणांचे रूपानें मात्र आहे. उदाहरणार्थ, या पुडक्यांतून असलेल्या जाहिराती! प्रत्यक्ष वृत्तकथन फारच थोड्या ठिकाणीं असून तीं ठिकाणें जशीं अफाट समुद्रांत लहान लहान रमणीय बेटें असावीं तशींच दिसतात. अलंकारिक भाषेनें सांगावयाचें ह्मणजे इतःपर टय़ूफेलसड्रॉक साहेब जरी पिशाच्चरूप होऊन गुप्तसंचारी झाले नसले, तरी पिशाच्याचा संचार झाल्यासारखे सर्वत्र संचारी, व वाऱ्याप्रमाणें अप्रतिहतमार्गगामी झाले आहेत, असें तरी ह्मटलें पाहिजे. मनुष्याच्या चरित्रांत अशी गोष्ट आजपर्यंत कधींच आढळांत आलेली नाहीं. टय़ूफेलसड्रॉक साहेबांची इतिहासरूप नदी आपण अगदीं लहानशा झऱ्याच्या स्थितीपासून शोधीत शोधीत आलों; व आतां ती विस्तीर्ण महानदाचे स्वरूपानें समुद्रास जाऊन भेटेल अशी आशा आपणांस वाटते न वाटते तोंच, प्रेमप्रणयाचे कड्यावरून तिनें एकदम उडी घेतली आणि वेडरूप फेसानें व्याप्त झाली; आणि या धबधब्यावरून खालीं पडते न पडते तोंच पुन्हां तीस एकाएकीं धुक्याचें स्वरूप येऊन फिरून खालच्या आंगास तें पाणी सांठून त्याचीं डबकीं व तळीं होतात; परंतु तीं पुढें फारच अंतराअंतरावर असून पुन्हां त्यांपासून कायमचा प्रवाह उत्पन्न झाला तर भाग्यच ह्मणावयाचें! या सरोवरांचें व डबक्यांचें बारकाईनें निरीक्षण करून पुन्हां

३ मक्केची यात्रा केलेल्या इसमास मुसलमान लोक हाजी साहेब असा किताब देतात.

यांचा उपसा कोणत्या प्रवाहानें होतो हें पाहण्याचें काम आह्मांस पुढें एक-दोन भाग करावयाचें आहे.

या कामास या गबाळांतून मिळणारीं इतिहासपर टिपणेंच काय तीं महत्वाचीं आहेत. तथापि हीं टिपणें वरींच असून ट्यूफेल्सड्राक साहेबांविषयीं आजला जी आह्मांस माहिती झाली आहे, तीवरून पाहतां तीं प्रसिद्ध करणें वाजवी होईल कीं नाहीं याचा संशय आहे. कारण ट्यूफेल्सड्राक साहेब मानवी समाजाच्या अगदीं खालच्या तळापासून तों थेट वरच्या पृष्ठभागापर्यंत फिरत असून यापुढला त्यांचा इतिहास जगाचे इतिहासामध्यें गुरफटलेला आहे उदाहरणार्थ, सुलतान महमुद[४], नेपोलियन बोनापार्ट[५], वगैरे ऐतिहासिक पुरुषांशीं जो त्यांचा संबंध आला आहे व भाषणं झालीं आहेत तीं राजरहस्याचीं अंगें असल्यामुळें नुसत्या चरित्रपर गोष्टी ह्मणून प्रसिद्ध करणें योग्य होईल किंवा नाहीं याचा आह्मांस उलगडा होत नाहीं. शिवाय राज्याभिषिक्त पुरुष आह्मांस पूज्य वाटत असल्यामुळें हा राजरहस्याचा भाग तूर्त एकीकडे ठेवावा हेंच बरें वाटतें.

आतां, ही जगाची यात्रा करण्यांत प्रोफेसर साहेबांचा अखेर उद्देश कांहीं नव्हताच. तेव्हां तो काय असेल हें विचारण्यांत कांहीं अर्थ नाहीं. परंतु ते जिकडे जिकडे गेले तिकडे तिकडे जाण्याचें कांहीं तात्पुरतें कारण झालें असेलच; मग तें हेतुरूप नसलें तर प्रवृत्तिरूप असेल. तें कारण कोणतें याचें उत्तर प्रोफेसर साहेबांनीं स्पष्ट देऊन ठेविलें आहे. आतां, तें उत्तर आपणांस आवडणारें नाहीं ही गोष्ट निराळी! ते ह्मणतात, "मनाची "अनिर्वाच्य अस्वस्थता मला एकसारखी पुढें ढकलीत होती, "व पुढें गेल्यानें या टोंचणीची इजा कांहींशी कमी होईल याच "आशेनें मी पुढें जात होतों. पण पुढें जावयाचें तें कोठें? "जो ध्रुवाचा तारा वाट दाखविणार तो तर नाहींसा झाला! माझ्या "भोंवतीं चोहोंकडून अग्नीचें काहूर उठलें होतें, त्यामुळें कोणचेंही नक्षत्र "मला दिसेना. तरी पण पुढें जाण्यावांचून गत्यंतर नव्हतें! माझ्या पायां-"खालची जमीन पेटली आहे कीं काय याप्रमाणें माझे पायांस त्रिसात्रा "ह्मणून नव्हता. मी एकटा, निखालस एकटा होतें; पण आंतल्या आतुरते-

---

४ दुसरा महमुद-तुर्कस्थानचा सुलतान (१७८५-१८३९)

५ नेपोलियन बोनापार्ट (पुस्तक १ भाग ७ टीप ४)

" मुळें माझीच कल्पना माझ्यापुढें एकामागून एक मायावी रूपें धारण करून
" उभी राही. मग एकाकडे धांव घे, तें खरें नाहीं असें समजल्यावर मग
" दुसऱ्याची पाठ घे, याप्रमाणें निरर्थक भटकावें, यावांचून दुसरा उद्योग
" नाहीं ! पण माझ्या मनांत असा एक ग्रह झाला होता कीं, या माझ्या
" रोगास कोठें तरी औषध असलेंच पाहिजे. या आशेनेंच या सांप्रत काळच्या
" तीर्थयात्रा[६] मीं आरंभिल्या. मोठमोठे पुरुष पाहिले, मोठीं शहरें पाहिलीं
" मोठमोठ्या उलाढाली केल्या, अनेक खटाटोपींत आंग घातलें. परंतु
" मला कशानेंही गुण आला नाहीं. माहितींतल्या देशांत हिंडलों तसाच
" गैर माहित देशांतही हिंडलों. रानमाणसांच्या प्रदेशांत हिंडलों तसाच
" दुर्वर्त्तपणांत कडेलोट केलेल्या सुधारणेच्या शिखरास पोहोंचलेल्या देशांतही
" हिंडलों. परंतु जशी एका ठिकाणची स्थिति तशीच दुसऱ्या ठिकाणीं!
" आपल्याच **सांवल**ीपासून सुटूं पाहूं ह्मटलें तर साधावें कसें! तथापि
" सांवलीनेंच आंग पोळतें असें झाल्यावर पुढें जाण्यावांचून मार्गच नाहीं!
" मला इतकी घाई झाली होती कीं सांगतां सोय नाहीं. परंतु कोणचें काम
" करण्याकरितां आपण इतकी घाई करितों तें माझें मलाच कळेना! तरी
" माझी प्रवृत्ति, माझ्या मनाची सर्व उचल, पुढें जाण्याकडे होती. **वारे,**
" **नद्या,** व इतर सर्व **सृष्टि,** पुढें जाण्याकरितांच माझें प्रोत्साहन करितात असें
" माझ्या कल्पनातरंगांत मला वाटे. याप्रमाणें भरभर लोटणारा जो **काळ**
" त्याचेंच कायमचें अनुषंगित्व मला प्राप्त झालें."

या उताऱ्यावरून पाहतां **सैतानाच्या परिचारकांची** गर्दी अद्याप त्यां ज्वर चाललीच होती असें स्पष्ट होत नाहीं काय? त्यांनीं ऐके ठिकाणीं ह्मटलें आहे कीं **एपिक्टिटसचें**[७] टिपणबुक मी नेहमीं आपल्या जवळ बाळ-

---

६ सांप्रत काळच्या तीर्थयात्रा—पूर्वी लोक देशाटण करीत तें तीर्थयात्रेच्या हेतूनें करीत. परदेशांतील लोकांच्या रितीभाती, आचारविचार, कलाकौशल्य, स्थलप्रदेश, वृक्ष वनस्पती वगैरे पाहून ज्ञानसंचय व देशसेवा हा हेतु केवळ दुसऱ्या प्रतीचा होता. आतां शिकलेल्या लोकांस यात्रेंत कांहीं वाटत नाहीं. ते देशपर्यटणास, कानग्रेस, प्रदर्शन वगैरे समारंभास, मोटमोठीं शहरें, पुरुष व देखावे पाहण्यास जातात. याच सांप्रतच्या तीर्थ यात्रा.

७ एपिक्टिटस—रोम येथील स्टोइक पंथाचा एक तत्ववेत्ता. हा मूळ गुलाम असून डोमिशिअन बादशहानें त्यास रोम मधून हाकून लाविलें होतें. या बादशहाचे मृत्यूनंतर तो परत रोम येथें आला व आड्रियन व मार्कस आरेलियस यांनीं त्याची किंमत ओळखून

“ गीं; व माझा **विवेकी सोबती** काय तो तेवढाच; परंतु काय सांगावें! माझ्या “ मनास त्यापासूनही विशेष समाधान झालें नाहीं.” पण मूर्खा ट्यूफेल्सड्रोका! त्यानें तुझें समाधान व्हावें कसें? एपिक्टेटसचीं टिपणें वाचण्याइतकें ग्रीक भाषेचें तुला ज्ञान असून “ मनुष्याच्या ऐहिक जीविताचा इत्यर्थ किंवा सार्थक **कर्मांत** आहे, नुसत्या **विचारांत** नाहीं” हें तुला कसें कळलें नाहीं?

आणखी एका टिपणांत ते ह्मणतात, “ इतक्या व्यापांत मी जगलों “ कसा? बोबारे, ‘ही **पृथ्वी** सर्ववत्सल **भूमाता** आहे’ असें जे **सोफो-** “ **क्लीजनें** ह्मटलें आहे, तें बरोबर आहे. जी आढ्यावर राहणाऱ्या “ चिमणींनांही पोट भरते, ती मनुष्यास कांहीं कमी करील काय? तुझ्या “ आंगांत जीव असून नुसता तूं हिंडलास फिरलास तरी बहुधा अन्नाची “ ददात पडणार नाहीं. उदाहरणार्थ फार लांब जाणें नलगे. एकदां माझा “ चहा अमूर नदीच्या पाण्यांत मडक्यामध्यें एका तार्तरी बाईनें करून “ दिला होता, व तें मडकें तिनें माझ्या घोड्याच्या शेपटीनें घांसलें! यद्द- “ च्छेनें रानांत मिळालेलीं अंडीं साहारा मैदानाच्या तापलेल्या रेतींत खुप- “ सून उकडून मी खाल्लीं आहेत; आणि पारिस येथील एका रस्त्यांत व व्हिएना “ येथील एका भिकार प्रदेशांत निजून उठलों तेव्हां न्याहारीस नुसत्या पाण्यावां- “ चून कांहीं मिळण्याची आशाही नव्हती! मला पोटाचा उद्योग होता ह्मणूनच “ मला आत्मघातानें मरण आलें नाहीं. आपल्या यूरोपांत तर रसायनांचे “ कारखान्यांत, शिल्पाचे कारखान्यांत, सामान्य कारागिरींत, राज्यव्यव- “ स्थेंत, धर्मशिक्षणांत, व्यावहारिक शिक्षणांत व व्यापारांतही बुद्धिमान् “ पुरुषांची जिकडे तिकडे जरूर व वाण आहे. ख्रिस्ती नसणाऱ्या देशांत

---

त्यास आश्रयही दिला. त्याचा “एनकायरिडिअन” नांवाचा एक ग्रंथ असून त्यांत **स्टोइक** विचारांचें उत्तम स्वरूप आहे. त्यांतील भाषा अगदीं साधी पण फार जोमदार आहे. हा ग्रंथ अनुभविक सिद्धांतांनीं भरला आहे. त्या ग्रंथांतून अँटोनियस बादशहानें कांहीं टिपणें काढिलीं असून लोकांचें हित साधून आपलाही मान राहण्यासारखीं तीं आहेत याबद्दल त्यानें ईश्वराचे आभार मानिले! एपिक्टिटसचा मृत्युकाळ सुमारें सन ५०.

८ सोफोक्लीज—अथेन्स येथील एक नामांकित नाट्याचार्य, मुत्सद्दी व योद्धा. यानें एकंदर १३० नाटकें लिहिलीं व इस्चिलिस, यूरिपिडिस वगैरे उत्कृष्ट कवी सामन्यास असूनही वीस वेळां त्यास उत्तम नाटकाबद्दल बक्षिसें मिळालीं असें ह्मणतात. हल्लीं त्याचीं सात नाटकें मात्र उपलब्ध आहेत. पेरिक्लीजच्या वेळेस त्यानें अनेक लढायांत सेनापतीचेंही काम करून कीर्ति संपादिली ( ख्रि० पू० ४९५-४०६ ).

" सुद्धां जादूटोणे करून पोट भरावयाचें नाहीं काय ? पोट भरण्याची
" इतकी पंचाईत ती कसली ? बुद्धिमान पुरुषाचे अंगीं काय किमया आहे
" पहा ! त्याच्या योगानेंच नुसतें एक बोट हालवून एखाद्यास हवी तितकी
" अन्नसामुग्री उत्पन्न करितां येईल. पण हीच किमया दोन्ही हातांचें बळ
" खर्चून दुसरे कांहीं पदार्थ करीत असते. ते कोणचे ? तर काल्पनिक पिशाच्यें.
" आणि तीं कशाकरतां ? स्वतःस जाच व असंतोष करून घेण्याकरितां ! "

अरेरे, गरीब बिचारा ट्यूफेल्सड्राक ! तो जिकडे धांवे तिकडे भूक त्याच्या बरोबर असून शिवाय पाठीस पिशाच्यांची फौज लागलेली ! व त्यामुळें प्रत्यक्ष भुकेचाही जाच त्यास गोड वाटूं लागला, याप्रमाणें बायबलांतल्या केन[९] सारखी किंवा ख्रिस्तास छळणाऱ्या शापदग्ध[१०] यहुद्यासारखीच त्याची स्थिति झाली; फरक इतकाच कीं आपण अपराधी अगर पातकी नाहीं अशी खात्री असून अपराधाचें फळ ह्मणजे मनांत कांही उद्देश नसतां तळमळत धूम एकसारखें हिंडणें—तेवढें मात्र भोगावें लागलें. गीट[११] कवीला जशी " वरटरचें दुःख " नांवाची कादंबरी लिहावी लागली, त्याचप्रमाणें जिवास मुक्ति होऊन खरें मनुष्यत्व प्राप्त होईपर्यंत आपल्या ट्यूफेल्सड्राक साहेबांस आपल्या दुःखाचें वर्णन पायांच्या लेखणीनें सर्व भूतलावर लिहिणें प्राप्त आहे ! कितीही पळणारा झाला तरी स्वतःच्या छायेपासून त्याची सुटका होणार नाहीं. आणि या भिकार युगांत तर कोणीही दिव्यांशधारी पुरुष उमेदींत येतो तेव्हां त्याला या जगांत दोन गोष्टी मात्र मुबलक भरलेल्या दृष्टीस पडतातः—**माजी** पडलेलीं **नीतितत्त्वें**, आणि **माजी** पडलेले **धंदे**. (अर्थात् आज त्या तत्त्वांवर वर्तन करूं ह्मटलें किंवा त्या धंद्यांवर चरितार्थ चालवूं ह्मटलें तर अशक्य होतें.) म्हणून सर्व जग लबाड्यांनीं भरलें असून त्यांत

---

९ केन—बाबा आदमचा वडील मुलगा. यानें आपल्या भावास ठार मारल्यावरून " तूं नेहमीं असाच भटकत रहा " असा देवानें शाप दिला अशी कथा बायबलांत आहे.

१० शापदग्ध यहुदी—ख्रिस्तास क्रूसावर ह्मणजे † अशा आकाराच्या लांकडी सुळावर खिळे मारून देहान्त शासनाची शिक्षा ठरल्यावर त्याच्या डोक्यावर सदर क्रूस देऊन त्यास नेत असतां ओझें झाल्यामुळें दमून तो एका यहुदी चांभाराच्या ओट्यावर बसला असतां तो यहुदी ख्रिस्ताला ह्मणाला " उठ येथून, जा लवकर. " ख्रिस्त ह्मणाला, " मी तर जातोंच. तूं मात्र असाच भटकत रहा. "

११ गीट—पुस्तक १ भाग ८ टीप ११

जर कोणी लबाड न बोलेल व लबाड आचरण न करील तर त्यास निराश होऊन स्वस्थच बसलें पाहिजे असें त्यास सहजच वाटतें. यामुळें सत्पुरुषास कोणच्या तरी लिपीनें आपल्या ट्यूफेल्सड्राक साहेबांसारखा एखादा ग्रंथ लिहिण्यावांचून इलाज नाहीं. दुष्ट कलीशीं त्याचें जें पुढें निकराचें युद्ध व्हावयाचें असतें त्याचा असला ग्रंथ म्हणजे श्रीगणेशा होय. बायरनकवी उत्पन्न

---

१२ बायरन कवि—लॉर्ड जॉर्ज गोरडन बायरन १७८८–१८२४. याच्या स्वैरवर्तनी बापानें बायकोचा त्याग करून तिचें सर्व स्त्रीधन बदफैलीपणांत घालविल्यामुळें बाल्यदशेंतच त्यास स्वदेश सोडावा लागला व पुढें लौकरच बाप मेल्यामुळें तो व त्याची आई अगदींच निराधार झाली. पुढें कांहीं वर्षांनीं त्याचा चुलत आजा मरण पावल्यामुळें त्यास अकरावें वर्षींच घराण्यांतील पिढीजाद सरदारी व दौलत प्राप्त झाली. या पुरुषाचे विशेष गुण म्हटले म्हणजे अद्भुत कवित्वशक्ति, स्वातंत्र्यप्रियता, व स्वच्छंदीपणा हे होते. त्याचें मन बसलेल्या एका स्त्रीनें दुसऱ्याशींच लग्न लाविल्यामुळें त्याचें चित्त बेफाम होऊन तो अत्यंत बदफैली झाला व त्यामुळें त्याची प्रकृति अगदींच ढांसळून पैशानेंही त्याची फार खराबी झाली. अखेरीस या मोहांतून सुटण्याकरितां पुन्हां इंग्लंड सोडून तो परदेशीं प्रवासास निघाला. दोन वर्षांनीं तिकडून परत आल्यावर त्यानें एका मागून एक अनेक काव्यें भराभर प्रसिद्ध केलीं व त्यामुळें त्याची लोकांत फारच चाहा होऊं लागली. १८१५ त त्यानें लग्न केलें. पण एक मुलगी होते तोंच नवराबायकोंत बेबनाव होऊन त्यानें तिला काडी मोडून दिली. परंतु यामुळें त्याचे संबंधानें लोकांत अनेक कंड्या पसरून त्यास बाहेर तोंड दाखविण्याचीही पंचाईत झाली. मग त्यानें कायमचा देशत्याग केला. पुढें तो म्हणण्यासारखा कायम असा कोठेंच राहिला नाहीं. तरी तशा स्थितींतही नवीं नवीं काव्यें भराभर निर्माण करून तो आपल्या इंग्लंडांतील भक्तांस आपल्या कवितेचा स्वाद देत असे. १८२३ त ग्रीक लोकांची स्थिति पाहून त्याच्या मनानें दुर्वर्तनांतून उलट खाल्ली; व त्यानें आपली लेखणी, आपली तलवार व आपलें द्रव्य ग्रीक लोकांचे सह्यार्थ मरेपर्यंत वेंचण्याची शपथ घेतली. पण तीप्रमाणें वागण्यास तो फार दिवस जगला नाहीं. तो १८२४ त मरण पावला. एवढ्या थोड्याशा अवधींतही त्यानें ग्रीक लोकांचे साह्यार्थ जे परिश्रम केले व उदारपणानें पैसे खर्चले त्यामुळें ग्रीक लोकांस त्याच्या मरणानें फार दुःख झालें. त्याच्या गुणांत व स्वभावांत अत्यंत विरोधी प्रकारांचें विलक्षण मिश्रण होतें. त्याची विचारशक्ति फार सतेज व नाजुक असूनही तो अत्यंत अस्थिर व क्षणिक बुद्धीचा असे. त्याची कविता रसभरित, वक्तृत्वपूर्ण व जोरदार असून ती कांहीं ठिकाणीं उत्कृष्ट विचारांनीं व उदात्त विकारांनीं भरलेली तर कांहीं ठिकाणीं निंद्य व्यसनें व ग्राम्य विचार यांनीं किळसवाणी झाली आहे. त्याची विचारसरणी उत्कृष्ट असून तींत उत्कट व निर्मळ व्यंसनलंपटता मिसळून गेली आहे. आणि जरी कवित्व-

झाला त्यानें "लार्ड जार्जचें दुःख" हा गद्यपद्यात्मक ग्रंथ लिहिला. नेपोलियन बोनापार्ट उत्पन्न झाला त्यानें "नेपोलियनचें दुःख[13]" हें फारच विलक्षण नाटक करून दाखविलें. या नाटकांत बेंडबाजाचें ऐवजीं तोफांची सरबत्ती व कत्तलींतील आरोळया होत्या. पेटलेले गांव ते या नाटकांतील रंगभूमिवरील दिवे होत. व लढाईस सज्ज झालेल्या फौजांचें चालणें व पाडाव झालेल्या शहरांतील आक्रोश यांनीं या नाटकांतील गाण्यावजावण्याचें काम केलें. तात्पर्य आपल्या वस्त्ररहस्यकार तत्ववेत्त्याप्रमाणें जो कोणी नुसत्या आपल्या जोड्याच्याच टांचांनीं या निर्जीव पृथ्वीवर असा आपला ग्रंथ लिहून तो आपल्या आयुर्मर्यादेंत संपवितो, तोच धन्य ह्मणावयाचा!

---

# भाग सातवा.

## सगळें थोतांड.

या धूमकेतूच्या वातावरणांत आमचे प्रोफेसर साहेब गडप झाले होते तरी त्यांच्या आध्यात्मिक स्थितीचें पाऊल पुढेंच असून तिची सारखी अभिवृद्धि होत होती यांत संशय नाहीं. कारण, कसेंही असलें तरी 'काळ-पुत्रा'स स्वस्थ बसावयास कसें सांपडेल? त्यांच्या इतिहासाच्या या अज्ञा-तवासाचे काळांत अध्यात्मदृष्ट्या त्यांचें स्थित्यंतर चालूच होतें. फार काय, हा अज्ञातवासही या स्थित्यंतराचाच परिणाम होय. जसें एखाद्या रसायनाचें स्थित्यंतर होतांना आंत सर्वत्र खळबळ होऊन वर फेसाचा पूर येतो, त्या-प्रमाणें त्यांची ही वेडगळपणाची जगाची वारी त्यांच्या स्थित्यंतररूप रसा-यनाचा फेस होय! हा फेस नाहींसा झाल्यावर सर्वच रसायन कायम स्थितीस पोहोंचून केव्हां तरी जास्त स्पष्ट दिसूं लागेल, यांत संशय नाहीं.

---

शक्तीबद्दल तो प्रशंसेस पात्र असला तरी तिचा उपयोग त्यानें दुर्गुणांचे गोडवे गाण्यांत व तद्द्वारा लोकांस दुर्वर्तनाचा धडा देण्यांत केला आहे याबद्दल त्याची निर्भर्त्सनाही केली पाहिजे. हा ह्या पुरुषाचा विलक्षण चारित्रक्रम हाच त्याचा "लॉर्ड जॉर्जचें दुःख" नां-वाचा गद्यपद्यात्मक ग्रंथ असा कार्लाइलसाहेबांचा भावार्थ आहे.

13 "नेपोलियनचें दुःख—" पान ५६ टीप ४ पहा.

असलीं स्थित्यंतरें बरेंच दुःख दिल्याशिवाय होत नाहींत; मोठा गरुड पक्षी झाला तरी पहिले पंख जाऊन नवे येण्याचे वेळीं त्यास फार क्लेश होतात व त्यामुळें तो अजारी व अशक्तही होतो. त्यास नवी चोंच याव-याची झाली ह्मणजे आपली जुनी चोंच मोठ्या कठोरपणानें आगोदर दग-डावर आपटून त्यास फोडावी लागते! त्याचप्रमाणें या स्थित्यंतराचे वेळीं आपल्या फिरस्त्यानें ओढून ताणून आपल्या वर्तनांत कितीही निगरगट्टपणा आणिला असला तरी त्यांच्या अंतर्यामीं अत्यंत खळबळ होऊन त्यांची वृत्ति अनावर झाली होती, व त्यांस फार दुःख होत होतें हें उघड आहे. आणि त्या दुःखाग्नीच्या ज्वाळा बाहेरही प्रकट होत होत्या. व त्या गुप्त रहाव्या कशा? पुष्कळ वर्षें त्यांचा सारखा हिरमोड होत असून दैवानें[1] त्यांचा केवळ खेळ मांडिला होता हें आपण पाहिलेंच आहे. सुखेच्छेनें तरुण पुरुषास जी जी गोष्ट हवीशी वाटते ती ती त्यास मिळूं नये, व शेव-टच्या प्रसंगीं तर त्याच्या तोंडांतला घास दुसऱ्यानें काढून न्यावा, असें झालें! दैवावर हवाला ठेवून राहण्याचा उत्कृष्ट गुण हवा तितका होता, परंतु भुकेस जसें अन्न अवश्य आहे त्याचप्रमाणें दैव उदयास येण्यास अवश्य असणारा जो प्रयत्न तो मात्र अगदींच नाहीं, असें होतां होतां अखेरीस अगदीं निरुपयोगी, अगदीं वेडगळ, असा हा जगाच्या वारीचा उद्योग तरी त्यांस पतकरावा लागला! हाय, हाय! हिंटरश्लाघ[2] येथील पाठशाळेंत गेल्या दिवसापासून त्याच्या दुःखाचें माप हळू हळू भरत अगदीं तुडुंब झालें होतें, व आतां त्याची अखेर होणार असें वाटतें न वाटतें तोंच त्यांत आणखी टाउगुड ब्लुमाइन प्रकरणाचा भयंकर विषसंपर्क होऊन त्यास पूर येऊन तें वाहूं लागलें तरी दैवास त्यांची दया आली नाहीं!

आमचे प्रोफेसर साहेबांनींच एके ठिकाणीं ह्मटलें आहे कीं, "मनुष्याचें "इह लोकचें जीवित आशामय आहे; व त्याची ऐहिक खरी संपत्तीही

---

१ **अरुण रवीचा सारथि दहनाचा वायु यत्न कीं विधिचा।**
**सारथि हो तूं तैसा कर्णाचा धैर्यबळपयोनिधिचा॥**

मोरोपंत–महाभारत

यत्न केला तरच दैव उदयास येतें. यत्न न करितां दैव खडतर ह्मणून रडत बसणें हा केवळ आळशी लोकांचा आळस छपविण्याचा मार्ग आहे.

२ हिंटरश्लाघ—पाठीमागून थप्पड.

"आशेवांचून दुसरी नाहीं. हा भूलोक ह्मणजे केवळ आशेनें हें उमेदवारीचें "आयुष्य कंठण्याची जागा होय." प्रोफेसर साहेबांच्या या लिहिण्यांत नवीन ह्मणण्यासारखें कांहीं नाहीं, परंतु त्यांत तथ्य बरेंच आहे. तर मग या मानानें प्रोफेसर साहेबांची संपत्ति तरी काय काय होती तें पाहूं. आह्मांस तर असें दिसतें कीं, आशानगरांत जाण्याची त्यांस सक्त मनाई होती. कारण कांहीं मार्ग दिसेल अशा आशेनें सूर्योदयावर हेतु ठेवून पूर्व दिशेकडे तोंड करून तिष्ठत बसण्यास आतां मार्गच नव्हता. आतां धरणीकंप होतो, कीं भयंकर वादळ होणार, या धागधुगींत चोहोंकडे धुंद व आरक्त झालेल्या वातावरणांत वेड्यासारखें इकडे तिकडे पाहणें एवढें मात्र त्यांच्या हातीं होतें!

हाय, हाय! त्यांना **आशेचा** आधार नाहींसा झाला तोही केवळ ऐहिक गोष्टींतच नव्हे. कारण या जगास कंटाळून ते हिंडत असतां परलोकचेंही भान त्यांस उरलें नाहीं. ते स्वधर्म-निष्ठेनें किंवा निदान धर्मशीलतेनें परिपूर्ण आहेत असें जरी आज आपल्या दृष्टोत्पत्तीस येतें, तरी ते त्या वेळेस अगदींच धर्मपराङ्मुख झाले होते ही गोष्ट त्यांनीं आपणांपासून छपवून ठेविली नाहीं. त्यांच्या वृत्तींत नवीन शिक्षणानें चलबिचल झाली होती. व पुढें "संशयास अश्रद्धेचें रूप येऊन पाखंडाचीं एक एक पुटें बसत अखेरीस सर्व अंतरात्मा तमोमय होऊन गेला." ज्या वाचकांनीं मनुष्यजन्मासंबंधानें ह्मणण्यासारखा विचार केला असेल, व मतलबी स्तोत्र जरा एकीकडे ठेवून मनुष्य ह्मणजे केवळ पोटार्थी प्राणी नव्हे असें ज्यांना वाटत असेल, त्यांना प्रोफेसर साहेबांच्या पुढील शब्दांची सत्यता भासल्याशिवाय राहणार नाहीं. "मनुष्याच्या सुखास **श्रद्धा** व ईश्वराचे "ठायीं **विश्वास** हीं अवश्य असून त्यांचेवांचून कांहींही चालावयचें नाहीं. "अगदीं बलहीन मनुष्यही या **श्रद्धेच्या** जोरावर मोठमोठीं संकटें, दुःखें, व "लज्जा आनंदानें सोसतो. पण **श्रद्धेचा** आधार नसला म्हणजे मोठे बलवा"न् व संसारांत दंग असलेले लोकही सर्व गोष्टींची चैन असून सुद्धां आपलें "क्षुद्र जीवित आत्मघातानें नाहींसें करितात." आणि हें जर खरें आहे, तर केवळ विवेकावरच अवलंबून असणाऱ्या मनुष्यास श्रद्धेची उणीव म्हणजे सर्वच गोष्टींची उणीव असल्यासारखी आहे. म्हणून हे ट्यूफेल्सड्राका, तूं

३ या संबंधांत जान नाक्स, लूथर व नीरो यांचीं चरित्रें पहावीं.

दुर्दैवी खरा. कारण दारिद्र्यामुळें सतत होणारें दुःख, मित्राचा खोटेपणा, प्रेमप्रणय दाखविणाऱ्या स्त्रीचा खोटेपणा, वगैरे या संसारयुद्धांतील सर्वच जखमा तुझ्या प्रेमळ स्वभावांत **श्रद्धेचा** अंकुर असता तर खचितच भरून आल्या असत्या. असो; या गहजबांत असतांना प्रोफेसर साहेब वैतागून म्हणतात, "तर मग देव **नाहींच** का! व जर असलाच तर असून नसल्या-"सारखा– एकदां हें जग निर्माण केल्यावर तें कसें चाललें आहे हें दुरून "साक्षित्वानें पाहणारा मात्र आहे. अर्थात् मग '**कर्तव्य**' या शब्दास कांहींच "अर्थ राहिला नाहीं? आपण ज्यास **कर्तव्य** म्हणतों तो आपणांस या संसा-"रसागरांतून पार नेणारा **ईश्वरप्रेषित दिव्य वाटाड्या** नसून तें निवळ "**थोतांड** आहे व तें इच्छा आणि भय यांच्या पायावर रचिलें आहे[4] हेंच "**खरें**. म्हणें काय! तर विवेकाच्या योगानें आपल्या मनास पटलेल्या गोष्टी "केल्यापासून **सुख** होतें! या बोलण्यांत काय अर्थ आहे? टार्ससचा "**पाल**[5], ज्याला सर्व लोकांनीं साधु असें मानिलें आहे त्यालाच मी "अगदीं महापातकी असें वाटत नव्हतें काय? इकडे रोमचा बादशहा **नीरो**[6]

---

४ सुखाच्या आशेनें व दुःखाच्या भीतीनें करावयाचें कर्म ह्मणजे कर्तव्य असेंच अनात्मज्ञास वाटतें.

५ टार्ससचा पाल–सेंटपाल ( मृत्यू सन ६७ ) ख्रिस्तीधर्माचा आद्य प्रसारक.

६ नीरो—रोमचा बादशहा ( सन ३७—६८ ) हा गादीवर बसला तेव्हां न्यायी, दयाळू, उदार, लोकप्रिय व सद्गुणी असा कांहीं दिवस वाटत होता. पण या वरपांगी डौलाखालीं संपूर्ण मनुष्यजातीस कलंकप्राय असें अंतरंग दडून होतें असें लौकरच आढळून आलें. त्यानें आपले हे सद्गुण एकीकडे सारून आगोदर आपल्या सद्गुणी आईस ठार मारून तो स्वतंत्र झाला. पुष्कळ सरदारांचीही तीच वाट लागली व सर्व राजधानीस अत्युत्तम पुरुषांच्या रक्तानें या नराधमाकडून स्नान झालें. या क्रौर्याच्या तोडीचाच नीरोचा बदफैलीपणाही होता. एवढा बादशहा पण नाटकांत सोंगें घेऊनही नाचत असे. आपली पतिव्रता स्त्री मारून टाकिल्यावर त्यानें आपला गुरु सेनिका, व कवी लूकस यांचेही बळी घेतले! ख्रिस्ती लोकांस अनेक प्रकारें छळिलें, व शहरांस आपणच अनेक ठिकाणीं आगी लावून तो तमाशा आपल्या राजवाड्याच्या गोपुरांतून तंतुवाद्यें वाजवीत तो पहात असे; व या आगी ख्रिस्ती लोकांनींच लाविल्या असें उलटें कुभांड घेऊनही बऱ्याच लोकांस त्यानें जिवें मारिलें. अशा अमर्याद वर्तनानें अखेरीस लोकांस चेव येऊन त्यास मारण्याचे कट झाले. यामुळें निरुपाय होऊन त्यानें आपल्या एका नोकराकडून आपणास मारवून घेऊन आत्महत्या केली. याचे हातून अमुक प्रकारचें अघोर पातक व्हावयाचें राहिलें असें नाहीं!

" सर्व जगाच्या मतें अघोर पातकी असून बिचारा खुशाल सुखांत
" तल्लीन होऊन गाणेंबजावणें करितांना आपण पाहिला नाहीं काय? हे
" मूर्खा परिणामवाद्यां शद्बशास्त्र्या! कर्माचें बरेंवाईटपण त्या कर्मापासून
" होणाऱ्या सुखदुःखावर अवलंबून आहे असें कसें म्हणतां येईल? तुझ्या त-
"र्कशास्त्राच्या चरकांत सद्गुणाची दिव्य विभूतीही करण्याची कळ आहे काय?
" अरे, या चरकांत सुखरूपी फोलकटें दळून त्याचे पदार्थ सद्गुणरूपी पक्वान्नें
" म्हणून आह्मांस देऊं पाहतोस काय! अरे अशानें आमची समजूत पडणार
" नाहीं. हें सर्व तुमचें थोतांड आहे. अरे, सद्गुण म्हणजे सुख देणारा वर्तन-
"क्रम अशी कल्पना झाल्यावर जो ईश्वरासही न जुमानणारा पुरुष तो जर
"सद्गुणी असून त्यास दुःख होईल, तर आपण सद्गुणी आहों व आपल्यास
"आपल्या सद्गुणांचें न्याय्य फळ मिळत नाहीं हीच गोष्ट त्याच्या जिवास
"लागून त्याच्या दुःखांत आणखी तळमळीची भर होणार नाहीं काय? हेंच
"काय तुमच्या सद्गुणांचें फळ? एवंच **सदगुणांची स्फूर्ती** म्हणजे निवळ एक
"प्रकारचें वेड असून इतर वेडांत व या वेडांत फरक इतकाच कीं, यानें
"दुसऱ्याचें हित होतें! काय असेल तें असो; मला एकच गोष्ट कळते. ती ही कीं
"सुख हीच जर सर्वांनीं अभिलाष्य वस्तु असेल, तर आपण या **सद्गुणाच्या**
" '**कल्पनेनें**' निवळ आड मार्गास मात्र लागलों आहों. यथास्थित पोटभर
"अन्नवस्त्र मिळालें म्हणजे नीतीची कल्पना नसून सुद्धां पुष्कळ गोष्टींस
"तोंड देतां येईल. पण पोटांतल्या कावळेकोरीपुढें मानसिक असमाधानाचा
"बाऊ या कल्पनाहीन काळांत कोण जमेस धरितो! म्हणून आतां आपला
"संसाराचा किल्ला नीतितत्वाचे पायावर उभारण्याचा नाद सोडून देऊन
"आपणांस सूपशास्त्र (पाकशास्त्रच) आधारास घेतलें पाहिजे. आतां आपलीं
"देवास ओंवाळण्याचीं धुपाटणीं फेंकून देऊन जो कलिराज आपणांस दु-
"ष्कर्मानें गोड गोड पदार्थ तरी खाऊं घालतो त्यासच फोडणीच्या आरत्या
"व पक्वान्नांचे तळण्यांतून नैवेद्य समर्पण करावे हेंच बरें!"

याप्रमाणें वनदेवतेच्या कानांत ओरडून प्रश्ना मागून प्रश्न करण्याचें व उत्तरादाखल पडशब्द मात्र ऐकण्याचें या आपल्या गोंधळलेल्या फिरस्त्याचे कपाळीं आलें आहे. हें जग जें त्यास एके काळीं अति रमणीय वाटत होतें

---

७ परिणामवादी—पु० २ भा० ३ टीप २६

तेंच आज भयंकर शून्यारण्याप्रमाणें झालें असून त्यांत श्वापदांच्या आरोळ्या व निराशा झालेल्या लोकांच्या किंकाळ्यांशिवाय दुसरें त्यास कांहींच ऐकूं येत नाहीं. आपल्या वारकऱ्याला या भयंकर अटवींतून मार्ग दाखविण्यास बायबलांत सांगितल्याप्रमाणें रात्रीं **अग्निस्तंभ** किंवा दिवसास **जलस्तंभ** यांसारखें कांहीं साधनही नाहीं. इतकी त्याची शंका दुस्तर झाली! तो म्हणतो, " पण फळ काय? या युगांत सर्वांचेंच नशीब असलें आहे. **व्हालटेअर** व

---

८ व्हालटेअर ( १६९४ १७७८ ) विख्यात फ्रेंच तत्ववेत्ता व ग्रंथकार. याची कुशाग्रबुद्धि लहानपणींच प्रसिद्ध होती. उपरोधिक काव्यें करून लोकदोषाविष्करण करण्याचें कामीं त्याचा फार लौकिक असे. म्हणून फ्रान्सचा राजा चौदावा लुई मरण पावल्यावर त्यासंबंधानें जे उपरोधिक लेख निनावी प्रसिद्ध झाले ते त्यानेंच लिहिले अशा आरोपावरून त्यास किल्ल्यात कैदेंत ठेविलें होतें. एक वर्षानें रिजेंट साहेबाच्या मध्यस्तीनें त्याची सुटका झाली. नंतर त्यानें कांहीं नाटकें लिहिलीं त्यांची फार वाहवा झाली परंतु त्यामुळें पुन्हां तो कैदेंत पडला. तेथून सहा महिन्यांनीं त्यानें आपली सुटका करून घेतली व इंग्लंडांत जाऊन त्यानें आपलें हेनरिएड हें नाटक वर्गणी करून प्रसिद्ध केलें. इंग्लंडांत तीन वर्षे राहून तो पुन्हा पारिसमध्यें आला व व्यापार आणि ग्रंथरचना यांत काळ घालवूं लागला. या दोहोंतही त्यास चांगलेंच यश आलें. १७३० मध्यें त्याचें अत्युत्कृष्ट शोकपर्यवसायी नाटक प्रसिद्ध झालें. " तत्वविचाराची पत्रें " या नांवाचा त्याचा ग्रंथ पार्लमेंटच्या ठरावावरून जाळून टाकिला, व आणखी काय प्रसंग येतो नकळे अशा धास्तीनें त्यानें पारिसशहर सोडिलें. पण पुढें मॅडेम् पांपाडूर बाईच्या मध्यस्तीनें दरबारची इतराजी दूर झाली व त्यास फ्रान्सचा अखबारनवीस ( इतिहास लेखक ) नेमिलें व फ्रेंच ॲकॅडमीमध्येंही त्याचा प्रवेश झाला. १७५० त प्रशियाचा राजा फ्रेडरिक दि ग्रेट यानें त्यास आपले दरबारी बोलावून नेलें. तेथें तीन वर्षें राहिल्यावर त्या राजाशीं कांहीं मतभेद झाल्यावरून तो तेथून निघाला. जातांना त्या राजानें लिहिलेल्या ग्रंथाची हस्तलिखित प्रत त्यानें आपले बरोबर घेतली होती व ती परत करीपर्यंत वाटेंत त्यास अटकाव झाला होता. तेथून कोलमार व जिनीव्हा येथें कांहीं दिवस राहून अखेरीस त्यानें फरनि या खेड्यांत घर केलें, व तेथें अनेक चतुर कारागीर वसवून त्यानें तें खेडें चांगलें उदयास आणिलें. या कारागिरांचीं कामें तो रशिया, जर्मनी, स्पेन, इतली वगैरे देशांत पाठवी. १७७८ त तो पारिस येथें गेला तेथें तो फारच लोकप्रिय झाला. त्याची नास्तिक कोटींत गणना असे तरी तो अगदींच धर्मपराङ्मुख नव्हता. ख्रिस्तीधर्माविरुद्ध असलेले त्याचे ग्रंथ वाचतांना ही गोष्ट नेहमीं लक्षांत ठेविली पाहिजे. त्याचे एकंदर ग्रंथ ७० भागांत छापिले आहेत. कांहीं लोकांत त्याजविषयीं अत्यंत पूज्यबुद्धि असून कांहीं लोकांत अत्यंत तिरस्कारबुद्धीही आहे.

" डायडोराट[९] यांच्या नास्तिक कालाच्या आगोदर तुझी अध्यात्म प्रगति
" झाली नाहीं व अगदींच दगड होऊनही तूं जन्मास आला नाहींस
" म्हणून हें भोक्तृत्व भोगलेंच पाहिजे! सर्व जगासच तुझ्या सारखें संशय-
" पिशाचिकेनें गांठलें आहे. जुन्या देवळांवर वृष्टि होऊन होऊन अखेरीस
" आज तीं उध्वस्त झालीं आहेत व आतां देव कोठेंच नाहींसा होऊन लोक
" आपआपसांत म्हणतात, कीं 'कां हो देव आहे तरी का! आपल्या
" डोळ्यांनीं तर बुवा कोठें दिसत नाहीं! "

आपला डायोजिनिस जरी इतका बेफामपणानें बोलत आहे, तरी त्यास कालिपुरुष ठरविणें योग्य होणार नाहीं. वास्तविक पाहिलें तर 'ईश्वराचे दास' या दृष्टीनें आपण सर्वच लोक कवडीच्या मोलाचे आहों; परंतु ईश्वर आहे कीं नाहीं ही शंका घेत असतांनाच टयूफेल्सड्राक साहेब ईश्वराची जशी एकनिष्ठपणें सेवा करीत होते तशी त्यांनीं इतर वेळीं कधींही केली नसेल. ते म्हणतात " माझे चरित्रांतील एक गोष्ट येथें नमूद केली पाहिजे, ती ही कीं,
" या माझ्या शंकेखोरपणानें जरी मला इतकें गांजून सोडिलें होतें तरी
" माझ्या शंका कुभांडखोरपणाच्या नव्हत्या. सत्यावर[१०] माझी पूर्ण निष्ठा
" असून सत्यशोधनाच्या आतुरतेमुळेंच या शंका मला येत होत्या. सत्यावर
" माझी निष्ठा इतकी होती कीं, तिजकरितां हवीं तीं दुःखें सोसण्यास मी
" तयार होतों. मी आपल्या भरांत येऊन म्हणें कीं, हें आकाश जरी मजवर
" कडकडून पडलें तरी मी सत्याची कास सोडणार नाहीं आणि असत्याच्या
" यत्किंचित् आश्रयानेंही जरी मला स्वर्गसुख मिळणार असलें तरी तें मी
" पतकरणार नाहीं. व हीच गोष्ट माझे आचरणांत होती. जर एखाद्या

---

९ डायडोराट (१७१३–१७८४) एक फ्रेंच नास्तिक ग्रंथकार हा मोठा बुद्धिमान् असून त्यानें बरेच नीतिविषयक ग्रंथ लिहिले आहेत.

१० सत्य हें नीतितत्व सर्वांत प्रधान असून स्वतःसिद्ध आहे. बाकीचीं कोणचींही नीतितत्वें ठाम नाहींत. देशकालस्थितीच्या मानानें त्यांत फरक होतो. परंतु कांहीं झालें तरी खरें असेल तें खोटें व खोटें असेल तें खरें कधींही होणार नाहीं. या नीतितत्वाच्या विरुद्ध वर्तन होतें तें केवळ दुर्बळपणामुळें व सत्वहीनतेनें होते आणि ह्मणूनच सत्याची कांस धरून बसलेला मनुष्य इतर कोणच्याही दुर्गुणांत फसला असला तरी त्याच्या सुधारणेची निराशा होण्याची जरूर नाहीं.

" **आकाशवाणीनें** किंवा अन्य प्रकारच्या **दृष्टांतानें सत्य शोधनार्थ** प्रत्यक्ष
" आगींत उडी टाकण्यासही मला सांगितलें असतें तरी तेंही मोठ्या आतुरतेनें
" मीं केलें असतें. परिणामवाद्यांच्या **वाक्पांडित्यानें** माझ्या डोळ्यांवर कसेही
" वडस वाढले असले व **नफ्यातोट्याच्या** तत्वज्ञानानें माझी दृष्टि कितीही
" तरळ झाली असली, तरी **कर्तव्याचें** अगाध तत्त्व, अंधुकपणें कां होईना,
" पण अजून मला दिसत होतें. देव वगैरे सर्व थोथांड आहे असें मानून
" जरी निरीश्वरतेनें मी त्या वेळीं संचार करीत होतों, तरी ईश्वराचें दिव्य
" तेज माझ्या डोळ्यांपुढून समूळ नाहींसें झालें नव्हतें. माझ्या आतुर पण
" मोहोरबंद डोळ्यांना जरी ईश्वर कोठेंही दिसत नव्हता तरी तो माझ्या
" अंतर्यामीं प्रकट असून कर्तव्यबुद्धिरूप त्याची दिव्य आज्ञा मला ढळढळीत
" सदैव भासमान असे; व ती पवित्र मानून मी पाळीतही असें."

या सर्व सत्वपरीक्षणांतून आणि ऐहिक व पारमार्थिक वनवासांतून पार पडत असतां आमच्या **फिरस्त्याच्या** स्तब्ध जीवास काय काय क्लेश होत असतील त्यांची कल्पना होणें अशक्य आहे. ते म्हणतात, " सर्वांत असह्य यातना
" म्हटली म्हणजे आपल्या **दुर्बळपणाची** होय. इंग्रज कवी मिल्टनें[११] म्हणतो
" त्याप्रमाणें दुर्बळपणा हेंच खरें दुःख[१२] आहे. तथापि आपल्या शक्तीची कल्पना
" जें कांहीं आपल्या हातून घडलें असेल, जें कांहीं आपण केलें असेल त्याव-
" रून मात्र होत असते. आपल्या हातून घडण्यासारख्या गोष्टी पुष्कळ अस-
" तात. परंतु कर्मधर्मसंयोगावर अवलंबून असणाऱ्या कर्तृत्वाच्या नुसत्या अनु-
" मानांत आणि आपल्या हातून घडलेल्या कर्मांत केवढें तरी महदंतर असतें[१३] !

---

११ जान मिल्टन इंग्लंडचा अतिविख्यात कवी. ( १६०८—१६७४ ) याची बरींच काव्यें असून त्यांत पॅरॅडाइज लॉस्ट हें अप्रतिम आहे. त्याचें कांहीं उत्कृष्ट गद्य ग्रंथही आहेत. इंग्लंडांत पहिला चार्लस राजा राज्य करीत असतां राजाचीं अनन्वित कृत्यें पाहून लोकांत प्रजापक्षाचा तट झाला त्यांत हा प्रमुख होता. पुढें क्रामवेलच्या कारकीर्दींत तो लॅटिन सेक्रेटरी होता.

१२ Fallen cherub, to be weak is miserable.

१३ आपल्या हातून घडण्यासारख्या गोष्टी असतात त्या घडून येणें हें कर्मधर्मसंयोगावर अवलंबून असतें. ह्मणजे अनुकूल वस्तुस्थिती ( वस्तुगत धर्म ) मिळून अनुकूल क्रिया घडली तर होतात. या सर्व शक्य गोष्टी आपल्या कर्तृत्वावरून संभवनीय असतात पण त्यांत आणि प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टींत केवढा फरक असतो ?

" कर्तृत्वाची शक्यता अर्धवट अदृष्टरूपानें आपणा प्रत्येकांत असते, ती घड-
" लेल्या गोष्टींवरून मात्र स्पष्टपणें प्रत्ययास येणारी आहे. जसें डोळ्यांनीं
" आपण सर्व पदार्थ पाहतों परंतु ते आपले डोळे प्रतिबिंबावांचून आपणांस
" दिसत नाहींत; त्याचप्रमाणें सर्व घडणाऱ्या गोष्टी शक्यतेप्रमाणेंच होतात.
" पण ती शक्यता आत्मरूप असून अनुभवाचे आरशावांचून समजुतींत
" येत नाहीं. घडलेल्या गोष्टीचा आरसा मिळाला तरच ती आपल्या आ-
" त्म्यास दिसेल. ह्मणूनच कर्मांचे अनुभवावांचून आत्मज्ञान करून घ्या हें
" ह्मणणें केवळ मूर्खपणाचें व अर्थरहित होय. आपल्या हातून होण्यासारखें
" काय आहे तें पहा, असा याचा भावार्थ धरिला तर मात्र याचा कांहीं
" अर्थ होतो.

" असो, माझ्या स्वतःविषयीं पाहिलें तर मी इतका कांहीं अपयशी होतों
" कीं माझे हातून घडलेल्या गोष्टी म्हणजे निवळ आंवळ्या एवढें पूज्य!
" याप्रमाणें जर आरसाच नाहीं तर त्यांत माझी शक्ति किती आहे तिचें
" प्रतिबिंब मला कोठून दिसणार! व मजमध्यें कांहीं कर्तृत्व आहे असें तरी
" मला वाटावें कसें? " तुझ्यांत कांहीं गुण असून तुला कांहीं किंमत
" आहे कीं सांप्रतकाळच्या महाशंखांपैकींच तूंही एक आहेस, " हा आज
" बाष्कळ वाटणारा प्रश्न मला वरचेवर येऊन मला कांहींच सुचत
" नसे. अश्रद्धेचें अत्यंत भयंकर स्वरूप म्हटलें म्हणजे स्वतःच्या शक्तीवि-
" षयीं अश्रद्धा होय. पण माझे शक्तीविषयीं माझेमध्यें भरंवसा उत्पन्न
" व्हावा कसा? सर्व जन्मांत येऊन मीं केलें असें एकच. मजपुढें स्वर्ग-
" द्वार उघडलेलें आहे असें वाटून प्रेमप्रणय करण्याचें धाडस मीं नाहीं
" म्हणण्यास केलें खरें. पण त्यांतही मी किती सर्वथैव फसलों! यामुळें या
" जीवदशेचें अध्यात्मिक तत्व मला एकसारखें अधिकाधिकच गूढ वाटूं
" लागलें. पण तेंही असो. या अधिभौतिक संसारतत्त्वांतही माझी यत्किंचित्
" सुद्धां गती होईना! जो मार्ग धरावा त्यांत ठेंच लागून पडावें आणि मग
" दुसऱ्यांनीं लाथेनें उडवून वाटेवेगळें करावें असें झालें! क्षणांत मला गट्ट
" करितो कीं काय अशा या विश्वसागरांत मी एकटा व दुबळा असून
" आपलें दैन्य दिसण्यापुरतेच मला डोळे आहेत असें मला वाटूं लागलें.
" जणूं काय सर्व सजीव वस्तूंच्या व माझ्या दरम्यान अदृश्य पण अभेद्य
" भिंती जादूनें उत्पन्न झाल्या असून या जगांत आपला कनवाळू ह्मणून

" अमुक एकास विश्वासानें मिठी घालीन ह्मटलें तर तसा एकही दिसेना.
" असें माझें चमत्कारिक खडतर दैव ! तेव्हां मीं आपल्या तोंडास कुलूप घालून
" ठेविलें. कारण ज्यांच्या ज्यांच्या कोमेजलेल्या, अभिमानी, व खाखा सुट-
" लेल्या अंतरंगांत स्नेहाचा विकार नाममात्रेंही वसत नाहीं, त्या शाकूसो-
" बत्यांशीं बोलून तरी उपयोग काय ? अशा स्थितींत एकच मार्ग होता;
" अगदीं थोडें भाषण व तेंही वर्तमानपत्रांतल्या गोष्टींवर; व हाच मार्ग मीं
" स्वीकारिला. त्या वेळची स्थिति आज पाहिली असतां जसा एखाद्या उजाड
" रानांत एकटा मनुष्य असावा याप्रमाणें ती असून तेव्हांची आठवण
" झाली कीं, अंगावर कांटा उभा राहतो. माझे भोंवतीं स्त्रिया, पुरुष हिंडत
" होते, माझ्याशीं बोलत होते. पण ते सर्व मला बाहुल्यांसारखेच वाटत असून
" ते जिवंत आहेत व आत्मशक्तीनें चालले आहेत हें मी अगदींच विसरलों
" होतों. त्यांच्या मोठमोठ्या समाजांतून व गर्दी झालेल्या रस्त्यांतूनही पहावें
" तों मी आपला एकटाच ! जसा एखादा पटाईत वाघ त्याच्या जंगलांत
" असतो तसाच मी असून त्याच्या सारखा क्रूरही होतों. फरक इतकाच
" कीं, त्या वाघाप्रमाणें मी दुसऱ्याचें काळीज न खातां आपलेंच काळीज
" काळजीनें खाऊन टाकीत होतों. फॅास्टप्रमाणें भूतराजाचे लगामीं जरी
" मी असतों तरी बरें झालें असतें असें वाटतें. कारण नरकपुरींत जरी
" पिशाच्यांचाच वास आहे व नरकपुरीपेक्षां अधिक दुःखद जागेची आपणांस
" कल्पना होत नाहीं, तरी मला वाटतें कीं, तेथील पिशाच्यें नाहींशीं झालीं
" तर नरकपुरीसुद्धां जास्त भीतिप्रद होईल. पण आमच्या या श्रद्धाहीन युगांत
" कोणीही उंच दिसला कीं, त्यास खालीं ओढावें अशा योगानें आपण प्रत्यक्ष
" भूतराजासही खालीं पाडिलें आहे. व आतां त्याजवरही श्रद्धा बसण्याच्या
" स्थितींत आपण नाहीं. यामुळें मला या जगांत **चैतन्य** नाहीं, **हेतु** नाहीं,
" **कर्म करण्याची इच्छा** अगर **शक्ति** नाहीं, फार तर काय पण **वैरही**
" नाहीं असें झालें; आणि जसें एखादें इंजन, जो प्राणी पुढें येईल त्यास

१४ फास्ट. हा सोळाव्या शतकांतील एक जादूगार-याच्या चुलत्यानें पुष्कळ धनसंचय केला होता. परंतु फास्टनें तें सर्व द्रव्य चैनबाजींत उडविलें. अखेरीस कलीचा अवतार जो मॅफिस्टो फेलिस (पु. १ भा. ४ टी. ४ पहा.) त्याशीं त्यानें असा करार केला कीं मला चोवीस वर्षें जर अव्याहत सुख झालें तर मी तुझा दास होईन. जर्मन कवी गीट यानें हें फास्टचें चरित्र एका अपूर्व नाटकांत गोंविलें आहे.

" बिनादिक्कत चिरडून पुढें जातें, तसेंच हें जग म्हणजे मला चिरडून टाक-
" णारें मोठें थोरलें इंजनच आहे कीं काय, असें मला वाटे, अरेरे ! कोण हीं
" भयंकर जागा ! केवळ मृत्यूचा चरक ! ख्रिस्तास[१५] खिळे मारिलेली जागाही
" इतकी भयंकर नसेल. अशा जागेंत या चैतन्ययुक्त व शुद्धीवर असलेल्या
" प्राण्यास तेथें एकटें कसें सोडिलें असेल तें असो. कारण भूतराजानें त्यास
" तेथें सोडलें असें म्हणावें तर मूळ भूतराजाच नाहीं मग तुमचा देवच जर
" भूतराजा असला तर न कळे."

अशा विचारांनीं पोखरून पोखरून टच्यूफेलसड्राकच्या पोलादासारख्या धडधाकड प्रकृतीवरही बराच परिणाम होऊन त्यांच्या दुःखांत शरीरयातनांची भर पडली असेल. त्यांस दुखण्याबाण्यांचाही अनुभव आला असेल आणि जरी तो इतका जलदीनें प्रवास करणारा असला तरी त्यांसही कांहीं दिवस एका अंथरुणास खिळून रहावें लागलें असेल. उदाहरणार्थ, हा उतारा पहा. " अमुक अमुक मनुष्य हृदयस्फोट होऊन मेला असें कागदावर लि-
" हिलेलें किती सहज दिसतें? पण तीच गोष्ट अनुभवांत किती निराळी
" आहे. या प्रसंगीं आपल्या ज्ञानेंद्रियांच्या खिडक्या व बुद्धीचेंही दार चिख-
" लानें चिणून टाकल्याप्रमाणें इतकें कुंद होतें कीं, त्यांतून ज्ञानरूप उज्वल
" किरण आंत अगदींच येऊं शकत नाहींत. बरें, आत पहावें तों औष-
" धांचा कर्दम जिकडे तिकडे पसरला असून बिचारा थिजलेला आत्मा
" शिसारीचे दलदलींत हळू हळू बुडून जातो."

---

१५ ख्रिस्त. या साधुपुरुषाचें चरित्र मुख्यतः म्हटलें म्हणजे त्या वेळीं लोकांत असलेले दोष व दुर्गुण त्यानें अनेक प्रकारें व अत्यंत निस्पृहतेनें लोकांच्या नजरेस आणिले; आणि अनेक मोहजालांतून सुटून व अनेक संकटें भोगून सत्व रक्षण केलें. शेवटीं दुरभिमानी लोकांनीं कांहींतरी आरोप बळेंच त्याच्यावर लादून त्यास क्रुसावर खिळे टोंचून मरण्याची शिक्षा दिली व याची अत्यंत निर्भर्त्सना केली. पण हें सर्व त्यानें निमुटपणें सोसलें. इतका त्याच्या चारित्रांत ऐतिहासिक भाग आहे. याशिवाय कुमारीपासून अपौरुषेय जन्म, अनेक अद्भुत चमत्कार, शेवटीं थडग्यांत पुरल्यावर पुन्हां सजीव होणे वगैरे अनेक आख्यायिका आहेत. अद्वितीय साधुपुरुषासंबंधानें अनेक प्रकारच्या अद्भुत चमत्काराच्या गोष्टी भोळया लोकांत उत्पन्न होऊन फार त्वरेनें लोकांत पसराव्या व त्यांवर लोकांचा विश्वास बसावा हें अगदीं साहाजिक आहे.

हीं प्रोफेसर साहेबांचीं बाह्य व अंतस्थ दुःखें पाहून त्यांच्या पुढें दिले-ल्या शांतपणाच्या उद्गारांत फारच खोल अर्थ असावा असें आह्मांस वाटतें. ते ह्मणतात, " अशा स्थितींत मीं खचितच आत्मघात करून घेतला असता " परंतु धर्मश्रद्धेच्या विलक्षण तेजाचा अनुभव पुढें माझे नशीबीं होता ह्मणू-" नच मला तशी बुद्धि झाली नाहीं. या कामांत खुस्तीनेंही मला साह्य " केलें नसेल असें नाहीं. कारण आत्मघात करून जीविताचा शेवट " करण्याचा उपाय हवा तेव्हां योजितां येण्यासारखा आहे असें वाटून तें " काम आतांच करावें असें मला केव्हांही वाटत नसे. तथापि प्रसंगविशेषीं " मला वाटे कीं, या कोपऱ्यावरून वळतांना जर कोणी गोळी घालून मला " या शरीरव्यापित्वाचे स्थितींतून सोडवून परलोकीं, किंवा परलोक नसला " तर निदान अभावस्थितींत ढकलून देईल तर किती मौज होईल? नेहमीं " असा विचार माझ्या मनांत येई. आणि समुद्रावर तुफान झालें असतां, " किंवा शहरास वेढा पडला असतां किंवा अशाच आकास्मिक मृत्यु येण्याचे " ठिकाणीं याच विचारानें मी अगदीं शांतपणें हिंडें. लोकांना मात्र अशा " वेळेस माझ्या शांततेचें कारण माझें नैसर्गिक धैर्य असेल असें वाटे! "

अखेरीस आमचा फिरस्ता ह्मणतो, " अशा भयंकर स्थितींत क्लेश " भोगीत बरींच कंटाळवाणीं वर्षें मीं काढिलीं. तितक्या अवधींत दिव्यामृ-" ताचा थेंबही मजवर न वळल्यामुळें मी तसाच झुरत हळू हळू आंतल्या " आंत जळत होतों. या सर्व काळांत मी कधीं अश्रु ढाळले असें मला " आठवत नाहीं. एके वेळीं मात्र फास्टचें मृत्युस्तोत्र म्हणत असतां

" ज्याची गांठीं पडे रणांगणि तुशीं तो धन्य भूमंडळीं "

" हें कडवें ह्मणतांना मला प्रेमाश्रूचें भरतें आलें व मनांत वाटलें कीं, हा " माझा सोबती ( मृत्यु ) तरी अखेरपर्यंत टिकणारा असून दैव कितीही " फिरलें तरीं मला मरूं न देण्याइतकें सामर्थ्य त्याच्यांतही नाहीं! असो. " मला कसलीही आशा नसल्यामुळें मनुष्य किंवा सैतान यांपासून विशेष " प्रकारची भीतिही मला कधीं वाटत नसे. इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष सैता-" नानें मला छळण्याकरितां पाहिजे तसले जरी प्रकार काढिले तरी हरकत " नाहीं पण त्यानें एकदा माझे समोर यावें ह्मणजे मला तरी त्यास हात " दाखविण्यास सांपडेल; असें वाटून मला असल्या विचारांनीं कांहींसें " समाधानच वाटे. तरी पण चमत्कार पहा कीं माझे मनांत स्पष्ट भीति

" जरी कशाचीही नव्हती, तरी एक प्रकारची विलक्षण अपरिस्फुट भीति
" सारखी माझ्या मनांत असून तीमुळें मी एकसारखा झुरणीस लागलों
" होतों. नेहमीं माझा जीव धाकधूक करून दबून असे; मग त्यास कशाची
" भीति वाटे नकळे. जणूं काय पृथ्वीवरील व स्वर्गांतीलही प्रत्येक वस्तूस
" माझा सूड उगविण्याचें मात्र काम होतें! जणूं काय स्वर्गलोक व हा
" भूलोक हे एखाद्या महाराक्षसाचे जबडे असून त्यांत सांपडून मी हे
" प्राण कंठीत होतों."

" एके वर्षीं उन्हाळ्याच्या अखेरीस पारिस शहरांत वाट चुकलों असतां
" असले विचार माझ्या मनांत घोळत होते. त्या वेळेस पारिस शहरांत किंवा
" त्याचे आजूबाजूसही माझ्या इतका दुःखी प्राणी कोणीही नसेल. वाट
" चुकून चालतां चालतां दमून मी एका घाणेरड्या गल्लींत एका मोठ्या
" उकिरड्याजवळ आलों. तेथें कुंद हवा व तापलेली फरशी यांच्या बाह्य
" वेदनांमुळें आंतील विचारांच्या टोंचणीस थोडासा उसंत पडून कांहींसें
" समाधान वाटतें तोंच माझ्या मनांत एकाएकीं कांहीं विचार येऊन मी
" आपणास म्हणतों " अरे तुला इतकी भीति वाटत आहे ती कशाची?
" नेहमीं एखाद्या भागूबाईप्रमाणें वळतात्रिवळत व मुठींत जीव धरून पळत
" असतोस तें कशाकरितां? धिःकार असो तुझ्यासारख्या द्विपाद पशूला.
" अरे, सर्व दुःखें जीं तुझ्यापुढें आ पसरून उभीं आहेत त्यांनीं पराकाष्ठा
" केली तरी काय होणार? मृत्यूचना? येऊं दे मृत्यु! मृत्यूंत इतकें
" भिण्यासारखें काय आहे? आणि मृत्यु केव्हां तरी येणारच. आणखी
" मृत्यूच्या जोडीस मनुष्य आणि सैतान यांच्या प्रतापानें होण्यासारखीं
" असतील तीं सारीं दुःखें जरी घातलीं तरी काय होणार? तुझ्यांत
" हिय्या नाहीं काय? हें सर्व दुःख सोसून तें तुला गांजीत असतांच त्याचा
" स्वतंत्र पुरुषाप्रमाणें नायनाट करण्याचें सामर्थ्य तुझ्या अंगांत नाहीं काय?
" होऊं दे तर मग काय होतें तें; मला त्याची कांहीं पर्वा वाटत नाहीं! जें काय
" होईल त्यास तोंड देण्यास हा मी तयार आहें. हा विचार माझ्या मनांत
" आल्याबरोबर एकदम अग्निसंचार झाल्याप्रमाणें भिकार भीति मीं तेव्हांपासून,
" कायमची झुगारून दिली. तेव्हांपासून मला कोठलें बळ आलें न कळे! मी मोठा
" सामर्थ्यवान् आहें, मी देहातिरिक्त आत्मरूप आहें, किंबहुना बहुतेक मी
" देवच आहे असें मला वाटूं लागलें. तेव्हांपासून माझ्या दुःखाचें स्वरूप बद-

" लून पुढें मला भीति किंवा शोक न होतां राग व अनादर यांचाच संचार
" होऊन दंड थोपटून सामन्याकरतां मीं कलिराजास आव्हान करीत असें.
" याप्रमाणें " हें सर्व थोतांड आहे " या नास्तिकपणाच्या कल्पनेनें
" माझ्या अंतरंगांतील सत्वाचा कोपरानूकोपरा अगदीं दणाणून टाकिला होता;
" व मग माझ्या चैतन्यानेंही ( अध्यात्मिकरूपानें ) उचल खाऊन आपल्या
" ईश्वरदत्त श्रेष्ठत्वाच्या जोरावर या नास्तिकपणास रोकडा जबाब दिला.
" अध्यात्मशास्त्राचे परिभाषेनें हा रोकडा जबाब ह्मणजे वर निर्दिष्ट केलेला
" क्रोध आवेश व बेपर्वाई हा होय. ही निरीश्वरता मला म्हणे कीं " खबर-
" दार, हें जग ईश्वरनियंत्रित नसून कलिनियंत्रित आहे. शिवाय तुला आई-
" बाप नसून तूं निराधार असल्यामुळें असत्याची कास न धरशील तर
" तुझा निभाव लागणार नाहीं. " पण यावर माझ्या स्वत्वानें ( सत्वानें )
" जबाब दिला कीं हे कलिराज, मी तुझा नाहीं; मी स्वतंत्र आहें; व मी
" तुझा आमरण वैरी आहें.

" जशी महापातक्याची शुद्धि अग्निकाष्ठें भक्षण करून होते तद्वत् या
" वेळेस माझें अंतरंग शुद्ध होऊन अध्यात्मदृष्ट्या माझें मौंजीबंधन
" होऊन मला द्विजत्व आलें. खरें मनुष्यत्व मला तेव्हांपासून प्राप्त झालें."

---

# भाग आठवा.

## वैराग्याचें नाकें.

या द्विजत्वानंतर आपली अस्वस्थता जास्त झाली असें आपल्या फिर-स्त्याचें ह्मणणें आहे; आणि क्रोध व आवेश हे विकार कोणाच्याही मनाला स्वास्थ्य देणारे नाहींत. तथापि आत्मवृत्तीची चिकित्सा करणाऱ्या लोकांस एवढें कळण्यास हरकत नाहीं कीं, हें अस्वास्थ्य अगदींच निराश होण्या-सारखें नसून आतां त्यास एक प्रकारची दिशा तरी लागली आहे. कारण, या अग्निशुद्धीचे आगोदर त्यांचा जीव सदैव जाचांत असून वज्रपातानें जणूं काय शतखंड झाल्यासारखा होता; तोच आज मोकळा झाला आहे व स्वातंत्र्याचा साक्षात्कार हाच त्याचा उपनयनविधि होय. आज त्यानें आपल्या राज्यांतील मुख्य किल्ला कलीपासून जिंकून पुन्हां त्यास पराधीन

होण्याची भीति नाहीं इतकी त्याची डागडुजी करून ठेविली आहे. बाहेरील उरलेला प्रदेश जिंकण्यास अजून मोठमोठ्या लढाया मारल्या पाहिजेत हें खरें; तरी पण तोही मुलूख हळू हळू सर होऊन तेथील पुंडावा नाहींसा होईल याविषयीं आतां बिलकुल संदेह उरला नाहीं. हीच गोष्ट दुसऱ्या दृष्टांतानें सांगू. टयूफेलसड्राक साहेबांचे अंतःकरणांत ज्या पिशाच्यांनीं आजपर्यंत पुंडावा मांडिला होता त्यांस पारिस शहरांतील या गल्लींत असतांना आपल्या अंतःकरणांतून त्यांनी अगदींच लाथ मारून हांकून दिलें नाहीं खरें; तरीपण तेथून एकदम निघून जाण्याविषयीं त्यांस त्यांनीं सक्तीची कायदेशीर नोटीस दिली असून तिची अमान्यता झाल्यास बेमुरवत अर्धचंद्र देऊन त्यांस ते हांकून लावणार यांत आतां शंका नाहीं. या त्यांच्या नोटिशीमुळें तीं पिशाच्यें चवताळून व दांत ओंठ खाऊन अकाळविकाळ ओरडून शिव्याशाप देऊं लागलीं आहेत; व यामुळेंच कांहीं काळपर्यंत टयूफेलसड्राक साहेबांस त्यांची दंगल गुप्त ठेवितां आली नाहीं.

तात्पर्य टयूफेलसड्राक साहेबांच्या तीर्थयात्रेचा पुढील इतिहास तपासून पाहिला असतां आतां त्यांच्या वेडास कांहींसा व्यवस्थितपणा येऊं लागला आहे असें दिसून येईल. आतां टयूफेलसड्राक साहेब निवळ पिशाच्यचेष्टा करीत नसून पिशाच्यशत्रु बनले आहेत व कांहीं काळानें ते पुरे पंचाक्षरी होतील यांत संशय नाहीं. आजपर्यंत इतक्या तीर्थांस जाऊन तेथील तीर्थोदकानें त्यांनीं आपली तहानही भागविली नाहीं तरी यापुढें सामान्य विहीर भेटली तरी तींतील पाण्यानें ते आपला घसा ओला करीत अससात. पूर्वींप्रमाणें आपलें अंतरंग खाण्याचें जरी त्यांनीं अजून अगदींच बंद केलें नाहीं तरी आतां त्यांत खळ पडूं लागला. व तेवढ्या अवधींत स्वतःचें अंतःकरण विकाराग्नीनें होरपळण्याचे ऐवजीं तें आतां आपल्याहून निराळे जे बाह्य पदार्थ त्यांविषयीं विचार करूं लागले व त्यामुळें त्यांच्या प्रकृतीवरही चांगला परिणाम झाला असून आतां त्यांच्या प्रकृतींतील तऱ्हेवाईकपणा कांहींसा कमी झाला असें या पुढील उताऱ्यांवरून स्पष्ट दिसतें.

" लहान मोठीं शहरें, नगरें, विशेषतः जुनीं शहरें मी मोठ्या आस्थेनें
" पाहिलीं. असल्या मार्गांनीं प्राचीनकाळाकडे दृष्टि पोहोंचविणें किती आ-
" ल्हादकारक आहे बरें! हीं नगरें ह्मणजे जणूं काय गतकाळाचे प्रत्यक्ष
" तुकडेच वर्तमानकाळीं आपणापुढें मांडले आहेत. या जुनाट शहरांतील

" स्वयंपाकघरांतला विस्तव दोन हजार वर्षांपूर्वी कधीं कोणी तरी पेट-
" विला असेल. तो तेव्हांपासून आजपर्यंत त्या प्रदेशांत जसें सरपण मि-
" ळालें त्यावर दिवसानुदिवस अधिक अधिक तेजःपुंज होत जाऊन त्याचा
" धूर आज आपल्या डोळ्यांस प्रत्यक्ष दिसत आहे. हें तर काय, पण
" ह्याहीपेक्षां जास्त अविज्ञेय असा चैतन्यरूप अग्नीही निदान दोन हजार वर्षां-
" पूर्वीं तेथें पेटून तेव्हांपासून एकसारखा जळत राहून चोहोंकडे फैलावत
" आहे. त्याचा धूर व राख (न्यायमंदिरांतून व स्मशानांतून) प्रत्यक्ष दिसत
" असून तो चेतविण्याचे ( धर्मरूप ) भातेही आज चालू आहेत; व त्या-
" च्या ज्वाळा सुमनुष्याच्या अगर दुर्मनुष्याच्या तोंडावरील तेजोरूपानें आ-
" पणास आनंददायक ऊब अगर दुःखदायक चटके देत आहेत.

" मनुष्याच्या विचारशक्ति व पराक्रमाचीं मुख्य फळें दृष्टिगोचर नसून
" वायुरूप किंवा गूढ आहेत; व तीं एकापासून दुसऱ्यास, दुसऱ्यापासून ति-
" सऱ्यास अशीं परंपरेनें मात्र आलेलीं आहेत. हीं मुख्य फळें ह्मटलीं ह्म-
" णजे राज्यसंस्था व त्यांची शक्ति, कपड्यांतील व आचरणांतील रितीभाती
" आणि हस्तकौशल्यांतील मनुष्यजातीचें समाईक भांडवल हीं होत. यां-
" पैकीं शेवटचें, कीं ज्याचे योगानें आपण सृष्टपदार्थांचें इतकें विलक्षण
" रूपांतर करितों तें तर फारच गूढ आहे. या तर्व गोष्टी जरी अत्यंत
" आवश्यक व अमोल्य आहेत तरी कुलपें लावून त्या कोठें ठेवितां येण्या-
" सारख्या नाहींत. परंपरेच्या अदृश्यवाहनावर बसून मात्र एकापासून दुस-
" ऱ्यास, बापापासून लेंकांस याप्रमाणें त्या संचार करीत असतात. चर्मचक्षूंनीं
" दिसण्याला त्या अमूक एका जागीं आहेत असें नाहीं. शेतकरी, लोहार
" वगैरे लोक अगदीं प्राचीनकाळापासून हवे तितके पाहण्यास सांपडतात.
" परंतु त्यांचें कसब--शेतकीचें ह्मणा किंवा धातुकारागिरीचें ह्मणा किंवा दुस-
" ऱ्या कोणच्याही जातीचें कसब असा कांहीं पदार्थ कोठें सांठवून ठेवि-
" लेला आपणास आढळणार नाहीं. हवेच्या व प्रकाशाच्या वाहनावर ह्म-
" णजे श्रोत्रेंद्रिय किंवा चक्षुरिंद्रियाचे द्वारानें हें कसब एका व्यक्तीपासून दुस-
" ऱ्या व्यक्तींत पसरतें पण तें स्वतः अदृश्य, अस्पृश्य, केवळ अध्यात्मिक आहे.
" त्याचप्रमाणें व्यवहारनीति कोठें आहे, राजशासन कोठें आहे असें तुह्मीं
" मला विचारीत बसूं नका. कारण अमक्या ठिकाणीं हे पदार्थ आहेत असें
" मला सांगतां येणार नाहीं. मोठमोठ्या राजवाड्यांतून व दिवाणदरबारांतून

" जरी जाऊन पाहिलें तरी तेथें तुह्मांस काय दिसणार आहे? दगडांच्या
" किंवा विटांच्या इमारती व कांहीं कागदांचीं पुडकीं! पण मोठ्या धूर्त-
" तेनें शोधून काढिलेली, सर्व सत्ताधारिणी राजसत्ता आपणांस अमके ठि-
" काणीं प्रत्यक्ष सांपडेल हें ह्मणणें व्यर्थ होय. पाहिली तर चोहोंकडे आहे;
" नाहींतर कोठेंही नाहीं. व ती आपणास दिसावयाची तर परिणामरूपानें
" मात्र दिसेल. अर्थात् हीही गोष्ट वायुरूप व अदृश्य आहे. वाचकांस
" काय वाटेल तें वाटो. पण आह्मांस तरी ही गोष्ट गूढ व अविज्ञेय वा-
" टते. याप्रमाणें आपलें सर्वच दैनंदिन चारित्र अरूप असून जें जें कांहीं
" आपण करितों तें तें अव्यक्त आत्म्यापासून व अदृश्य शक्तींपासून होत
" आहे. या अरूप महासागरांतून ' प्रत्यक्ष ' हें एखाद्या आकाशांतील चि-
" त्राप्रमाणें किंवा गंधर्वमंदिराप्रमाणें कांहीं अनिर्वाच्य रीतीनें मात्र
" आपणापुढें प्रकट होतें.

" आतां भूतकालापैकीं ज्या दृश्य व स्पृश्य वस्तु आहेत त्यांचे माझ्या
" मतें तीन वर्ग आहेत. पहिला, शहरें व तेथील राजमंदिरें आणि किल्ले;
" दुसरा, लागवडीची जमीन, खाणी वगैरे; रस्ते, पूल, धर्मशाळा विहिरी,
" हीं पहिल्या अगर दुसऱ्या वर्गांतच घातलीं पाहिजेत, आणि तिसरा वर्ग
" ग्रंथांचा. या तिन्ही वर्गांपैकीं शेवटचा जरी बाकीच्या दोहोंपेक्षां मागून उत्पन्न
" झाला असला तरी त्याची योग्यता बाकीच्या दोहोंपेक्षां फारच मोठी आहे.
" खऱ्या पुस्तकांची योग्यता केवळ अतर्क्य होय. शहरांची स्थिति पाहतां शहरें
" मातीदगडांचीं केलेलीं असून त्यांची वर्षास डागडुजी केली तर तीं राहण्या-
" च्या उपयोगी; तेव्हां पुस्तकांशीं त्यांची तुलनाच अशक्य आहे. पुस्तकांस
" शेतांची उपमा शोभेल; पुस्तकें हीं आत्मज्ञानाचीं शेतें होत. पण त्यांस
" शेतें म्हणण्यापेक्षां आत्मज्ञानाचे वृक्ष म्हटले तर जास्त शोभेल. कारण तीं
" दर वेळेस नव्यानें पेरावीं लागत नाहींत. तीं वर्षानुवर्ष व युगानुयुग
" कायम राहतात. कित्येक पुस्तकें तर हजारों पिढ्या चालत आलीं आहेत.[1]
" शिवाय त्यांस दरसाल टीका, भाष्यें, निबंध व त्यावर उभारलेल्या
" अध्यात्मिक व व्यावहारिक विशिष्ट संस्था इत्यादि रूपानें नवी पालवी येते
" ती निराळीच. या वृक्षांच्या प्रत्येक फळांत कांहीं विलक्षण

---

१ उदाहरणार्थ आपले वेद ६०००—४००० वर्षांचे जुने आहेत.

" जादू आहे. कारण त्याचा परिणाम मनुष्याच्या मनावर होतो. परंतु ग्रंथ
" या नांवास शोभणारा ग्रंथ लिहिण्याचें भाग्य शेंदोनशें वर्षांत एखाद्याचें
" असलें तर न कळे. ह्मणून हे पुरुषा, जर तुजमध्यें असा ग्रंथ लिहि-
" ण्याचें सामर्थ्य असेल तर ज्यानें शहरें वसविलीं त्याच्या क्षुद्र पदवीचा
" हेवा करण्याचें तुला कांहींच कारण नाहीं; आणि ज्यांनीं शहरें काबीज केलीं
" अगर जाळिलीं अगर उध्वस्त केलीं त्यांच्या स्थितीचा तर तुला तिटका-
" राच आला पाहिजे. त्या स्थितीस विजयश्री हें नांव देणें, ह्मणजे विषर-
" सास अमृत ह्मणण्यासारखें आहे. तूंही विजयशाली असून वास्तविक
" पाहिलें तर विजयश्री तुलाच शोभते. कारण तुझे विजय सामान्य
" मनुष्याशीं झुंजण्यांत येणारे नसून सर्व सत्संकल्पांचा द्वेष्टा जो सैतान किंवा
" कली त्याशीं झुंजून प्राप्त होणारे आहेत. तूंही शहरें वसवीत नाहींस
" काय? इतकेंच कीं, हीं शहरें दगडाविटांचीं नसून मनुष्याच्या मनोरूप
" अतर्क्य धातूंचीं आहेत. त्यांतील घरांस घरें अगर वाडे म्हणण्यापेक्षां
" मंदिरें अगर देवालयें असेंच म्हटलें पाहिजे. तूं वसविलेलीं शहरें संसारा-
" टवींत फसलेल्या मनुष्यांस संरक्षणाचे व सुमार्गदर्शनाचे किल्लेच होत.
" या शहरांतून लोक नुसते नांदतील एवढेंच नव्हे तर सद्धर्मानें वागणारे
" येथून तेथून सर्वच लोक या क्षेत्रांत सदैव वाऱ्या करीत राहतील. जे लोक
" जुनीं कामें पाहण्याच्या हेतूनें कैरोजवळचे दगडी अगर मातीचे मनोरे
" पाहण्याचा उपव्याप करितात ते केवढे मूर्ख म्हणावयाचे! हे मनोरे आज तीन
" हजार वर्षें एके ठिकाणीं स्वस्थ आळशासारखे बसून आहेत त्याचें काय
" फळ? या लोकांस हिब्रू बायबल किंवा निदान त्याचें भाषांतर तरी
" वाचितां येतें कीं नाहीं कोण जाणें!

आपला फिरस्ता समरांगणावर लढाईत आलेला कोठें दिसत नाहीं. तरी एका रणभूमीवर मागून तो आलेला पाहून आपणास कमी आनंद होईल असें नाहीं. ही रणभूमि वाग्रामची असावी असें पुढील संदर्भावरून कळतें. टयूफे- ल्सड्राक साहेबांच्या चरित्रांतील सर्व घोंटाळ्यांत या एका स्थळीं तरी नक्की काळाचें अनुमान करितां येतें, हेंही आपलें सद्भाग्यच होय. या टिपणांतील मुद्याचा भाग आम्ही खालीं देतों.

---

२ खिस्ती लोकांचा धर्मग्रंथ बायबल मूळ हिब्रू भाषेंत होता.

" किती भयंकर प्रकार हा ! या अफाट रणभूमीवर जिकडे तिकडे तो-
" फांचे गोळे आणि माणसांचे व घोड्यांचे मुडदे पसरले आहेत! हे मागून
" खितपत पडलेले लोक मेले असून त्यांस कोणीं पुरलेंही नाहीं ! पुर-
" लेल्या लोकांच्या या तांबड्यालाल खांची पहा ! यांमध्यें असलेल्या
" डोक्यांच्या कवटयांतले गुणविशेष व प्राण नाहींसे होऊन, जशा आपण
" अंड्यांच्या अगर कवठांच्या कवच्या गोळा करून फेंकतों, तशाच त्या
" आतां गोळा करून या खांचींतून भरून दृष्टीआड केल्या आहेत. कार्पे-
" थियन पर्वतावरील उत्कृष्ट सुपीक माती आणून येथें मैदान करण्याची
" बुद्धि डोणा नदीस जेव्हां सृष्टिदेवीनें दिली, तेव्हां हे समरांगणा, तिचा
" हेतु तुजवर उत्तम उत्तम पिकें होऊन सृष्टीच्या बालकांचे रक्षण व
" पोषण व्हावें असा होता, कां तीं पोरें छिन्नविच्छिन्न होऊन या
" खाचींतून पुरलीं जावीं असा होता ? अरे तुझ्या पृष्ठभागावर या तीन
" सडका यूरोपांतील अगदीं लांब लांबच्या भागांतून येऊन मिळतात त्या
" काय दारू गोळयांच्या गाड्या वाहण्याकरितां केल्या होत्या काय? हीं येथें
" असलेलीं वाग्राम मार्चफील्ड स्टिलफ्रीड वगैरें गावें वसलीं तीं त्यांत दारू-
" गोळा सांठवून हप्सबर्गच्या राजघराण्यांतील पुरुषांनीं दुसऱ्यांचीं डोकीं
" फोडावीं व आपलीं दुसऱ्यांकडून फोडून घ्यावीं एवढ्याकरितां वसलीं
" होतीं काय? मागें आटोकार राजा[३] त्या पलीकडच्या टेंकडीखालीं रोडाल्फच्या[४]
" तरवारीनें मृत होऊन पडला ! परवां येथें जर्मनीचा बादशहा केसरफ्रांझ
" नेपोलियनच्या तरवारीनें बेशुद्ध होऊन पडला आहे ! बाकीचा काळ

---

३ आटोकार-यानें १२५३त बोहिमिया, आस्ट्रिया व स्टिरिया हीं राज्यें एकत्र केलीं १२५४ त प्रशियाचाहि कांहीं भाग जिंकिला; बादशाहीवर हप्सबर्गच्या रोडोल्फची नेमणूक झाली म्हणून तक्रारही केली. परंतु पुढें त्यास बादशाहीचें पाठबळ न मिळाल्यामुळें त्याच्या मदतीस असलेल्या राजांनीं त्यास सोडिलें. तरी १२७७ त पुन्हां त्यानें युद्ध सुरू केलें. परंतु १२७८ त तो मार्च फील्ड येथें लढाइत पडला. त्यानें नवीन शहरें वसविलीं आणि व्यापारास व कारागिरीस चांगलें उत्तेजन दिलें.

४ रोडाल्फ आफ हप्सबर्ग—आस्ट्रियाच्या हल्लींच्या राजवंशाचा मूळपुरुष ( १२१८–१२९१ ) याची १२७३ त जर्मनीचे बादशाहीवर निवडणूक झाली तीस आटोकार आडवा आला तरी त्याचा मोड करून त्यानें आपलें सार्वभौमत्व त्यास कबूल करावयास लाविलें. आटोकारनें पुन्हां युद्ध केलें परंतु त्यांत त्याचे प्राण व राज्यही गेलें.

" राहिला तरी हे समरांगणा ! या पांचशें वर्षांतच तुझा पृष्ठभाग किती
" वेळां छिन्नभिन्न होऊन असंख्य प्रेतांनीं अपवित्र झाला असेल ! हीं हर-
" ळीची उत्कृष्ट जमीन विदारून जिकडे तिकडे माणसांनीं तुडवून टाकिली
" आहे ! हीं फळझाडें, कुंपणें, शेतांतील घरें, ज्यांच्या मशागतींत
" माणसें जिवापाड खपत होतीं तीं आतां दारूनें अस्ताव्यस्त झालीं आहेत,
" ही दयाळू भूमाता मनुष्याच्या पोषणार्थ धान्य पुरविते ती आज उदास व
" भयाण होऊन तिजवर जिकडे तिकडे माणसांच्या डोक्याच्या नरोट्या मात्र
" पसरलेल्या आहेत. तथापि सृष्टीचें काम चालूच आहे आणि या दारूनें घात
" करणाऱ्या पिशाच्यपुत्रांचें सुद्धां तिजवर कांहीं चालत नाहीं. हें
" सर्व रक्त व मांस लौकरच पृथ्वी आपल्या पोटांत घेऊन त्याचें खत
" करील व त्याच्या योगानें ही जमीन पुढचे वर्षीं अबादच आबाद होऊन
" जाईल. शर्थ आहे या सृष्टीच्या काटकसरीची ! आम्ही उधळेपणानें
" जें फेंकून देतों तेंच ती मोठ्या काळजीनें घेऊन त्याचा कांहीं तरी
" उपयोग करिते. प्राणघातकी मनुष्याच्या प्रेतापासूनच ती मागें राहिले-
" ल्यांना प्राणधारणास अन्न उत्पन्न करिते !

" असो. दरबारी भाषा क्षणभर एकीकडे ठेवून लढाईचा नक्की इंगितार्थ
" व मथितार्थ काय आहे तें पाहूं. उदाहरणार्थ समजा कीं, ब्रिटनमध्यें
" एका कष्टपुरी गांवांत पांचशें लोकांची वस्ती आहे. त्यांतून फ्रान्सच्या
" मोहिमे करितां फ्रेंच लोकांच्या नैसर्गिक शत्रूंनीं तीस धट्टेकट्टे लोक
" निवडून काढिले. या सर्व तीस लोकांना त्या गांवानें हरएक प्रकारची
" अडचण व घस सोसून लहानाचें मोठें केलें. आणि बरीच यातायात व
" कष्ट करून त्यांना माणूसपणांत आणून कांहीं धंदेही शिकविले. आज
" त्यांपैकीं कांहीं लोक कापड विणतात, कांहीं घरें बांधितात, कांहीं लोहार
" काम करितात व ज्याला कांहींच सुधरत नाहीं तो वजनी तीन मणांचा
" बोजा वाहून हमाली तरी करितो. तथापि घरच्या माणसांची पुष्कळ रडा-
" रड शिव्याश्राप वगैरे होऊन होय नाहीं करितां करितां अखेरीस त्यांना नि-
" वडून नेतात, तांबडा पोषाख देऊन सजवितात व सार्वजनिक खर्चानें
" हजार कोसांवर, किंवा समजा नुसत्या स्पेन देशापर्यंतच नेऊ-
" न गरज लागे तोंपर्यंत तेथें त्यांस खाऊं पिऊं घालून ठेवितात. इकडे इंग्रज
" लोकांचे नैसर्गिक शत्रु फ्रान्समधल्या एका कष्टपुरीमधून तसेच तीस कारा-

"गीर लोक निवडून तशाच रीतीनें तेथें पाठवितात. अखेरीस बराच प्रयत्न
"केल्यावर या दोन्ही टोळ्या जवळ जवळ येतात व इकडचे तीस लोक
"तिकडच्या तिसांचे सामन्यास उभे रहातात. मग "बत्ती द्या" असा हुकूम मिळा-
"ल्याबरोबर दोहींकडचे लोक आपआपल्या बंदुकांनीं सामन्याचे लोकांचीं
"डोकीं फोडतात व मग त्या दोन गांवांत मिळून जे साठ लोक अनेक उप-
"युक्त धंदे करून रहात होते त्यांचे ऐवजीं साठ प्रेतें मात्र राहून त्यांना
"पुरण्याची व त्यांचेकरितां रडण्याची यातायात पडून अखेरीस तींही
"नाहींशीं होतात. या साठ लोकांचें आपसांत भांडण, वैर, कांहीं तरी होतें कां ?
"कलीचा प्रभाव कितीही असला तरी त्यांचें कवडी इतकेंही भांडण नव्हतें !
"एकमेकांपासून ते बिचारे हजारों कोस लांब रहात असत. फार तर काय त्यांची
"यत्किंचित् तोंडओळखही नव्हती ! मग हें असें झालें कसें ? अरे बाबा, हें
"काय विचारतोस? त्यांचे राजे भांडले व मग आपलें अंग राखून या गरीब
"लोकांस तोंडाशीं देण्याची त्यांचे अंगीं धूर्तता होती म्हणून !!! हाय हाय !
"हीच गोष्ट आजपर्यंत या देशांत व चोहोंकडे चालली आहे. 'राजांनीं हवे
"ते खेळ खेळावे आणि प्रायश्चित्त मात्र लोकांनीं घ्यावें' ही उक्ति होरेसच्या
"पुरातन ग्रंथांत आहे आणि हेंच तत्त्व अद्यापही अमलांत आहे. आतां,
"स्मोलेटच्या[५] कादंबरींत पुढें कधीं तरी लढाई अजीबात बंद होण्याचें भाकीत
"असल्यासारखें दिसतें. मग कोणाचें वैर लागलें कीं दोघांनींही आपआपल्या
"चिलमींत ( राजकारणपटुत्वाचें ) गंधक भरून त्याचा धूर एकमेकांच्या
"आंगावर सोडून कोण हरतो तें पहावें. पण तें शांततेचें युग या भाकिताप्र-
"माणें येईपर्यंत रक्ताचे पाट पहात पहात आपणांस कितीशें वर्षें काढावीं
"लागतील कोण जाणे !"

याप्रमाणें सांप्रत आपले प्रोफेसर साहेब शुद्धीवर असतील त्या वेळीं आ-पलें दुःख विसरून जाऊन या विविध रंगांनीं भरलेल्या जगाकडे नजर पोहोंचवून त्यांत काय चाललें आहे तें कुशाग्रदृष्टीनें पाहून टिपून ठेवितात. व येथें एवढी एक गोष्ट सांगितली पाहिजे, कीं अध्यात्मिक उन्नतीचे संबंधानें हे दिवस त्यांना फार सोईचे होते; मग दुसरा कांहीं लाभ त्यांस झाला असो नसो. या वेळेस त्यांच्या अंतर्यामीं अनुभविक शिक्षणक्रम चालला अ-

---

५ स्मोलेट—एक नामांकित स्काटलंडांतील कादंबरीकार ( १७२१—१७७१ )

सून त्यास प्रत्यक्ष उदाहरणें त्यांच्या या वारींत हवीं तितकीं सापडत होतीं. नेहमीं स्थलांतर झाल्यामुळेंही त्यांच्या विचारसरणीस अडचण न होतां उलट दुजोराच झाला असेल. ही गोष्ट त्यांच्या मनासंबंधाची झाली. आतां बाह्य-परिस्थितीसंबंधानें पाहतां त्यांच्या आतुर झालेल्या अंतःकरणास रमविणारी जी एक वस्तु ती जरी त्यांच्या या प्रवासांत त्यांस भेटली नाहीं तरी त्यांच्या डोळ्यांचें पारणें फेडण्याजोगीं दुसरीं पुष्कळ स्थळें त्यांच्या पाहण्यांत येत असत. अजून त्यांच्या अंतरंगांत पुंडावा करणाऱ्या पिशाच्यांचें बंड जरी पूर्णपणें मोडलें नसलें तरी त्यांच्या या निरंतरच्या प्रवासामुळें या सर्व भूगोलाचें, त्यावरील लोकांचें व त्यांच्या कृत्यांचें, किंबहुना सर्व बाह्य ज्ञेय-वस्तूंचें त्यांस पुष्कळच ज्ञान झालें असेल.

ते म्हणतात, "पृथ्वीवरील बहुतेक पुस्तकालयांतील ग्रंथ मीं वाचले. कान-
"स्टॅन्टिनोपल व समरकंद येथील लायब्ऱ्याही सुटल्या नाहींत. पृथ्वीवरील
"बहुतेक कालेजांत मी शिकलों किंवा तेथें शिक्षणाची सोय नसल्याबद्दल
"अनुभव तरी घेतला. चिनांतील सरदारांच्या पाठशाळा मात्र राहिल्या. बहु-
"तेक परभाषा त्या भाषा बोलणाऱ्यांशीं झालेल्या दळणवळणामुळेंच मला
"आल्या. बहुतेक गोष्टींची मोजदाद, भूगोलाची सामान्य शास्त्रिय माहिती
"मला "चक्षुरिंद्रियानेंच आपोआप झाली. त्याचप्रमाणें मनुष्याची व्यवस्था व
"तो आपली अन्नवस्त्राची व रक्षणाची तरतूद कशी करितो याविषयीं बहु-
"तेक ठिकाणची माहिती मला प्रत्यक्ष अनुभवानें झाली आहे; व हड्रियन[६]
"बादशहाप्रमाणें मींही आपल्या पायांच्या कैवारानें (कंपासानें) हा सर्व
"भूलोक मोजून टाकिला आहे.

"मीं मोठे रमणीय देखावे पाहिले असतील हें आतां निराळें लिहिण्याची
"जरूर नाहीं. व्हॉक्ल्यूजचीं पाइन वृक्षाचीं अरण्यें पाहून मी इतका दंग
"झालों कीं, सबंध तीन दिवस मीं त्याबद्दल विचार करण्यांत व वर्णन लि-
"हिण्यांतच घालविले. तेथील सरोवरांच्या पाण्यांत मीं आपली भाकर भि-
"जवून खाल्ली आहे. ताडमूर येथील उंच ताडवृक्षांखालीं मी बसलों आहें.

---

६ अड्रियन—रोमचा बादशहा. (सन ७६—१३८) हा मोठा गुणी पण तसाच क्रूर असे. याचे कारकीर्दित ख्रिस्ती लोकांचा फार छळ झाला. प्रवास करून ज्ञान संपादन केल्याबद्दल याची फार प्रसिद्धि आहे.

" चीनची जंगी वेस[७] मी पाहिली आहे. ती भुरक्या रंगाच्या विटांची बां-
" धिली असून तिचा दर्शनी भाग मात्र कुरुंदानें गिलावा केल्यासारखा बांधला
" आहे. बांधकामासंबंधानें पाहिलें तर या भिंतीचा फार तर तिसरा नंबर
" मात्र लागेल. त्याचप्रमाणें मोठ्या उलाढालींच्या गोष्टीही मीं पाहिल्या आहेत.
" आपल्या जीवाची शिकस्त करकरून अखेरीस कांहीं राजे बर्लिन मिलन
" रस्त्यावरील जकातकारकुनाचे पद्धतीस आलेले मीं पाहिलें आहे. हा बहु-
" तेक भूगोल सबंध जिंकलेला व हरलेलाही मीं पाहिला आहे. लाख
" लाख फौज एका दिवसांत परस्पर कत्तल करून रणभूमीवर पडलेली मीं
" पाहिली आहे. अनेक राष्ट्रें, देश, व राजकुलें यांची सगट रास होऊन मग
" पुनः त्यांचे निरनिराळे विभाग होऊन त्यांच्यांत प्रेमभाव उत्पन्न व्हावा
" अशाही गोष्टी माझ्या पाहण्यांत आल्या आहेत. प्रजासत्ताक राज्यांचा
" उदय होतांना समाजदेवीस झालेल्या प्रसूतिवेदना तर थेट स्वर्गापर्यंत ऐकूं
" गेल्या असतील, मग त्या मला कळल्या यांत नवल कार्य ?[८]

" थोर पुरुषांविषयीं माझे मनांत पहिल्यापासूनच पूज्यबुद्धि होती; व
" सांप्रत काळच्या थोर पुरुषांपैकीं कोणीही माझ्या दृष्टीखालीं यावयाचा
" राहिला असेल असें वाटत नाहीं. थोर पुरुष ह्मणजे ईश्वरी स्वरूपाच्या दिव्य

---

७ चीनची जंगी वेस—चीनच्या उत्तरेस व कांहीं पश्चिमभागास संरक्षणार्थ बांधलेला कोट. याची एकंदर लांबी १२५० मैल आहे! तो पायथ्याशीं तीस फूट रुंद असून उंचीला मैदानावर २५ फूट व डोंगरावर डोंगराच्या चढाच्या मानानें १५–२० फूट आहे. त्यावर ठिकाठिकाणीं बुरूज व किल्ले असून हा कोट मनुष्यानें केलेल्या महत्कृत्यांपैकीं एक ह्मणून प्रख्यात आहे.

८ पूर्वीची राजसत्ता मोडून प्रजासत्ताक राज्यें झाल्याचीं अलीकडील मुख्य दोन उदाहरणें आहेत. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें (१७७४) व फ्रान्स (१७८९). पैकीं फ्रान्स मध्यें वरचेवर चलबिचल होऊन कायम व्यवस्था १८७२ त झाली. फान्सची क्रांती होत असतां ज्या अनन्वित गोष्टी झाल्या त्यांचें वर्णन अशक्य आहे. गांजणुकीमुळें लोकांत राजे, श्रीमानलोक व सरदार यांविषयीं इतका तिटकारा उत्पन्न झाला होता कीं, मनुष्यास मारण्याचा, त्याचा उपमर्द व मानहानी व निर्भर्त्सना करण्याचा जो जो मार्ग सुचला तो तो अमलांत आला! पुरुषांच्या कातड्याचे जोडे व बायकांच्या कातड्याचे हात मोजेही झाले!!!

" विभूतीच असून ईश्वरप्रणीत अव्यक्तमहाग्रंथाचीं बोलतीं चालतीं व्यक्त
"मूलतत्वें होत.या मूलतत्वांच्या परंपरेनें या महा ग्रंथांचे अध्याय होतात व त्या
" अध्यायांसच कांहीं लोक इतिहास असें म्हणतात. अनेक बुद्धिमान लोक
" व असंख्य निर्बुद्ध लोक हे या ईश्वरस्फूर्तीनें चालणाऱ्या आदितत्वांवर टीका-
" रूप बरे वाईट ग्रंथ होत. अथवा आपल्या प्रार्थनामंदिरांतून गाडा
" गाडा मूर्खत्वानें भरलेले सद्धर्मप्रवर्तक किंवा थोथांडप्रवर्तक लेख दर
" आठवड्यास बाहेर पडतात त्यांचीही उपमा या अनुषंगी लोकांस
" वावगी होणार नाहीं. पण मला या टीकाग्रंथांची कांहीं जरूर लागत
" नाहीं. हीं आदितत्वेंच मला पुरेशीं आहेत. याप्रमाणें शिलर व गीटे ( हे
" तत्ववेत्ते ) प्रवास करीत असतां ट्रिसानिट्झ येथें एका झाडाखालीं उत-
" रले होते, तेव्हां खाणावळींतील नोकराच्या वेषानें त्यांच्या खुर्चीमागें
" उभा राहून मी त्यांच्या खिदमतीस नव्हतों काय? तेथें त्यांचें जें संभाषण
" ऐकिलें तें अजून माझ्या कानांत दुमदुमत आहे. कारणः—"

पण असो, मागें जें सावधागिरीचें तत्व अवश्य आहे असें आह्मी म्हणालों होतों, त्याचें आतां अवलंबन केलें पाहिजे. सरस्वतीनें जयमाळा घातलेल्या या पुरुषांचें भाषण देऊन त्यांची अमर्यादा करणें योग्य नाहीं. सांप्रतच्या कालस्थितींत फरक होऊन या इतिहास प्रसिद्ध लोकांच्या गोष्टी प्रसिद्ध करण्याचा पुढें कधीं समय आला तर आह्मी आपल्या वाचकांचें कोड पुरवूं. परंतु आज तसें करणें अयोग्य व विश्वासघाताचें आणि कदाचित राजद्रोही हेरासारखें काम होईल. म्हणून लार्ड बायरन,

---

९ अव्यक्तमहाग्रंथ–सर्व ग्रंथांचा हेतु अदृश्य गोष्टी लिपीच्या द्वारें मनास प्रत्यक्ष करावयाचा असा असतो. अर्थात् ग्रंथ ह्मणजे सृष्टींत अनुभवास येणाऱ्या विशिष्ट गोष्टींच्या समुदायाचा मनोग्राह्य फोटोग्राफ. हे ग्रंथ प्रत्यक्ष गोष्टींच्या मानानें कधींही निर्दोष व पूर्ण नसतात. सृष्टिरूप ग्रंथ तर प्रत्यक्ष गोष्टी जशाच्या तशाच आपणापुढें मांडितो. अर्थात् तो निर्दोष व पूर्ण असल्यामुळें महाग्रंथ हें नांव त्यासच शोभतें. तो अव्यक्त आहे. लोकोत्तर पुरुष हीं त्यांतील व्यक्त मूलतत्वें ह्मणजे ज्यांच्या आधारावर सर्व ग्रंथ व्यक्त होणार तीं होत.

१० शिलर--भाग २ टीप १२

पोपसाहेब पायसे[११], तर्कवांग बादशहा, श्वेतकमल ( चिनांतील एक गुप्त कारस्थानी मंडळी ) वगैरेंच्या गूढ कारस्थानांचा येथें आह्मीं परिस्फोट करणार नाहीं. प्रत्यक्ष नेपोलियन बादशहासंबंधानें सुद्धां आह्मीं आज इतकेंच सांगतों कीं, त्यांचा व टय़ूफेल्सड्राक साहेबांचा संबंध अनेक प्रकारें घडला असून त्यांत त्यांची संभावनाही तशीच अनेक प्रकारची झाली आहे. प्रथम आपल्या बिचाऱ्या प्रोफेसर साहेबांना हेर असें समजून तोफेच्या तोंडीं देण्याचा हुकूम झाला होता. पण मग त्यांना अंतस्थ सल्लामसलतींत घेतलें, व त्यांचे कान वगैरे उपटून सुद्धां पैशाचे संबंधानें कांहींच संभावना न करितां अखेरीस हा केवळ शाब्दिक तत्वविवेचक पुरुष आहे, असें समजून त्याचा अपमान करून त्यास हांकूनही लाविलें; थोडक्यांत चुकलें नाहीं तर त्यास खिडकींतूनच बाहेर फेंकून देत होते ! पण प्रोफेसर साहेब म्हणतात. "तो (नेपोलियन) स्वतःच तसा कल्पनामय तत्वविवेचक " पुरुष होता. कारण त्याचें चारित्र, वागणूक, लढाया वगैरे सर्व कल्पनां-" वरच चाललें होतें. हा पुरुष सामान्य नसून केवळ अवतारी होता. पण " आपण असे आहों हें त्याला कांहींच ठाऊक नव्हतें. ' चालवील त्याचें " हत्यार ' हें तत्व त्यानें तोफेच्या तोंडानें लोकांस व्यक्त करून सांगितलें. " राज्यकारभारांतलें अस्सल तत्व हेंच असून त्यानेंच आपला परिणाम " लागून आपणांस खरें स्वातंत्र्य मिळेल, हें तत्व त्यानें अगदीं वेडगळ " रीतीनें प्रतिपादिलें खरें; परंतु धर्मवेड्या आतुर लोकांची व आरंभीं धर्म-" प्रसारकांची बहुधा अशीच स्थिती असते. त्यांचें बोलणें नीटसें कळत " नाहीं. आणि त्यांत उगीच फालतु पांडित्यही बरेंच असतें. परंतु नेपो-" लियन बादशहानें जें तत्व लोकांस शिकविलें तें कदाचित याहून चांग-" ल्या रीतीनें शिकवितांही आलें नसतें. अमेरिकेंत प्रथम वसाहत करितांना " तेथील जंगल तोडून त्यांतील असंख्य लांडगे नाहींसे करण्याकरितां मजूर " लोक लाविले होते. त्यांनीं दारू चोरी व इतर प्रकारचा मनःपूत पुंडावा

---

११ पोपपायस सातवा पायस ( १८००—१८२३ ) यास नेपोलियननें फार छळलें. नेपोलियनच्या मृत्यूनंतर पायसनें आपल्या राज्यांतील पोलिस सुधारलें व धर्मसंबंधी आचरणाबद्दल देहान्तशासन बंद केलें, कँम्पेगनातील पुंडावा मोडला, व कित्येक त्रासदायक चाली बंद केल्या.

" केला. पण त्यांच्या परिश्रमामुळेंच मागून ती जमीन लागवडीस येऊन
" तींतून धान्य मिळाल्यामुळें असंख्य लोक ईश्वरास दुवा देऊं लागले.
" तशीच गोष्ट नेपोलियनची आहे हें लक्षांत आणून आपण त्याच्या स्वैर
" वर्तनाकडे किंचित कानाडोळा केला पाहिजे."

पुढें टच्यूफेलसड्राक साहेबांचा उदय उत्तर ध्रुवाकडील प्रदेशांत झाला असल्याबद्दल खात्रीलायक आधार सांपडतो. ते तेथें कोणच्या कोणच्या मार्गांनीं गेले याचा कांहीं पत्ता लागत नाहीं. ते तेथें असतांना एक फिक्या निळ्या रंगाचा स्पॅनिश फयाशनचा झगा त्यांचे अंगांत होता. त्यावरून त्याच्या अगोदर कधीं तरी ते स्पेनमध्यें होते एवढें मात्र अनुमान होतें. ते म्हणतात—" हा झगा खूप ऐसपैस असून वरून पाघरण्यास एवढेंच वस्त्र मजपाशीं होतें." अशा थाटांत एकदा मध्यरात्रीं भूगोलाच्या उत्तरार्धाचे या टोंकावर उभें राहून पुढें पसरलेला अपार समुद्र ते तटस्थ वृत्तीनें पहात होते. या वेळेस ते जरी अगदीं स्तब्ध असले तरी आम्हास वाटतें कीं, किंचित शब्द होतांच सिंहनाद उत्पन्न होणाऱ्या एखाद्या देवालयाच्या घुमटाप्रमाणेंच ते दिसत असतील.

" ते लिहितात " अहाहा! किती ती शांतता! कारण या ध्रुवाच्या
" प्रदेशांत सुद्धां मध्यरात्रीचें नेहमींचें शांत स्वरूप आपल्यास भास-
" ल्यावांचून रहात नाहीं. येथें फक्त या टेंकड्यांवरच काय तें कोंवळें व
" लाल सकुमार उन्ह पडलें आहे[12] आणि हा ध्रुव प्रदेश असल्यामुळें समु-
" द्राचा शांत व गंभीर ध्वनींहि अगदीं सावकाश होत आहे. हा सूर्यना-

१२ ध्रुव प्रदेशांत आपल्या इकडच्या प्रमाणं निबिड अंधाराच्या रात्रीं किंवा अतिकडक उन्ह कधींच नसतें. तेथें सहा महिनें रात्र असते पण ती आडनांवाचीच रात्र असते. त्या वेळीं सूर्य फार तर २२$\frac{1}{2}$ अंश क्षितिजाखालीं असतो आणि आजूबाजूच्या बर्फामुळें प्रकाशाचें इतकें परावर्तन होतें कीं आपल्याकडे सूर्योदयास्ताच्या जवळच्या घटकेंत जितका उजेड असतो तो तेथील अतिकाळोख होय. त्याचप्रमाणें सहा महिनें सूर्य क्षितिजावर असूनही त्याचीं किरणें ढाळतीं येत असल्यामुळें ऊन्ह अत्यंत कोमळ असतें. या सहा महिन्यांच्या दिवसांत सूर्य हा जशी घार आकाशांत घिरटया घालिते तसा क्षितिजाशीं कमीजास्त समांतर प्रदक्षिणा घालीत असतो. चोवीस तासांत एक प्रदक्षिणा होते. तेव्हां अमुक दिशेस सूर्य आला ह्मणजे चोवीस तासाच्या प्रदक्षणेचा अमका भाग झाला हेंच वेळेचें माप असतें. येथें ग्रंथांत सांगितलेली मध्यरात्र ह्मणजे चोवीस तासांहून कमी दिवस असणाऱ्या ठिकाणची रात्रीच्या बारा वाजण्याची वेळ.

" रायणाचा मेघरथ तांबड्या व सोनेरी रंगांनीं विभूषित केला आहे. हीं
" सूर्याचीं किरणें महासागराचे आरशावर अग्नीच्या खांबांसारखीं दिसत
" आहेत. त्यांचा हा प्रकाश थेट माझ्यापर्यंत येऊन येथें जणूं काय एकदम
" गुप्त होतो. अशा समयास एकांतवासही अप्रतिम सुखास कारण होतो.
" कारण या वेळेस माझ्या मागच्या अंगास यूरोप व आफ्रिका गाढ झोंपेंत
" असून पाहारेवाल्या लोकांवांचून त्यांत कोणीही जागें नाहीं. इकडे माझ्या-
" पुढें त्या अनंत परमात्म्याचा शांत व विस्तीर्ण आकाशरूपी राजवाडा
" असून त्याचे दारावर ही सूर्याची दिव्य मशाळ तेवत आहे. अशा वेळेस
" मला कोण त्रास देणार आहे !

" असे विचार माझ्या मनांत येतात तोंच या शांत समयासही एक
" धिप्पाड मनुष्य, किंवा त्यास राक्षस म्हणावें हेंच बरें, असा त्या खड-
" काच्या खडप्यांला धरीत धरीत माझ्याकडे आला. त्याच्या सर्वांगावर
" केंस होते; व तो रशियांतील अस्वलाएवढा आकारानें होता. त्यानें येतांच
" रशियन भाषेंत कांहीं मला म्हटलें. त्यावरून तो बहुधा चोरून माल
" नेणाआणणारा असावा असें मला वाटलें. मीं थोडक्यांत आदबीनें उत्तर
" दिलें, कीं, 'लबाडीच्या व्यापाराशीं मला कांहींच कर्तव्य नसून माझ्या
" हातून कोणास इजाही होणार नाहीं. मी एक गुप्तसंचारी मनुष्य आहें.'
" इतकें मीं सांगितलें, तरी त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तो
" राक्षस आपल्या मोठ्या शरीराच्या घमेंडींत, मजपासून कांहीं फायदा
" करून घ्यावा किंवा निदान मला कांहीं त्रास करून थोडी मौज तरी
" करावी, मग तेवढ्याकरितां एखादा खून झाला तरी हरकत नाहीं; अशा
" विचारानें तो तसाच पुढें येऊन माझ्या समोर इतका जवळ आला कीं,
" त्याच्या तोंडाची घाण येऊन मला शिसारी आली. आह्मीं दोघेही एका
" उंच कड्याच्या अगदीं टोंकाशीं असून खालीं खोल महासागर मंजूळ
" शब्द करीत हेलावत होता. त्या राक्षसास त्या अप्रतिम देखाव्याचें कांहींच
" वाटलें नाहीं. मग माझ्या वाक्पांडित्य त्याच्यावर काय चालणार? त्या
" मूर्खावर माझें सर्व वाक्पांडित्याचें फुकट गेलें. मग काय प्रसंग येतो कोण
" जाणे, असा विचार येऊन मी एक पाय हळूच उचलून चटादिशीं वळलों
" कीं, न जाणो याच्याशीं झटापट झाली तर आपण खालीं तरी पडूं नये;
" आणि आंतल्या खिशांतून एक मोठें पिस्तुल बाहेर काढून त्यास रशियन

" भाषेंत म्हटलें, ' मित्रा, कृपा करून येथून चालता हो. येथें एक क्षणभ-
" रही राहूं नको, नाहीं तर प्राणास मुकशील. ' हें वाक्पांडित्य या ध्रुवा-
" कडील माणसासही कळलें व माझी क्षमा मागत व आर्जवें करीत लाग-
" लाच तो मागें फिरला व मग जिवावर उदार होऊन प्राणघात किंवा
" आत्मघात करण्याचा विचार केल्याशिवाय पुनः तो तेथें येईल अशी
" भीति राहिली नाहीं.

" बंदुकीच्या दारूचा मूळ उपयोग हाच असावा असें वाटतें. तिच्या
" योगानें सर्वांसच सारखा धिप्पाडपणा येतो. इतकेंच नव्हे, तर जर तुह्मी
" मजपेक्षां जास्त शांत स्वभावाचे व कल्पक असलां, जर तुमचें शरीर
" माझेपेक्षां मोठें नसूनही तुमचें मन मजपेक्षां सतेज असलें, तर तुह्मीच
" मजपेक्षां धिप्पाड ठरून मला प्रथम मारून टाकाल. या दारूच्या युक्तीनें
" मोठे प्रबळ क्रूर व भयंकर प्राणीही दुर्बळ होऊन मनुष्यास अचाट शक्ति
" आली आहे व नुसता अंगजोर ह्मणजे कांहींच नाहीं असें होऊन बुद्धि-
" बळाचे द्वारानें आत्म शक्तीच सर्वसत्ताधारी झाली आहे.

" द्वंद्वयुद्धासंबंधानें माझी कांहीं विशेष प्रकारची समजूत आहे. हें सर्व
" जगच अत्यंत विलक्षण चमत्कारांनीं भरलें आहे; परंतु त्या सर्वांत सांप्रत-
" च्या द्वंद्वयुद्धाइतकी चमत्कारिक गोष्ट मला दुसरी दिसत नाहीं. या अफाट
" सृष्टींत दोन मनुष्याकृती मशकें बहुतेक निराधारपणें घिरट्या घालीत
" असून आपल्या अंतसमयाची वाट पहात आहेत व कितीही खटाटोप
" केला तरी हीं मनुष्यरूप घुंघुरटीं या जगांतून फारच लौकर नाहींशीं
" होणार ! इतके असन्नमरण प्राणी एकमेकांपासून आठ दहा हातांवर उभे
" रहातात काय ! आणि एक गिरकी मारून मोठ्या कुशलतेनें केलेल्या
" बंदुकीच्या साह्यानें एकमेकांस गोळ्या मारून नष्ट होतात काय ! ! !
" अहो, या संतापशील मनुष्याची गणना वास्तविक पाहिलें तर कोणच्या
" कोटींत होईल ? मला तर ह्यूगोट्टींबर्ग[१३]प्रमाणेंच असें वाटतें कीं, " त्या
" निर्विकार ईश्वरास हास्यविकार होत असेल तर, त्यास या मानवी मुरकु-
" टांचे खेळ पाहून खरोखरच अनिवार हसें येईल ! "

असो. या विशेष गोष्टींच्या नादांत आपणांस आपल्या मुख्य कामाचा
विसर पडतां कामा नये. या यात्रेंत ट्यूफेल्सड्राक साहेबांच्या अंतरा-

१३ ह्यूगोट्टींबर्ग—एक जर्मन ग्रंथकार.

त्याची स्थिती कशी होती, या मुख्य मुद्याचा आपण शोध करीत आहों. सैतानाचे हस्तक अजून त्यांच्या अंगांत संचार करीत आहेत, कां त्यांस कायम मुक्ती मिळाली हा प्रश्न आहे. त्यास, एकंदर गोष्टींवरून पाहतां त्यांच्या बाधेस उतार लागला आहे असें स्पष्ट दिसतें. अनुभव हा मनाचा उत्कृष्ट धन्वंतरी असून त्याच्या हाताखालीं ट्यूफेलसड्रॉक साहेब बरेच दिवस अनेक कडू औषधांचा सारखा प्रयोग करून घेत आहेत. मनाचेही पुष्कळ रोग असाध्य असतात; तशांतलाच आमच्या मित्राचा रोग असला तर सांगवत नाहीं, परंतु आम्हास तर त्यांचा रोग असाध्य आहे असें वाटत नसून ते आतां लौकरच बरे होतील अशी खात्री वाटत आहे. आमच्या मतें सैतानाचे हस्तक आतां बहुतेक गतसत्व झाले असून त्यांस अखेर मुक्ती मिळण्याचीच बाकी आहे; आणि आतां आपल्या मित्राचे मनास जरी खरा आनंद होत नसला तरी तात्पुरती स्वस्थता होती.

असो; आपले आत्मचरित्रकार लिहितात, " अखेरीस, जसा " एखादा पदार्थ तापून तापून त्याचें पीठ होतें, तशीच या त्रिविध तापांत " इतके दिवस होरपळल्यामुळें माझी अवस्था झाली. आतां हेतु एवढाच " आहे कीं, जसे हे तापून पीठ झालेले पदार्थ कांहींच उपयोगाचे रहात " नाहींत तसें मात्र माझें न होवो. काय होणार असेल तें असो; परंतु एवढें " खरें कीं, मला बहुतेक गोष्टींचा चांगलाच परिचय झाला व तोही स्वतः- " च्या अनुभवानें झाला; आणि माझे जीवास थोडीशी शांतिही आली. " माझें दुःख नाहींसें झालें अगर वाईट गोष्टींचा वाईटपणा नाहींसा झाला " असें नाहीं, परंतु पूर्वीं दुःखांत असतां त्यांत मी इतका चूर होत असें " कीं, मला दुसऱ्या गोष्टींकडे लक्ष देण्यास सवडच होत नसे; तसें आतां " राहिलें नाहीं. आतां दुःखांत असतांनाही इतर गोष्टींकडे लक्ष पुरवावें " इतकी माझी भीड चेंपली होती म्हणून दुःखांस तुच्छवत् मानितां येऊं " लागलें. अहो, या मर्त्यलोकचे वस्तींत असा कोणीही जीवमृग मला आढ- " ळला नाहीं कीं, तो मृगजळाच्या पाठीस लागला नाहीं किंवा बुजगाव- ' ण्यांनीं भीत नाहीं. खरी स्थिती ही अशी असून त्याचा वर डौल पाहिला ह्मणजे " खरोखरच विस्मय होतो. मी आपल्याशींच म्हणे, ' तुझ्या आशांचा सर्व- " थैव भंग झाला खरा, पण जरी त्या सफळ झाल्या असत्या तरी काय " झालें असतें. शिकंदर शहानें एक भूगोल जिंकल्यावर दुसरा नाहीं म्हणून

“ त्यास रडूं आलें नाहीं काय ? आणि सर्व ग्रहमाला व तिच्यामागून सर्व
“ विश्व जरी त्याच्या हातीं आलें असतें तरी काय झालें असतें ? या
“ ताऱ्यांकडे पाहिलें ह्मणजे वाटतें कीं, ते या निष्कलंक अवकाशांतून करु-
“ णार्द्र दृष्टीनेंच आम्हांकडे पहात असतील. ते म्हणत असतील कीं, काय
“ हा क्षुद्रप्राणी ! आणि खरोखरच, काय हें मनुष्याचें क्षुद्र
“ भाग्य ! आजपर्यंत हजारों पिढ्या हल्लींच्या इतका गोंगाट करकरून
“ अखेरीस काळाच्या सपाट्यांत चूर होऊन गेल्या; त्यांचा आज पाहूं
“ म्हटलें तर यत्किंचित अवशेषही राहिला नाहीं. तोच हा भरत पहा, हा
“ स्वातीचा तारा हा लुब्धक, हे ध्रुवाचे तारे; ते आज किती लाख वर्षें आपआपला
“ मार्ग क्रमीत अजून जशाचे तसे स्पष्ट व ऐन बहारांत आहेत. त्यांचे
“ मानानें ही पृथ्वी ह्मणजे निवळ उंदरांच्या सांपळ्याप्रमाणें असून तींतही
“ तूं कोठें सांदींत पडला आहेस त्याचा कोणास पत्ता नाहीं. तूं आहेस
“ पण खरोखरच असून नाहीं सारखा. तूं कांहींच नव्हेस ! तर मग जो
“ कोणी आहे किंवा जें काय आहे, तें तरी कोणचें ? तुझ्या स्वतः संबंधानें
“ पाहिलें, तर या मानवी कुटुंबास तुझा कांहींच उपयोग नाहीं. जसा एखा-
“ दा अवयव कापून एकीकडे ठेवावा तशीच तुझी स्थिति आहे. असो तर.
“ कदाचित हीच स्थिति सर्वोत्तम असेल !”

हाय हाय ! ट्यूफेलसड्राक साहेब सुद्धां किती चूर होऊन गेले आहेत !! तथापि त्यांचीं बंधनें अगदीं शिथिल होत असून लौकरच केव्हां तरी ते आपलें दुःखाचें ओझें झुगारून देऊन पुनः स्वतंत्र होऊन दिव्य ज्ञानतेजानें खचितच मंडित होतील. असो.

आमचे प्रोफेसर साहेब ह्मणतात, “ याप्रमाणें मी वैराग्याच्या ऐन
“ नाक्यावर येऊन पोहोंचलों. व कोणासही झालें तरी नास्तिकपणांतून
“ आस्तिक्यभावांत यावयाचें झालें ह्मणजे या वैराग्याचें नाक्यावरून
“ गेलेंच पाहिजे.”

---

# भाग नववा.

## समाधान.

ख्रिस्त तपश्चर्येंत असतां सैतानानें त्यास अनेक प्रकारचे मोह पाडिले[1] त्यास उपलक्षून प्रोफेसर साहेब म्हणतात " सत्वपरीक्षण हें फक्त ख्रिस्ताचे " वांट्यासच नसून आपणां सर्वांसच ही सत्वपरीक्षा लागू आहे. अशा " अग्निसंपर्कानें गाळून काढल्यावांचून हें मनुष्य स्वभावांतील हीण दूर " होणार नाहीं. संसार हा केवळ मोहवशतेचा बाजार असून या जीविताचा " इत्यर्थ तर मोहास झुगारून देऊन विवेकशीलतेनें चालण्यांतच आहे. या-" प्रमाणें आपणांत दोन विरोधी धर्मांचा लढा उत्पन्न होतो[2]; व मुळारंभीं " तर ही लढाई अत्यंत कठीण होते. कारण सत्कृत्य करण्याविषयीं ईश्व-" राची आज्ञा आपल्या अंतःकरणांत दैवीप्रवृत्ति रूपानें एकसारखी जागृत " असून तिचा अर्थ काय तें कळेपर्यंत व कळल्यावर ती अमलांत येईपर्यंत " आपणास चैन कसें तें पडूं देत नाहीं. ही एक गोष्ट झाली. इकडे " आपल्या जड प्रकृतीची तर अशी प्रवृत्ति आहे कीं खाऊनपिऊन चैन " करावी व इंद्रियार्थांचा यथेच्छ उपभोग घ्यावा. ही आसुरी प्रवृत्ति आ-" पल्या रक्तांत भिनून मोहद्वारानें एकसारखी टोंचीत असते. अर्थात या " दोहों प्रवृत्तींपैकीं श्रेष्ठ प्रवृत्तीची सरशी होऊन दुसरीचा सर्वथैव मोड होई-" पर्यंत हा लढा एकसारखा चालणारच.

" याप्रमाणें मनुष्यांत ही ईश्वराची आज्ञा प्रकट होऊन शारीरप्रवृत्तींशीं " तिचा लढा पडला म्हणजे मग या आसुरीप्रवृत्तीचा मोड होऊन किंवा " दैवीप्रवृत्तीचा तरी पाडाव होऊन भांडण मिटल्यावांचून तर गत्यंतर " नसतें. असें झालें म्हणजे भेसूर अरण्यांत जाऊन मोहाशीं टक्कर देऊन तो " हार येऊन पळून जाईपर्यंत विवेकानें त्यास तोंड द्यावें हें अगदीं साह-" जिक आहे. या लढाईस आपण पाहिजे तें जरी नांव दिलें तरी ती प्रत्येक " मनुष्यास करावी लागते. या लढाईत विवेकाचे सामन्यास लढण्यास प्रत्यक्ष

---

१ बुद्धाविषयीं व राम, पांडव, नल, हरिश्चंद्र वगैरे महात्म्याविषयींही अशाच कथा आहेत.

२ दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता—

भगवद्गीता

" सैतान असो अगर नसो; तें मैदान प्रत्यक्ष कड्या खडप्यांचें अथवा
" वाळूचें असो किंवा मनुष्यांनीं गजबजलेल्या शहरांतील अप्पलपोटे-
" पणाचें आणि नीचतेचें असो. कोठेंही झालें तरी हा मोह सामन्यास
" येणारच. विवेकाची जागृती होऊन त्याच्या विरुद्ध असलेला
" मोह जर आपणांस न दिसेल तर आपल्या हतभाग्यतेस सीमाच
" नाहीं. बरें, जरी आपण अर्धवट राहिलों व या ईश्वराज्ञेची विलक्षण दि-
" व्यलिपी आपणांस दिव्य तेजानें ढळढळीत न दिसतां सामान्य प्रकाशांत
" संशयितपणें दिसली किंवा ऐहिक दुःखरूपी ओलाव्यानें व मोहाचे का-
" ळोखानें अगदीं पुसट व अंधुक झाली तरीही आपण हतभाग्यच. या अ-
" श्रद्धेच्या दिवसांत हें सर्व जगच आपलें समरांगण होय; व दुःखाचीं आणि
" उपासमरीचीं भयाण युगासारखीं वर्षें हा या लढाईचा काळ होय. तो कि-
" तीही काळ असला तरी त्याचा शेवट खास होणार. या लढाईत माझ्या
" नशीबीं जरी जय यावयाचा नसला तरी सांप्रत ही लढाई चालली आहे, इ-
" तकी मला शुद्ध असून जोंपर्यंत मी अचेतन झालों नाहीं तोंपर्यंत या लढा-
" ईत तग धरावयाचा, असा पक्केपणाही मजमध्यें आहे. या भारलेल्या व
" निबिड अंधःकारानें भरलेल्या अरण्यांत राक्षसांची वस्ती असून तेथें सतत
" दृष्टी फिरण्यासारखीं त्यांचीं अनन्वित कृत्यें, व कान किटण्यासारख्या
" भयंकर आरोळ्या चालू आहेत. अशा स्थितींत गोंधळून व दमून गेल्यावरही
" किती माझें सुदैव ह्मणावयाचें कीं, ज्या पर्वतास शिखर नाहीं किंवा स्वर्ग
" हेंच ज्याचें शिखर त्या पर्वतावर चढण्याची वाट दिव्य सूर्याच्या प्रकाशानें
" मला स्पष्ट दिसते. ! "

आणखी एके ठिकाणीं हीच गोष्ट निराळ्या अलंकारानें वर्णिली आहे. आमच्या ट्यूफेलसड्राक साहेबांस अलंकारीक भाषा म्हणजे अगदीं जन्म भाषेसारखी झाली आहे. ते म्हणतात. " या पिढींत जे अति थोर पुरुष
" माझे पाहण्यांत आले असतील त्यांच्याच तोडीचें माझेंही जन्मवृत्त नाहीं
" काय ? ज्या प्रमाणें नवीन लागवडीच्या जमिनींत काढिलेलें पहिलें पीक
" असतें, तशीच माझी स्थिती झाली आहे त्यांत जितक्या अमोल्य वन-
" स्पती असतात, तितकेंच रान माजतें, मग हें पीक पाण्याच्या कमतरते-
" मुळें करपून जातें. त्याचप्रमाणें प्रथम माझे तरतरीस पूर येऊन अनेक
" प्रकारची हुरूप उत्पन्न झाली. मग वरचेवर निराशा होत गेल्यानें संशय

" उत्पन्न होऊन, संशयामुळें व्यावहारिक व आध्यात्मिक गोष्टींत अश्रद्धा
" उत्पन्न झाली. ती अश्रद्धा वाढतां वाढतां कायमचा निरीश्वरपणा उत्पन्न
" होऊन ती तरतरी व हुरूप नष्ट झाली. आतां, या क्षेत्रांत जरी दुसरें
" पीक आलें व आतां तेथें कायमची बाग होऊन ज्यांना अवर्षणाची भितीही
" नाहीं अशा मैलागिरीचंदनाच्या शीतळ छायेंत स्वस्थपणें बसावयास
" सांपडलें आहे तरी यांतही माझ्या तोंडीला दुसऱ्यांचीं उदाहरणें व
" मासले आहेतच."

तात्पर्य, ट्यूफेल्सड्राक साहेबांत सुद्धां हा अति अभिनंदनीय फरक झाला. नुसत्या मृगजळाच्या नादीं लागून व छायेच्या आहारीं पडून जी ही जगाची वारी त्यांना करावी लागली ती खरोखरच त्यांनीं ह्मटल्याप्रमाणें केवळ या संसाराटवीतील भुरळ असून तिचे योगानें त्यांस पावित्र्यच आलें! आणि अशा रीतीनें सत्वशुद्धि झाल्यावांचून त्यांचें अवतारकृत्य सुरूही झालें नसतें. व आतां मोठी आनंदाची गोष्ट ही आहे कीं, ही भुरळ नाहींशी होऊन, त्यांचें बोकांडीस बसलेल्या सैतानाचा व त्याचे हस्तकाचा पाडाव झाला. पारिस शहरांतील त्या भिकार गल्लींत गांठून " माझी पूजा कर नाहीं तर मीं तुला शतधा विदीर्ण करीन " असें सैतानानें ह्मटल्यावर त्यांनीं त्याला मोठ्या शौर्यानें " चल हो एकीकडे " असें ह्मणून जें उत्तर दिलें तेव्हांच बहुधा त्यांच्या स्थितींत बदल होण्यास आरंभ झाला असावा. पण आमचे ट्यूफेल्सड्राक साहेब अति विलक्षण पुरूष आहेत. त्यांनीं आपलें हें अद्भुत चरित्र सामान्य भाषेंत सांगितलें असतें तर किती चांगलें झालें असतें ! पण या पुडक्यांतून असा पूर्वापार संबंध जुळवून त्यांचा इतिहास छानून निराळा काढूं म्हणणें व्यर्थ होय. जिकडे पहावें तिकडे अलंकारिक, संदिग्ध व कल्पनाप्रचुर भाषेवांचून कांहींच सांपडावयाचें नाहीं. जशी एखाद्या पदार्थाची पाण्यांत पडलेली छाया मनास वाटेल तशी हलत असल्यामुळें त्या पदार्थाचे आकृतीविषयीं आपल्या मनांत अनेक कल्पना उत्पन्न करिते, तशांतलेच हे चरित्रपटलेख होत. त्यांपासून न्यायशास्त्राचे सिद्धांतास अनुसरून त्यांच्या अस्सल चरित्राचें हुबेहूब इतिहासरूपी चित्र तयार करणें अशक्य आहे. प्रोफेसर साहेब एके ठिकाणीं म्हणतात, " मनुष्याच्या अंतरंगांतील पवित्रतम जागेंत असणाऱ्या
" वस्तूचें दर्शन या बाह्य दृष्टीस चित्ररूपानें कसें होईल? जो वाणीचा

“ विषयच नाहीं त्यास या अपवित्र काळांतील शब्दांनीं कसें वर्णावें ? ” हें त्यांचें ह्मणणें खरें आहे. पण यावर आह्मी त्यांस असा उलट प्रश्न विचारतों कीं, हा काळ जरी अपवित्र असला तरी त्यांतील लोकांस कांहीं गोष्टी गुप्त ठेवून व कांहीं भलत्याच सांगून सर्वच चरित्राचा घोंटाळा करून विनाकारण बुचकळ्यांत कां पाडावें ? आमचे प्रोफेसर साहेब फार खोल मनाचे आहेत इतकेंच नव्हे, तर ते अत्यंत तऱ्हेवाईकही आहेत; व या वेळेस तर डोळ्यांस भुरळ पडेल इतक्या विलक्षण रीतीनें त्यांनीं आपणांस गुरफटून घेतलें आहे. यामुळें आह्मांस तर त्यांच्या स्वरूपाचा बोध होत नाहीं. हे कांहीं उतारे पुढें आह्मीं जशाचे तसेच दिले आहेत त्यांवरून आमच्या वाचकांस कांहीं बोध होत असल्यास पहावें.

ते ह्मणतात “ या वावटळीनें आपली अगदीं पराकाष्ठा करून आतां
“ ती शांत झाली. तिचा भयंकर शब्द माझे अंतरंगांतून आतां नाहींसा
“ झाला असून फार वेळच्या बधिर झालेल्या माझ्या जीवास आतां ऐकूंही
“ येऊं लागलें होतें. व माझेमध्यें बदल होण्याची वेळ संन्निध आली आहे
“ असें जाणून जरा थांबून विचार करावा ह्मणून मी बसलों. त्या वेळेस
“ माझा अभिमान सर्व नाहींसा होऊन व सर्व नाद सोडून देऊन मीं ह्मटलें
“ कीं धिःकार असो या आशारूप मृगजळाला ! आजपासून मी त्याचे मागें
“ लागणार नाहीं व आतां मी त्यास खरेंही मानणार नाहीं. त्याचप्रमाणें हे
“ भीतिदायक बागुलबोवांनों तुह्मीही मिथ्यारूपच असून मला आतां तुम-
“ चीही पर्वा वाटत नाहीं. आतां मला या वाटेचा व जिवाचाच कंटाळा
“ आला आहे. आणि आतां मी येथेंच बसणार. येथें राहून मला मृत्यु
“ आला तरी पुरवला. कारण जगणें व मरणें हीं दोन्ही मला सारखींच आ-
“ हेत; व दोहोंचीही किंमत मला कांहींच वाटत नाहीं. ” पुन्हां ते ह्मणतात
“ याप्रमाणें मी तेथें वैराग्याच्या नाक्यावर पडलों असतां तेथें मला एका-
“ एकीं गाढ झोंप लागली. अर्थात् ही झोंप कोण्यातरी दिव्य शक्तीच्या
“ प्रसादानेच आली असावी. कारण तीमुळें माझे जिवास समाधान झालें व
“ आजपर्यंतच्या स्थितींत जीं भयंकर, दुःखदायक स्वप्नें पडत होतीं तीं
“ सर्व हळू हळू नाहींशीं होऊन मी जागा होऊन पहातों तों पृथ्वी व आकाश
“ या सर्वांचेंच रूपांतर झालेलें दिसलें. केवढें माझें सुदैव कीं, नीतिदृष्टया

" आपल्या उन्नतीची मूळ पाहिरी जो निरहंभाव, तो उत्पन्न होऊन माझ्या
" जीवात्म्याचे डोळे मायापटलापासून मोकळे होऊन त्याचे पाश तुटून पडले."

ही झोंप त्यांस कोठें लागली होती, त्या वेळीं त्या पठारावर त्यांची पताक कोठें पडली होती, याचा अजमास यापुढें दिलेल्या उताऱ्यावरून होणार आहे, त्याचप्रमाणें या झोंपेचा त्यांचे प्रकृतीवर किती हितावह परिणाम झाला हेंही त्यावरून व्यक्त होईल. मात्र या लेखांतील शब्दसारणी या प्रसंगाचे मानानें कांहींशी हस्यास्पद असून कांहीं भागांत तर थोडीशी ग्राम्यपणाची वाटते. तथापि ट्यूफेलसड्राक साहेबाचे प्रकृतींतच विलक्षण द्वैत असून केव्हांही पाहिलें तरी त्यांच्या अंतःकरणाच्या एका चौकांत मारे नाच, रंग, गाणें, बजावणें वगैरेची बहार चालली असते पण इकडे मागल्या चौकांतून आरडा ओरडींचे व शोकाचे अस्पष्ट उमाळे ऐकूं येत असतात ! असो; आह्मी सबंध उताराच खालीं देतों.

" तेथें बसून मनांतल्या मनांत विचार करितांना फारच अल्हाद होई.
" त्या वेळेस त्या डोंगरा समोरच्या पठारावर बसलों असतां मला वाटे कीं,
" जसा कांहीं मी एखाद्या विस्तीर्ण तंबूत बसलों आहें. या तंबूचा आकाश-
" रूपी स्वच्छ निळा टप वरचे आंगास पसरलेला आहे; सभोंवतीं चारी
" दिशांस स्वच्छ निळ्या वातावरणाच्या कनाती आहेत. या कनातींची
" खालची झालर सूर्यकिरणरूपी अनेक रंगांच्या जरीनें सुशोभित केली
" आहे. अशा उत्कृष्ट आश्रयास बसलों असतां मला वाटे कीं, त्या पर्व-
" ताच्या पलीकडील दरींत उत्तमोत्तम वाडे असून त्यांच्या सभोंवतीं फुलांच्या
" बागा आहेत, व सुंदर विहारी पुरुष व स्त्रिया आंत सहल करीत आहेत.
" असें मनात येऊन आनंद वाटे. एखाद वेळ मनांत येई कीं तेथें गवताच्या
" झोंपड्या असून त्यांत बिचाऱ्या पुत्रवत्सल आया स्वयंपाक करीत अस-
" तील आणि त्यांच्या सभोंवतीं त्यांचीं नाजूक व खेळकर मुलें बागडत
" खेळत असतील; असें मनांत आलें ह्मणजे तर फारच आनंद होत असे.
" कल्पनेंतही हे सर्व प्रकार दृष्टीआडचेच असत पण ते अगदीं प्रत्यक्ष पाहि-
" ल्याप्रमाणें डोळ्यांपुढें उभे रहात. सभोंवतालच्या प्रदेशांतील नऊ खेडीं
" तेथून प्रत्यक्ष दिसत व त्या प्रत्यक्ष देखाव्यास कल्पनेचें साह्य झाल्यावर
" मग काय विचारावें. शांत वेळेस हीं गांवें आपआपल्या देवळांतील घंटा-
" रूपी तोंडांनीं व लोळ्यांच्या पितळी जिभांनीं माझ्याशीं जणों काय

" बोलतातच असें वाटे. इतर वेळींही आंतून निघणाऱ्या धुराचे योगानें तीं
" आपलें चैतन्य व्यक्त करीत. एखाद्या घड्याळाप्रमाणें हा धूर मला वेळेचें
" मान व्यक्त करी. कारण हा धूर त्या गांवांतील पतिव्रता स्त्रिया सकाळीं,
" दुपारीं व संध्याकाळीं आपल्या पतीकरितां व मुलांबाळांकरितां जो स्वयंपाक
" करीत त्यामुळें अगदीं टिपणाटिपणानें वरचेवर होत असे. आणि प्रत्येक
" गांवांतील धूर एकदम किंवा आळीपाळीनें वर जाऊन आकाशांत पसरून
" आतां अमुक अमुक प्रकारचें अन्न केलें आहे असे यथाशक्ति सुचवीत
" असे. असो. हा देखावा अगदींच तुच्छ नव्हता. कारण त्यांत तो सर्व
" परगणा, त्यांतील प्रेमरसाचे व दुष्टाव्याचे खेळ, तेथील लोकांचीं भांडणें
" व संतोष, सर्व कांहीं आपल्या डोळ्यापुढें स्पष्ट थोडक्या स्थलांत दिसत
" असून, आड नुसती टोपी धरिली तरी सर्व झांकून जाण्यासारखें होतें.
" इतक्या माझ्या फिरण्यांत जगांतील कारभारांचें बारकाईनें अवलोकन
" करण्यास जर मी शिकलों असतों तर कदाचित येथून त्या खेड्यांकडे
" पाहून जगांतील व्यवहारासंबंधानें सामान्य सिद्धांत काढून त्यावर तर्क
" बांधण्यास ही जागा फार सोईची होती.

" त्याचप्रमाणें येथून दूर भयंकर वादळें होत तींही मला दिसत. एखा-
" द्या शेकहार्नसारख्या टेंकडीभोंवतीं सर्व ढग जमून जिकडे तिकडे काळें
" भिन्न दिसत असे. मग त्या ढगांत कांहीं विलक्षण चलन होऊन एखाद्या
" रागानें वेडावलेल्या ( जादुगारिणीच्या ) डाकीणीच्या केंसांप्रमाणें एकदम
" पावसाच्या सरीवर सरी उतरून पुन्हां सर्व आकाश जिकडे तिकडे निळें
" व निरभ्र होऊन सूर्याच्या किरणांनीं उज्वलित झालेली ती टेंकडी पुन्हां पां-
" ढरी सफेत होई. कारण या ढगांत बर्फ असतें. हे सृष्टिमाते, या जग-
" द्रूपी किंवा वातावरणरूपी तुझ्या कारखान्यांतील रसायणाच्या कढईत
" किती गोंधळ करून सोडितेस ? पण तुला सृष्टि असें तरी मी कां ह्म-
" णावें ? तुलाच परमेश्वर असें कां ह्मणूं नये ? परमेश्वराचें वस्त्र किंवा
" दृश्यरूपच्च तूं नव्हेस काय ! ओ हो हो ! ! ! अरे, हा परमेश्वरच सृष्टि-
" रूपानें प्रत्यक्ष बोलतो आहे वाटतें ! जो चैतन्यरूपानें व प्रेमरूपानें या
" सृष्टींत नांदतो, जो चैतन्यरूपानें व प्रेमरूपानें मजमध्यें नांदतो तो परमेश्वर
" हाच तर !

" याप्रमाणें मजवर तत्वाची पूर्वच्छाया पडूं लागली. वस्तुतः त्यास

" पूर्वच्छाया न ह्मणतां पूर्व प्रकाश किंवा अरुणोदयच ह्मटलें पाहिजे. हा
" तत्वाचा पूर्व प्रकाश मजवर कांहीं अनिर्वाच्य रीतीनें पडूं लागला. नोव्हा-
" झेंब्ला येथें जहाज फुटून दुर्दशा झाल्यावर जसा दिवस उगवावा, किंवा
" एखादें मूल चुकल्यामुळें बावरून रडत असतां व त्याच्या मनांत अनेक
" विकारांचें काहूर उठलें असतां जशी त्यास अकस्मात आई भेटावी,
" किंवा एखाद्या बेफाम व व्यग्र झालेल्या मनुष्याच्या हृदयास दिव्य गा-
" यनाच्या मधुर ध्वनीनें जसें तल्लीन करून टाकावें त्याप्रमाणेंच परमे-
" श्वराची ओळख करून देणारा हा समय मला वाटला. जी सृष्टि पूर्वी
" मला अचेतन व पिशाच्चांचे कोंडवाड्याप्रमाणें वाटत होती तीच आतां
" ईश्वराशीं सरूप व ईश्वरनिर्मित व सचेतन वाटूं लागली.

" आतां माझ्या जातिबांधवांकडे मी अगदीं निराळ्याच दृष्टीनें पाहूं
" लागलों. आतां मला त्यांजविषयीं अपार प्रेम व अपार दया हीं उत्पन्न
" झालीं. अरेरे, गरीब बिचारा भ्रमलेला व आडवाटेस लागलेला प्राणी !
" माझ्याप्रमाणें तुझेंहि सत्वपरीक्षण होऊन तुलाही या काळाचे भयंकर
" कोरडे खावे लागले आहेत. अरे जरी तुझ्या डोक्यावर राज्य-छत्र असलें
" किंवा नुसती भिकाऱ्याची कंथा असली, तरी सुद्धां या संसारमार्गांत
" दमून त्याचें तुला ओझें झालें असेल; व आतां स्मशानांतील समाधीच
" खरें विश्रांतिस्थान असें वाटत असेल. हे माझ्या बांधवा, हे बंधो, तुझे
" अश्रु पुसून तुला माझ्या हृदयपुरांत थारा देण्याचें माझ्या हातीं असतें
" तर किती बरें झालें असतें ! असें मला वाटूं लागलें. या संसारांत चोहों-
" कडे चाललेला गोंगाट अजूनही माझ्या मनाच्या कानांनीं मला ऐकूं येत
" होताच. परंतु आतां त्यानें मला बुजाल्यासारखें किंवा वेडावल्यासारखें न
" होतां उलट माझें अंतःकरण द्रवूं लागलें. ज्याप्रमाणें एखादा मुका प्राणी
" रडत व स्फुंदत असतां त्याचा आक्रोश परमेश्वरास स्पष्ट स्तुतिवतच वा-
" टतो, तद्वतच हा संसारांतील गोंगाट मला वाटूं लागला. ही बिचारी
" धरणी, जी मला पूर्वी दुष्ट सापत्न मातेसारखी वाटत होती तीच आतां
" गरीबीनें गांजल्यामुळें थोडेंच कां होईना पण आपल्याच्यानें होईल ति-
" तकें सुख देणाऱ्या पुत्रवत्सल आईप्रमाणें वाटूं लागली. मनुष्य इतक्या
" वेडगळ आशापाशांत व क्षुद्र कर्मांत फसला असल्यामुळें मला तो जा-
" स्तच प्रिय वाटूं लागला; व त्याचें दुःख व त्याचीं कुकर्में पाहूनच मला

" त्याची दया व कींव येऊं लागून मी त्यास बंधूप्रमाणें समजूं लागलों.
" याप्रमाणें दुःख हेंच खरें तप असून त्यानेंच मनःशुद्धि होते; व ख्रि-
" स्त वगैरे महात्म्यांच्या उन्नतीस हेंच कारण झालें ही गोष्ट त्यावेळीं माझे
" लक्षांत आली. आणि आपणही या दुःखदेवतेचे सभामंडपांत असून
" आंत गाभाऱ्यांत गेल्यावर आपलीही मनःशुद्धि होईल असें मला वाटूं
" लागलें "

आमचे प्रोफेसर साहेब ह्मणतात कीं आपल्या गळ्यास लागलेल्या फांसाची गांठ त्यांस प्रथम येथेंच दिसली व दिसल्याबरोबर लागलींच ती त्यांनीं सोडून ते एकदम मुक्त झाले. ते ह्मणतात " प्रत्येक प्राण्यास या
" जगाचे आरंभापासून एक विलक्षण कोडें येऊन पडतें. आणि नुसतें दुःख
" सागरांत लोळण्याचे ऐवजीं त्यांतून सुटण्यास कांहीं प्रयत्न करावा असें
" ज्याला ह्मणून वाटतें, त्यास प्रथम या कोड्याची कांहीं तरी अखेर ला-
" वावी लागते. या कोड्याचें सांप्रतचें स्वरूप ' दुःखाचा उद्भव कसा होतो
" हें आहे. सांप्रतकाळीं बहुतेक लोकांना या प्रश्नावर कसेंतरी पांघरूण
" घालून कोणच्या तरी व्यवसायास लागलें ह्मणजे चालतें; परंतु कांहीं लो-
" कांस हें कोडें सोडविल्यावांचून चालतच नाहीं. त्याचप्रमाणें निरनिरा-
" ळ्या काळीं या प्रश्नाच्या उत्तराचें स्वरूपही बदलत असून कालचें
" उत्तर आजला उपयोगीं पडत नाहीं. कारण, मनुष्याचा स्वभा-
" वच असा आहे कीं, शतका शतकांत त्याची परिभाषा बदलत जावी.
" असें न होण्याविषयीं त्याची फार खटपट असते. पण त्याचा इलाज चा-
" लत नाहीं. चालू काळचें खरें धर्म-तत्व अजून माझे हातीं लागलें नाहीं.
" परंतु तें हातीं लागेपर्यंत माझ्या स्वतःचे समजुतीकरितां हें कोडें मीं या-
" प्रमाणें सोडविलें आहेः—मला वाटतें, मनुष्याच्या दुःखाचें मूळ त्याचा
" मोठेपणा हें आहे. त्याच्या ठायीं जें एक अपार व अनंततत्व आहे त्या-
" मुळें त्यानें कितीही चातुर्य खर्च केलें तरी या सृष्टींत मिळणाऱ्या मर्यादित
" व अल्प गोष्टींनीं त्याची तृप्ति होत नाहीं. युरोपांतील सांप्रतचे मोठमोठे
" फडणीस, नामांकित कारागीर व सुगर आचारी या सर्वांनीं मिळून फक्त
" या एका जोडे टांचणाऱ्यास सुखी करूं म्हटलें तरी तो सुखी होईल काय?
" त्यांनी आपली कितीही शिकस्त केली तरी एक दोन तासांपलीकडे त्यांस
" ही गोष्ट साधणार नाहीं. कारण या जोडे टांचणाऱ्या चांभारास पोटाहून

" भिन्न असा आत्मा आहे. त्याची कायमची तृप्ति होण्यास एकच गोष्ट पा-
" हिजे. ती असली ह्मणजे जास्त कांहीं नको. व तिच्यापेक्षां कमीही कांहीं
" चालावयाचें नाहीं. ती कोणची तर परमेश्वराची ही अपरिमेय सृष्टी त्याचे
" एकट्याचे मालकीस असावी. ह्मणजे कोणचीही इच्छा झाल्याबरोबर ती
" लागलींच तृप्त करून घेतां येऊन सदैव उपभोग भोगीत रहावें. अमृताचा
" सबंध समुद्र व अगस्तीचें सामर्थ्य जरी त्याला मिळालें तरी तेवढ्यानें
" भागणार नाहीं. त्या चांभाराच्या अपरिमेय आत्म्यास तें कांहींच नाहीं-
" सारखें आहे. हा समुद्र भरला कीं तें अमृत त्यास बेचव वाटून दुसऱ्या
" अधिक चांगल्या अमृताची त्यास इच्छा होणार. त्यांस निमी सृष्टी व
" निमें सर्व शक्तिमत्व देऊन पहा. लागलीच तो बाकीच्या निम्या सृष्टीच्या
" व निम्या सर्वशक्तिमत्वाच्या मालकांशीं भांडूं लागेल व आपणांस नीट
" रीतीनें वागवीत नाहींत, आपणांस न्याय मिळत नाहीं अशी त्याची ओ-
" रड सुरू राहणारच. याप्रमाणें आपल्या सुखरूप प्रकाशाबरोबर दुःखरूप
" सावलीची काळोखी सदैव राहणार. मी पूर्वीं ह्मटल्याप्रमाणें आपल्या सा-
" वलीपासून सुटूं ह्मटलें तर कसें साधावें?

" आतां, सुखाविषयीं आपली कल्पना कशी होते ती पहा. आपल्या
" अजमासानें या जगांतील सुखांचा कांहीं एक प्रकारचा हिशेब करून
" आपण आपल्या मनांत असें ठरवितों कीं आपल्या पद्धतीच्या मनुष्यास

३ ब्रह्मांड मंडलीमात्रं, किंभोगाय मनस्विनः ।
शफरीस्पुरितेनाब्धौ, क्षुब्धता जातुजायते ॥

**भर्तृहरिः**

नजातु कामः कामानामुपभोगेनशाम्यति ।
हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभि वर्धते ॥ १ ॥
आत्मानंहि विजानीयादहमस्मीति पूरुषः ।
किमिच्छन्कस्य कामाय शरीर मनुसंज्वरेत् ॥ २ ॥

**मंकलगीता-महाभारत.**

थोर मनाच्या पुरुषास हें ब्रह्मांडही उपभोगार्थ पुरणार नाहीं. बेडकानें उडी मारिल्या-मुळें सागराचें पाणी उधासेल काय? उपभोगानें कोठें वासना तृप्त होते काय? आंत तूप टाकलें तर अग्नी जास्तच चेततो तसेंच हें आहे. परंतु मी व हें सर्व आत्मरूपच आहे असें झाल्यावर मग इच्छा करावयास व शरीरास त्रास करून घेण्यास राहतेंच कोठें काय?

" सामान्यत्वेंकरून अमुक अमुक ऐहिक उपभोग असावे. निदान तितक्या-
" वर तरी आपला अबाधित हक्क आहे असें आपण मानितों. तितकें आप
" णांस मिळणें ह्मणजे केवळ या जन्माची आपली हक्काची मजुरी असून
" तेवढी मिळाली तर कोणाचें आभारी होण्याचें अगर कुरकुर करण्याचें
" कांहीं कारण नाहीं असें आपणांस वाटतें. याहून जास्त मिळालें तर
" त्यास आपण सुख ह्मणतों व कमी मिळालें ह्मणजे दुःख मानितों. आतां
" विचार करा, कीं आपल्या लायकीचें हें नक्की मान आपण स्वतःच काढीत
" असल्यामुळें हें मान काढण्यांत पुष्कळच पक्षपात होत नसेल काय ?
" स्वतःच्या अजमासाचा कांटा या पक्षपातामुळें पुष्कळच प्रसंगीं भलतीकडे
" ढळला, व त्यामुळें अनेक टोणपे " काय हा पगार, आमच्या सारख्या
" लायक मनुष्यांची कितीही दैना ! " असें ह्मणून ओरडत सुटले तर त्यांत
" कांहीं आश्चर्य आहे काय ? पण या टोणप्यांस माझें असें उत्तर आहे
" कीं ' बाबांनों, हें तुमचें असमाधान केवळ अहंभावाचें फळ आहे. या
" अहंभावामुळेंच माझी अमुक अमुक योग्यता आहे असें तुह्मांस वाटतें. पण
" तुमची वास्तविक योग्यता फांशी जाण्याचीच आहे असें नसेल कशाव-
" रून ? तर मग आपली योग्यता फांशीं जाण्याची आहे अशीच कल्पना
" केली ह्मणजे गोळीनें उडविण्याचा हुकूम झाला तर तें तुह्मांस सुखच वा-
" टेल! किंवा घोड्याच्या केंसाच्या दोरीनें फांशीं जाण्याची आपली योग्यता
" आहे अशी आपली समजूत झाली तर मग नुसत्या सणाचे दोरीच्या
" फांसावरें चढतांना सुख होणार नाहीं काय ?

" आपलें ऐहिक भोक्तृत्व हा एक अपूर्णांक आहे. उपभोग हा त्यांचा
" अंश असून त्याचा छेद आपल्या लायकीची कल्पना हा आहे. ह्मणजे,

" $$\frac{\text{उपभोग}}{\text{आपल्या लायकीची कल्पना}} = \text{भोक्तृत्व (सुख)}$$

४ सणाचे दोरीचा फांसः—स्काटलंडच्या राजाचा एक कोक्रेन नांवाचा मित्र होता. त्याच्या बदफैलीपणाचा राजाचे आचरणावर वाईट परिणाम होऊं लागल्यामुळें प्रसंग साधून लोकांनीं त्यास फांशीची शिक्षा दिली. फांसावर देते वेळीं तुझी आतां शेवटची इच्छा काय आहे असें त्यास विचारिलें असतां तो ह्मणाला " माझे हात रेशमी काढणीनें बांधून मला रेशमी दोरीनें फांशी द्यावें; कारण एखाद्या दरवडेखोराप्रमाणें सणाच्या दोरीनें जर मला बांधिलें तर त्यांत मला लांछन आहे. हें ऐकून त्याच्या शत्रूंनीं त्यास चिडविण्याकरितां घोड्याच्या केंसांची दोरी प्रयत्नानें मिळवून तिनें त्यास फांशीं दिलें !

" ह्मणून भोक्तृत्व हें आपल्या लायकीची कल्पना कमी केल्यानें जसें वाढ-
" वितां येईल तसें उपभोग वाढविल्यानें वाढवितां येणार नाहीं. आपल्या लाय-
" कीची कल्पना हा या अपूर्णांकांतील छेद कमी केल्यानें भोक्तृत्वाची किंमत
" हवी तितकी वाढेल. फार तर काय, पण माझें बीजगणिताचें ज्ञान जर
" खरें असलें तर मी खचित सांगतों कीं अंश स्थानची संख्या जरी अ-
" गदीं कमी असली, तरी छेदस्थानीं पूज्य केल्यानें त्याची किंमत खरोखर
" 'अनंत' होते. ह्मणून आपल्या लायकीची योग्य मजुरी पूज्य आहे असें
" मानलें ह्मणजे तुमच्या सुखास सर्व जगांत जोड मिळणार नाहीं. सांप्रत
" काळांतील एका सुज्ञ तत्ववेत्त्यानें ह्मटलें आहे कीं " आपल्या कारकी-
" र्दीची खरी सुरुवात अभिमानाचा समूळ नाश झाल्यापासूनच होतें " तें
" अगदीं यथार्थ आहे.

" मीं आपल्या मनास विचारिलें कीं 'ज्याकरितां तूं इतका खेद व
" शोक करून व बावरल्यासारखा होऊन संताप करून घेत आहेस त्या-
" चें कारण तरी काय? तू सुखी नाहींस एवढेंचना? तूं इतका गोजी-
" रवाणा असून तुला योग्य मान मिळत नाहीं, खाण्याला सुग्रास नाहीं
" निजावयास परांच्या गाद्या गिरद्या नाहींत व प्रेमपूर्वक तुझी कोणी शु-
" श्रूषा करीत नाहीं; एवढेंचना? पण थोडक्याच काळापूर्वीं तुला या ज-
" गांत मूळ तोंड दाखविण्याचाच काय हक्क होता? व आतां जन्मल्यावर
" तूं सुखी न होतां असुखीच असावेंस अशी तरी ईश्वरी योजना कां नसा
" वी? तुझी आणि एखाद्या गिधाडाची योग्यता सारखीच काय? कांहीं
" खावयास मिळावें ह्मणून हिंड हिंड हिंडावें; व तृप्ति होईपर्यंत सडकें मां
" स मिळत नाहीं ह्मणून अमंगळवाणें ओरडत सुटावें. हाच काय जन्माच
" इत्यर्थ? पुरे आतां बायरनचा अभ्यास, आतां गीटचें अध्ययन कर[५].

प्रोफेसर साहेब पुढें एके ठिकाणीं ह्मणतात, " मला त्याची तुरळ

---

५ पुरे आतां बायरनचा अभ्यासः—गीटचें अध्ययन कर. " अंतरात्म्याचे पा
तुटून संशय व असमाधान नाहींसें होऊन त्यास " स्वातंत्र्य, विश्वास व कर्तव्यपर
आल्याबांचून मनुष्यास अध्यात्मिक पूर्ण दशा येत नाहीं. ही आध्यात्मिक पूर्णत
येण्याकरितां बायरनची सारखी धडपड चालली होती, तोंच त्यास मृत्यूनें गांठि
गीटला मात्र या कामीं चांगलेंच यश आलें."

कार्लाइल, निबंध १.

" झांक दिसली आहे. मनुष्यामध्यें सुखेच्छेपेक्षां श्रेष्ठतर असें एक तत्व " आहे. सुखाशिवाय मनुष्याचें चालेल. सुखाचे ऐवजीं त्यास समाधानाचा " प्रसाद प्राप्त होऊन त्या प्रसन्नतेंत त्यास आनंद वाटेल. या श्रेष्ठतर त- " त्वाचा उपदेश करण्याकरितांच ऋषी व योगी कवी आणि आचार्य यां- " नीं अनेक संकटें भोगून आपल्या चरित्रानें व प्रसंगीं आपल्या मरणानेंही " असें सिद्ध केलें नाहीं काय, कीं मनुष्यामध्यें ईश्वरी अंश आहे, आणि " त्या ईश्वरी अंशांतच पराक्रम व स्वातंत्र्य हीं आहेत. आणि हें ईश्वरप्रणी- " त तत्व समजून घेण्याची योग्यता तुलाही प्राप्त झाली आहेना! तूं धन्य " आहेस! अहाहा केवढी या दुःखप्रसंगाची योग्यता ! हें दिव्यतत्व कळ- " ण्यास दुःखप्रसंगच कारण आहेत. या उपकारक दुःखांच्या कडक शाळें- " त पश्चात्ताप होऊन हें तत्व समजण्याइतकें तुझें भाग्य असल्यावर आ- " णखीं काय पाहिजे. दैवानें तुझी आणि या दुःखप्रसंगांची गांठ घालून " दिली याबद्दल दैवाचे उपकारच मानले पाहिजेत. व आतांही जीं कांहीं " दुःखें भोगण्याचें प्रारब्धीं असेल तीं आनंदानें आभारपूर्वक भोगिलीं पा- " हिजेत. या दुःखांची जरूरच होती. त्यांवांचून तुझें मीपण जाऊन तूं " निरभिमान झाला नसतास. जसा हाडीं खिळलेला रोग तापाची व्यथा " होऊन ज्वरद्वारां निघतो व तेवढ्याकरितां हाडीं खिळलेले रोग काढण्या- " साठीं प्रसंगीं ताप येण्याचीं औषधें द्यावीं लागतात, आणि तापाच्या " व्यथेंतच हा ताप इष्टसिद्धीचें चिन्ह आहे असें वाटून आनंद होतो. त- " द्वतच जन्मतः मागें लागलेल्या मृत्यूचे कचाट्यांतून संसारदुःखांचे योगा- " नेंच आपणास मुक्तता मिळते ! अरे, काळसमुद्राच्या गर्जना करणाऱ्या " लाटांवर तूं पडला आहेस खरा; परंतु या समुद्रांत तूं गडप न होतां या " लाटांचे आधारावरच घनश्याम जो अनंत त्याप्रत तूं पावशील. ह्मणून " सुखोपभोगावर आसक्ति ठेवूं नको ईश्वराचे ठिकाणींच प्रेम ठेव हेंच खरें " तत्व होय. आणि आपल्या प्रकृतींत जी दुही आहे तिचेंही या तत्वानें- " च निरसन होतें. या तत्वानें जो चालेल तोच सुखरूप होईल."

पुन्हा ते ह्मणतात " ग्रीकतत्ववेत्ता झेनो[६] यानें सांगितल्याप्रमाणें हें जग

६ झेनो—( ख्रि० पू० ३५५--२६०) हा स्टोइक पंथाचा मूळ उत्पादक. हा पंथ चारशें वर्षें चालला होता. या पंथांत ( १ ) मनुष्य हा ईश्वरानें पूर्ण उत्पन्न केला आहे ह्मणून बनेल तोंपर्यंत नैसर्गिक स्थितींत राहणेंच योग्य आहे, ( २ ) जो खरा ज्ञानी

" व त्यांतील दुःखें तुच्छवत मानणें फारसें मोठें काम नाहीं. कारण हें जग
" तुला छळीत असतां त्यावर प्रेम करणें, तें छळतें ह्मणून त्यावर प्रेम क-
" रणें हीही गोष्ट तुला साध्य आहे. या तत्वाचा उपदेश करण्याकरितां झे-
" नोपेक्षांही श्रेष्ठतर पुरुष पाहिजे होता व तोही ईश्वरानें आपणास दिला.
" साधुपुरुषांनीं विपन्नावस्थेस इतकें श्रेष्ठ मानिलें आहे त्यांतलें इंगित तुला ठा-
" ऊक आहे काय? या दुःखरूप देवतेचें स्थान सुमारें १८०० वर्षांपूर्वी स्था-
" पिलें असून आतां तें देवालय अगदीं पडून गेलें आहे. आतां त्यावर
" रान माजलें असून त्यांत अमंगळ प्राणी मात्र राहतात. तरी पण धीर
" सोडूं नको. तसाच पुढें हो ह्मणजे ही इमारत कोसळून पडलेल्या दग-
" डांनीं बनलेल्या भुयारांत अजून तें यज्ञकुंड व त्याच्या जवळचा अखंड
" नंदादीप प्रज्वलित दिसेल."

या विलक्षण उद्गारांवर टीका न करितां आह्मी इतकेंच सांगतों कीं, या कागदांतच कांहीं याहीपेक्षां जास्त विलक्षण उद्गार आढळतात. पण ते सामान्य लोकांस कळणें शक्य नाहीं. फार तर काय त्या उद्गारांपासून आह्मासही कांहीं बोध होत नाहीं. जशी धूमकेतूची शेंडी तशांतलेच हे धर्मसंबंधीं उद्गार अपरिज्ञय असून त्यांत ठिकाठिकाणीं विलक्षण तेजाची दीप्तीही आहे. हे उद्गार " अक्षय्य राहणारी धर्मस्फूर्ति, " " भविष्य, " " सांप्रतकाळांतील खरे व खोटे आचार्य, " व अशाच प्रकारच्या दुसऱ्याही कांहीं विषयांवरील निबंधांत आहेत. त्यांतील कांहीं उतारे देऊन हा अठरा धान्यांचे कडबोळ्यासारखा भाग आह्मी संपवितों.

" व्हालटेअरबुवा आतां आपण स्वस्थ असा. आपलें अवतारकृत्य आतां
" संपलें असल्यामुळें आतां आपले मधुर शब्द आटोपून धरा. आपण आ-
" पली कामगिरी बजावलीत " ख्रिस्ति धर्माचें रहस्य जसें आठव्या शत-
" कांत दिसे तसें आतां अठराव्या शतकांत दिसत नाहीं " ही गोष्ट विचा-
" रणीय किंवा अविचारणीय कशीही असो; ती आपण स्पष्ट सिद्ध करून आ-

---

असतो तो सर्वसंपन्न असल्यामुळें इतर माणसास जे ऐंद्रिय विषय पराधीन करितात त्यांचा त्याजवर कांहीं अंमल चालत नाहीं. स्टोइकलाही इतराप्रमाणें शारीरिक दुःख होतें, पण त्यामुळें त्याच्या मनाचें स्वास्थ्य मोडत नाहीं; अशीं मतें होतीं. स्टोइक लोक ज्ञान व अनासक्ती प्राप्त करून घेण्याकरितां फार झटत. एपिक्युरिअन लोकांप्रमाणें ते विषयानुषंगी नसत.

" ह्मांस दाखविली. पण कायहो, आपले मोठमोठाले छत्तीस ग्रंथ, व इतरांचे " छत्तीस हजार ग्रंथ व अनेक रिमें आजपर्यंत त्या विषयावर छापिलीं तीं " सर्वही एवढीशी एक गोष्ट आह्मांस सांगण्यास जरूर होती काय! बरें ही " आपली गोष्ट आह्मीं ऐकिली, पण पुढें काय करावयाचें? त्या दिव्य- " धर्माचें रहस्य निराळ्या रूपानें निराळ्या भाषावस्त्रानें अलंकृत करून " आमचे आत्मे जे बुडत आहेत त्यांच्या तरणोपायार्थ आमच्या पुढें आ- " पण मांडाल काय? काय ह्मणतां? हें सामर्थ्य आपल्यांत नाहीं! पहिली " इमारत जाळून टाकण्यास चुडी मात्र आपणाजवळ होती; नवी बांधण्याचें " सामर्थ्य नाहीं! बरें तर आपलें आह्मांवर बहुत उपकार झाले; पण आतां " आपलें काम नाहीं. आपण चालते व्हा कसे!

" असो, पण हीं जुनी झालेलीं मतें मला काय होत? सर्वव्यापी जो " परमेश्वर, जो माझ्या हृदयांत प्रत्यक्ष भासमान आहे. तो या व्हालटेअर- " साहेबांच्या पांडित्यानें माझ्या अंतरंगांतून नाहींसा होईल, किंवा माझ्या " अंतरंगांत नसेल तर येईल असें आहे कां? हें दुःखदेवतेचें पूजन ह्मणजे हा " तपोमहात्म्यरूपी धर्म कोठून कसा उत्पन्न झाला याविषयीं पाहिजे त्या " कल्पनाकरितां येतील. पण तो उत्पन्न झाला एवढें तर खरें! मग तो को- " णच्याही तऱ्हेनें उत्पन्न होईना? तो येथें माझ्या अंतरंगांत नाहीं काय? " पाहिजे तर आपल्याच अंतरंगांत पहा आणि मग तो ईश्वरप्रणीत आहे " कीं नाहीं याचा निवाडा कर. याचेंच नांव विश्वास व धर्मश्रद्धा. अंतरं- " गांत जीं भासत नाहींत तीं तत्वें केवळ पुराणांतलीं वांगीं होत, व ज्यांना " हौस असेल त्यांनीं त्यांच्या भानगडींत शिरावें."

दुसरे एके स्थळीं ते ह्मणतात " पूर्ण स्फूर्तीच्या संबंधानें किंवा अशाच " दुसऱ्या एखाद्या विषयावर उगीच व्यर्थ वाटाघाट करून एकमेकांचे डोळे " काढण्यांत काय जीव आहे. त्यापेक्षां पूर्ण स्फूर्तीचे ऐवजीं जरी थोडीशी " अर्धवट स्फूर्ती प्रत्येकास प्राप्त होत असली तर तेवढीच आपलीशी करून " घ्यावी हें बरें नव्हे काय! पूर्ण स्फूर्तीचा एक ग्रंथ मात्र मला ठाऊक " आहे. त्याच्या स्फूर्तीचे पूर्णत्वाविषयीं नुसती शंकाही घेतां येणें अशक्य " आहे. छे, छे! ईश्वराचाच प्रत्यक्ष हात तो ग्रंथ लिहीत असतां मी स्वतः " पाहिला. बाकीचीं तुमचीं बायबलें या ग्रंथास केवळ टीकारूप पत्रांप्रमाणें " असून अल्पबुद्धीच्या लोकांचे साह्यार्थ तीं केवळ चित्रबोधाप्रमाणें होत."

आतां आमच्या कंटाळलेल्या वाचकांस कांहीं थोडासा फेरबदल होण्याकरितां खालील कांहींसा सोपा उतारा देऊन हा भाग समाप्त करूं.

प्रोफेसरसाहेब ह्मणतात, " या आपल्या आयुष्यांत काळाशीं एकसारखी " झोंबी चाललेली असते; यामुळें दुसरी कोणत्याही प्रकारची झोंबी किंवा " भांडण अगदीं अशक्यच आहे असें वाटतें. ह्मणून मित्रा, तुझ्या एखाद्या " बांधवाशीं जर तुझा कांहीं वाद असेल तर माझें तुला एवढेंच सांगणें " आहे कीं या भांडणाचा अर्थ काय, एवढें तूं नीट लक्ष्यांत आण. कारण " या भांडणाच्या अगदीं बुडाशीं गेलें असतां त्याचा तात्पर्यार्थ एवढाचः– " एक म्हणतो, गृहस्था तुझ्या वांट्यापेक्षां तुला सुख जास्त आहे; व तें तूं " माझ्या वांट्यांतून घेतलें आहेस. तर मी ईश्वरास स्मरून सांगतों कीं तें " मी तुला पचूं देणार नाहीं. प्रसंग आला तर तुझ्याशीं लढण्यासही मी " मागें सरणार नाहीं. हेंच सर्व भांडणाचें बीज. पण हाय हाय! ज्या सुखा-" च्या राशींत हे सर्व वांटे व्हावयाचे ती रासही जर पाहिली तर किती " आहे! नुसतें भुसकट!!! कारण, आंतला दाणा अगोदरच चट्ट झाला " आहे. या सर्व सुखाच्या राशीनें एकाचीही तृप्ती होणार नाहीं. पण " तिच्या भोंवतीं पहावें तों येथून तेथून सर्व मनुष्यजात झोंबत आहे. " अशा स्थितींत आपणांस योग्य उत्तर पाहतां हेंच कीं बाबारे तूं काय " म्हणतोस? हे अप्पलपोट्या खादाड गृहस्था, मी समजत होतों कीं, हा " भाग माझ्या हिश्शाचा आहे. तूं म्हणतोस तुझ्या हिश्शाचा आहे; व " तुला त्याचें इतकें अगत्यही वाटत आहे. बरें, हा एवढा भाग माझे " जवळ राहिला तरी त्यानें माझ्या स्थितींत मोठासा बदल होईल असेंही " नाहीं. तर बाबा तो घे तूं आणि तो तुला लखलाभ असो. तुझी भूक " पुरण्याइतकें मजपाशीं असतें तर तें मीं तुला संतोषानें दिलें असतें.' " फीचीच्या[७] ग्रंथांतील तत्वविचारांस जर व्यावहारिक ख्रिस्तीधर्म असें

---

७ फीची ( १७६२--१८१४ ) एक विद्वान् जर्मन प्रोफेसर. हा प्रथम जेनाचे युनिव्हरसिटींत प्रोफेसर होता. तेथें त्यानें " सशास्त्र वर्तन " या नांवाची एक स्मृति लिहिली. परंतु त्यावर नास्तिकपणाचा टपका आल्यामुळें तो तेथून निघून कांहीं दिवस बार्लिन येथें राहिल्यावर त्यास पुन्हां एर्लिंजनच्या युनिव्हार्सिटींत प्रोफेसरची जागा मिळाली.

" ह्मणावयाचें तर मी म्हणतों कीं अशी वागणूक ख्रिस्ती धर्मास त्याहींपेक्षां
" जास्त अनुरूप होईल. हेंही या मनुष्यजन्मांतील सर्व इतिकर्तव्य न-
" व्हेच. पण तितिक्षा किंवा उदासीनतारूपी हें त्याचें अर्धांग होय आणि
" हें तत्वसुद्धां जसें आपणांस शब्दांनीं सिद्ध करून देतां येतें; तसेंच जर
" व्यवहारांत आणितां आलें तरच त्याचा उपयोग<sup></sup>.

" परंतु वास्तविक पाहतां एखादी गोष्ट कितीही चांगली असली, व म-
" नास कितीही खरी वाटली तरी ती वर्तनांत येईपर्यंत कवडीमोलच होय.
" इतकेंच नव्हे, तर ती गोष्ट वर्तनांत आणल्यावांचून चैन पडत नाहीं; असें
" झालें तरच तिजविषयीं मनाची खात्री झाली असें ह्मणतां येईल. नुसत्या
" शब्दपांडित्यानें निरुत्तर करून किंवा कांहीं कल्पना करून हवी ती गोष्ट
" सिद्ध करितां येईल व खरीशी वाटेल. कारण, शब्दपांडित्यास किंवा क-
" ल्पनातरंगांस कांहीं आडकाठी किंवा मर्यादा आहे असें नाहीं. ती सिद्ध
" करावयाची किंवा खरी मानावयाची गोष्ट अमुक प्रकारची असावी किंवा
" अमुक विषयांत असावी असा काहींच निर्बंध नाहीं. जेव्हां अनुभवाचें
" प्रत्यक्ष प्रमाण पहावें तेव्हां मात्र त्या कल्पनेस किंवा सिद्ध केलेल्या
" गोष्टीस विवक्षित दिशा लागून शक्य स्वरूप येतें व एवढ्याकरितांच
" एका ऋषीनें म्हटलें आहे कीं कोणत्याही प्रकारचा संशय उत्पन्न झाला
" तर त्याची निवृत्ती प्रत्यक्ष अनुभवावांचून होणार नाहीं. ह्मणून जो कोणी
" कल्पनातरंगांच्या अंधारांत किंवा शब्दसिद्धतेच्या अंधुक उजेडांत चाच-
" पत चाचपत जात असून खरी गोष्ट काय आहे ती स्पष्ट कळावी असें
" ज्यास मनापासून वाटत असेल, त्यानें या खालीं दिलेल्या दुसऱ्या त-
" त्वाचें आचरण करावें ह्मणजे त्यास आपोआप खरी गोष्ट कळेल. या त-
" त्वाचे आचरणानें मला फारच अप्रतिम उपयोग झाला आहे. तें तत्व हें
" कीं आपलें सध्यांचें जें कर्तव्य असेल, जें आपलें कर्तव्य असें आपणांस
" सांप्रत भासत असेल तेंच एकाग्रतेनें करावें. तें केल्यावर पुढील कर्तव्य
" कोणचें तें आपोआप आपणापुढें प्रकट होईल.

" आणि केव्हांही पाहिलें तरी आपल्या मुक्ततेची खरी वेळ ह्मणजे

---

८ क्रियेविण वाचाळता व्यर्थ आहे.

**रामदास.**

‘ सांप्रतची घटका असते. आपल्या मनांत अनेक प्रकारची काल्पनिक परि-
“ स्थिती व तदनुरूप कर्तव्याच्या अनेक कल्पना असतात; व त्यांत आ-
“ पलें उत्कृष्ट कर्तव्य कोणचें तें शोधण्यास आपण चाचपडत व्यर्थ सैरावैरा
“ हिंडत असतों. परंतु तशी स्थिती सांप्रतकाळीं नसतेच! खरें जग व आपली
“ परिस्थिती सांप्रतकाळीं आपणांस प्रत्यक्ष असते. व त्या स्थितीस अनु-
“ रूप असें आपलें कर्तव्यही आपणांस स्पष्ट दिसत असतें. अशी कोणती
“ ही स्थिती नाहीं, असा कोणताही काळ नाहीं, कीं त्यांत आपण करण्या-
“ सारखें विशिष्ट कर्तव्य नाहीं. अर्थात सांप्रतकाळच्याच आपल्या परिस्थिती-
“ स आपल्याच विवेक दृष्टीनें योग्य असें कांहीं तरी कर्तव्य असतेंच; मग
“ ही स्थिती कितीही गरीबीची, कितीहि दुःखाची, कितीही अडचणीची,
“ कितीही तुच्छ असली तरी या प्रत्यक्ष स्थितींत, व तें कर्तव्य करूनच,
“ तुमचा तरणोपाय आहे. आणि या स्थितींत हें कर्तव्य केलें नाहीं तर
“ कोणच्याही स्थितींत तरणोपायाची आशा नाहीं. ह्मणून आपण ज्या
“ कर्तव्यरूप इष्ट स्थळाचे शोधांत आहों तें हेंच आहे असा पक्का निर्धार करून
“ त्यांत एकदम डोकें घालून तें कृतींत आणलें पाहिजे तें केलें तरच तु-
“ मचे हातून घडणार. नाहीं तर तुमच्या हातानेंच तें पुढें तुम्हांस अवघड
“ होणार ! तें लागलेंच करून अनुभवांत आणिलें ह्मणजे विश्वास वाढतो,
“ भासमान चैतन्य वाढतें व आत्म्याचें स्वातंत्र्य अनुभवास येतें.[१] अरे, ही
“ कर्तव्याची शक्यता तुजमध्येंच असून त्यास येणाऱ्या अडचणीही तुजम-
“ ध्येंच आहेत. तुझी स्थिती ह्मणजे हें शक्यतारूप भांडें घडण्याची साधनी-
“ भूत माती होय. ही माती कशीही असली तरी काय हरकत आहे. तुह्मी
“ जें भांडें त्यापासून घडणार तें उत्तम असलें ह्मणजे झालें. प्रत्यक्षाची
“ ( विद्यमान स्थितीची ) बेडी जड होऊन जो तूं झुरत आहेस, व “ हे
“ ईश्वरा, अमुक अमुक कर्तव्यें करण्याचा माझा हेतु सफळ होण्याजोगें मला
“ एखादें राज्य दे ” असें ह्मणून धायधाय रडत आहेस, तो तूं किंचित
“ डोळे उघडून एवढी एक गोष्ट निखालस पाहून ठेव. जें तुला पाहिजे, तें

---

१ भासमान चैतन्य ह्मणजेच आयुष्य. ह्मणून या नियमाप्रमाणें चालणें हाच असलेलें आयुष्य पदरांत पाडण्याचा किंवा देहाचे सार्थक्याचा मार्ग आहे. प्रतिक्षणीं आपणांस जें कर्तव्य ह्मणून वाटेल तेंच करावें.

" आज तुजपाशींच आहे. तें तुला या स्थितींतच मिळेल व दुसऱ्या
" कोणच्याही स्थितींत सांपडावयाचें नाहीं. मात्र तें तूं डोळे उघडून पाहि-
" लें पाहिजेस.

" जीवात्म्याचे उन्नतीस बाह्य सृष्टीचाच न्याय लागू पडतो. पुराणांतरीं
" असें वर्णन आहे, कीं सृष्टीच्या उत्पत्तीस आरंभ तेजाचे उत्पत्तीपासून
" झाला. त्याप्रमाणेंच डोळ्यांस ईश्वरी प्रेरणेनें दृष्टी येईपर्यंत सर्व इंद्रियें
" स्तब्ध असतात. व ज्याप्रमाणें पूर्वीं सर्व तमोरूप असतां तेजस्तत्वाची
" उत्पत्ती झाली, त्याचप्रमाणें अनेक काहुरांनीं व्याप्त झालेल्या दृष्टीस ई-
" श्वरकृपेनें एकदम फांटा फुटून तत्वनिधान दिसूं लागतें. कमी बुद्धिमान
" लोक या स्थितीस कदाचित अद्भुत चमत्कार असें ह्मणणार नाहींत. प-
" रंतु ज्या सद्भाग्य पुरुषास ही स्थिति अनुभवास येते त्यास ती ईश्वरी
" साक्षात्कार अशाच दृष्टीनें भासून तिच्या योगानें त्याची ईश्वराशीं प्रत्यक्ष
" ओळखच होत नाहीं काय? कमी बुद्धिमान लोकांस मात्र ईश्वराचें अ-
" स्तित्व भासण्यास बाह्य सृष्टींतील चमत्कारांची आवश्यकता असते. या-
" प्रमाणें आत्मसाक्षात्कार झाल्यावर अंतरंगांत जी दुही माजलेली असते
" ती एकदम शांत होऊन आत्मरूप सृष्टीची रचना होऊं लागते. एकमे-
" कांत गुरफटलेले परस्पर विरोधी पदार्थ अलग अलग होऊन आपआप-
" ले जिल्हे वांटून घेतात व सर्वांच्याच आधारास ( कर्तव्यरूप ) भक्कम
" पाया होतो. सर्वांच्या शिरोभागीं ( ईश्वररूप ) दिव्य आकाश पसरून
" त्यांत चिरकाल राहणारे ( सिद्धांतरूप ) दिव्य प्रकाश उत्पन्न होतात.
" आणि पूर्वींचा सर्व गोंधळ नाहींसा होऊन त्याचे ऐवजीं टवटवीत, सुफल-
" दात्री, चोहोंकडे ईश्वराचा आधार असलेली दिव्य सृष्टी प्रचीतीस येते.

" माझेही अंतःकरणाची सांप्रत अशीच स्थिति होऊन मी आपल्या
" मनास ह्मणूं लागलों, तूंही आतां अव्यक्त व मिश्र तमोरूपानें न राहतां,
" जगाचें किंवा निदान लहानशा जगुकलीचें स्पष्ट व व्यक्त स्वरूप धारण
" कर! हूं!!! होऊं दे उत्पत्तीला सुरुवात! मग तो उत्पन्न होणारा पदार्थ जरी
" कितीही क्षुल्लक असला तरी परमेश्वराचें स्मरण करून तुझ्या हातून याच
" स्थितींत जें काय होण्यासारखें असेल तें कर. तुझें कर्तृत्व हेंच कार्यतें तु-
" झें सार्थक होणारें तत्व आहे. व तें तुजपासून कर्मरूपानें बाहेर पडलें
" तरच उपयोग. ह्मणून आंग झाडून व आंग मोडून तुजकडून जें जें

" कांहीं होण्यासारखें असेल तें तें कर. चल ऊठ! आयुष्यरूपी दिवस आहे
" तोंपर्यंत काय होईल तें होईल. कारण मृत्युरूपी रात्र पाठीस लागली
" आहे व एक वेळ रात्रीचा तम पसरला ह्मणजे माणसाचे हातून कांहींच
" होत नाहीं.

---

# भाग १०

## विश्रांति.

यांप्रमाणें ट्यूफेल्सड्राक साहेबांचे चरित्रांत ज्या निरनिराळ्या स्थिती

---

१ या पारिमाफांत परमात्म्यासंबंधीं तीन प्रकारचे साक्षात्कार सांगितले आहेत. पहिला, हरक्युलीस वगैरे पुरातन ग्रीक लोकांस नुसत्या अंतःकरणप्रवृत्तीवरून व अनुमानधक्यानें झालेला;—हरक्युलिसची अशी कथा आहे कीं तो अति बलवान् व सत्वशील होता; व त्याचें सत्व पाहण्याकरितां सदाचार ( सुनीति ) व दुराचार ( कुनीति ) यांनीं दोन स्त्रियांचीं रूपें धारण करून त्यास सांगितलें कीं, आह्मांपैकीं तूं पाहिजे तिचा स्वीकार कर. तेव्हां तो गोंधळांत पडला. पण पोक्त विचार करून पहिली ( सुनीति ) जरी बाह्यस्वरूपानें विशेष मोहक नव्हती तरी तिचाच त्यानें स्वीकार केला—तात्पर्य त्या लोकांत अनुमानधक्याच्या अंतःकरणप्रवृत्तीवांचून सदसद्विवेक करण्यास कांहीं साधन नव्हतें. दुसरा प्रकार साक्रेटिस प्लेटो वगैरे लोकांस तर्कशास्त्रांतील सिद्धांतांमुळें अनुमानदृष्टीनें झालेला साक्षात्कार. पैकीं साक्रेटिसाचा सिद्धांत " नेतिनेति " स्वरूपाचाच असून व्यतिरेकानुमानांवरून होणारा कांहीं अव्यक्त कल्पनारूप मात्र होता. त्याचा शिष्य प्लेटो त्यास हें मायावरण स्पष्ट दिसलें परंतु त्यांतून परमात्म्याचें स्पष्ट स्वरूप त्यासही साध्य झालें नाहीं. तिसरा प्रकार ख्रिस्तास झालेला मनुष्याच्या नैसर्गिक श्रेष्ठत्वाचा साक्षात्कार. सामान्यतः जीव ह्मटला तर सुखदुःखांच्या वाऱ्यांवर वाहणारा व मृत्यूच्या व दुःखांच्या बागुलबोवास भिऊन आडमार्गाचें अवलंबन करणारा प्राणी होय. परंतु मनुष्यप्राण्याची स्थिति तशी नाहीं. मनुष्य हा आपल्या विवेकाच्या व सत्वाच्या जोरानें मृत्यूस व दुःखास पादाक्रांत करणारा एकच प्राणी आहे. ही गोष्ट पाश्चात्य लोकांचे निदर्शनास ख्रिस्तानें आणून दिली.

पुढें चालू.

त्यांस प्राप्त झाल्या त्यांचें पर्यालोचन करून संवर्धन, भ्रम, अविश्वास नास्तिक्य वगैरे पाहिऱ्या ओलांडल्यावर सत्वसंशुद्धीच्या कांहींशा भक्कम पाहिरीवर ते येईपर्यंत त्यांच्या चरित्राचें बारकाईनें व आमच्या मतें समाधानकारक रीतीनें आह्मीं निरीक्षण केलें. या मनुष्यधर्माविषयीं ते ह्मणतात—
" या शब्दाचें हंसें करणें योग्य नाहीं. उलट जी अप्रतिम गोष्ट पूर्वींच्या
" मोठमोठ्या लोकांसही ठाऊक नव्हती ती आपणांस या युगांत या शब्दा-
" चे अर्थरूपानें प्राप्त झाली आहे, याचा आपणांस आनंदच वाटला पाहिजे.

या तिन्ही प्रकारच्या साक्षात्कारांचीं उदाहरणें फार प्राचीन काळापासून या भरतखंडांत होत आलीं आहेत व यामुळेंच पाश्चात्य धर्माचें प्राबल्य या देशांत होत नाहीं. परंतु आपल्या धर्मांत एक मात्र उणेपणा स्पष्ट दिसतो; आणि जे कांहीं लोक ख्रिस्ती होतात ते त्यामुळेंच होतात. तो हा कीं, भारतवर्षांतील आर्यधर्म सर्व सामान्य नसून सर्व जातींस सारखे सामाजिक हक्क नाहींत. ही उणीव अलीकडे फारच अनिष्ट मार्गांनीं दूर होऊं लागली आहे. हिंदू लोकांत एकोपा कमी झाल्यामुळें आणि व्यक्तिस्वातंत्र्यास कांहींच आळा न राहिल्यामुळें ज्याला जें पाहिजे तें त्यानें करून त्यास कोणीं बोलूं नये असें होऊन धर्मबंधनच अजीबात नाहींसें होत चाललें आहे. परंतु हा परिणाम चांगला नव्हे. धर्मबंधन अवश्य पाहिजेच व तें कडकडीत रीतीनें अमलांतही असलें पाहिजे. परंतु तें समाजांतील सर्व मनुष्यांस सारखें लागू असलें पाहिजे. प्रत्येक व्यक्तीच्या विचारावर विवेकाचें कार्य स्वतंत्रपणें होत असल्यामुळें प्रत्येक धर्मांत पंथ हे असणारच. परंतु नेहमींच्या सामान्य व्यवहारांत जातिभेद असणें बरोबर नाहीं. धंद्याच्या गलिच्छपणाचे मानानें जितकी स्वच्छता राखणें जरूर आहे तिजबद्दल अवश्य तजवीज करावी व ती प्रत्येक राष्ट्रांत असतेच. परंतु जातिभेदामुळें एकमेकाच्या मनांत डांचणारे उच्चनीच भाव आतां काय उपयोगाचे आहेत ? इकडे अभक्ष्यभक्षण,अपेयपान, अगम्यागमन, असत्याचरण वगैरे अत्याचार करणारे आपल्या ओळखीचे ब्राह्मण राजरोस आपल्या पंक्तीस बसतात; आणि इकडे एखादा मांग महार नुसता शिवला तरी आपण स्नान करितों अशा अव्यवस्थित जातिभेदास काय ह्मणावें ? सदाचाराविषयीं पूज्यभाव, अभिमान व बक्षीस आणि दुराचारांविषयीं तिटकारा, लज्जा व शासन हींच वास्तविक पाहता समाजास धर्मबंधनें असलीं पाहिजेत. तीं तर आपणांत बिलकूल नाहींत. त्यांची उणीव आपसांत असंतोष व अडचण करणाऱ्या निरर्थक नियमांनीं कधींही भरून निघणार नाहीं. सदाचार व दुराचार यांमधील अवश्य भेद समाजांतील लोकांच्या आचरणांत कडकडीतपणें असता तर कदाचित् असले प्रकार लोकांनीं खपवून घेतले असते. आतां या गोष्टी जर आपण न सुधारूं तर या आर्य धर्माचें पावित्र्य व श्रेष्ठत्व हीं खा[illegible]लयास जातील इकडे वाचकांनीं लक्ष द्यावें.



२८

" आज आपणांस जी खऱ्या मनुष्यत्वाची ओळख होत आहे तिचे ऐवजीं " पूर्वीचे लोकांस हरक्युलिसाप्रमाणें विशिष्ट पुरुषांत निवड करून त्यांपैकीं " अनुमानधक्यानें वाटेल तो अनुकरणास घ्यावा असें होतें. मनुष्याच्या " नैतिक प्रगतींत इतकी मजल पूर्वी कधींच पोहोंचली नव्हती. या मनुष्य " धर्माचे योगानें जो अनंत पुरुषोत्तम त्याचें सायुज्य अतिहीन जो मनुष्य " त्यासही होतें. प्लेटोच्या अनुभवास जो केवळ मायावृत स्वरूपानें आला; " साक्रेटिसे यास जो केवळ कल्पित स्वरूपानें प्रत्ययास आला, तोच " परमात्मा या मनुष्यधर्माचे साह्यानें तुमचे झेनझेनडार्फ, वेसली, वगै- " रेंच्याही अनुभवास प्रत्यक्ष येत आहे. "

असो टच्यूफेल्सड्राक साहेबांची अध्यात्मदृष्टच्या पूर्ण वाढ आतां झाली

२ साक्रेटीस—( खि० पू० ४६८—३९९ ) अथेन्स येथील महासाधु व प्लेटोचा गुरु. हा मोठा तत्ववेत्ता होता, तरी त्यानें अमुक एक आपलें मत किंवा सत्यतत्त्व असें प्रतिपादन केलें नाहीं. तो फक्त सद्गुणाचरणाचा उपदेश करी; आणि लोकांतील मतांचा पोकळपणा व्यक्त करून दाखवी. परंतु त्याच्या प्रश्नोत्तरात्मक शिक्षणामुळें लोक जास्त खोल विचार करूं लागले व पुढें प्लेटो,झेनोफन वगैरे तत्त्वज्ञ उत्पन्न झाले. तो चांगला योद्धा होता व पुष्कळ लढायांत तो होता. एका लढाईत त्यानें झेनोफन आणि सेनापती अलकिबिएडिस यांचे प्राण वांचविले. त्याचा पोषाख व राहटी फारच साधेपणाची होती, त्याचा शिष्यवर्ग जसजसा जास्त होऊं लागला तसतसा मत्सरी लोकांचा त्याजविषयीं द्वेषही वाढला व अखेरीस त्यांनीं पांचशें लोकांच्या सभेकडून " हा अथेन्सच्या मुलांस बिघडवितो व धर्मांत उलथापालथ होण्यासारखीं भाषणें करितो " अशा आरोपावर त्यास देहान्त शिक्षा ठरविली ! परंतु मध्यंतरीं कांहीं महोत्सव आल्यामुळें ती शिक्षा अमलांत येण्याचें लांबलें. त्या अवधींत त्याच्या मित्रांनीं तुरुंगावरील अधिकाऱ्याच्या संमतीनें त्यास तेथून पळून जाण्याविषयीं फार गळ घातली. परंतु " जन्मलेल्या प्राण्याचा अशानें मृत्यु टळेल काय ? " असें म्हणून त्यानें ती गोष्ट नाकारिली, व शिक्षा अमलांत येईपर्यंतचा काळ आनंदानें तत्वसंभाषणांत घालविला. शेवटीं सरकारी माणसांनीं त्याच्याकरितां तयार करून ठेविलेलें विष समाधानवृत्तीनें पिऊन त्यानें देहावसान केलें. त्याच्या मृत्यूनंतर अथेनियन लोकांस आपल्या कृतघ्नपणाबद्दल पश्चात्ताप झाला पण उपयोग काय ? त्याच्या वैऱ्यांचेही मागून फार हाल झाले. त्याची बायको फार कजाग व छळवादी होती ती या गुणांवरून फार प्रसिद्ध आहे.

३ कौंट झेन झेन डार्फ—मोरेव्हियन समाज पंथाचा पुढारी. ( १७००—१७६० )

४ वेसली—( १७०३–१७९१ ) मेथाडिस्ट पंथाचा मूळ उत्पादक.

असें ह्मणण्यास हरकत नाहीं. मनुष्य या नात्यानें, जीवाभावापासून, गोंधळल्यावांचून सहेतुक सत्कृत्यें करण्याचा त्यांचा क्रम इतउत्तर आपणांस दिसून येतो. आतां त्यांचे लक्ष्यांत आलें कीं, आपला काम करण्याचा कारखाना कोठें आहे ह्मणून जे आपण आजपर्यंत ठेंचा खात धुंडाळीत होतों तो हाच विशिष्ट परिस्थितीचा गरीबसा कारखाना होय. व आतां फक्त हत्यारांचा मात्र प्रश्न राहिला. यासंबंधानें ते ह्मणतात, "अरे हत्यारें हत्यारें काय " करितोस ? तुजपाशीं हत्यारें नाहींत काय ? अरे, या कारखान्यांत एकही " मनुष्य किंवा पदार्थ असा नाहीं कीं, त्याचें हत्यार त्याजपाशीं नाहीं. " अगदीं हीन कोटींतला प्राणी घ्या. त्याचें हत्यार त्याजपाशीं आहे " हा कोळी पहा. त्याचेपाशीं सूत कातण्याचें यंत्र आहे. विणण्याचेंही " आहे. त्याचा माग त्याचे डोक्यांतच आहे. शिंपल्यांतील किडे घ्या. " आपणांस ते मासाच्या लोधाप्रमाणें वाटतात, पण त्यांचेपाशीं अन्नपच- " नाचा अपूर्व कोठा आहे; त्यास राहण्यास चुनेगच्ची घरही आहे. या- " प्रमाणें जो प्राणी जगतो त्याचे हातून कांहीं तरी होण्यासारखें असतेंच. " तेवढें त्यानें केलें ह्मणजे झालें. हत्यारांची ती पंचाईत कशाची ? तुला " एक ज्ञानतेजानें भरलेलें किंवा ज्ञानतेजानें भरतां येण्यासारखें डोकें " नाहीं काय ? लेखणी धरण्यापुरतीं तीन बोटें तरी तुला आहेतना ? " लेखणीसारखें विलक्षण काम करणारें हत्यार आजपर्यंत दुसरें झालेलें " कोणीं पाहिलें नाहीं व कोणीं ऐकिलेंही नाहीं. कारण, काय चमत्कार आहे

---

५ सहेतुक सत्कृत्यें—आपण जें कांहीं करितों त्यांत कांहीं चांगला हेतु असून कार्यकारणभावाचा संबंध ओळखून तें आपण केलें पाहिजे. आपणांत धर्मग्रंथांच्या अर्धवट समजुतीमुळें सहेतुक कृत्य ह्मणजे कांहींसें निंद्य असा चमत्कारिक समज झाला आहे. अप्पलपोटे लोक आपल्यापुरता मात्र विचार करून सहेतुक कृत्य करितात तें निंद्य खरें, याचप्रमाणें केवळ फलाशेनें एखादें कृत्य करून त्या फळाचे उपभोगानें सत्वभंग होऊन आत्मसाक्षात्कार नष्ट होतो किंवा फलप्राप्ती न झाल्यामुळें समाधानाचा भंग होतो अशा कृत्यें केवळ आत्मविषयक असून निंद्य होत. परंतु कर्तव्यबुद्धीनें आपण कर्मं केलींच पाहिजेत. इतकेंच नव्हे, तर तीं आपण व्यवसायपर होऊन केलीं पाहिजेत. अर्थात् तीं विशिष्ट हेतूवांचून आपले हातून होणें अशक्य आहे. ह्मणून सहेतुक सत्कृत्य निंद्य नव्हे. मात्र फळाचे उपभोगांत आसक्ति व फलाभावानें असमाधान न झालें ह्मणजे झालें. हेंच तत्व भगवतांनीं अर्जुनास गीतेंत सांगितलें आहे.

" पहा! या जगांत सर्व पदार्थ इतकें घन ( भरींव ) दिसत असून हें जग तर
" एकसारखें बदलतें आहे. परंतु ध्वनी म्हटला तर अगदीं शब्दशः क्षण-
" भंगुर; त्या ध्वनीचा पराक्रम लेखणीचे योगानें सदैव चालू रहावा असाच
" कांहीं विलक्षण ईश्वरी संकेत आहे. या जगांत शब्दासारखी सर्वसत्ता-
" धारी दुसरी वस्तूच नाहीं. या शब्दामुळें मनुष्यास देवपण येऊन
" अद्भुत शक्तीच्या गोष्टीही त्यास करितां येतात. हें हत्यार कांहीं लहान-
" सान आहे काय? जागा हो. ऊठ. जें कांहीं तुझ्यांत आहे, तें बोल तरी. जें
" कांहीं ईश्वरानें तुला दिलें आहे व जें प्रत्यक्ष काळासही तुजपासून
" घेतां येत नाहीं, तें नुसतें बोल, म्हणजे झालें. आजपर्यंत मनुष्यास
" जे जे अधिकार प्राप्त झाले त्या सर्वांत उपदेशकाचे तोडीचा अधिकार
" दुसरा नाहीं. या श्रेष्ठ पदवींतील अगदीं खालच्या दर्जाचें काम जरी
" तुला करावयास सांपडलें तरी त्यांतच सर्व आयुष्य खर्चून आपलीं
" हत्यारें उपयोगांत आणिल्यानें तुझें व त्यांचेंही सार्थक्य होणारें आहे.

" आतां हें खरें आहे कीं, अधिकार नसतां याही कामांत शिरून
" या श्रेष्ठ उद्योगासही पोटभरू धंद्याचे पद्धतीस आणण्याचें कोणी
" मनांत आणिलें तर तें सहज होईल. तरी तेव्हांपासून याच कामांत मी
" असतों. माझे लेख माझ्या नांवावर प्रसिद्ध नाहींत. ( पण ज्याला व्यव-
" हारांत 'मी' असें म्हणावयाचें त्याची योग्यता ती किती? ) तरी ते
" अनेक मनोरूप शेतांत बीजरूप झालेले आहेत. हें बीज जरी गुप्तपणें

---

६ उपदेशकाचा अधिकार—हा अधिकार बहुधा प्रत्येक मनुष्यास चालवावासा वाटतो. परंतु मोठया दुःखाची गोष्ट ही आहे कीं आपलें उपदेशाचें पांडित्य दुसऱ्यांच्या वर्तनापुरतेंच असतें. खोटें बोलूं नये हें प्रत्येकास ठाऊक आहे व या तत्वाचा उपदेश प्रत्येकजण दुसऱ्यास करीत असतो. इतकेंच नव्हे तर इतरांच्या खोटेपणाबद्दल प्रत्येकास मनापासून चीडही असते. परंतु स्वतःच्या वर्तनांत या पांडित्याचा व ज्ञानाचा व चिडीचा किती अमल होतो? यास अपवाद असतील पण बहुधा सर्वत्र असाच प्रकार आहे. परंतु वास्तविक पाहतां उपदेशाचा अधिकार येण्यास अगोदर स्वतःचें वर्तन शुद्ध पाहिजे; स्वतःची सत्वशुद्धि होऊन सत्वनिष्ठा आली पाहिजे; आणि शुद्धाचारी व सत्वनिष्ठ उपदेशकाचे मात्र उपदेश फलद्रूप होतात ही गोष्ट प्रत्येक उपदेशकानें व शिक्षकानें लक्ष्यांत वागविली तर आपला भाग्योदय खचितच लौकर होईल.

" पेरिलें गेलें आहे तरी त्याचीं फळें ठिकठिकाणीं पाहून मला समाधान
" होतें आणि त्याकडे पाहून माझ्या कर्तव्याची अखेरीस मला ओळख
" पटल्याबद्दल परमेश्वराचे उपकार वाटतात. व पुढेंही या उद्योगाचीं
" फळें दृष्टोत्पत्तीस येवोत अगर न येवोत हाच उद्योग आपण चालवावा
" असें आतां माझ्या मनानें घेतलें आहे."

" जसें एखादें वडाचें उत्तम बीं चांगल्या जमिनींत पडून त्याच्या
" झाडानें आपल्या फांद्या चारी दिशांस पसरल्यावर त्यांचा पाखरांस
" आश्रय होतो; तसेंच सुविचाराचें बीज सुक्षेत्रीं रुजल्यानें अनेक सत्कृ-
" त्यांस आश्रयरूप होतें. आतां अनेक लोकांच्या कृतींत आलेल्या एखाद्या
" सुविचाराचें बीज माझ्याच डोक्यांत आलें असें कशावरून असा कदाचित
" प्रश्न उत्पन्न होईल. त्याचें उत्तर एवढेंच कीं हा उद्योग कोणाच्या तरी
" वांट्याचा होताच. व तो मूळ उत्पन्न झाला तेव्हां कोणाच्या तरी
" एकाच्या डोक्यांतच कांहीं तरी कल्पना येऊन त्याची उत्पत्ती झाली
" असली पाहिजे. मग ती कल्पना माझ्याच डोक्यांत कां आली नसेल?"
या लहानशा उताऱ्याबद्दल विचार करितां आम्हांस असें वाटतें कीं, या विलक्षण कागदांच्या पुडक्यांतून अनेक ठिकाणीं "मालमत्तेचें संरक्षण करणाऱ्या" मंडळीसंबंधानें बरेच उद्गार आढळतात; व पुन्हां त्यांचा मागमूस नाहींसा होतो. त्या संस्थेस उद्देशून तर ट्यूफेल्सड्राक साहेबांनीं हा मजकूर लिहिला नसेल ना? कारण त्यांची लहर केव्हां कोणीकडे फिरेल याचा नेम नाहीं. या संस्थेसंबंधानें ते एके ठिकाणीं म्हणतात, " अशी
" संस्था सांप्रत काळास अनुरूपच आहे; व एवढ्याशा थोडक्या काळांत जो
" तिचा प्रसार झाला आहे त्यावरून तर ही गोष्ट स्पष्ट होते. इंग्लंड, फ्रान्स
" जर्मनी वगैरे देशांतील उत्कृष्ट लोक जरी या संस्थेंत नसले तरी उत्कृष्ट
" नांवानें मोडणारे किंवा आडनांवाचे उत्कृष्ट लोक या संस्थेंत आहेत व
" त्यांपैकीं कांहीं पत्रव्यवहारादिकांनीं साहानुभूति दाखविणारे असून या संस्थेस
" चोहोंकडून पैशांची व लेखांचीही मदत होत असते. या संस्थेचा उद्देश
" जगांत शिल्लक असलेला सर्व प्रामाणिकपणा एकत्र करून त्याचा आत्मसंर-
" क्षणार्थ या (संस्थारूप) किल्ल्याभोंवतीं मोठ्या तजविजीनें गराडा घालावा
" असा आहे." मग या इतक्या महत्त्वाच्या 'आत्मत्व संरक्षक मंडळीचे' उत्पा-

दक आपण आहों असें सांगण्याचा तर टयूफेलसड्राक साहेबांचा वरील लेखांत मतलब नसेल ना ! व जर तसा मतलब असेल तर या संस्थेचें स्वरूप तरी काय आहे ? ते आणखी एके ठिकाणीं म्हणतात "हिब्रू लोकांच्या दहा "नीति नियमांत प्रमुख नियम म्हटला म्हणजे "चोरी करूं नये" हा "आहे, व त्याची योग्य तऱ्हेनें समजूत करून घेतली म्हणजे बाकीच्या "नऊ नियमांचाच काय, परंतु सोलॅन, लायकरगर्स, नेपोलियन,

---

७ सोलन—( ख्रि० पू० ६३८–५५९ ) अथेन्सचा कायदेकार व ग्रीसमधील सात-शाहण्यापैकीं एक. तो तत्त्वज्ञानाचा अभ्यास करून आपलें ज्ञान वाढविण्याकरितां अनेक देश हिंडला व कवि ह्मणून प्रसिद्धीसही आला. तो अथेन्स येथें परत आल्यावर पाहतो तों लोकांत दुही माजली असून संस्थानची अगदीं नासाडी झालीआहे असें त्यास आढळून आलें. मग "सलॅमिसची शिकस्त" या नांवाचें एक काव्य रचून तें त्यानें सार्वजानिक सभेंत लोकांपुढें वाचलें. त्याचा लोकांचे मनावर इतका विलक्षण परिणाम झाला कीं लागलेंच सलॅमिस शहर परत घेण्याकरितां स्वारी करण्याविषयीं ठराव करून त्या स्वारीचें सेनाधिपत्य लोकांनीं सोलनलाच दिलें. या स्वारींत फत्ते झाल्यामुळें लोकांची त्याजवर मर्जी बसली व त्यांनीं सर्वानुमतें सोलनला आर्कन (राजा) नेमून कायदे करण्याविषयीं पूर्ण हक दिला. हें जबाबदारीचें काम त्यानें मोठ्या शाहणपणाने सचोटीनें व सदयतेनें बजाविलें. हें कायदा करण्याचें काम संपल्यावर त्यानें दहा वर्षांची रजा घेतली आणि ईजिप्त व एशिया-मायनरमध्यें प्रवासास गेला. तो परत आला तेव्हां फिलिस्ट्रेटस हा कुलमुखत्यार राजा बनला असून त्याचेकडून लोकांस कांहीं अधिकार मिळतील असेंही दिसेना. ह्मणून सोलननें त्यासच साह्य होऊन त्यानें आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करूं नये असा बंदोबस्त केला.

८ लायकरगस ( मरणकाळ ख्रि० पू० ८७० )–स्पार्टा येथील कायदे करणारा. हा स्पार्टाचा राजा पालिडेक्टिस याचा भाऊ. पालिडेक्टिस मेला तेव्हां त्याची बायको यास राज्य देऊं लागली. परंतु लायकरगस ह्मणाला "मला राज्य नको, तूं गर्भिणी आहेस ह्मणून तो मुलगा मोठा होईपावेतों पाहिजे तर त्याच्या नांवानें मी राज्य चालवीन. त्याप्रमाणें पुतण्या वयांत येतांच त्याचें राज्य त्याच्या स्वाधीन करून तो इतर देशाचे कायदे रितीभाती वगैरे पाहण्यास बाहेर निघाला. स्वदेशीं परत आल्यावर तो पाहतो तों राज्यांत घोंटाळा झाला आहे; राजा तर मनसोक्त राज्य करण्याविषयीं झटत असून प्रजा पाहिली तर त्यास अगदींच जुमानीत नाहीं असें पाहून राज्यतंत्र सुधारण्याचें काम त्यानें पत्करिलें आणि अव्यवस्थित व पुंड लोकांस ताळ्यावर आणण्याजोगे कडक कायदे करून "मी परत येईपर्यंत हे कायदे पाळा" अशी लोकांस शपथ घालून आपण स्पार्टातून गेला तो कोणीकडे नाहींसा झाला त्याचा पत्ता नाहीं.

" जस्टिनिॲन[१] वगैरे कायदेकारांनीं, धर्माचार्यांनीं व नीतिशास्त्रकारांनीं ठरविले-
" ल्या व अनेक भयंकर शिक्षांनीं अमलांत आणिलेल्या सर्वच नियमांचा अंत-
" र्भाव या एका नियमांत होतो असें दिसेल. असें असतां सांप्रतकाळीं तो
" नियम नुसत्या शब्दरूपानें मात्र मनुष्यांच्या मनांत वागत असून
" चोरी करावी " हा त्याच्या विरुद्ध नियम फारच थोड्या आडपडद्यानें
" सर्वत्र पसरण्याचें काम फारच झपाट्यानें चाललें आहे! अशा सार्वत्रिक
" वेडसरपणाच्या या काळांत जे लोक शुद्धीवर असतील त्यांनीं एक-
" जुटीनें हात पाय हालविणें फारच अवश्य आहे. आज लोकांस खरा
" वाटण्यासारखा व अजून विद्यमान असलेला मालमत्तेवरील हक्कासंबंधीं
" एवढाच नियम उरला आहे; व त्याचीही मोठमोठ्या महत्वाच्या गोष्टींत
" सुद्धां समूळ पायमल्ली होत असून त्याला स्वार्थपर वर्तमानपत्रांची मंजुरी व
" प्रोत्साहन मिळत आहे. आणि आतां ' तुमच्या शरीरावरही तुमचा
" हक्क नसून केवळ प्रसंगवशात कांहीं अटींवर मात्र तें तुम्हांकडे राही-
" ल ' असेही उद्गार लोकांस निमुटपणें ऐकावे लागत आहेत. ' तेव्हां
" याची अखेर काय होईल ती उघड आहे; गरीब बिचाऱ्या कीटकप्राय
" माणसांची व्यवस्था धराधर करणाऱ्या व फांसावर चढविणाऱ्या
" लोकांच्या आयुधांनीं लागेलच. परंतु या मांसाहारी, मनुष्याहारी,
" मानवी विषसर्पांच्या तडाक्यांतून, अशी एखादी सार्वजनिक संस्था
" असल्यावांचून आपलीही सुटका होणें दुरापास्त दिसतें. म्हणून या
" संस्थेचे उद्देश, त्यांतील विषय व बक्षिसें याबद्दलचीं हस्तपत्रकें वर्त-
" मानपत्रांतून प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांवरून ही संस्था कोणीं काढिली,
" असा प्रश्न एकांतांत राहणाऱ्या विचारशील मनुष्यांस कदाचित येण्यासा-
" रखा आहे. पण अशा लोकांस आमची एवढीच विनंति आहे कीं,
" आश्चर्यांत गोंधळून अशी चिकित्सा करण्याचें तूर्त त्यांनीं बंद ठेवून
" एकाग्र चित्तानें हीं बक्षिसें मिळविण्याच्याच खटपटीस त्यांनीं लागावें हें बरें."

यावर आमचा असा प्रश्न आहे कीं, हें हस्तपत्रक किंवा या ' माल-

---

१ जस्टिनियन रोमचा बादशहा ( ४८३–५६५ ) यानें पूर्वीच्या व नवीन काय- द्यांचा मेळ घालून एक नवीन कोड तयार केलें. तेंच सर्वत्र आज आधारभूत मानितात.

मत्तासंरक्षक मंडळीचे दुसरे कोणचेही खात्रीलायक लेख स्वदेशी किंवा परदेशी वर्तमानपत्रांत कोठें तरी आमच्या वाचकांच्या पाहण्यांत आले आहेत काय? जर आले असतील तर हे बक्षिसाचे विषय कोणते आहेत, शर्ती काय आहेत व या बक्षिसांची व्यवस्था कोठें व केव्हां व्हाव-वयाची? या पुडक्यामध्यें तर या गोष्टींचा मागमूस कळण्यासारखा एकही छापील लेख दिसत नाहीं! न जाणों ट्यूफेलसड्राक साहेबांच्या तऱ्हेवाईक-पणाच्या विलक्षण गोष्टींपैकींच ही एक असून तिच्या योगानें त्यांनीं आम-च्याशीं लपंडाव तर मांडिला नसेल? काय असेल तें ईश्वरास ठाऊक.

हे अलीकडील भाग लिहित असतां आम्हांस एक शंका येऊं लागली आहे व तीमुळें हें चरित्र लिहिण्याची आमची हौसही बरीच मंदावली आहे, हें आतां वाचकांस सांगणें प्राप्त आहे. ही शंका कदाचित अगदीं शुष्क कारणावरून उत्पन्न झाली असेल. तरी टच्यूफेलसड्राक सा-हेबांच्या थट्टेखोरपणामुळें व उपरोधिक भाषणाच्या खोडी मुळें ती एकसारखी वाढत जाऊन आतां आह्मांस असें वाटूं लागलें आहे कीं या अपार थट्टेखोरपणाखालीं व एकांत एक गुरफटलेल्या असंख्य उपरोधिक गोष्टींखालीं या अल्प चरित्र-पर लेखांतील बराच अंश केवळ काल्पनिक तर नसेल ना? त्यांनीं आपल्या कारकिर्दींत घडलेल्या ह्मणून सांगितलेल्या इतक्या गोष्टी जर निवळ काल्पनिक असल्या तर काय वाट? जर या लेखांत प्रोफेसर साहेबांच्या चरित्राची लहानशीच पण हुबेहुब प्रतिमा नसून तिशीं सादृश्य असलेलें कांहीं वेडेंविद्रें चित्रच येथें दिलें असलें तर कसें? आम्हांस तर आतां असें वाटूं लागलें आहे कीं आपल्या चारित्राचें नुसतें सादृश्य दा-खविणारे हे कागद ह्यूसक्रेक साहेबांचे हातीं आत्मचरित्रपर लेख ह्मणून देतांना टच्यूफेलसड्राक साहेबांनीं त्यांची थट्टाच केली असेल; आणि हें जर खरें असेल, तर ह्यूसक्रेक साहेबांनीं ते घेऊन आपल्या बरोबर आम्हांसही वेड लाविल्याबद्दल त्यांस काय ह्मणावें हें आम्हांस कळत नाहीं. टच्यूफे-लसड्राक साहेबांसारखा परमगूढ विचारी व आंतल्या गांठीचा मनुष्य आपलें चारित्र मोकळ्या मनानें ह्यूसक्रेक साहेबांसारख्या अजागळ मनुष्यास देईल कसा व तें एखाद्या इंग्रज गृहस्थानें प्रसिद्ध करावें या गोष्टीस अनुमोदन

देईल कसा, याचा आम्हांस उमग होत नाहीं. आम्हांस तर आतां वाटतें कीं आपलें हृदयकपाट ह्यूसकेक साहेबांस व त्यांचे बरोबर आम्हांसही उघडून दाखविण्याचे ऐवजीं आम्हां उभयतांसही या चरित्र लेखांच्या नादांत गुंगवून या दोघां वेडगळ माणसांची या लेखांतील मजकुरानें कशी काय गंमत होते हें पाहण्याचाच प्रोफेसर साहेबांचा बेत असेल !

तरी पण या जोडीपैकीं एक तरी वेडा प्रोफेसर साहेबांचे हातीं लागतां लागतां मारामार दिसते. कारण पूर्वीं आम्हीं या कागदांपैकीं एक चिटोरें कोरें म्हणून फेंकून दिलें होतें, परंतु आज तें पुन्हा पाहतां त्यावरची शाई अंधुक अंधुक दिसत असून मोठ्या प्रयत्नानें लाविल्यावर त्यांत पुढील मजकूर सांपडला " तुमच्या ऐतिहासिक गोष्टींची व विशेषतः " विशिष्ट पुरुषाच्या चरित्रांतील गोष्टींची वास्तविक पाहतां कितीशी " किंमत आहे ? ज्यांना तुम्हीं ऐतिहासिक गोष्टी म्हणून मोठें संभावित " नांव देतां त्या केवळ बजरबट्टूसारख्या असून त्यांची माळ केल्यानें तुम्हांस " मनुष्याची माहिती होणार काय? मग मनुष्य जातीची माहिती होण्याची गोष्ट " तर लांबच राहिली ! अहो, मनुष्य म्हणजे त्याचे गळ्यांतल्या बजरबट्टूंचा " समुदाय नव्हे. मनुष्य म्हणजे त्याचे हातून घडलेल्या गोष्टी नव्हत; " तर ज्या शीलानें त्या गोष्टी त्याचे हातून घडविल्या तें शील हें त्या " मनुष्याचें खरें स्वरूप होय. त्यानें काय काय केलें ही मुद्द्याची " गोष्ट नसून त्याची आध्यात्मिक उन्नति कसकशी होत गेली ही मुख्य " मुद्द्याची गोष्ट आहे. एखाद्या पुरुषाचे चरित्रांतील गोष्टी ह्मणजे चित्रासारख्या " असून त्यांवरून त्यांस आधारभूत जें शील त्याचा बोध घ्यावयाचा " असतो. ही चित्रलिपी वाचतां येणारे लोक फारच विरळा आढळतात. " बहुतेक लोक निवळ शंख व आडाणी असतात. ते या चित्रलिपीखालीं " असलेल्या अर्थाविषयीं अगदींच बेफिकीर राहून हीं चित्रें चांगलीं " काढिलीं आहेत कीं नाहींत, हीं कृत्यें नीतिला अनुसरून आहेत कीं " नाहींत एवढेंच पाहतात. इतिहासशास्त्राविषयीं उपद्व्याप करणाऱ्या " बाकीच्या अर्धवट लोकांकडे पाहिलें तर त्यांची स्थिती यांच्याहूनही " कठीण दिसते. माझ्या पाहण्यांत कांहीं लोक असे आले आहेत कीं ते

" प्रथम रूसो सारख्यांचें चरित्र वाचून त्यांतील इंगित स्पष्ट करून दाख-
" विण्याचा आंव घालितात, व मग या चित्रलिपीच्या वाईटपणामुळें
" भुरळ पडून अनादि चैतन्यरूप जो शेष सर्प त्यासच ते सामान्य विष-
" सर्प असें समजून त्यावर धोपटे घालीत सुटतात !" आपल्याही चरित्रांत आपल्यामधील अनादिचैतन्यरूप शेषसर्पासंबधानें कोणीं अशीच चूक करील अशी तर भीती आमच्या प्रोफेसर साहेबांस पडली नसेल ना? म्हणून त्यांनीं त्या चरित्राचें मूळ स्वरूप बदलून त्यांत खोल अर्थाचे उपरोधिक मजकूर घालून तें चरित्र जास्त स्पष्ट चित्रासारखें केलें असेल?

---

१० रूसो—( १७१२--१७७८ ) एक प्रसिद्ध फ्रेंच ग्रंथकार. हा एका घड्याळजीचा मुलगा असून त्याचें शिक्षण एकमार्गी झालें होतें. तो प्रथम एका नक्षी खोदणाऱ्याकडे काम शिकण्यास राहिला होता. पण तो ह्मणतो, कीं " तेथें लबाड बोलणें व चोरी यावांचून मी कांहींच शिकलों नाहीं. " तेथून तो पळून गेला व त्यास अगदीं निराधार पाहून एका बाईनें त्यास आश्रय दिला. ही बाई पूर्वी प्राटेस्टंट मताची असून रोमन क्याथलिक पंथांत शिरली होती. तिच्या मनांत या पोराविषयीं विलक्षण उपकारबुद्धि उत्पन्न होऊन तिनें त्याला आपल्या खर्चानें ड्यूरिन येथील क्याथलिक मठांत शिक्षणार्थ ठेविलें. तेथून तो निघून एका बाईच्या घरीं हुजऱ्या होऊन राहिला. तीही लौकरच मेली. मग गाणें शिकविण्याचा धंदा करून त्यानें कांहीं दिवस उपजीविका केली. व पुढें व्हेनिस येथील फ्रेंचसरकारच्या वकिलाकडे प्रायव्हेट सेक्रेटरी ह्मणून होता. पुढें फ्रान्समध्ये परत आल्यावर त्यानें कांहीं दिवस बेनोकर राहून कंगाल स्थितींत काढिले; व मग डुपिनच्या तालुकदारास त्याची दया येऊन त्यानें त्यास आपल्या कचेरींत जागा दिली. १७५० त " शास्त्रांच्या व कलांच्या योगानें मनुष्याच्या नीतीस व शुद्धाचरणास मदत झाली आहे कीं काय " या विषयावर उत्कृष्ट निबंध लिहिल्याबद्दल डिजनच्या विद्यापीठाकडून त्यास बक्षीस मिळालें. यामुळें हुरूप येऊन " त्यानें मनुष्य जातींतील अन्यायाचें बीज " या विषयावरील आपला ग्रंथ लिहिला. पुढें " नाट्यकला, " "संगीत" व " फ्रेंच संगिताविषयीं विचार " हे ग्रंथ बाहेर आले. नंतर " न्यूहेलाय " या नांवाची पत्रव्यवहारात्मक कादंबरी प्रसिद्ध झाली. तींत अनेक अप्रतिम कथानकें असून कांहीं तर अगदींच भिकार आहेत. तथापि लोकाच्या जशा कांहीं उड्याच पडल्या. पुढें " एमिली " नांवाच्या नीतीपर कादंबरीनें तर तीवरही ताण केली. तींत रूसोनें " सृष्टीचें अवलोकन करून मनाच्या कलाप्रमाणें चालणें या सारखी दुसरी शाळाच नाहीं " असें प्रतिपादन केलें आहे. या ग्रंथांत खिस्ती धर्मांतील भविष्यें व अद्भुत चमत्कार यांवर खरमरीत टीका केली आहे. पारिसच्या पार्लमेंटनें हा ग्रंथ अनीतिकारक आहे असें ठरवून रूसोवर खटला केला; ह्मणून रुसो हा तेथून पळून स्वित्सरलंडांत गेला. पण तेथें त्याच्या मतांबद्दल त्याचा इतका छळ झाला कीं, तो पारिस येथें परत आला.

किंवा आमच्या प्रोफेसर साहेबांस अलंकारिक भाषा वापरतां आली कीं झालें. मग ती कोणीकडे कां वाहवेना ! अशांतलाच हा अर्धवट खरा, अर्धवट खोटा चरित्रात्मक लेख नसेल ना? या विषयीं निश्चयात्मक कांहींच सांगतां येत नाहीं. आणि आमचे प्रोफेसर साहेब इतके विलक्षण पुरुष आहेत कीं त्यांच्या विषयीं कोणासही झालें तरी निश्चयात्मक असें कांहींच सांगतां येणार नाहीं. ही आम्हांस आलेली शंका जर अगदींच निराधार असेल तर या चुकीचा दोष सर्वस्वीं प्रोफेसरसाहेबांचे तऱ्हेवाईकपणाकडे आहे. कारण प्रस्तुत कामांत आम्हांस तर इतका चौकसपणा असलाच पाहिजे.

पण हें कसेंही असो आम्ही आतां अगदींच हातटेंकीस आलों असून दमून गेलों असल्यामुळें हीं पुडकीं तूर्त आम्ही बांधून ठेवितों. आतां ट्यूफेल्सड्राक साहेबांच्या स्वभावास कायम स्वरूप आलें असून त्यांत महत्वाचे फेरफार होण्याचा पुढें अगदींच संभव नाहीं. म्हणून टूयूफेल्सड्राक साहेबांची आम्हांस इतकी माहिती झाली आहे तेवढी बस आहे. अर्थात, ते म्हणतात त्याप्रमाणें त्यांनीं केलेल्या कृत्यांची आम्हांस कांहींच माहिती नाहीं. पण त्यांचे शील कसकसें बनत गेलें हीच गोष्ट त्यांचे मतें महत्वाची असून ती आम्हांस कळली आहे. हा कोशाचे अंड्यांत सांपडलेला किडा बाहेर येऊन त्यास पंखहि फुटले.आतां तो हवा तिकडे गेला तरी त्याचें स्वरूप कायम राहाणारें आहे.ट्रयुफेलसड्राक रूपी पतंगानें कसकशा भराऱ्या मारीत किंवा नुसतें हवेवरच तरंगून आपली विसिनिचट्रवो येथील प्रोफेसरची जागा मिळविली व त्यांच्या कायम बनलेल्या स्वभावरूपी पंखांवर सामान्य व्यावहारिक कामाचे रंगाचीं आभरणें कशीं पडलीं या गोष्टींचा तपास करण्यांत आतां आम्हाला अर्थ दिसत नाहीं. कारण अशा तपासाच्या नादांत कदाचित आपण भलतीकडेच वाहवत जाऊं हें एक, आणि हा तपास लागणें आम्हास तरी असंभाव्य वाटतें. परंतु आह्मीं या चरित्राचा नाद सोडला तो याच गोष्टीमुळें सोडला असें मात्र कोणीं समजूं नये. कुसुमावतीच्या प्रणयरूपी कड्यावरून त्यांच्या चरित्रनदीनें उडी घेतल्यावर मग ती बाष्परूप झाली: त्या स्थितींत जरी ती राहती तरी आमच्या कामास हरकत झाली नसती. पुढील थोडींशीं डबकीं व झरे पाहून तिचा सामान्य रोंख आपणास कळला एवढें पुरे आहे. शिवाय कोणच्या ना कोणच्या मार्गानें ही वाफ पुन्हां

जमून तिचा प्रवाह बनला व विसिनिच्टवो येथें तिचें पात्र खोल व शांत झालें असून त्यांत आतां वस्त्ररहस्यादिकांची गर्दी झाली आहे हेंही आपणास ठाऊक आहे. व जो कोणी प्रत्यक्ष पाहण्याची तसदी घेईल त्यास हें सर्व आज दिसेलही. या कागदरूपी मातीशीं मिसळून असलेलीं पुष्कळ अमोल्य रत्नें आपणांस या चरित्रखाणींत सांपडलीं, व समयविशेषीं आणखी कांहीं पारखून पहावीं लागतील व योग्य ठिकाणीं कोंदणांत जडवावींही लागतील-तोपर्यंत आमचें खोरें कुदळें एकीकडे ठेवून हें कंटाळवाणें खणण्याचें काम तूर्त आह्मी बंद ठेवितों.

आतां वस्त्रहरस्य ग्रंथ पुन्हा उघडण्याचे अगोदर या दहा भागांत त्या ग्रंथांतील विषयाची नीट समजूत होण्याचे कामीं आपली कांहीं प्रगती झाली कीं नाहीं हें विचारपूर्वक पाहिलें तर आपली अगदींच निराशा होण्याचें कारण नाहीं. यमसदनाजवळ मृत्यूनें बांधलेल्या पुलाची उपमा या आमच्या कृतीस आह्मीं पूर्वीं दिली आहे. तीच उपमा कायम ठेवून आह्मांस इतकें सांगतां येईल कीं, आतां आह्मी बरींच पिपें एकमेकांस जोडून तयार केलीं आहेत, पण अजून तीं पाण्याचे पृष्ठभागावर अव्यवस्थितपणें तरंगत असल्यामुळें दोर ताणून बांधल्यावर हा पिपांचा पूल किती लांब पोहोंचेल याचा आज नुसता अजमास मात्र करितां येण्यासारखा आहे.

आमचा स्वतःचा अजमास इतका होतोः—पुष्कळ लहान लहान झरोक्यांतून ट्यूफेल्सडाक साहेबांचें अंतरंग आतां आपणांस दिसलें आहे. हा विलक्षण, गूढ, व नजरबंदी जादूच्या पसाऱ्यासारखा त्यांचा सृष्टीचा नकाशा आपले पाहण्यांत आला असून तो कसकसा काढला गेला याविषयींही आज आपणांस अगदींच माहिती नाहीं असें नाहीं. कालासंबंधीं त्यांच्या अचाट कल्पना विचारणीय असून विचाराअंतीं त्या अगदींच आपल्या समजुतींत येणार नाहींत असें नाहीं. व हळुहळू त्यांचेंपासून बरींच अर्थनिष्पात्ति होण्याचा संभव आहे. त्याचप्रमाणें त्यांची सृष्टीची विशेष कल्पना आणि सृष्टीचे एकव्यक्तित्वाविषयींचा सिद्धांत, या गोष्टी तर वरच्या गोष्टीपेक्षांही जास्त फलद्रूप होणाऱ्या आहेत. ही सर्व सृष्टी व तींतील चैतन्य या ताण्याबाण्यांचें मिळून एक वस्त्र झालें आहे; हें सजीव वस्त्र काळरूपी मागावर विणण्याचें काम अव्याहत चाललें आहे; वगैरे विधानांतच वस्त्ररहस्य ग्रंथाचा सांगाडा नाहीं काय? या तत्वांस या ग्रंथाचा सांगाडा असें जरी ह्मणतां न आलें; तरी या ग्रंथरूप

इमारतीचा आराखडा ( जमिनीवरील मोजमाप ) तरी या तत्वांत नाहीं काय ? त्याचप्रमाणें असला ग्रंथ समजण्याला ग्रंथकर्त्याच्या स्वभावाची माहिती अवश्य आहे. ती आपणांस पूर्वीं कांहींच नव्हती; पण आज त्या पुरुषाच्या स्वभावाचें पहिलें गूढत्व नाहींसें झालें आहे. आणि त्याच्या स्वभावास जरी आंतल्या गोंधळामुळें इतकें नवीन गूढपण आलें असून त्यास कांहींसें वेडसर पणाचेंही स्वरूप आलें आहे, तरी त्यांतहि अनिवार्य आवेश व अपार पूज्यबुद्धि हीं दोन टेंकड्यासारखीं दिसत असून त्यांच्या भक्कम पायावर त्यांच्या स्वभावाची बाकीची इमारत उठलेली आहे.

हें ट्यूफेल्सड्रूक साहेबांचें आत्मचरित्र खरें नसून सादृश्यदर्शक चित्रालिपीमय असावें अशी अपणांस आलेली शंका जरी खरी धारिली तरी या चरित्रावरून हा पुरुष वस्त्ररहस्यग्रथ लिहिण्याकरितांच निर्माण झाला असावा असें अनुमान होतें. कारण वस्तूंचें बाह्यस्वरूप सोडून देऊन त्यांचे अंतःस्वरूप पाहण्याचे प्रसंग त्यास आणून केवळ भवितव्यतेनेंच हें अंतःस्वरूप त्यास पहावयास लाविलें. जन्मतःच जी प्रकृतीवशतेची तटस्थ वृत्ती त्यास प्राप्त झाली होती तिला त्यांच्या दैवयोगांतील अनेक चढउतारांनी वेळोवेळीं साह्यच होत गेलें; आणि पाण्यांत तेल टाकलें असतां जसें तें अलिप्त राहून पाण्यांतील अंतस्थ हालचालीपासून अलग राहतें, त्याचप्रमाणें या दैवयोगामुळें ट्यूफेल्सड्रूक साहेबही समाजांतील अनेक गडबडीपासून व प्रपंचांतील नेहमींच्या व्यावहारिक कर्मकांडापासून अलिप्त राहून एकांतांत ज्ञानयोगानें त्यांनीं आयुष्यक्रमण केलें; व जीं दुःखें केवळ अपरिहार्य आहेत व ज्यांचें निराकरण शक्य नाहीं तीं शांतपणें भोगण्याच्या कामाकडेच त्यांच्या आयुष्यांतील सर्व जोम लागला. याप्रमाणें जिकडे पहावें तिकडे वस्तूंच्या बाह्यस्वरूपांनीं त्यांस त्रासवून सोडिलें, त्यांचे मार्गांत अडथळे आणिले व त्यामुळें अखेरीस समूळ नाश होतो कीं काय अशीही त्यांस भीति पडली. आणि वस्तूंच्या सत्यस्वरूपाकडे मोठ्या धैर्यानें लक्ष्य पोहोचविल्यानेंच त्यांस शांतता व धैर्य यांचा लाभ झाला. या बाह्यस्वरूपांतून किंवा वरच्या प्रावरणांतून आंतील खऱ्यावस्तूकडे लक्ष्य पोहोंचविणें हेंच वस्त्ररहस्याचें मूळ नव्हे काय ? आणि वस्त्ररहस्यांतील तत्वज्ञानाचा अखेर रोख कोणत्या स्थळाकडे आहे, व असल्यायुगांत अशा मनुष्यास त्याचें स्वरूप कशारीतीनें भासलें असेल, याचेंही किंचित ज्ञान आपणास झालें नाहीं काय ?

आतां तिसऱ्या पुस्तकाचे पाहिरीवर चढतांना आपणास कोणत्या दिशेनें जावयाचें आहे याचा साधारण तर्क आमच्या सूज्ञ वाचकांस झाला असेलच. आणि ट्यूफेल्सड्राक साहेबांबरोबर जरी आपणास या स्वप्नोद्यानांतील विलक्षण अरण्यांत भटकावें लागेल तरी तेथेंही मधून मधून अचुक दिशा दाखविणारा जो ध्रुवाचा तारा तो आपणांस खचित दिसेल अशी आह्मांस आशा आहे.

---



# पुस्तक तिसरें.

## भाग पहिला.

### एक अर्वाचीन इतिहासांतील गोष्ट.

टच्यूफेल्सड्राक साहेबांस सृष्टींतील वस्तुचमत्कार फार आवडत असून वस्तुचमत्कारांविषयीं त्यांस चिकित्साही फार आहे, ही गोष्ट **वस्त्ररहस्याचे** बहुतेक आरंभापासूनच आपल्या नजरेस येत आहे; आणि दैवदुर्विलासांमुळें त्यांस कितीही वेड लागल्यासारखें झालें असलें, तरी अशा स्थितींत सुद्धां जगांतील गूढ व अनिर्वाच्य अशा चमत्कारांकडे ते एकसारखे प्रेमानें व सखोल दृष्टीनें पहात असतात. त्याचप्रमाणें प्रत्येक लहान मोठ्या इंद्रियग्राह्य विषयांत इंद्रियांचे संबंधानें जसें त्यांस वरपांगीं **वस्त्रस्वरूप** दिसतें; तसेंच या वस्त्रस्वरूपाचे द्वारां त्यांतील **चैतन्यही** त्यांस दिसतें; ही गोष्ट फार विलक्षण आहे. एकीकडे पहावें तों, पदार्थांच्या **बाह्यस्वरूपरूपी** चिंध्या व आपल्या इंद्रियांस मोह पाडणारी त्या चिंध्यांस लागलेली बेगड, यांस तो पायानें चिखलांत तुडवीत आहे; तोंच इकडे त्या बाह्यस्वरूपाच्या आधारभूत **चैतन्यास** सर्व पार्थिव शक्तींहून अधिक मानून तें कितीही नीच व्यक्तींत दिसलें तरी त्याचें तो मोठ्या श्रद्धेनें पूजन करीत आहे! सृष्टीच्या या सर्व सामान्य **जामदारखान्यांत** ( कपडे ठेवण्याचे खोलींत ) अशा रीतीनें आग पाखडून आमच्या प्रोफेसर साहेबांस कोणचा इष्ट हेतु साध्य करावयाचा आहे, सुधारलेल्या समाजाचे व त्यांतील बुद्धिवैभवाचे सर्व कपडे अशा रीतीनें फाडून जाळून त्यांस काय करावयाचें आहे, हें पाहण्याकडे आमच्या वाचकांचे डोळे लागले असतील. कारण टच्यूफेल्सड्राक साहेब स्वतः **दिंगंबरी** मताचे नाहींत; किंवा सर्व लोकांनीं आपल्या शरीराचे व मनाचेही कपडे फेंकून देऊन पुनश्च रानटी स्थितींत शिरावें, असें रूसोप्रमाणें (पान २५८) सांगण्याचाही त्यांचा हेतु नाहीं; तेव्हां त्यांचा मतलब तरी काय

१ आदमी धर्म—किंवा दिगंबरी मत—पु० १ भा० ९ टीप १ व २.

असावा ' असा प्रश्न साहजिकच येतो. व या वस्त्ररहस्य ग्रंथाचें धोरण तरी हाच प्रश्न उकलून सांगण्याचें आहे.

परंतु हें धोरण या ग्रंथांत स्पष्ट केलें नसून तें स्पष्टपणें लोकांस समजावें इतकी सामुग्री मात्र या ग्रंथांत सिद्ध केली आहे; ही गोष्ट वाचकांनीं विसरतां कामा नये. कारण, आम्ही झालों तरी आपल्या वाचकांस टच्यूफेल्सड्राक साहेबांनीं निर्दिष्ट केलेल्या सुवर्णभूमीवर नेऊन तेथील सोन्याच्या खाणी मात्र दाखविणार आहों. त्यांतील सोनें आम्ही खणून देणार नाहीं. व आम्हीं कितीही खणलें तरी तें संपणारही नाहीं. म्हणून तेथें गेल्यावर प्रत्येकानें आपलें भांडार भरण्याकरितां स्वतःच हवें तेवढें खणलें पाहिजे.

शिवाय प्रोफेसर साहेबांच्या या सुवर्णभूमींत हिंडण्याला सरळ सुगम सडका अगर घाट सांपडतील, असेंही नाहीं. कड्याकड्यांवरून लांब लांब ढेंगा टाकीत व उड्या मारीतच आपणास गेलें पाहिजे. आपल्या मार्गाचा क्रम लक्षांत येण्यासारख्या स्पष्ट खुणा कांहीं ठिकाणीं दिसतात खऱ्या; पण त्यांकडे फार चौकस दृष्टीनें व सर्व प्रदेशाच्या विस्तारावर नजर पोहोंचवून सुज्ञ वाचकांनीं सर्व वाटेचें अगोदर अजमासानें धोरण बांधलें पाहिजे, व एका ठिकाणावरून दुसऱ्यावर उडी पोहोंचेल अशा बेतानें स्थळांची निवड केली पाहिजे. मग, आपल्या कामास पूर्वीं पुलाची उपमा दिली आहे त्याप्रमाणें हीं ठिकाणा ठिकाणांमधील अंतरें जोडिलीं, ह्मणजे साधारण जाण्यापुरता मात्र पूल होईल. आजपर्यंत आपण अशाच रीतीनें प्रवास केला आहे व पुढेंही आपणाला याच पद्धतीनें गेलें पाहिजे. अशा स्पष्ट ठिकाणांपैकीं हें पुढें एक आहे, तें वाचकांनीं अगोदर आपलेंसें करून घ्यावें.

आमचे प्रोफेसर साहेब ह्मणतात, " अर्वाचीन इतिहासांत अत्यंत मह- " त्वाची गोष्ट ह्मटली ह्मणजे वर्म्स[2] येथील दरबार, किंवा आस्टरलीट्झ[3],

---

२ वर्मस येथील धर्मपरिषद—"सन १५२१ त वर्मस येथें जर्मनीचा बादशहा पांचवा चार्लस याच्या अध्यक्षतेखालीं धर्मपरिषद भरली होती. तींत ता. १७ एप्रिल रोजीं लूथरनें ( पु० ३ भा० ७ टी० ९ ) कांहीं भीड नधरितां ख्रिस्ती धर्मांतील अत्याचार व्यक्त केलें हीच सांप्रतच्या इतिहासांतील फार मोठी गोष्ट होय" कार्लाइल—वीरपूजन.

३ आस्टरलिट्झ—येथें १८०५ त नेपोलियननें ( १।७।४ ) इंग्लंड, आस्ट्रिया, व रशिया यांचा पराभव केला.

" वाटरलू, पेटरलू अगर इतर ठिकाणच्या लढाया नसून सर्वांत महत्त्वाची
" गोष्ट जार्ज फार्क्स यानें आपल्यास कातड्याचा पोषाख केला ही
" होय. या गोष्टींकडे बहुतेक इतिहासकारांनीं दुर्लक्ष केलें असून बाकी-
"च्यांनी तिला हास्यास्पद ठरविलें आहे. हा पुरुष क्केकर पंथाचा मूळ
" उत्पादक असून त्याचा धंदा जोडे शिवण्याचा होता. कांहीं लोकांस
" दिव्य तत्त्व कांहीं तरी स्वरूपानें प्रकट होऊन अज्ञान आणि पार्थिव
" हीनत्व यांच्या आवरणांतून तें त्यांच्या अंतरंगांत प्रवेश करून तेथें
" कांहीं अनिर्वाच्य तेजानें प्रकाशतें. अशा लोकांस ऋषी, अवतारी पुरुष
" व कधीं कधीं तर देव असें मानितात. जार्ज फाक्स हाही पुरुष अशाच
" योग्यतेचा होता. तो आपल्या दुकानांत बसून कमावलेल्या कातड्याचें
" शिवण काम करीत असे. सभोंवती सांडस, रोगणाची शिंगटें, राळ,
" डुकरांचे केसाच्या कुंचल्या वगैरें त्याच्या धंद्यांत लागणारें पुष्कळ सटर-
" फटर सामान पडलेलें असे. तथापि त्यास सचेतन ह्मणण्यास योग्य असा
" आत्मा होता. आणि त्याच्या जवळ ईश्वरी स्फूर्तीनें निर्माण झालेल्या धर्म
" ग्रंथाची (बायबलची) एक पोथी असे; व या ज्ञानाचे खिडकींतून आपलें
" कायमचें वसति स्थान जें वैकुंठ त्याकडे तो नजरही पोहोंचवी. रोज एक
" जोडा शिवावा, तेव्हां भाकरीची व याची गांठ पडे. कातडे कमवि-

---

४ वाटरलू येथे १८१५ त इंग्लिश सरदार वेलिंगटन यानें नेपोलियनचा मोड केला (पु० १ भा० ७ टी० ४)

५ पेटरलू. मँचेस्टर येथील सेंटपीटरच्या शेतांत १८१९ मध्यें लँकेशायरच्या लोकांनीं कट चालविला होता त्यांस लष्करी टोळीनें हाकून लाविलें. वाटरलूची लढाई नुकतीच झाली होती त्या नांवाचें अनुकरण करून या गोष्टीस पिटरलूची लढाई असें थट्टेनें म्हणत.

६ जार्ज फाक्स—क्केकर नांवाच्या खिस्ती पंथाचा मूळ उत्पादक (१६२४–१६९०). याला प्रथम एका धनगराकडे ठेविलें होतें. पण पुढें तो जोडे शिवण्याचें काम शिकून तोच धंदा करीत असे. १६४३ त तो धर्मचर्चेकरितां बाहेर हिंडूं लागला व १६४७ त लोकांतील दुराचारांविषयीं व धर्माचार्यांच्या वर्तनाविषयींही चर्चा करूं लागला. त्याच्या उपदेशाचें तत्व असें असे कीं, आपल्या अंतरंगांत असलेला विवेक रूपी देव हाच खरा तारक असून ज्यांच्या अंतरंगांत तो नांदत असेल तेच धर्माचार्यांचे पदवीस योग्य होत. या त्याच्या निर्भिड चर्चेवरून त्यास अनेक प्रसंगीं कारागृहवास भोगावा लागला. त्याच्या अनुयायांच्या भाषण समयींच्या विलक्षण आवेशावरून व अंगविक्षेपांवरून त्याच्या पंथास क्केकर हें नांव पडलें.

" ण्याच्या कसबाविषयीं त्याची फार प्रसिद्धी असे. व पुष्कळ दिवस सचोटीनें
" राहिल्याबद्दल त्यास त्या खेड्यांत पंचाचा अधिकारही असे. पण एवढ्यानें
" त्याचें समाधान होईना. कातड्यास भोंकें पाडणें व हातोड्यानें ठोकणें
" हा व्यवसाय तर दिवसभर चाललाच असे; तरी तो करीत असतांच
" **स्वर्गलोकींचे** व **यमसदनाचेंही** कारभार त्याचे कानीं येत. **स्वर्गींचे**
" दिव्य **तेज** व **यमसदनांतील** भयंकर **तम** हीं त्यास नेहमीं प्रत्यक्ष दिसत.
" कारण, आह्मीं वर सांगितल्याप्रमाणें हा चांभार नुसता नांवाचाच नव्हे
" तर **खरा मनुष्य** असून, मनुष्य जन्मास येऊन त्या **अनाद्यंत** परमेश्व-
" राच्या या **विश्वरूपी** देवालयांत आपणास कांहीं **काम** करावयाचें
" आहे, असें त्यास वाटे. ह्मणून या देवालयाविषयीं त्यास अनिर्वाच्य
" श्रद्धा असे.

" लोकांचे **आध्यात्मिक** हिताविषयीं जपण्याकरितां व **गूढ धर्मतत्त्व**
" लोकांस समजावून देण्याकरितां नेमलेले कांहीं धर्मोपाध्यायही त्याच्या आजू-
" बाजूस असत. त्यांकडे हा चांभार धर्मग्रंथांतील आपल्या शंकांचें निरा-
" करण करून घेण्याकरितां जाई. परंतु ते त्याच्या शंकांचा कंटाळा करून
" त्यास सांगूं लागले कीं " तूं मद्य प्राशन करून तरुण युवतींशीं नाचरंग
" कर; म्हणजे तुझ्या शंकांचें आपोंआप निवारण होईल." अंधळ्यांचा
" अंधळा वाटाड्या म्हणतात, त्याचा मासला हा पहा. कारण, **पोट** आणि
" त्याचे **साह्यकारी अवयव** एवढेंच जर खरें तत्त्व असतें; आणि **खूप**
" **खावें** आणि **जिरवावें** यांतच जर **मनुष्यजन्माचें सार्थक्य** असतें; तर
" मग उपाध्यायांचा रोजमुरा, त्यांस सरकारांतून मिळणारे उंची उंची
" पोषाख, प्रार्थनामंदिरांचे दुरुस्तीकडे व आंतील धार्मिक गोष्टींकडे लाग-
" णारा अवाढव्य खर्च, यांचें काय प्रयोजन होतें ? असो, बिचारा **फाक्स**
" खट्टू व निरुपाय होऊन, मनांत असल्या **धर्मगुरूंबद्दल** कष्टी झाला आणि
" दुःखाश्रूंनीं त्याचे डोळे भरून आले; व तसाच तो आपल्या दुकानाकडे
" तडक परतला, व आपल्या **जिवावर** जें **शंकारूप** पर्वतांचें ओझें आहे
" त्याचें निवारण होऊन आपणांस **मोक्षमार्ग** कसा सांपडेल याची विवे-
" चना करूं लागला. हे **शंकांचे** पर्वत **हिमालया**सारखे मोठे होतें. परंतु
" आंतला **आत्माही सचेतन** होता, ( आणि आंतील **आत्मतत्व जागृत**
" आहे तोंपर्यंत हा **जीवात्मा** कसल्याहि ओझ्यास डगत नाहीं.) त्यामुळें

" दिवसाचे दिवस व रात्रीच्या रात्री आपल्या सर्व शक्तीनें या ओझ्या-
" खालून निसटण्याकरितां त्याची एकसारखी धडपड चालली होती. त्या
" योगें हे पर्वत बराच काळपर्यंत इकडून तिकडे व तिकडून हिकडे कोल-
" मडत राहून अखेरीस त्याखालीं सांपडलेल्या बिचाऱ्या जीवाची सुटका
" होऊन त्यास दिव्य दृष्टी प्राप्त झाली ! तुमच्या **धर्माचार्यांचे वाडे** व
" **मोठमोठीं क्षेत्रे**, हीं वास्तविक पाहतां त्या **चांभाराच्या दुकानापुढें**
" तुच्छ प्राय होत. असो; **फाक्सनें** अतिकष्टी होऊन मनांत विचार केला
" कीं " असल्या बंधनांत असली धोंड वागवून हजारों गोष्टींची खटपट
" करावी, लोकांचें ऋणी व्हावें, आणि इतकेंही करून, वाद्या, चिंध्या
" व सुकतळें, यांचे पसाऱ्यांत बसून फायदा काय ? तर मला हालतांही
" येऊं नये, आणि दिसूंही नये ! मी स्वतःच्या कामाचा बिलकूल नसून
" जगांत नुसता भारवाहकच आहे ! इकडे काळ तर सपाट्यानें पाठीस
" लागला असून, स्वर्ग पहावा तर अतिशय उंच आहे, व तेथें जाण्याची
" शक्ति नाहीं. नरक लोक पहावा तर तो अति खोल असून तेथल्या
" नुसत्या कल्पनेनेंच आंगावर शहारे येतात. अशा स्थितींत तुझी गती
" लागावी कशी ? नीट विचार करून पहा. तुला विचारसामर्थ्य असेल
" तर **ज्ञानप्राप्तीनें**च तुझी गती लागेल. काय म्हणतोस ? तुला विचार
" करण्यास सामर्थ्य नाहीं ? कां नाहीं ? कोणीं तुला बांधलें आहे? दारि-
" द्र्यानें ! अरे दारिद्र्य कशाचें ? सर्व जगांत जितके जोडे खपतात, तित-
" क्यांच्या किमतीची जरी तुझे पुढें रास घातली, तरी त्यानें हा भवसागर
" तरून दिव्य लोकांत तुझा प्रवेश होईल काय ? नाहीं. दिव्यज्ञानप्राप्तीनें
" व सद्गद अंतःकरणानें ईश्वरचिंतन केल्यानें मात्र तुला गती मिळेल.
" तर ऊठ; हो चालता रानांत. राहण्यास तेथें झाडाच्या ढोली आहेत.
" निर्वाहास कंदमुळें आहेत. आतां थंडीकरितां एक कायमचें चर्मांबर झालें
" तरी पुरे आणि असें चर्मांबर तुला शिवतांही येईल ! "

टचूफेलसड्राक साहेब ह्मणतात, "ऐतिहासिक चित्रांचे साह्यानें लोकास इति-
" हासज्ञान करून देण्याची कला मी शिकलों नाहीं. ह्मणून ही **फाक्सची गोष्ट**
" अशा ऐतिहासिक चित्रांस योग्य विषय आहे कीं नाहीं, हें मला निश्चयात्मक
" सांगतां येणार नाहीं. परंतु अज्ञान तमांत फसलेल्या व त्याचे क्लेशांतून सुटका
" होण्याविषयीं निराश झालेल्या आत्म्याचे ठायीं स्वातंत्र्याची प्रभा फांकून

" त्या प्रभेनें तो आपले क्लेश हलके करून या तमोमय प्रदेशासही उ-
" ज्वळ करूं लागला, ह्मणजे ती गोष्ट मात्र माझ्या मतें इतिहासदृष्ट्या
" खरी महत्वाची होय. ह्मणून अंजेलों[7] किंवा रोझा सारखे उत्कृष्ट चि-
" तारी जर आज कोणी असले तर त्यांनीं आपल्या मार्मिक दृष्टीचें व
" कल्पनाशक्तीचें साफल्य करून या प्रसंगाचें एखादें अनुपम चित्र काढिलें
" तर तें किती मोहक होईल ! हा **जार्ज फाक्स** येथें आपल्या फरांडीवर
" ( कातडे कापण्याचा फळीवर ) एक कातडें अंथरून बेतीत आहे, इकडे
" हें सर्वांगास पुरणारें विलक्षण चर्मांबर तो शिवीत बसला आहे; तें चर्मांबर
" आंगांत घालून येथें तो आपल्या अरीस ( कातडे कापण्याचे हत्यार )
" शेवटचा निरोप देऊन ठेवीत आहे ! वाहवा ! अरे **फाक्स**, शाबास तुझी!
" या तुझ्या चर्मांबरांतील प्रत्येक टांच्यानें **दास्य, संसार,** व **द्रव्यपूजा**
" यांस कायमची जखम होत आहे ! हें चर्मांबर शिवीत असतां तुझा हात
" हालत आहे; पण मला वाटतें कीं ज्यांत दंभानें आपली वखार मांडून
" चिंध्यांचा बाजार पसरला आहे, अशा या **संसाररूपी कारागृहा**च्या भोंव-
" तालच्या विस्तीर्ण खंदकांतून मोक्षाचे तीरास जाण्याकरितां पोंहत अस-
" तानाच हे तुझे हात हालत आहेत! हें काम कांहीं सामान्य नव्हे. साधलें

---

७ मायकेल अंजेलो बोनारोटी—( १४७५--१५६४ ) इटालींतील अतिप्रख्यात कारागीर. फ्लारेन्सचा राजा लारेंझो डी मेडिसाय यानें अंजेलो पंधरा वर्षांचा असतां त्याचे गुण पाहून त्यास आपल्या पदरीं ठेविलें. या उदार पोशिंद्याच्या मृत्यूनंतर तो पोपसाहेबांच्या पदरीं होता. त्याच्या आयुर्मर्यादेंत चार पोप झाले पण प्रत्येकाची त्याजवर अत्यंत मर्जी असे. त्याचें हातचीं कामें पुष्कळ असून तीं फार नामांकित आहेत. त्यां पैकीं मँचुआ येथील "निद्रिस्त मदन" व रोम येथील "बॅकस" ( देव ) हीं खोदींव कामें फारच प्रेक्षणीय आहेत. "अखेरची न्यायसभा" हें त्याचें चित्र सर्व जगांतील चितार कामांत अजून पहिल्या नंबरचें आहे ! त्याच्या खोदींव व चितारकामांत सर्व प्रकारचें लावण्य व मोहकपणा आहे. त्याच्या कामांत अतिशयोक्तीचा दोष आहे पण तो गुणांखालीं झांकून जातो.

८ सालव्हेटर रोझा--( १६१५-१६७३) एक विख्यात इटालींतील चित्रकार. लढाया, समुद्रावरील देखावे, वनशोभा, व लुटारू लोकांच्या टोळया यांचीं त्यानें काढिलेलीं चित्रें अगदीं अपूर्व आहेत. त्याच्या हातचा एक देखावा इंग्लंडांतील न्याशनल ग्यालरी नांवाच्या संग्रहालयांत आहे.

" तर या विस्तृत युरोपांतील एक मनुष्य तरी बंधमुक्त होईल ! आणि हें
" भाग्य तुझ्या वांट्यास यावें हें केवढें नशीब !

" याप्रमाणें अतिनीच स्थितींतून सुद्धां सर्व स्थितींत श्रेष्ठ स्थिति जो
" मोक्ष, त्याप्रत मार्ग असून गरीब लोकांनाही तो खुला आहे,
" आणि जर डीअलेंबर्ट[९] म्हणतो त्याप्रमाणें माझा नांवकरी प्रसिद्ध

---

९ डि अलेंबर्ट ( १७१७–१७८३ ) प्रख्यात फ्रेंच गणिती व तत्ववेत्ता—हा एका व्यभिचारिणीचा मुलगा असून तिनें त्यास उपजतांच चोरून " जान डि रँड"चे देवळा-जवळच्या रस्त्यावर टाकून दिलें होतें, म्हणून तो सांपडला तेव्हां सरकारी अधिकाऱ्यांनीं त्यास " जान डिला रँड डि अलेमबर्ट " हेंच नांव ठेवून एका तावदानवाल्याच्या बायकोच्या हवालीं केलें. पुढें हें मूल माझें आहे असें सरकारांत कळवून त्याच्या बापानें त्याच्या संगोपनाचा खर्च देण्याचें कबूल केलें. त्याची दाई त्यास "मेल्यावर आपलें नांव लोकांनीं घ्यावें म्हणून आपल्या हाडांचीं काडें करणारा शहाणा गाढव " असें उपाहासानें म्हणे. असो, तो बारावर्षांचा असतां त्यास कालेजांत घातलें. तेथें त्यानें " एपिसल टु रोमन्स " या सेंटपालच्या लेखावर टीका केली ती वाचून लोक अगदीं थक्क झाले. पुढें तो गणिताच्या नादीं लागला. त्यांतही त्यानें चांगलीच मजल मारिली. कालेज सोडल्यावर पुन्हां तो आपल्या दाईच्या घरीं आला व तेथें सालिना बाराशें फ्रँकच्या उत्पन्नावरच संतोष वृत्तीनें चाळीस वर्षें राहिला. " तूं कायद्याचा अभ्यास करून या दारिद्र्यांतून मोकळा हो " म्हणून त्याचे इष्टमित्र त्यास सांगत पण त्याची संतोषवृत्ती ढळली नाहीं. त्यानें कायद्याची परीक्षा दिली पण लौकरच तो व्यवसाय सोडून आपल्या आवडीचा पदार्थविज्ञान हा विषय घेऊन त्याचा अभ्यास करूं लागला. मग पुन्हां गणित शास्त्राचा अभ्यास केला. १७४१ त बहुमतानें त्याची नेमणूक शास्त्रपीठाचे सभासदाचे जागीं झाली. पुढें दोन वर्षांनीं त्यानें " चलपदार्थ शास्त्र " हा ग्रंथ लिहिला १७४६ त " वारे " या विषयावर त्यानें एक निबंध लिहिला. १७४९ त विषुवचलनाची उपपत्ति व विषुवचलनाचें प्रमाण आणि पृथ्वीची दैनंदिन गति यांचा निर्णय केला. १७५२ त प्रवाही पदार्थांचा प्रत्याघात या विषयावर एक ग्रंथ लिहिला. पुढें डायडोराट ( ३--७--९ ) च्या मदतीनें त्यानें प्रसिद्ध " एनसायक्लोपिडिया " हा ग्रंथ लिहिण्यास सुरवात केली. त्याचा उपोद्घात पाहून " कंडारले " हा तत्त्ववेत्ता म्हणे कीं, असला लेख लिहिण्याजोगे पुरुष या शतकांत दोन तीन झाले असतील नसतील. गणित शास्त्र सामान्य लोकांस अवगत नसल्यामुळें त्याची विशेष प्रसिद्धि झाली नव्हती परंतु त्याच्या ऐतिहासिक व अध्यात्म विषयावरील ग्रंथांनीं त्याची फारच ख्याती झाली. फ्रेडरिक दि ग्रेट ( २--१--४ ) नें आपल्या विद्यापीठांचें अध्यक्षपण घेण्याविषयीं त्यास विनंति केली होती पण ती त्यानें नाकारिली. त्याचप्रमाणें रशियाच्या राणीनें

" **डायोजिनीस** हा प्राचीन काळचा अद्वितीय महात्मा होऊन गेला असें माना-
" वयाचें तर या **जार्ज फाक्सला** अर्वाचीन काळांतील अद्वितीय महात्मा असें
" म्हणणें जास्त सप्रयोजक होईल. कारण त्या प्राचीन काळच्या महात्म्यांत एक
" उणेपणा होता. तो आमच्या **फाक्समध्यें** नाहीं. **फाक्सनेंही** आपल्या
" **मनुष्यत्वाच्या** भक्कम पायांवर उभें राहून संसारांतील निरर्थक टेंकणें
" व कुबड्या फेंकून दिल्या होत्या. पण डायोजिनिसनें आपल्या स्थितीच्या
" अभिमानांत या ऐहिक गोष्टींस तुच्छवत् मानिलें, तसें यानें केलें नाहीं.
" उलट शरीरस्थितीस अवश्य जें अन्न व ऊब तीं मिळण्याची जागा
" येथेंच असून स्वर्गाची वाट येथूनच जाते असें जाणून तो ऐहिक स्थितीस
" तुच्छ न मानितां, दया व श्रद्धा यांमध्यें प्रशांत स्थितींत राहिला होता.

---

आपल्या मुलाच्या शिक्षणार्थ त्यास आपल्या पदरीं राहण्याविषयीं फारच आग्रह केला पण तेंही त्यानें पत्करिलें नाहीं. धर्म संबंधांत तो व्हालटेअर (२-७-८) वगैरे लोकांप्रमाणें निरीश्वरवादी होता असें लोक म्हणतात. परंतु असें जर असेल तर ज्या रशियाच्या राणीनें " माझ्या राज्यांत धर्मास शिव्या देणाऱ्या लोकांस जागा नाहीं " असें म्हणून व्हालटेअरची भेटही घेण्याचें नाकारिलें तिनें आपण होऊन त्यास आपल्या पदरीं राहण्याविषयीं इतका अत्याग्रह कसा केला असेल याचें कोडें वाटतें.

१० डायोजिनिस. ( मृत्युकाल इ० सनापूर्वी ४१४ ) सिनिकपंथाचा विख्यात तत्वज्ञानी. यास खोटें नाणें पाडिल्याबद्दल हद्दपारीची शिक्षा झाल्यावरून उपरती होऊन तो अथेन्स मध्यें येऊन सिनिकपंथाचा उत्पादक अंटिस्थेनिस याचेजवळ तत्वज्ञानाचा अभ्यास करावयास राहिला. त्यानें त्या पंथांतील तपश्चर्या फारच कडकपणें आचरण केली ती अशी कीं त्यानें नेहमीं फाटकी व अतिजाड कफनी धारण करावी, अतिभिकार कदान्न खावें व धर्मशाळेच्या वळचणीस रहावें. पुढें पुढें तर तो अगदींच निरिच्छपणें काळ घालवूं लागला. उन्हाचे व पावसाचे वेळेस तो एका पिपांत पडून राही; व उपदेश करण्याचे वेळीं तेंच पींप पालथें घालून त्यावर उभा राही. कोरिंथ येथें तो लोकांस उपदेश करीत असे. प्रसिद्ध दिग्विजयी बादशाह अलेक्झांडर दि ग्रेट ( शिकंदर ) हा तेथें त्याचे दर्शनास गेला होता. तेथें गेल्यावर त्यास विशेष आदर वगैरे मिळाला नाहीं तेव्हां तो म्हणाला " मी अलेक्झांडर दि ग्रेट आहें.' तेव्हां डायोजिनिस म्हणाला, " मीही डायोजिनिस सिनिक आहे." तेव्हां बादशाह म्हणाला, मजकडून आपली कांहीं सेवा होण्यासारखी असल्यास सांगावी." डायोजिनिस म्हणाला, "होय आहे. तूं माझें ऊन्ह धरून उभा आहेस तेवढा जरा एकीकडे हो म्हणजे झालें. मला तुजपासून दुसरें कांहीं नको !" हा त्याचा निरिच्छपणा पाहून अलेक्झांडर थक्क होऊन म्हणाला कीं " मी अलेक्झांडर नसतों तर डायोजिनिसच झालों पाहिजे होतों !"

" **सिनिक** पंथाच्या मूळ उत्पादकाच्या **पिपाची** योग्यता मोठी खरा;
" मनुष्यत्वाची योग्यता व धर्माचें दिव्य तत्व यांचा उपदेश या **पिपावरूनच**
" झाला; पण या उपदेशांत ऐहिक स्थितीविषयीं तिरस्कारबुद्धि वसत
" होती. आमच्या **फाक्सच्या चर्मांबराची** योग्यता या पिपापेक्षांही अधिक
" आहे, कारण हाच उपदेश त्यांतून झाला असून तो उपदेश तिरस्कार-
" बुद्धीनें नव्हे, तर प्रेमानें व दयेनें युक्त होता."

हें **जार्ज फाक्सचें** चर्मांबर आज दोनशें वर्षांत अगदीं जीर्ण होऊन कोठें एके आंगास पडलें होतें; तें हल्लींच्या समाजाच्या पूर्णतेबद्दल जिकडे तिकडे वाटाघाट चालू असतां आमच्या प्रोफेसर साहेबांनीं मुद्दाम लोकांपुढें कां काढावें? मताभिमानाचा अंधपणा तर प्रोफेसर साहेबांत नाहींच; शिवाय ते केकर पंथाचेही नाहींत. त्यांची शांति कितीही पूर्ण असली तरी उत्तर ध्रुवाच्या प्रदेशांत त्यांनीं आपलें पिस्तुल काढण्यासही मागेंपुढें पाहिलें नाहीं हें वाचकांस स्मरत असेलच.

त्यांच्या **दिगंबरी मताचें** खोल स्वरूप आपल्यास ठाऊक झाले असल्यामुळें वरील उताऱ्यांत नुसत्या वाच्यार्थापेक्षांही बराच आणखी खोल अर्थ असावा असें आम्हांस वाटतें. तथापि या उताऱ्यांत जर गुप्त कोटिक्रम नसेल, तर ही ऐतिहासिक गोष्ट लोकांचे नजरेस आणण्यांत व तिचें अनुकरण करण्याविषयीं शिफारस करण्यांत प्रोफेसर साहेबांची आतुरता व साधेपणा पाहून कोणास नवल वाटणार नाहीं? अर्थात् ही शिफारस संदिग्ध आहे; पण विसिनिचट्टो येथेंही अगदीं निखालसपणें एकादी गोष्ट सांगण्याची त्यांची पद्धती अशीच आहे. मग, ज्या बिचाऱ्यांना या मोहाचे वखारींत व चिंध्यांच्या बाजारांत या सुधारलेल्या काळांतही डोळे बांधून कोरड्याखालीं जिवापाड परिश्रम करावे लागतात, ते लक्ष्मीस लाथ मारून या कारागृहांतून निसटून जातील, व चर्मांबरांत शिरून निर्भय होतील, व अशा लोकांचा बराच मोठा समाज होईल; अशी तर ट्यूफेल्सड्राक साहेबांची समजूत नसेलना! असेल तर ही गोष्ट आम्हांस तर हास्यास्पद वाटते. कारण राजे लोक आपले भरजरी उत्तम पोषाख टाकून देऊन चर्मांबर स्वीकारितील काय? त्याचप्रमाणें तरुण युवती आपले ऐटदार पोषाख टाकून देतील काय? असें झालें तर **हडर्सफील्ड, मांचेस्टर, कान्हेंट्री, पेले** वगैरे कापसाच्या लोंकरीच्या व रेशमाच्या कापडांच्या पेठांचे व **फॅन्सीबझार** सारख्या अद्वितीय बाजारांचे बारा वाजून

ड आणि मार्टिन वगैरे रोगणवाल्यांची मात्र पोळी पिकेल! परंतु अशा रीतीनें दिगंबरत्वाचे शीतोष्णबाधादि वाईट परिणाम न होतां सर्व लोकांस सारखे-पणा येऊन हल्लींच्या सामाजिक स्थितींतील नीचोन्नत भावानें होणारे दुष्प-रिणामही टळतील अशी जर ट्यूफेल्सड्राक साहेबांची समजूत असेल तर ती व्यर्थ आहे. कारण त्यांची तजवीज अमलांत येईल अशी जरी घटकाभर कल्पना केली, तरी मग श्रीमंत मनुष्यें पाण्याचा शिरकाव न होण्यासा-रख्या रशियन कातडचाचे पोषाख करतील; व उंच कुळांतील तरुण लोक मोरोक्कोच्या चित्रविचित्र कातड्याचे झग्यास शामीच्या कातड्याची झालर लावून हिंडतील; आणि मजुरांच्या व गरीबांच्या कपाळीं ढोरांच्या जाड्या-भरड्या व रंगहीन कातड्याचेच पोषाख येऊन समाजांतील उच्चनीच पदव्या पूर्वीप्रमाणेंच कायम राहतील.

कां ही गोष्ट आमचेपुढें मांडण्यांत प्रोफेसरसाहेबांचा निराळाच कांहीं-तरी हेतु असून, हें कोडें उकलतांना आह्मांस पडलेली पंचाईत पाहून ते आह्मांस गुप्तरूपें हंसत आहेत, हेंही कांहीं कळत नाहीं.

---

# भाग दुसरा.

## धर्मवस्त्रें[1].

वरील विषयाप्रमाणेंच धर्मवस्त्रावरील भाग लिहिण्याचा हेतु काय असावा तें कळत नाहीं. हा भाग सगळ्या वस्त्ररहस्यांत अगदीं लहानही आहे. तो आह्मी सबंधच भाषांतरानें खालीं देतों:--

---

१ धर्मवस्त्रें--वास्तविक पाहतां सर्व पदार्थ मात्र ईश्वराच्या विभूती आहेत. पण अशा दृष्टीनें प्रत्येक वस्तुमात्राकडे पाहणें हें केवळ निर्विकल्पब्रह्मज्ञान्यांस मात्र शक्य आहे. या पाहिरीच्या अलीकडे सत्य असत्य, चांगलें वाईट, सुख दुःख, सद्गुण दुर्गुण, आपला परका, वगैरे द्वैतयुक्त ब्रह्म मात्र आपणांस गोचर होतें. त्यांत अर्थातच आपण एका भागास महत्व देऊन दुसऱ्या प्रातियोगिभूत भागास हीनत्व देतों. हेंच सर्व लौकिक धर्मांचें सामान्य स्वरूप होय. कांहीं लोकांस "सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म" या-स्वरूपानें ब्रह्म अविर्भूत झालें; कांहींस "सच्चिदानंदरूप" ब्रह्म आविर्भूत झालें. भृगूस "अन्नप्राण-मन-विज्ञानानंद-कोशगत" ब्रह्म आविर्भूत झालें. ख्रिस्तादिकांस मनुष्याचें नैसर्गिक श्रेष्ठत्व किंवा सत्व या स्वरूपानें झालें. या प्रत्येक स्वरूपानें आविर्भूत होणारें ब्रह्म एकच निर्विकल्प निर्विकारी आहे. तें आपणांस आविर्भूत करून देणारीं हीं त्याची विशिष्ट स्वरूपें म्हणजे निरनिराळ्या युगांत उदयास आलेलीं धर्मतत्वें हींच धर्मवस्त्रें होत.

" 'धर्मवस्त्र' या शब्दांत माझा अर्थ धर्मकृत्यांचे वेळीं किंवा इतर
" प्रसंगीं धर्माचार्यांनीं घालण्याचे पोषाख असा नसून त्याहून फारच खोल
" आहे, हें येथें सांगण्याची जरूर नाहीं; मग रविवारचे दिवशीं प्रार्थना-
" मंदिरांत जातांना सामान्य लोक जो पोषाख घालतात तो पोषाख असा
" या शब्दाचा माझा अर्थ नाहीं हें उघडच आहे. माझा अर्थ या
" दोन्ही अर्थांहून निराळा आहे. आमच्या परिभाषेंत '**धर्मवस्त्रें**' म्हणजे
" निरनिराळ्या युगांत ज्या **स्वरूपांनीं धर्मतत्त्व** मनुष्यास आविर्भूत झालें
" तीं स्वरूपें; अर्थात् **परमेश्वराच्या सर्वव्यापित्वाची** कल्पना ज्या
" शब्दस्वरूपांनीं आपणांत प्रत्यक्ष नांदून आपलें **अक्षय्यचैतन्य** आप-
" ल्यांस प्रकट करितें तीं **स्वरूपें धर्मवस्त्रें** होत.

" मनुष्याच्या जिंदगानींत जीं अनेक **वस्त्रें** व बाह्य आवरणें आपल्या
" दृष्टीस पडतात, त्या सर्वांत हीं **धर्मवस्त्रें** अत्यंत महत्वाचीं आहेत. सर्व
" चमत्कारांत जो आद्यचमत्कार, ह्मणजे मनुष्याचा **समाज**, त्यानें हीं
" **धर्मवस्त्रें** कांतून विणलेलीं असतात. कारण जें केवळ **चैतन्यात्मक** व
" **अविनाशी धर्मतत्व**, तें बीजरूपानें जरी व्यक्तिमात्रांत नांदत असलें
" तरी अद्यापसुद्धां दोन किंवा तीन मनुष्यें एकत्र झाल्यावांचून स्पष्ट
" उद्भूत रूपानें व्यक्त होऊन, तें श्रद्धेस किंवा अश्रद्धेस पात्र होत नाहीं;
" मग तें उद्भूतरूप सप्तजिव्ह अग्नीप्रमाणें परदाहक कां असेना? दोन **जीवात्मे**
" **स्वर्गाकडे** दृष्टि देऊन एकमेकांशीं व्यवहार करूं लागले, ह्मणजे त्या उभय-
" तांत होणारा मनोयोग सामान्य जादूपेक्षां फारच गूढ व अनिर्वाच्य असतो.
" **आत्म्याची आत्म्याशीं** ओळख प्रथम याच प्रसंगीं होते. कारण
" ज्यास आपण **योग, प्रेम** किंवा **समाज** ह्मणतों, त्या **जीवात्म्याच्या**
" अवस्था **स्वर्गाकडे** दृष्टी फेंकली असतांच शक्य होतात; **इहलोकावर**
" दृष्टी देऊन होत नाहींत; मग **स्वर्ग** आणि **इहलोक** यांचा पाहिजे तो
" अर्थ धरिला तरी हरकत नाहीं. "माझ्या मताचे सत्यत्वाविषयीं दुसऱ्याची
" खात्री पटली ह्मणजे त्या योगें माझी श्रद्धा अनंतपट वाढते." हें **नोव्हा-**

---

२ सप्तजिव्ह अग्नीच्या स्वरूपाचें—ख्रिस्तानें धर्मप्रसारार्थ पाठविलेल्या बारा शिष्यांच्या दृष्टीस परमेश्वर अग्नीच्या लोळाच्या स्वरूपानें खालीं उतरतांना दिसला व तें तेज या शिष्यांमध्यें संचरलें अशी कथा बायबलांत आहे तीस उद्देशून हें लिहिलें आहे.

“ **लिसचें**[३] ह्मणणें किती यथार्थ आहे! अरे, ज्याचे डोळ्यांत **प्रेमाग्नि**
“ किंवा **क्रोधाग्नि** विलास करीत असेल, अशा तुझ्या **जातिबंधूचे** तोंडा-
“ कडे क्षणभर पहा, ह्मणजे तुझा स्थिर असलेला **आत्मा** आपोआपच
“ जागृत होऊन तुम्ही दोघेही आपआपले डोळ्यांतील **आत्मतेज** एकमेकांवर
“ पाडाल, व त्या संयोगापासून आत्मैक्य करणाऱ्या **प्रेमाची** किंवा परस्पर
“ नाश करणाऱ्या **द्वेषाची** ज्योत धगधगूं लागेल! त्या वेळेस एका **पुरुषां-**
“ **तून** दुसऱ्यांत कोणचें **तत्व** जातें हें कोणास सांगतां येईल काय? पण ही
“ गोष्ट अनेक व्यापारांत आपण चूर असतांना केवळ ऐहिक विषयासंबं-
“ धानें परस्परांत उत्पन्न होणाऱ्या विकारांची झाली. मग ज्यास **पारमा-**
“ **र्थिक व्यवहारचरित्र** ह्मणावयाचें, त्यांत माझ्यामधील **अंतर्गत तत्व**
“ व दुसऱ्या पुरुषांतील **अंतर्गत तत्व** यांचा योग झाला असतां काय स्थिति
“ होत असेल बरें!

“ एवढ्याचकरितां **धर्मवस्त्रें** हीं समाजानें कांतलेलीं व तयार केलेलीं अस-
“ तात असें मी म्हणतों. धर्माचें **बाह्यस्वरूप** समाजापासून उद्भवतें व **धर्मानेंच**
“ **समाजाचें स्थैर्य** शक्य होतें. फार तर काय, अर्वाचीन व प्राचीन काळींही
“ जो जो समाज झाला, तो तो वास्तविक पाहतां सर्वस्वी **धर्मस्वरूपात्मकच**
“ होता; मग त्यांतील धर्माचें स्वरूप पुढें दिलेल्या तीन प्रकारांपैकीं कोणचें-
“ ही असो. पहिला, लोकांस स्पष्ट धर्मशिक्षण देऊन पुढील सुव्यवस्थेस मार्ग
“ दाखविणारा; हा उत्तम प्रकार. दुसरा, लोकांस स्पष्ट धर्मशिक्षण मिळण्या-
“ विषयीं तळमळत असून, अद्यापपर्यंत जरी पुढील सुव्यवस्था करण्याची
“ शक्ति नाहीं, तरी तशी शक्ति असलेले कोणी तरी अवतारी पुरुष उत्पन्न
“ होऊन नीट व्यवस्था लावतील अशा आशेवर असणारा; हा मध्यम
“ प्रकार. आणि तिसरा, वार्धक्यामुळें हीनता येऊन मुग्ध दशेंत असलेला,
“ किंवा समूळ उच्छेद होण्याचे अगोदर उन्मादावस्थेंत कांहीं तरी अस्पष्ट-
“ पणें बरळणारा; हा कनिष्ठ प्रकार. आतां या व्याख्येंत आम्ही **धर्म** म्हणून
“ म्हटलें त्या शब्दाचा अर्थ विवक्षित धर्मव्यवस्था किंवा प्रार्थनामंदिरें असा

---

३ नोव्हॅलिस—(१७७२—१८०१) एक प्रसिद्ध जर्मन ग्रंथकार.

४ या तीन प्रकारांपैकीं सध्यांचें आपल्या धर्माचें स्वरूप कोणच्या प्रकारचें आहे याचा सुज्ञ वाचकांनीं निरभिमानपणें विचार करावा.

" कांहीं तरी धरून धर्मशिक्षण व धर्मव्यवस्था म्हणजे प्रत्यक्ष ऐकूं
" येणारीं व्याख्यानें किंवा भाविष्यें असा कोणीं अर्थ घेतील तर ( आमचे
" प्रोफेसर साहेब म्हणतात) त्यांनीं या चर्चेच्या भानगडींत न पडतां मोकळ्या
" अंतःकरणानें असेंच कांहीं काळपर्यंत ग्रंथपरिशीलन करीत बसावें.

" आतां **धर्मविशेषासंबंधानें** व धर्माच्या आचारादि **बाह्यंगासंबंधानें**
" एवढी एक गोष्ट मी निखालसपणें सांगतों कीं, त्याशिवाय आजपर्यंत
" समाज कधीं चालला नाहीं व पुढें कधीं चालावयाचाही नाहीं. कारण
" समाज कायम राखून त्याचें रक्षण करणारी जी **राज्यव्यवस्था** तीस जर
" समाजाची **बाह्यत्वचा** असें मानिलें; व समाजास अन्नवस्त्रादि अवश्य
" लागणारे पदार्थ पुरविणारे जे हाताचे अगर डोक्याचे अनेक धंदे, त्यांस या
" समाज शरीरास चालविणारे बाह्यकातड्याखालचें **मांस व स्नायु** असें मानिलें;
" तर **धर्मास** या शरीरांतील **ज्ञानतंतू व रक्तवाहिन्या** असेंच म्हटलें पाहिजे.
" कारण या **समाजरूपी** पुरुषास चैतन्य व जीव हीं या **धर्मरूपी** हृत्पिं
" डापासूनच मिळतात. **समाजाच्या** या ज्ञानतंतूवांचून व रक्तवाहिन्या-
" वांचून ( धर्मावांचून ) त्यांतील हाडें, मांस व स्नायू ( उद्योगधंदे ) शि-
" थिल होतात; किंवा चाललेच तर जसे विजेच्या अगर वाफेच्या जोरावर
" निर्जिव यंत्रानें काम चालावें तसेंच चालतात. मग बाह्यकातडेंही सुरकुतून
" नासून जातें व सर्व **समाज** प्रेतवत् होतो. मग त्या समाजांतील लोकांस
" **समाज** ह्मणण्यापेक्षां **समुदाय** हेंच नांव शोभेल; पण ही समुदायप-
" णाची स्थितीही मग कायम न राहतां क्रमाक्रमानें या समुदायांत जिकडे ति-
" कडे **अप्पलपोटेपणा, असत्याचार, भांडणें, द्वेष व विभक्तपणा** होऊन
" शेवटीं समुदायाचीही वाताहत होते. याप्रमाणें **धर्मरूपी ज्ञानतंतू** व
" रक्तवाहिन्या यांचें काम बंद पडल्यामुळें **समाजरूपी** पुरुषाचें जें **समु-**
" **दायरूप** प्रेत किंवा माती राहते तीही अखेरीस **नष्ट** होते. इतकें **स-**
" **माजास धर्माचें** महत्व आहे ही गोष्ट विचारी व विवेकशील मनु-
" ष्यास मात्र समजते.

" असो; आतां सांप्रत काळच्या **धर्मवस्त्रां**संबंधानें पाहतां तीं अगदींच
" जीर्ण झालीं असून फाटलीं आहेत; इतकेंच नव्हे, तर त्यांपैकीं बहुतेक
" आतां **बुजगावण्यावरील कपड्यांचे** तोडीचीं, अगदींच निःसत्व अशीं
" झालीं असून त्यांत आतां कोणचाही **चैतन्ययुक्त मनुष्य समाज** राहील

" असें नाहीं. फारच झालें तर कोळी, रातकिडे, झुरळें, वगैरेच्या योग्यतेचे प्राणी
" मात्र त्यांत आपला व्यवसाय चालवितील ! आतां हीं पोकळ **बुजगावणीं**
" आपल्या कांचेच्या डोळ्यांनीं खऱ्या चैतन्ययुक्त पुरुषाचा वरकरणी डौल
" दाखवून भेसुरपणानें केवळ पहात मात्र आहेत. त्यांतील धर्मचैतन्य परतें
" झालें, तें पुढें नवीन पोषाख घालून पिढी दीड पिढीनें आपणांवर किंवा निदान
" आपल्या मुलांनातवंडांवर कृपादृष्टी करण्याकरितां कोठें तरी एकांतांत
" **नवें वस्त्र** विणीत बसलें असेल! एकंदर मनुष्यांत **धर्माचार्य** किंवा **सद्गुरु**
" म्हणजे त्या **अनिर्वाच्य पवित्र वस्तूस** प्रत्यक्ष करून देणारा पुरुष, हा
" उत्तम व श्रेष्ठ होय; त्याचप्रमाणें हा धर्माचार्यांचे नांवाखालीं मोडणारा पुरुष
" जर **तोतया** असेल, तर त्याच्या सारखा अधम व दुष्ट मनुष्यच दुसरा नाहीं;
" मग त्याचे अधिकारदर्शक पोषाख जरी पोपसाहेबांच्या किंवा शंकरा-
" चार्यांच्या पोषाखाच्या योग्यतेचे असले तरी तेही त्याच्या आंगावरून
" लकतऱ्या होऊन निघतील, व त्यांचा उपयोग मनुष्यजातीच्या जखमा
" बांधण्याकडे, किंवा न जाणो, नुसत्या सर्पणासारखाही होईल.

" पण हा विषय येथें अप्रासंगिक असून त्यास " **समाजाचें पुनरु-**
" **ज्जीवन** " या नांवाच्या माझ्या दुसऱ्या ग्रंथांत स्थळ देण्यांत येईल.
" या ग्रंथांत **चैतन्यरूप** वस्त्राची झीज, नाश, व पुनरुत्पत्ती म्हणजे
" ' **वस्त्ररहस्या** ' चाच सामान्य विचारापलीकडील भाग येणार आहे; व हा
" ग्रंथ लिहिण्याचें काम सुरू होऊनही आज बरेच दिवस झाले आहेत. "

याप्रमाणें दुसरी कांहीं एक व्याख्या, स्पष्टीकरण, किंवा टीप वगैरे न देतां हा **धर्मवस्त्रा**वरील भाग ट्यूफेलसड्राक साहेबांनीं संपविला आहे; व अर्थात आम्हासही संपवावा लागत आहे.

---

# भाग तिसरा

## चिन्हें.

"चिन्हें" या विषयावरील प्रोफेसर साहेबांचे विचार या स्थळीं दिलें असतां वरील गूढ विचारांचें बहुधा स्पष्टीकरण होईल असें वाटतें. यासंबंधीं त्यांच्या सर्व विचारांचें येथें पूर्ण प्रतिपादन करणें आपल्या योजिलेल्या कामाबाहेरचें

आहे. शिवाय " **दिव्य वस्तु** गोचर होण्याचें साधन **कल्पना** हें असून
" मनुष्याचें दृश्यस्वरूप जरी इतकें लहान आहे, तरी या कल्पनेच्या योगानें
" त्या अनिर्वाच्य **अदृश्य वस्तूच्या** अनंत स्वरूपापर्यंत त्याच्या दृष्टीचा
" पल्ला चालत असून, वास्तविक पाहतां त्याचें इहलोकचें चारित्र तरी त्या
" अदृश्य **अनंताचेंच स्वरूपविशेष** होय. " वगैरे या विषयांतील विधा-
नांत जो गूढपणा व अतींद्रियत्वहीं दिसून येतात, तसे दुसऱ्या कोणत्याही
स्थळीं नसतील. म्हणून असले अतींद्रिय विचार एकीकडे ठेवून, या काग-
दांतील पुडक्यांतून, व या छापलेल्या ग्रंथांतून, या विषयावरील जेवढे भाग
युक्तीस अनुरूप व अनुभवांत येण्यासारखे असतील, तेवढेच निवडून व नीट
व्यवस्थेशीर लावून त्यांतून किती अर्थ निघतो तें पाहूं. उपोद्घाता दाखल
हा खालील मार्मिक उतारा घ्या.

प्रोफेसर साहेब म्हणतात. " **गौप्य** किंवा **गुप्तपणा** ही वस्तू किती
" उपकारक आहे? तिच्या गुणांचें वर्णन करण्याचें सामर्थ्य कोणास आहे?
" अहाहा! **मौन** व **गौप्य** या **ईश्वरी विभूतींची** योग्यता कांहीं अनिर्वाच्य
" आहे! हा काळ जर **देवळें** बांधण्याचा असता तर जिकडे तिकडे
" त्यांचीं देवळें होऊन सर्वांनीं त्यांची पूजा करावी असाच त्यांचा अधिकार
" आहे. सर्व मोठमोठ्या गोष्टी या **मौनाचे** तत्वानेंच साध्य होतात.
" त्याच तत्वांत त्या गोष्टी पूर्णत्वास येऊन मग तेथून मोठ्या थाटानें त्या
" या बाह्य संसारांत प्रकट होऊन त्यामध्यें आपलें वर्चस्व चालवितात!
" एकटा **विलियम दि सायलेंट**[1] ( मौनी विलियम ) हाच काय, पण
" सर्वच मोठमोठे लोक, आणि दरबारी कारस्थानांत व पाचपेंचांत निष्णात
" नसलेले कर्तबगार लोक सुद्धां आपल्या हेतूंची वाच्यता न करितां आपलें
" काम मुकाट्यानेंच पण अगदीं मनापासून झटून साधीत असतात.
" फार कशाला तुमची स्वतःचीच गोष्ट घ्या. कांहीं मोठ्या विचाराची गोष्ट
" येऊन ठेपली तर नुसती तोंडाची बडबड सोडून देऊन एक दिवस मौन
" धरिलें कीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं तुमचें कर्तव्य तुम्हांस जास्त स्पष्ट
" दिसूं लागतें. शब्दांच्या वटवटीचा लुब्रेपणा बंद झाला, म्हणजे तुमच्या
" अंतरंगांत जे गुप्त कारागीर आहेत ते तेथील सर्व अडगळ मोडून व

---

१ विलियम दि सायलेंट—आरेंजचा राजा पहिला विलियम ( १५३३–१५८४ ) हा आपले विचार अगदीं बोलत नसे असें म्हणतात.

" केरकचरा काढून टाकून तुमचें अंतरंग निर्मळ करून ठेवितात; व मग
" अर्थातच त्यांत तुमचे इष्ट हेतू व कर्तव्यें तुम्हांस स्पष्ट दिसूं लागतात.
" एक फ्रेंच गृहस्थ म्हणतो कीं भाषण हें विचार-गोपनाचें साधन आहे;
" पण हें म्हणणें यथार्थ नाहीं. भाषणानें विचाराचें नुसतें गोपनच होत
" नसून त्यानें विचाराची मान मोडून विचाराचा समूळच लय होतो. मग
" गुप्त ठेवण्यास विचार शिलकीस राहतात कशाला ? भाषणाचीहि योग्यता
" मोठी आहे, पण इतकी मोठी नाहीं. स्वित्झरलंडांत एका शिलालेखावर
" लिहिलें आहे कीं "वाणी ही चांदीची सरी आहे. पण मौन ही सोन्याची सरी
" आहे." पण मला वाटतें या पदार्थांचें मोल धातूंचे मोलावरून करण्यापेक्षां
" कालाचे मोलावरून करावें; " **वाणी** ही **कालौपाधिक** आहे पण
" **मौन हें चिरस्थायी** आहे. "

" मधमाशा अंधारांत मात्र काम करितात, एरवीं करीत नाहींत. तसें
" विचाराचें काम मौनस्थितींत मात्र होतें एरवीं होत नाहीं. त्याचप्रमाणें **स-**
" **त्कर्महि** गौप्यानेंच होतें एरवीं होत नाहीं. जें सत्कर्म तुझा उजवा हात
" करील तें तूं डाव्या हातास कळूं देऊं नको; व ज्या ' गुप्त ' गोष्टी सर्वांस
" कळलेल्या असतात, त्या तुझ्या मनाशींहि तू बडबडत बसूं नको, असें आ-
" पल्या बायबलांत निक्षून सांगितलें आहे तें उगीच नव्हे. **हा विनय** पहा. तो
" सद्गुणांचें, घरंदाज चाली रितींचें, उत्तम नीतीचें माहेरघर आहे. सद्गुण
" हा एक वृक्ष असून इतर वृक्षाप्रमाणेंच त्याचे मूळ झांकल्याशिवाय व
" सूर्याआड केल्याशिवाय तें कधींहि वाढत नाहीं. सूर्याची दृष्टि त्यावर पडूं
" द्या, किंवा नुसते तुम्हीच त्याकडे गुप्तपणें बघा, कीं लागलीच दृष्ट लागून
" तें मूळ कोमेजून जातें. मग त्याच्या फुलापासून होणारें अप्रतिम दृष्टि-
" सुख अशक्य होतें. मित्रांनो, उदाहरणार्थ प्रचारांतील नुसत्या **विवाह-**
" **लतामंडपाकडे** दृष्टि फेंकून त्यावरील **लता** (स्त्री व पुरुष) पुत्ररूपी आपल्या
" उत्कृष्ट पुष्पगुच्छांचे दिव्य तेजानें ( मानवी ) संसार विकासवून टाकि-
" तांना व प्रेम परिमलाचा त्या संसारावर घमघमाट करितांना जर आपण
" पाहिलें, आणि मग कोणी त्या लता उपटून आपणांस त्यांचीं मुळें दाखवून
" असें सांगूं लागला कीं " या लतांचें मुळाशीं सर्व सोनखतच आहे, " तर
" संतापाचे भरांत अशा विघ्नसंतोष्याचें मुसकट फोडून टाकावें असा को-
" णास त्वेष येणार नाहीं? **छापखाने व वर्तमानपत्रें** यांची जिकडे तिकडे

" प्रशंसा चाललेली असते; परंतु **वस्त्रें** व **शिष्यांच्या इस्तऱ्या** यांच्या पुढें
" त्यांची काय किंमत आहे ?

अशा अप्रतिम प्रभावाच्या **गौप्याचे** जातीचाच, पण गौप्याहून फारच
" महत्वाचे गोष्टीशीं संबध असणारा, विलक्षण विषय म्हटला म्हणजे **चिन्हें**
" किंवा **मुद्रा** होत. या चिन्हांत किंवा मुद्रांत **गौप्य** असून कांहीं **प्रकटार्थ**ही
" असतो. आणि या गौप्याचा व प्रकटभावाचा मिलाफ झाल्यामुळें चिन्हांपा-
" सून दुप्पट अर्थ निष्पन्न होतो. तशांत या चिन्हांतील प्रकटार्थ जर उत्कृष्ट
" असेल, व त्यांतील गौप्यही वाजवी व योग्य असेल, तर त्यांच्या मिलाफानें
" आपल्या मनावर केवढा परिणाम होतो बरें! याप्रमाणें कांहीं सांकेतिक चि-
" न्हाकृतीचे द्वारां, किंवा नुसत्या शिक्कामोर्तबाच्या किंवा नाममुद्रांच्या द्वारेंही
" अगदीं सामान्य गोष्टी सुद्धा कांहीं विलक्षण स्वरूपानें आपणांस भासतात.

" कारण चिन्हें, मुद्रा, किंवा निशाणें या पदार्थांतच **कल्पनेचें** अतीं-
" द्रिय व आश्चर्यानें थक्क करून सोडणारें स्वरूप शिरून मग तें त्या चि-
" न्हाचे द्वारें इंद्रियग्राह्य होतें. खऱ्या चिन्हांत, म्हणचे ज्यांस चिन्हें
" अथवा निशाणें असें म्हणतां येईल त्यांत, हें कल्पनेचें अपरिमेय व
" अतींद्रिय तत्व कमी जास्त प्रमाणानें प्रत्यक्ष व व्यक्त असतें. हें अपरिमेय
" व अतींद्रिय तत्व प्रत्यक्ष व्हावें म्हणूनच तें या चिन्हरूप परिमेय प्रत्य-
" क्षाशीं मिसळलेलें असतें. एवढ्याच करितां मनुष्य हा सर्वथैव या चि-
" न्हांचे धोरणानें वागून, व **चिन्हांच्या** हुकमांत राहून, इह लोकांतील
" सुखें व दुःखें अनुभवितो. जिकडे पहावें तिकडे त्याच्या भोंवतीं चिन्हेंच
" पसरलेलीं आहेत; मग तीं त्यास चिन्हें या दृष्टीनें भासोत अगर न भासोत!
" ही सर्व **सृष्टी** म्हणजे केवळ **ईश्वराचें चिन्ह** असून प्रत्यक्ष **मनुष्य** तरी
" काय आहे ? तोही **ईश्वराचें चिन्हच** होय, आणि तो जें कांहीं करितो तें
" ही चिन्हरूपच असून त्या चिन्हाचे योगानें त्याचेमध्यें असलेली ईश्वर-
" दत्त अतींद्रिय व गूढ शक्ति इंद्रियास गोचर होते. जणूं काय या सर्व
" सृष्टीचे कल्याणाकरितां जन्मलेल्या एखाद्या अवतारी पुरुषाप्रमाणें तो आपल्या
" शब्दानें व कृतीनें त्या अनिर्वाच्य गूढ तत्वाचें प्रतिपादनच करीत आहे!
" त्याचे हातून उभें राहणारे नुसतें एखादें खोपट घेतलें तरी तें सुद्धा
" **विचाराचें** परिणामरूप दृश्यस्वरूप असून त्या अदृश्य व अतींद्रिय
" वस्तूचा प्रत्यक्ष पुरावाच होय."

हे विचार पुढें समजुतीच्या पलीकडे गेले असल्यामुळें आम्हीं पुढचा मजकूर सोडून दिला आहे. या उद्गारांत मनुष्याची योग्यता जितकी महत्वाची असल्याबद्दल उल्लेख आहे तितकीच त्याची हीनता प्रकट करणारे हे पुढील उद्गार पहा:—प्रोफेसर साहेब म्हणतात, "जन्मतःच मनुष्या-
" मध्यें कांहींशी उलूकप्रकृती (घुबडाचें साम्य) आहे. परंतु एकंदर उलूक-
" प्रकृतींत कार्यकारणसंबंधाची **चिकित्सा** करण्याचें जें त्याचें तर्कशास्त्र
" आहे तें कांहीं अजब आहे. मनुष्यानें त्या त्या काळांत आजपर्यंत अनेक
" खेळ केले आहेत. काचेच्या सजीव पुतळ्यापर्यंत अनेक सोंगांची बता-
" वणी केली आहे. (आमच्या परिणामवाद्यांच्या कार्यकारणसंबंधाचे तत्वा-
" संबंधीं एक कोडें आहे; ते असें:—एके ठिकाणीं एक गाढव उभें आहे
" व त्याच्या दोन्ही अंगांस अगदीं सारख्या अंतरावर दोन उत्तम
" गवताचे भारे आहेत. तर तें गाढव कोणच्या भाऱ्याकडे जाईल?
" कां कोणच्याही भाऱ्याकडे जाऊन जास्त फायदा नसल्यामुळें तें जेथल्या
" तेथेंच राहून उपाशीं मरेल!) या कोड्यांतील गाढवाप्रमाणें आतां
" मनुष्य हा आपल्या जगद्रूपी गवाणीशीं उभा असून त्या गवाणींत सुखदुःख-
" रूपी गवत व कुसळें पसरलीं आहेत, व त्यापैकीं कशापासून सुख जास्त होईल
" हें पाहण्याकरितां आतां त्याचें डोक्यांतील **हेतुचिकित्सेच्या** कांट्यावर
" त्यांचे वजन व्हावयाचें आहे! त्याचे कानही भले लांबलांब दिसत आहेत!
" अरेरे, काय ही बिचाऱ्याची स्थिति! त्यास बिचकावण्याकरितां बाऊही
" आहेत. एका युगांत त्यावर **डाकिणीचा** अंमल बसून त्यास चेटकें
" लागतात, दुसऱ्या युगांत त्यावर **धर्मगुरूचा** अंमल बसून त्यास पिसें
" लागतें. व कोणच्याही युगांत पाहिलें तरी कलीचीं हस्तक पिशाच्चें त्याचे
" पाठीस आहेतच. सांप्रत काळीं **यंत्र विद्येनें** त्यास इतकें गुदमरून
" टाकिलें आहे कीं आतां त्याचा आत्मा केवळ नष्टप्राय होऊन त्यापैकीं
" **अन्न पचनाचें** यंत्र व यांत्रिक **आयुष्यक्रम** ऐवढें मात्र अवशेष राहिलें आहे.
" भूलोकांत व स्वर्ग लोकांतही त्याला आतां यंत्रावांचून कांहींच दिसत
" नाहीं. त्यास **भीतीही** दुसरी कशाची उरली नसून **आशाही** दुसऱ्या
" कशापासून राहिली नाहीं. हें **कालचक्र** आपणांस चिरडून टाकील असें
" त्यास वाटतें; परंतु कार्यकारणभावाचा नियम त्यास ठाऊक आहे याचें योग्य
" अनुमान करून व बिनचूक गणित करून हें कालचक्र **उलटें** फिरा-

" यास लाविलें म्हणजे झालें! मग काय तें आम्हांस चिरडतें! होय
" कीं नाहीं ?

" त्याच्या डोळ्यांवर जर भ्रमाची झांपड पडली नसती, तर त्यानें
" नुसते डोळे उघडून पाहण्याचाच फक्त अवकाश होता; म्हणजे सर्व
" गोष्टी त्यास कळून आल्या असत्या. कारण कोणच्याही काळांत कोण-
" च्याही देशांत, मनुष्याचें सर्व चारित्र, कार्य कारण व हेतू, यांचे अनुमा-
" नावरच चालले आहे काय ? जर चालतें तर **खिस्ती धर्माचा प्रसार²**
" **शिलेदारीची उन्नती³**, युरोपांतील **रिफार्मेशन** नांवाची धर्मसुधार-

---

२ खिस्ती धर्माचा प्रसार—या प्रसाराचे कामीं अनेक उत्कृष्ट लोक बळी पडले आहेत. ते जर सुखदुःखांच्या संबंधांत परिणामवाद्यांच्या या व्यापारी दृष्टीनें चालते तर ही गोष्ट संभवलीच नसती.

३ शिलेदारीची उन्नति—यूरोपांत बाराव्या व तेराव्या शतकांत एक प्रकारचें शिलेदारी किंवा सरदारी व्रत प्रचलित असे. या व्रताचीं मुख्य अंगें म्हणजे सदाचार, साहस, पराक्रम, आर्तत्राण, दया, व एक पत्नीव्रत हीं होतीं. अर्थात हें व्रत आमरण पाळीत असत. त्याचा क्रम असा कीं, मुलगा ७ वर्षांचा झाला म्हणजे त्यानें असें व्रत घेतलेल्या सरदाराचे घरीं चौदाव्या वर्षापर्यंत एकनिष्ठपणें शागीर्दपण करावें. मग आपल्या परिचर्यांतील कोणी तरी कुलीन स्त्री निवडून तिचे प्रीत्यर्थ तन, मन, धन, अर्पण करण्याचा संकल्प करून सरदारी व्रताची उमेदवारी करण्याकरितां उपाध्यायाकडून अभिमंत्रण केलेली तरवार घ्यावी. या उमेदवारींतील त्याचीं कामें अशीं असत कीं, त्यांपासून सरदारी बाण्यास अवश्य लागणारे गुण संवयीनें त्याचे आंगीं यावे. या उमेदवारींत त्याची सत्वपरिक्षा होऊन त्यानें वाहवा मिळविली म्हणजे त्यास सरदारी व्रताची दीक्षा मिळे. त्या वेळीं स्नान करून विशिष्ट वस्त्रें परिधान करून एक अहोरात्र कडकडीत उपोषण करून देवालयांत जागत पुढें धारण करण्याच्या शस्त्रास्त्रांचें रक्षण करावें लागे. नंतर पूर्वीच्या सर्व आत्मचरित्राचा उपाध्यायासमक्ष उच्चार करावा लागे. या आत्मचरित्राचें निवेदन उपाध्यायाकडून परमेश्वरास झाल्यावर (तें निर्दोष दिसल्यास) त्यानें गळ्यांत घातलेल्या तरवारीस उपाध्यायानें आशीर्वचन करावें, कुमारिकांनीं किंवा कोणीं व्रतस्थ सरदारानें त्यास शस्त्र परिधान करावें व मग एका व्रतस्थ सरदारानें त्यास वार करावा. या विधीचे वेळीं त्या मुलास शपथ घ्यावी लागे ती अशी:—" (१) मी मरेपर्यंत देवाची व राजाची इमानानें चाकरी बजावीन, (२) दीनांची पाठ राखीन, (३) आपलें वचन पाळीन, (४) लोभ धरणार नाहीं, (५) निष्कलंक कीर्ति मिळवीन, (६) हातीं घेतलेलें काम अखेर होईपर्यंत सोडणार नाहीं, (७) स्त्री, व सद्गुण यांस पूज्य मानीन, (८) इमानानें, सभ्यचालीनें, व नम्रतेनें वागेन, (९) आणि संकटसमयीं स्त्रियांचें व त्यांच्या पातिव्रत्याचें रक्षण करीन. आपलेकडील उपनयन, सोडमुंज व पाणीग्रहण या व्रतांचें बारीक निरीक्षण केलें असतां या शिलेदारीच्या व्रतांतील बरेंच मर्म त्यांत आढळून येतें. परंतु आतां सत्वशुद्धि, सत्वपरीक्षण व सत्वनिष्ठा या सर्वांचाच लोप झाला असून नुसते कोरडे संस्कार मात्र राहिले आहेत.

" णेची लाट, **मार्सेल्स येथील स्तोत्रे** वगैरे गोष्टींची काय वाट लावाव-
" याची ? फार कशाला, पण हा कार्यकारणभाव तोलणारा व हेतूंची
" चिकित्सा करणारा पुरुष कोठें **प्रेम**पाशांत सांपडला नाहीं काय ? किंवा
" **पार्लमेंटची** निवड होते तींत जरी तो नुसता **उमेदवार** झाला तरीही
" कार्यकारणभावावर व हेतूंच्या चिकित्सेवर कितीशा गोष्टी अवलंबून
" असतात हें त्यास कळेल. असो; **काळाची शाळा** व **अनुभवाची**
" मात्रा मिळाली, ह्मणजे हा सर्व भ्रम आपोआप उतरेल.

" खरोखरच, मित्रांनो, या ठिकाणीं आपलें **तर्कशास्त्र** किंवा **गणितशास्त्र-**
"यांचा आपणांवर अंमल नसून आपण **कल्पनांचे** केवळ दास आहों. या कल्पना
" करणारा कारागीर जें **मन** तोच आपला राजा असून तोच आपणास स्वर्गाची
" वाट दाखविणारा **सद्गुरु** अगर नरकलोकाची वाट दाखविणारा **कली**

---

४ रिफार्मेशनची लाट.—जोंपर्यंत लोकांत अज्ञान असतें, तोंपर्यंत धर्माचे नांवाखाली हरतऱ्हेनें लोकांस फसवावें असा सत्वहीन धर्मोपदेशकांचा स्वभावच आहे. या नियमास अनुसरून पंधरावे शतकापर्यंत धर्माचें स्तोम माजवून ख्रिस्ती धर्माचार्यांनीं यथेच्छ फसवणूक चालविली होती. पंध्राव्या शतकांत लूथरचा अवतार होऊन त्यानें पापसाहेब पैसे घेऊन पापक्षालनाची सनद लोकांस विकत होते ही गोष्ट सद्धर्मास अनुसरून नाहीं हें लोकांस व्यक्त करून दाखवून सर्व बेंड फोडलें, व त्यामुळें आपल्या धर्मांत खरें तत्व तरी काय आहे हें पाहण्याकडे लोकांची प्रवृत्ति दिवसें दिवस जास्त होऊन निस्पृह व निग्रही लोक धर्मचिकित्सा करूं लागले. आणि धर्मांतील वेडगळ मतें व चाली हळू हळूं कमी होऊं लागल्या. ही लाट लूथरनें प्रथम जर्मनींत उत्पन्न केली. तेथून ती फ्रान्स व इंग्लंडमध्यें गेली व हळूं हळूं सर्वत्र पसरली. हे निस्पृही व निग्रही लोक सुखदुःखाच्या तर्कशास्त्रानें चालते तर ही गोष्ट कधींच झाली नसती.

५ मार्सेलसचीं स्तोत्रें—फ्रान्सच्या राजक्रांतीचे वेळीं लोकांची भयंकर स्थिति दूर करण्याचे कामीं सरकार कांहींच करीत नाहीं असें पाहून मार्सेल्स येथील म्युनिसिपालिटीनें लोकांवरील जुलमाच्या कारणांचा उच्छेद करण्याकरितां ६०० लोक तयार केले. हे लोक आपलीं घरें दारें मुलें बाळें सोडून फायद्याची कांहीं आशा न करितां या जुलमाच्या कारणांचा उच्छेद तरी करूं, नाहीं तर निदान त्या कामीं प्राण जाईपर्यंत प्रयत्न तरी करूं, अशा निग्रहानें शिर हातावर घेऊन निघाले. त्या वेळचें त्यांच्या अंतरंगाचें हुबेहुब आविष्करण करण्यासारखें एक "मार्सेलसचा कुच" किंवा "मार्सेलसचें स्तोत्र" या नांवाचें लहानसें काव्य कर्नल रोगेट डि लिली यानें करून तें बँडच्या चालीवर बसविलें आहे.

" होय. फार कशाला जो अगदीं हीन, विषयांध मनुष्य, त्याचींही इंद्रियें
" केवळ मनाचे अगर **कल्पनेचे** हस्तक होत; किंवा त्या मनाचीं पाणी
" पिण्याचीं उपकरणें होत. ज्यांचा चरित्रक्रम अगदीं घड्याळासारखा नियमित
" व कंटाळवाणा असतो, त्यांनाही वागविणारी एक ईश्वरी स्फूर्तीची किंवा
" कलीच्या वेडाची प्रभा असतेच. या प्रभेस **ईश्वरी स्फूर्तीचें** किंवा
" **कलीच्या वेडाचें** स्वरूप येणें हें कांहीं अंशीं आपल्या कर्तबगारीवर
" अवलंबून असून आपल्या भोंवतीं जो **अनंत**रूप सागर पसरलेला आहे
" त्याच्या तेजानें ही प्रभा पडते, आणि मनुष्याच्या जीवितावधिरूप बेटास
" हीच प्रभा आपल्या कवडाशांनें ते ते रंग देते. अर्थात ज्ञानरूप वातायनां-
" तूनच आपण पाहतों खरे, परंतु या वातायनाचीं तावदानें अगदीं स्वच्छ
" करूं म्हटल्यास अशक्य आहे. शिवाय मनाच्या डोळ्यांनींच या गवाक्षां-
" तून पाहावें लागत असून या डोळ्यांवरील **कल्पना**रूप बाहुलीच्या रंगा-
" प्रमाणेंच आपणांस या खिडकींतून दिसणाऱ्या पदार्थांस विशेष स्वरूप
" येणार. मीच स्वतः पांचपांचशें जिवंत शिपाई एका रंगविलेल्या कापडा-
" करितां कावळ्यांची धन झालेले पाहिले नाहींत काय ! त्या फडक्यास ते
" म्हणत हें आमचें **निशाण**; व त्याच्या अभिमानाकरितां ही सर्व प्राण
" हानि ! त्याची किंमत पाहूं गेलें तर बाजारांत कोणीं दोन आणेही दिले
" नसते. केसर जोसेफनें[६] हंगारीचा लोखंडी मुकुट खिशांत घातल्या बरो-

---

६ केसर जोसेफ---जर्मनीचा बादशहा ( १७४१--१७९० ) हा पुरुष प्रसिद्ध मेरिया-थेरिसाचा मुलगा. या बादशहाचें लक्ष लोकसेवेकडे फारच होतें; व लोकांचे हिताकरितां पूर्वींच्या राज्य पद्धतींत त्यानें पुष्कळ सुधारणा केली. आठवड्यांतून एक सबंध दिवस बादशहानें लोकांचे अर्ज व तक्रारी ऐकण्यांत घालवावा असें ठरवून तो त्याप्रमाणें वागत असे. वर्तमानपत्रांत व ग्रंथांत कांहीं विषयावर लेख लिहिण्याचा प्रतिबंध असे तो त्यानें दूर केला. धर्मसंबंधांतील जुलमाच्या गोष्टी बंद केल्या. व्हॅसलेज म्हणजे कांहीं सवलती असलेली गुलामगिरी त्यानें बंद केली. सामान्य ऐहिक व्यवहाराचे संबंधानें लोकांवर रोमच्या धर्मपीठाचें वर्चस्व होतें तें दूर केलें. धर्ममठांत जिकडे तिकडे जुलूम व अनन्वित कृत्यें चाललीं होतीं त्यांपैकीं ज्या मठांत सुधारणा होणें शक्य वाटलें त्यांत सुधारणा करून बाकीचे मठ बंद केले. ऐहिक गोष्टींत आपलें वर्चस्व पूर्ववत चालू ठेवण्याविषयीं खटपट करण्याकरितां स्वतः पोप साहेब त्याचेकडे आले होते. त्याचा मान मरातब त्यानें उत्तम प्रकारें ठेविला. तरी ही जुलमाची गोष्ट त्यानें ऐकिली नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यानें आपल्या प्राटेस्टंट पंथाच्या मांडलिक राजांचा दरबार करून त्यांचे राज्यांतून धर्मसंबंधांतही पोपचें जुलमी जूं काढून टाकावें असें ठरविलें. त्यानें अनेक लढाया मारून आपली सत्ताही वाढविली.

" वर, जसें चंद्रकिरणांनीं महासागरास भरतें यावें, याप्रमाणें सर्व **हंगारी**
" देश खवळून गेला; आणि इतकें कशा करितां ! तर जो मुकुट आकार-
" मानानें व किमतीनेंही एखाद्या घोड्याच्या नालाचयासुद्धां योग्यतेचा नाहीं
" त्याकरितां ! हे सर्व लोक बेवकूब होते काय ? नाहीं. पण समजून, किंवा
" गैरसमजुतीनें, मनुष्य हा **कल्पनांवर** व **कल्पनांच्याच** अनुरोधानें चालत
" असून **कल्पनेचेच** आधारावर त्याचा सर्व चरित्रक्रम असतो. या **कल्प-**
" **नांची** व चिन्हांची वास्तविक किंमत समजून ती ज्या लोकांस महत्वाची
" वाटली, तेच लोक नांवालौकिकास चढले. कारण उघडच आहे कीं
" या **चिन्हांत ईश्वरी** अंश असून तो दिसण्यासारखे ज्यांना डोळे असतात
" त्यांस तो दिसतोही.

" या चिन्हांविषयीं दुसरी एक गोष्ट सांगावयाची आहे. ती ही कीं त्यांस
" दोन प्रकारची किंमत असते. एक **वस्तुगत** किंवा अंतर्गत किंमत; व
" दुसरी **बाह्य** किंमत. कांहीं चिन्हांस ही दुसरी म्हणजे बाह्य किंमत मात्र
" असते. अंतर्गत किंमत बिलकुलच नसते. **शेतकऱ्यांच्या लढाईंत**[७] त्यांनीं
" निशाणाकरितां एक जोडा काठीस लाविला होता. त्यास **चिन्ह** या नात्यानें
" अंगभूत किंमत काय होती बरें ! किंवा **नेदरलंडचे लोकांनीं 'भिकारी'**[८]
" हें टोपण नांव घेऊन अभिमानपूर्वक एका **झोळी कुबडीच्या** निशाणा-
" भोंवतीं जमून प्रत्यक्ष **फिलिप**[९] राजाशीं सामना करून जय मिळविला तेव्हां
" त्या **झोळी कुबडीची** अंगभूत किंमत कितीशी होती ? या उदाहरणांतील

---

७ सन १५०२ मध्यें जर्मनींतिल शेतकऱ्यांनीं सरदार लोक व धर्मोपदेशक यांच्या जुलमास त्रासून बंड केलें होतें त्यास कलाबतूच्या जोड्याचें बंड असें नांव इतिहासांत पडलें आहे.

८ हें भिकाऱ्यांचें युद्ध १५५६ त झालें. ( पुढील टीप पहा. )

९ फिलिप—स्पेनचा राजा दुसरा फिलिप. (१५२७—१५९८) इंग्लंडची राणी पहिली मेरी ती त्याची बायको ( १--७--७ ). रोमन क्याथलिक पंथाचा अभिमान धरून इतर पंथांतिल लोकांची कत्तल, जिवंत जाळणें, व अन्य प्रकारचा छळ या कामांत या उभयतां नवरा बायकोनीं आपलें नांव चिरस्मरणीय करून ठेविलें आहे. पाखंडाचा उच्छेद करण्याच्या नांवाखालीं मेरीनें इंग्लंडांत व फिलिपनें आपल्या इटलींतील प्रांतांत अग्नि व तरवार यांचे योगानें फारच अनन्वित कृत्यें केलीं. फिलिपच्या मनांत याच प्रकारचें धर्मसंरक्षण नेदरलंडांतही सुरू करावयाचें होतें. परंतु विलियम दि सायलेंटच्या सैनापत्याखालीं नेदरलंडांतील सरदार एकत्र होऊन व अति निकरानें लढून त्यांनीं

" चिन्हांस अंगभूत किंमत कांहींच नसून बाह्य किंमत मात्र होती आणि या
" बाह्य किमतीचें स्वरूप म्हटलें तर जनसमूहानें कांहीं विशिष्ट पूज्यभावानें
" जमून एकदिलानें काम करण्याकरितां उत्पन्न केलेलें कांही आकस्मिक कारण
" या नात्याचें ! या एकजुटीमध्यें मात्र मागें सांगितल्याप्रमाणें कांहीं **गूढ**
" **तत्व ईश्वरप्रकृतींतून** आविर्भूत झालेलें असतें. याच वर्गांत सरदारांच्या
" घराण्यांतील विशेषक चिन्हें, लढाऊ फौजेंतील निशाणें, व सामान्यतः राष्ट्रां-
" तील निरानिराळ्या पंथांचे, व निरनिराळ्या रितिभातींचे लोक जीं विशिष्ट
" चिन्हें धारण करितात त्या सर्वांचा समावेश होतो. त्यांस अंगभूत किंमत
" किंवा पावित्र्य, किंवा महत्व कांहींच नसतें. व जें एक प्रकारचें बाह्यमहत्व
" त्यांस असतें तें कांहीं तरी **कल्पनेच्या** आश्रयानें आलेलें असतें. पण या
" सर्व चिन्हांखालीं **ईश्वरी दिव्य प्रभेचें** कांहीं तरी अंग असतेंच. लष्करी
" निशाणांत **कर्तव्याच्या, शौर्याच्या**, व **साहसाच्या कल्पनांचें** दिव्य
" तेज असतें. कांहीं निशाणांत **स्वातंत्र्याची**, कांहींत **हक्काची** या प्रमाणें
" कांहीं तरी **विशिष्ट दीप्ती वास** करिते. फार कशाला, पण ज्या निशाणा-
" खालीं आज अठराशें वर्षे अगण्य लोक एक होत आले आहेत त्या ख्रिस्ती
" लोकांच्या **क्रुसास** सुद्धां मूळ अंगभूत किंमत कांहींच नसून त्यास त्याची
" बाह्य किंमतही केवळ प्रसंगवशात् आलेली आहे.

" परंतु या चिन्हांत कांहीं **अंगभूत** अर्थ असला म्हणजे त्यांची गोष्ट
" अगदींच निराळी आहे. मग त्यांचे भोंवतीं मनुष्यांनीं एक जुटीनें जम-
" ण्यास कांहीं निराळें कारण लागत नाहीं. इंद्रियांस **ईश्वरांश** प्रकट झाला,
" व त्या **अनंतानें** आपलें थोडें बहुत स्वरूप या **मर्यादित कालोपाधींत**
" प्रकट केलें म्हणजे बस होतें. मग त्या ठिकाणीं मनुष्यें जमलींच पाहिजेत,
" व त्या **चिन्हविशेषांभोंवतीं** सर्वांनीं जमून त्या **अनंताची** पूजाही केली
" पाहिजे. मग असें होतां होतां दिवसें दिवस त्या **चिन्हाचे** ठायीं बाह्य
" पावित्र्यही उत्पन्न होतें.

---

स्पेनच्या अमलाचें भयंकर जूं झुगारून दिलें. मेरीचे मरणानंतर फिलिपनें एक मोठें " अजिंक्य " अरमार तयार करून सुमारें ३५००० लोक इंग्लंडावर स्वारी करण्यास पाठविले. परंतु तुफानामुळें व इंग्लिश लोकांच्या कौशल्यामुळें हें सर्व अरमार नष्ट झालें. हा राजा लोक छळाच्या कामांत इतका तरबेज होता कीं या " देश-हिताचे " कामाप्रीत्यर्थ त्यानें प्रत्यक्ष आपल्याच मुलास अंधार कोठडींत उपाशी ठेवून जिवें मारिलें !

" **कलांचीं** सर्व खरीं कामें ( म्हणजे मनाच्या कल्पकतेमुळें होणारीं
" प्रासादिक स्फूर्तीचीं कामें ) हीं या अंगभूत किंमत असलेल्या चिन्हांचे
" वर्गांत येतात. पण युक्ति प्रयुक्तीनें बनविलेलें बाहुलें कोणचें व खरोखर
" **कलेचें** काम कोणचें याची निवड आपणांस करितां आली तरच तो
" **अनंत परमात्मा** या **मर्यादित** कालस्वरूपांतून आविर्भूत होतांना आ-
" पणांस दिसेल. एरवीं त्याचें दिव्य स्वरूप आपणास दृष्टिगोचर होणार
" नाहीं. या चिन्हांस बाह्यमहत्व दिवसें दिवस येतें, असें वर सांगितलेंच
" आहे. उदाहरणार्थ **होमरचें इलियड** किंवा वाल्मिकीचें **रामायण** घ्या, या
" ग्रंथांस या कित्येक हजार वर्षांत अगदींच नवें असें महत्व प्राप्त झालें
" आहे. या जातीच्या सर्व चिन्हांत उत्कृष्ट प्रतीचीं म्हटलीं म्हणजे ईश्वरां-
" शानें अवतरलेल्या **महात्म्यांचीं चरित्रें** होत. कारण सर्व कलांत अशा
" चरित्रांपेक्षां दुसरा दिव्यतर पदार्थ सांपडणार नाहीं. या दिव्यकलेच्या
" पदार्थांचें परिसमापन मृत्यूंत आहे या दृष्टीनें पाहिलें असतां मृत्यूमध्यें
" सुद्धां, विशेषतः न्यायशील मनुष्याचे मृत्यूंत, हें ईश्वरी विभूतीचें चिन्हां-
" कित स्वरूप स्पष्ट दिसत नाहीं काय? अहाहा अशा पुरुषाचा मृत्यु
" म्हणजे **जयश्रीची झोंपच** होय! हें **दिव्यचिन्ह** त्या लोकप्रिय पुरुषा-
" च्या मुखावर छायारूपानें पसरलें असून आज तें आवडतें मुख जरी
" कोणास ओळखीत नाहीं तरी तुमचे डोळे शोकाश्रूंनीं अगदींच व्याप्त झाले
" नसले तर त्या चिन्हांत ही तुह्मांस **मर्यादित काल** व कालातीत **अनंत**
" परमात्मा या दोघांचा संयोगभाव स्पष्ट दिसून शिवाय एकस्या **अनंताची**
" निराळी झाकही दिसेल.

"व याही प्रकारच्या चिन्हांत अतिश्रेष्ठ चिन्ह म्हटलें म्हणजे जेव्हां हा
" **कारागीर** किंवा **कवी** अवताराचे पद्धतीस पोहोंचून सर्व लोकांस प्रत्यक्ष
" देवाप्रमाणें वाटतो व लोक त्याची पूजा करितात तेव्हांचें त्याचें स्वरूप
" होय. अर्थात मी **धर्मचिन्हां**विषयीं लिहीत आहें हें सांगावयास नको. या

---

१० होमर—ग्रीस देशांतील अतिपुरातन कवी. हा आपल्या आईचें लग्न होण्या-पूर्वींच झाला होता. यास होऊन किती वर्षे झालीं याचें कांहींच अनुमान होत नाहीं. असें म्हणतात कीं ग्रीस देशांत लेखनकला अवगत नव्हती तेव्हांच तो झाला असून त्याचीं "इलियड" व "ऑडिसी" हीं महाकाव्यें लोकांनीं पाठ करून करूनच काळाच्या तडाक्यांतून वाचविलीं.

" प्रकारचीं धर्मचिन्हें किंवा ( ज्यांस लौकिकांत धर्म असें म्हणतात ते )
" विशिष्ट धर्म मनुष्याच्या स्थितिविशेषाप्रमाणें आजपर्यंत अनंत झाले. कारण
" मनुष्याच्या स्थितिविशेषाप्रमाणेंच त्यास उच्च अगर हीन धर्माची कल्पना
" होते. म्हणून या धर्मचिन्हांपैकीं कांहींस मात्र तात्पुरती अंगभूत किंमत
" असून बाकीच्या बहुतेकांस निवळ बाह्य महत्व मात्र असतें. आतां या
" धर्मचिन्हांची आजपर्यंत किती प्रगती झाली आहे याची कोणास जिज्ञासा
" झाल्यास त्यानें अतिउत्कृष्ट धर्मचिन्ह म्हणजे नाझारेथचा येशूख्रिस्त व
" त्याचें चरित्र व या दोहोंचा प्रभाव पुढें किती झाला याकडे पहावें म्हणजे
" झालें. मनुष्याच्या मनाची मजल अजून या पलीकडे गेली नाहीं. मात्र हें धर्म-
" चिन्ह जरी अगदीं अक्षय्य व अनंत प्रकृतीचें आहे, तरी त्यांतलि गूढ इंगितार्थ
" नेहमीं नव्यानें स्पष्टकरून द्यावा घ्यावा लागेल.

" परंतु **काळाचा** प्रभाव याही चिन्हांचे पावित्र्यावर होतो; व ज्याप्र-
" माणें काळाचे प्रगतींत त्यांस हळू हळू जास्त पवित्रत्व येतें त्याचप्रमाणें
" पुढें कालांतरानें हें पवित्रत्व लुप्त होऊन त्याचे ऐवजीं कधीं कधीं अप-
" वित्रत्वही येतें. एकंदरींत इतर पार्थिव वस्त्रांप्रमाणेंच हीं **चिन्हवस्त्रें**ही
" कालांतरानें जीर्ण होतात. **होमरच्या** किंवा **वाल्मिकीच्या** काव्यांतील
" कवित्व आज नाहींसें झालें आहे असें नाहीं. परंतु त्यांतील पूर्ण कवित्व
" आपल्या आजच्या कल्पनादृष्टीस लुप्तप्राय झालें आहे; व त्याचें तेज
" एखाद्या दूरच्या पदार्थाप्रमाणें मात्र चमकतें. जसा एखादा तारा दृष्टि-
" क्षेपाचे पल्ल्यांतून दूर गेल्यामुळें अंधुक अंधुक दिसूं लागतो, व मग
" दुरबिणीचे साह्यावांचून दिसेनासा होतो; त्याप्रमाणेंच या चिन्हांची
" स्थिति झाली असून आतां आपल्या कल्पनादृष्टीवर प्रकाश पडण्या-
" सारख्या भाष्यरूप दुर्बिणीचे साह्यावांचून त्यांतील दीप्ती आपणांस स्पष्ट
" दिसणार नाहीं. त्याचप्रमाणें **स्कॅंडिनेव्हिअन लोकांचे थॉर** देव आणि
" त्यांचीं **एडास** नांवाचीं पुराणें केव्हां तरी अंतर्धान पावतील. सिद्धी
" लोकांचा देव **मंबोजंबो** व अमेरिकेंतील इंडियन लोकांचा **पावॉ**, यांस
" तर पळच काढावा लागेल. कारण सर्वच वस्तूंस, या आकाशकटा-
" हांतील तेजोमय नक्षत्रांस, व ध्रुवादि तारकांसही उदय, आक्रम, व
" ऱ्हास आहेतच. मग उल्कादिकांस या स्थिति असल्या तर नवल काय ?

" **राजचिन्ह** म्हणून राजाजवळ असणारी **तरवार** लांकडाची असून

" वरून मुलामा लाविलेली आहे हें मला आपण सांगतां यांत विशेष नाहीं.
" देशांतरचीं व युगांतरांचीं **नाणीं** सांठविण्याची पेटीही आपण म्हणतां
" त्याप्रमाणें कवडीमोलाची आहे हेंही खरें. नुसतें हें सांगण्यास कांहीं गुप्त-
" विद्येची जरूर नाहीं. पण या पदार्थांतील गेलेलें **महत्व** जर त्यांत कोणी
" परत घालील तर मात्र त्यास खरा मांत्रिक म्हणतां येईल.

" तरी एवढी एक गोष्ट निखालस आहे कीं जर **चिरत्वावर नजर**
" **ठेवून** तजवीज करावयाची असेल, तर मनुष्यांतील जें **खोल** व **अनंत**
" **चैतन्य** त्यावर म्हणजे **प्रेम** व **विवेकप्रवृत्ती** यांवरच आपली इमारत
" उभारली पाहिजे. पण जर एखाद्या दिवसाची मात्र तरतूद करावयाची
" असेल तर **अप्पलपोटेपणा** व व्यापारी दृष्टि, असल्या फोलकट व वर-
" पांगी गुणावर भागेल. ह्मणून जो पुरुष **ईश्वरस्फूर्तीनें** विश्वकर्म्याप्रमाणें
" नवीन **चिन्हें** करून त्यांत दिव्याग्नीचें तेज उत्पन्न करितो त्यासच मी
" **सद्गुरु** किंवा **आचार्य** ह्मणेन. असे सत्पुरुष कधीं होत नाहींत असें
" नाहीं. आजही कदाचित् कांहीं विद्यमान असतील. परंतु सामान्यपणें
" पाहतां अमुक ( **धर्म** ) **चिन्हांत** आतां सत्व राहिलें नाहीं असें पाहून
" हलक्याच हातानें त्यास जो दृष्टीआड करील त्यासही शाहणा अगर
" मोठा असें मानण्यास हरकत नाहीं.

" इंग्लंडातील सांप्रतचे **राजेसाहेब ( चवथा जार्ज )** सिंहासनारूढ
" होण्याची तयारी चालू असतां तेथील एका वर्तमानपत्रांत असें वाचण्यांत
" आलें कीं " आमच्या राजेसाहेबांच्या वतीनें ज्या वीरास या प्रसंगीं सर्व
" जगाशीं टक्कर द्यावयाची आहे, त्याची आज बरीच तयारी झाली असून
" आतां त्यास कोणाचे मदतीवांचून घोड्यावरही बसतां येतें ! " असें
" वाचून मीं आपल्या मनाशींच म्हटलें कीं, हेंही एक **चिन्हवस्त्र** आतां
" अगदीं फेंकून देण्याच्या योग्यतेचें झालें आहे[११]. हाय, हाय ! जिकडे

---

११ राज्याभिषेकाचे वेळीं कोणी प्रतिस्पर्धी उत्पन्न झाल्यास त्याचें निराकरण करण्याकरितां एक अधिकारी नेमण्याची वहिवाट इंग्लंडांत सन १०६६ त पडली. त्या वेळीं पहिला विलियम हा परकीय राजा नुकताच आला होता; ह्मणून असा अधिकारी अवश्य होता. परंतु आतां हा अधिकार केवळ थाटामाटा पुरताच आहे असा ग्रंथकर्त्याचा आशय आहे. आपणांतही केवळ गतानुगतिकत्वामुळें चालू असलेल्या पुष्कळच चाली आहेत. लग्नांतील बहुतेक चाली याच प्रकारच्या आहेत.

" पहावें तिकडे **काळाच्या** प्रभावानें जीर्ण झालेल्या **चिन्हवस्त्रांच्या**
" चिंध्या या **सृष्टिरूप** बाजारांत पडल्या असून आज त्यांची इतकी गर्दी
" झाली आहे कीं, आपणांस आतां हलण्यासही वाव नाहीं! आतां जर त्या
" आपण फेंकून दिल्या नाहींत तर मरण्याचीच पाळी आहे."

---

# भाग चवथा.

## दास्य.

या कागदांपैकीं **मीन** राशीच्या पुडक्यांत अगदीं एका बाजूस पडलेला होफ्राथ ह्यूसक्रेक साहेबांनीं लिहिलेला "**लोकसंख्या कमी करण्याची संस्था**" या नांवाचा लेख आहे. त्याचीं पानें फाटलीं असून त्यांस कांहीं विलक्षण वनस्पतीचा वास येत आहे. त्या लेखाकडे या स्थळीं आपणांस वळलें पाहिजे. वास्तविक पाहतां या लेखांत महत्वाचें कांहींच नाहीं, पण त्यांत समासामध्यें **टयूफेल्सड्राक** साहेबांचे हातच्या बऱ्याच टिपा असून त्यांपैकीं कांहीं येथें उतरून घेतल्यास वाचकांस फायदेशीर होईल.

होफ्राथसाहेबांच्या संस्थेसंबंधाच्या मजकुराशीं किंवा तत्संबंधीं पत्रव्यवहार वगैरे कामें करणाऱ्या मंडळ्यांच्या वर्णनाशीं आह्मांस कांहीं करावयाचें नाहीं. ह्यूसक्रेकसाहेब हे **मालथससाहेबांच्या**[1] शाळेंतले असून त्यांच्या मताचा त्यांस इतका अभिमान आहे कीं, तो अभिमान त्यांना खरोखरच गप्प करितो कीं काय कोण जाणें! ह्यूसक्रेकसाहेबांस लोकसंख्येच्या वाढीची अत्यंत धास्ती पडली असून ती त्यांच्या मनांत सदैव जागृत असते. अर्थात् तीमुळें त्यांना अगदीं वेड लागल्यासारखें झालें असून या संबंधानें विचार

---

१ मालथस—(१७६६—१८३४) एक इंग्लिश धर्मोपदेशक. यानें लोकसंख्या व अर्थशास्त्र यांवर बरेच ग्रंथ लिहिले आहेत. कार्लाइलचे वेळीं लोकांत या ग्रंथांची फारच चर्चा होत होती. लोकसंख्येसंबंधाचा मालथसचा मुख्य सिद्धांत असा आहे कीं, लोकसंख्या पंचवीस वर्षांत दुप्पट होते. परंतु अन्नाची तरतूद त्या मानानें वाढत नाहीं. लोकसंख्येची वाढ भूमितीश्रेढीनें होत असून अन्नाची वाढ गणित श्रेढीनें मात्र होते. या दोन प्रमाणांचा मेळ पाडण्याकरितां दुःखें व व्यसनें यांच्या योगानें व अल्पायुष्यानें मनुष्यसंख्या कमी व्हावी अशी सृष्टींत तरतूद आहे. ह्मणून दुःखें व अल्पायुष्य कमी करावयाचें असेल तर प्रजोत्पादनही कमी केलें पाहिजे.

करण्यासही आतां ते अपात्र झाले आहेत. जिकडे पहावें तिकडे त्यांस क्षुधेवांचून कांहींच दिसत नाहीं. पहावें तिकडे ' **आ** ' पसरलेलीं **तोंडें** असून प्रतिक्षणीं तीं जास्त जास्तच वासत चाललीं आहेत असें त्यांस वाटतें. व त्यांचे मतें याचा अत्यंत भयंकर परिणाम होऊन सर्व जगाचा अंत होईल; कारण **लोकसंख्या** अति वाढत जाऊन खाण्याची पंचाईत पडून सर्वांसच वेड लागल्यासारखें होईल; व मग लोक एकमेकांस खाऊं लागतील; या सर्व धरपळींमध्यें दयाळू पुरुषास जीविताची ओकारीच येईल. अशा वेळीं आपणांस जरा मोकळी हवा तरी मिळावी ह्मणून होफ्राथ साहेब ही **संस्था** काढीत आहेत. पण याशीं आपणांस कांहींच करावयाचें नसून प्रोफेसर साहेबांचीं जीं त्यावर टिपणें आहेत तेवढ्यांची मात्र आपणांस जरूर आहे.

आपल्या प्रोफेसर साहेबांचीं मतें **निःसीम** पंथाचीं आहेत असें आह्मीं मागें सांगितलेंच आहे. अर्थात् **मनुष्याच्या** विशेष **अधिकारा**संबंधानें त्यांचीं ठरीव मतें असून **झाडार्म** घराण्यांतले वाडे व चालीरिती पाहून **फुटरलच्या झोंपडीचें** त्यांना अगदींच विस्मरण झालें आहे असें नाहीं. ह्यूसक्रेकसाहेबांच्या लेखाच्या मळपृष्ठावर प्रोफेसरसाहेबांनीं लिहिलेला पुढील पुसट पुसट मजकूर आढळतो.

" **दोन पुरुषां**विषयीं मात्र मला पूज्यबुद्धि आहे. ह्या दोहोंवांचून
" इतरांविषयीं माझ्या मनांत बिलकूल पूज्यबुद्धि नाहीं. **पहिला, कामानें**
" **थकलेला मजूर** किंवा **कारागीर**. तो या पार्थिव पदार्थांचींच हत्यारें
" करून त्या हत्यारांनीं जगांतील नैसर्गिक शक्तींशीं लढून ही पृथ्वी जिंकून
" मनुष्याचीशी करितो. त्याचा तो कामानें घट्टे पडलेला ओबडधोबड वांकडा
" हात किती पूज्य आहे! दिसण्यांत जरी तो असा आहे, तरी त्याचे आंगीं
" कांहीं विलक्षण **गुण** आहे. वास्तविक पाहतां त्या हातांतच या **भूरा-**
" **ज्याचा राजदंड** असून त्याचा पराभव केवळ अशक्य आहे. या पुरु-
" षाचा चेहेराही ओबडधोबड, हवेनें घटलेला, व उन्हानें काळवंडलेला
" असून त्यांतील ज्ञानशक्तीही तशीच अडदांडपणाची आहे; पण तो चेहेरा
" किती पूज्य आहे! (आणि याचें कारण इतकेंच कीं,) तो पराक्रमी पुरुषाचा
" चेहेरा आहे. हे उदार महात्म्या पुरुषा, या तुझ्या ओबडधोबडपणामुळेंच
" तूं आम्हांस जास्त पूज्य वाटतोस. शिवाय तुझ्या कष्टाबद्दल आह्मी तुज-
" वर प्रेम व दया हीं केलीं पाहिजेत. बिचाऱ्या बांधवा, तुला कोणी ढुंकूनही

" विचारीत नाहींना ! अरेरे ! आमच्याकरितां कष्ट कर करून हें तुझ्या
" पाठीस कुबड आलें आहे. तुझेही हात पाय आमच्यासारखेच नीट
" नेटके व सुबक होते; आणि आमच्याकरितां केलेल्या कष्टामुळेंच त्यांस
" ही कुरूपता आली आहे. पूर्वी लढाईस पाठविण्याकरितां चिठ्या टाकून
" लोक निवडीत व लोकांकरितां लढाईत पराक्रम करितांना त्यांस जखमा
" लागून व अन्य प्रकारें त्यांची दैना होऊन लोकांस विजयाचें भूषण मिळे.
" त्याप्रमाणेंच हें आमच्या वतीनें नैसर्गिक शक्तीशीं लढाया करण्याचें काम
" **दैवानें** तुजवर सोंपविल्यामुळें आमच्या लढाया मारितांनाच तुझी अशी
" दैना झाली आहे. तुलाही ईश्वरदत्त लावण्य होतें; पण तें व्यक्त व्हाव-
" याचें नव्हतें. परिश्रमांतील अनेक आयासांमुळें व हिसकाहिसकीमुळें तें
" तसेंच बुरसून रहावें, व तुझ्या **आत्म्याप्रमाणेंच** तुझ्या **शरीरासही**
" **स्वातंत्र्याचा** अनुभव नसावा या दैवयोगापुढें इलाज नाहीं. पण
" चालूं दे; तुझें काम चालूं दे. दुसरें कोणी आपलें कर्तव्य करो किंवा
" न करो. तूं आपलें कर्तव्य बजावीत आहेस ! अरे, जीवांचून आमचें
" जीवित चालावयाचेंच नाहीं, त्या रोजच्या **भाकरी**[२]करितां तूं परिश्रम
" करीत आहेस !

" **दुसरा** एक पुरुष मला पूज्य वाटतो; व त्याची योग्यता याहूनही
" अधिक आहे. तो कोणचा, तर ज्या गोष्टीवांचून **आत्म्याचें** अडावयाचें,
" जी गोष्ट जीवात्म्यास अत्यंत आवश्यक, तिजकरितां परिश्रम करणारा.
" शरीरपोषक अन्नाकरितां नव्हे; तर जीवास **ज्ञानरूप** अन्न पुरविण्या-
" करितां खपणारा. तोही आपलें कर्तव्य करीत नाहीं काय? जीवाच्या
" समाधानाचें **आध्यात्मिकतत्त्व** हस्तगत करून स्वतःचे व्यवसाय हलके,
" मोठे कसेही असले तरी त्यांतच **शब्दांनीं** व **आचरणानें** तें तत्व जगास
" स्फुट करून देण्याचा प्रयत्न हा पुरुष करीत असतो. त्याच्या **अंतरंगां-**
" **तील विचारांत** व बाह्य **कृतींत** जर मेळ असला तर त्याची योग्यता
" केवळ अनिर्वाच्य असते. खरा **कामकरी** किंवा **कारागीर** हें नांव
" त्यासच शोभतें. तो केवळ अचेतन पार्थिव पदार्थांवर काम करणारा
" कारागीर नव्हे; तर ईश्वरस्फूर्तीच्या हत्यारांनीं विचाररूप काम करणारा

---

२ भाकरी हा एकशेष समाहारद्वंद्व समास आहे. भाकरीशिवाय मनुष्याच्या जीवि-
तास अवश्य अशा वस्त्रादि सर्व वस्तूंचा त्यांत अंतर्भाव होतो.

" कारागीर होय. तो पार्थिव हत्यारांनीं आपणांकरितां इहलोक सर करीत
" नाहीं; तर दिव्य शक्तीच्या **ईश्वरनिर्मित हत्यारांनीं** आपणांकरितां
" **परलोक** सर करितो. जर हे गरीब बिचारे लोक आपल्या शरीरधार-
" णास अन्नादि अवश्य पदार्थ उत्पन्न करण्याकरितां इतके कष्ट करितात
" तर जे श्रेष्ठ व दिव्य शक्तींनीं काम करणारे कारागीर आहेत त्यांनीं
" त्याच्या मोबदल्यांत त्या बिचाऱ्यांना ज्ञान, उपदेश, स्वातंत्र्य व मोक्ष
" यांचा लाभ करून देण्याकरितां कष्ट करावयास नकोत काय ? या दोन
" प्रकारचे पुरुष, मग ते कोणच्याही पद्धतीचे असले तरी आम्हांस पूज्य
" वाटतात. तेच खरे **दाणे** होत. बाकीचे फोल व मातीमोल असून ते
" कोणीकडेही वाऱ्यावर वहावत गेले तरी त्याची आम्हांस कांहींएक
" दिक्कत वाटणार नाहीं.

" परंतु हे दोन्ही अधिकार जेव्हां एकत्र दृष्टीस पडतात, तेव्हां त्या
" **पुरुषाबद्दल** जो पूज्यभाव उत्पन्न होतो त्यास पारावार नाहीं. मनु-
" ष्याच्या जीवनास अवश्य अशा ऐहिक पदार्थांच्या उत्पत्तीकरितां खपत
" असतांच अत्यंत दिव्य अशा **अध्यात्मज्ञाना**करितांही खटपट कर-
" णारा कोणी दिसला तर त्यास पाहून मला विलक्षण कौतुक वाटतें.
" **शेतकरी[३] संताविषयीं** जो पूज्यभाव मला वाटेल तसा दुसऱ्या कोणा-
" विषयींही वाटणार नाहीं. मात्र असा **संत** आज सांपडला पाहिजे. अशा
" **संताच्या** साह्यानें पूर्वीचें **सत्ययुगच** आज प्रत्यक्ष होऊन इहलोकच्या
" अगदीं हीन स्थितींतही स्वर्गांतील दिव्य दीप्ती अनुभवास येईल."

आणखी एके ठिकाणीं टयूफेल्सड्राक साहेब म्हणतात, " गरीब लोकां-
" संबंधानें मला इतका खेद होतो त्याचें कारण त्यांस पडणारे **कष्ट** नव्हत.
" आपण सर्वांनींच **कष्ट** केले पाहिजेत; **कष्ट न** केले तर चोरी तरी केली
" पाहिजे; मग त्या चोरीस आपण पाहिजे तें संभावित नांव दिलें, तरी
" **कष्टा**शिवाय ज्याचे योगानें आपलें चालतें ती **चोरीच** होय. आणि
" कशीही झाली तरी **कष्टापेक्षां चोरी** चांगली नव्हे. तात्पर्य कष्ट कराव-

---

३ शेतकरी म्हणजे केवळ शेती करणारा नव्हे; तर लोकांच्या निर्वाहास लागणारे पदार्थ मूळ उत्पन्न करणारा अगर इतर पदार्थांपासून तयार करणारा. या मानानें पाहिलें तर व्यापारी व नोकर व मागें सांगितलेले पवित्र धंद्यांतील लोक शिवाय करून बाकीचे लोहार, चांभार वगैरे सर्व लोक याच वर्गांत येतात.

" यास लागल्याबद्दल खेद करण्याचें प्रयोजन नाहीं. अर्थात् कोणाही इमा-
" नानें काम करणाऱ्या पुरुषास **काम** म्हणजे खेळ नव्हे, हें खरें. गरीब
" लोकांस **तहान** लागते, भूक लागते; पण गरिबांच्याही भुकेस **अन्न**
" आहे—तहानेस **पाणी** आहे. त्यांचें ओझें त्यास डोईजड होतें व ते
" दमून जातात, पण त्याचे निरसनार्थ देवानें त्यांस **झोंप** दिली असून
" तीही उत्तमोत्तम झोंप. कांकीं त्यांच्या घाणेरड्या खोपटांतही **निद्रादेवीचें**
" शांत मंदिर असून त्यांची निद्रा चांगल्या चांगल्या स्वप्नांनीं मात्र चावळते.
" या कोणच्याही गोष्टींत गरीब लोकांची कींव करावी असें नाहीं. पण या
" **ऐहिक तमांत** त्या बिचाऱ्यांच्या **आत्म्याची ज्योत** नाहींशी व्हावी,
" त्यांचेपर्यंत **दिव्य ज्ञानाचे** किरण पोहोंचूं नयेत, व ऐहिक पदार्थविज्ञा-
" नही त्यांचे वांट्यास येऊं नये, ही गोष्ट माझ्या मनांत फारच मोठी
" तळमळ उत्पन्न करिते. या अज्ञानांधःकारांत **भय** व **क्रोध** हीं दोन
" पिशाच्चें मात्र त्याचे सोबतीस असतात. अरेरे, त्याचें शरीर इतकें भव्य व
" सशक्त असून आंतील **आत्मा** अंधळा, खुरटलेला, भांभावलेला व मृत-
" प्राय असावाना? अरेरे! ही **प्राणज्योत ईश्वराच्या** फुंकरानें त्यास
" **स्वर्गांत** प्राप्त झाली असूनही तिचें तेज या भूतलावर त्यापासून
" गुप्तच रहावें काय? मला तर वाटतें कीं, ज्ञान होणें शक्य असून एकही
" **पुरुष अज्ञानी** राहून मेलेला पाहण्याचें कपाळीं येणें हेंच खरें दैव-
" दुर्विलसित होय. आणि एक गणितकार म्हणतो त्याप्रमाणें या भूतलावर ही
" गोष्ट जरी प्रतिक्षणीं वीस वेळ होत असली, तरी तिचें खेदकारक स्वरूप
" यत्किंचितही कमी होत नाहीं. अहो. या **अविज्ञेय सृष्टींत** सर्व मनुष्य-
" जातीनें मिळून एवढेंसें तुटपुंजें **पदार्थविज्ञान** आपलेंसें करून घेतलें
" आहे, तेंही त्या बिचाऱ्या सर्वांना आपण देऊं नये काय?

ही पुढें दिलेली टीप अगदींच निराळ्या लहरींत लिहिलेली आहे. ते लिहितात " लोकसंख्या कमी करण्याची पूर्वींची **स्पार्टन** लोकांची रीत फार
" चांगली होती. दास लोक जास्त झाले म्हणजे त्यांची ते शिकार करीत
" व भाल्याबरच्यांनीं अधिक लोक असतील तेवढे मारून टाकीत. मग
" हल्लीं आपलीं शिकारीचीं साधनें इतकीं सुधारलीं असून होफाथ साहेब हे
" इतक्या पंचाइतींत कां पडले आहेत न कळे! आतां बंदुका निघाल्या आहेत
" व कायमच्या पगारी फौजा आहेत. यांचे योगानें फाजील झालेले भिकार

" नाहींसें करण्यास दरसाल फार तर तीन दिवस लागतील. आणि या
" कामास होणारा दारूगोळ्याचा खर्चेही कांहीं अंगावर येणार नाहीं.
" गोळीबाराची तितकी वेगळी कवाईत वाचून त्यांतच हें काम होणार आहे.
" शिवाय मारलेल्या भिकाऱ्यांच्या प्रेतांपासून कमी उत्पन्न होईल असें नाहीं.
" कारण हीं प्रेतें नीट खारवून भरून ठेविलीं तर त्यांचें छानदार पौष्टिक
" अन्न होऊन जरी तें फौजेंतील व आरमारांतील लोकांना घटकाभर न
" दिलें, तरी गरीबखान्यांतून, कारखान्यांतून, व इतरत्रही जे अशक्त भिकारी
" भटकत आहेत व ज्यांचे जीव वाचविणें हल्लींच्या ज्ञानी व धार्मिक लोकांस
" अवश्य वाटतें, त्यांची तरी या मांसावर सालभर चंगळ होणार नाहीं काय?"

पुढें एका पारिग्राफावर प्रोफेसर साहेब लिहितात, " यांत कोठें तरी
" निःसंशय चूक होत आहे. कारण पूर्णवाढीच्या **घोड्याची** कोणच्याही
" बाजारांत दोनशेंपासून दोन हजार रुपयेपर्यंत किंमत येते. इतकी जगांत
" घोड्याची योग्यता आहे. आतां पूर्ण वाढलेल्या **मनुष्याविषयीं** जर
" पाहिलें तर आज त्याची किंमत कोणी एक छत्रपतीही न देतां उलट तो
" फांस लावून घेऊन या जगांतून नाहींसा होण्याचा करार करील तर मात्र
" त्यास बरीच मोठी रक्कम मिळण्याचा संभव आहे. परंतु **घोडा** व
" **मनुष्य** या दोन वस्तूंची तुलना करून कोणची वस्तू उत्पन्न करण्यांत
" विश्वकर्म्याची अधिक कारागिरी उपयोगांत आली आहे, या दोहोंपैकीं
" कोणचें यंत्र जास्त कुशलतेनें केलेलें आहे, व कोणाचे आंगीं जास्त
" कामाची शक्ति आहे, एवढें जरी पाहिलें, तरी मला वाटतें हा **दोन**
" **पायांचा, पांच पांच बोटें असलेल्या दोन हातांचा, सार्थ शब्द**
" **बोलणाऱ्या वाणीचा,** व विलक्षण **कल्पनाप्रचूर डोक्याचा** मनुष्य
" निदान शें पन्नास घोड्यांचे किमतीचा तरी ठरेल.

दुसरे एके पारिग्राफावर टयूफेलसड्राक साहेब लिहितात, "शाबास आपली
" होफ्राथ साहेब. खरोखरच या पृथ्वीवर फाजील मनुष्यें झालीं आहेत.
" पण काय हो, इतकी अडचण करून घेण्यास धान्य उत्पन्न होण्यासारखी
" सर्व जमीन लागवडींत तरी आली आहे काय? अमेरिकेंत **पंपास व सव्हाना**
" या प्रांतांत कितीशी लोकवस्ती आहे? **कार्थेज** व **आफ्रिकेचा मध्यभाग**
" यांत किती आहे? **मध्य एशियाचें विस्तीर्ण पठार, अलताई पर्व-**
" **ताच्या उतरणी, स्पेन, ग्रीस, तुर्कस्थान, तार्तरी** वगैरे मुलखांत

" कितीशी वस्ती आहे ? माझी तर अशी समजूत आहे कीं, एक मनुष्य
" खपण्यापुरती जमीन मिळाली तर तींत तो आपल्यासुद्धां दहा माणसांचें
" पोट भरितो. परंतु जसजशी लोकसंख्या वाढत जाईल तसतसे आपले लोक
" अन्य देशांत नेऊन तेथें त्यांजकडून पराक्रम करवून तेथेंच त्यांची वसा-
" हत करविणारे **हेंजेस्ट[४] व अलेरिक[५]** आतां कोठें गेले आहेत? आतां
" कांहीं मारक शस्त्रांचीही जरूर नाहीं. वाफेचीं इंजनें व नांगर एवढीं
" आयुधें असलीं म्हणजे बस आहे. पण ते लोकाग्रणी आहेत कोठें ? शिकार
" वगैरे राखण्यांत तर गुंतले नाहींतना !"

---

# भाग पांचवा.

## पुनरुज्जीवन.

आतां मागल्या चार भागांची एकवाक्यता करून व या पुडक्यांतील कांहीं सूचक व कांहीं प्रत्यक्ष उद्गारांचा त्यांशीं मेळ घालून पाहिलें असतां एक विलक्षण सिद्धांत आपणांपुढें उभा राहतो. तो हा कीं, कांहीं लोक सांप्रतचे **समाजास** बहुतेक मृतप्राय समजतात त्यापैकींच ट्यूफेलसड्राक साहेब हे एक आहेत. त्यांचे मतें **समाजांतील लोक** आतां कोणच्याही **सामाजिक बंधनानें** बांधलेले नसून, जवळ जवळ राहण्याची मूळची प्रवृत्ती व आनुवंशिक संवयी आहेत म्हणून मात्र अजून आपली वाताहत झाली नाहीं! या दोन कारणांमुळेंच अद्याप मनुष्यसमाजांत सार्वत्रिक, राष्ट्रीय, सामाजिक, कुटुंबीय, व व्यक्तिशः सर्वत्र परस्पर कली माजला नाहीं!! असें त्यांच मत असेल, असें आपणांस पूर्वींच वाटलें होतें; तरी तेवढ्यानेंच या मताचा विलक्षणपणा कमी होतो असें नाहीं. ते म्हणतात, " गेल्या तीन शतकांत,
" विशेषतः गेल्या शें पन्नास वर्षांत **समाजशरीराच्या धर्मरूप** रक्तवाहि-
" न्यांस ( यांतच समाजाचा प्राण असतो असें आम्हीं मागें सांगितलेंच
" आहे ) सकारण व निष्कारण, बऱ्याच जखमा झाल्या असून, चोहों-

---

४ हेंजेस्ट—(हेंग्स)--पु. १ भा० ३ टी. १७.

५ अलेरिक—पांचव्या शतकांतील जर्मन योद्धा. यानें विसिगाथ हें राज्य मिळविलें व रोम शहराचा दोन वेळ पाडाव केला.

" करून मार लागल्यामुळें सर्वत्र बारीक भोंकें पडलीं आहेत. अर्थात् त्यांमुळें
" हा **समाज** झुरणीस लागून त्यास क्षय झाला आहे; व आतां त्याचे
" बहुतेक शारीरिक व्यापार बंद पडले आहेत; आणि आतां जी त्यांत
" हालचाल दिसते ती केवळ जशी निर्जीव पदार्थांत यंत्राचे साह्यानें हाल-
" चाल होते तशांतलीच असून आतां कसल्याही मात्रा दिल्या तरी ही धुग-
" धुगी दोन दिवसांहून अधिक चालेल असें वाटत नाहीं[1].

पुन्हां ते एके ठिकाणीं ह्मणतात, " जेथें **समाजविषयक** विचाराचा
" गंधही राहिला नाहीं; जेथें **समाज** हें आपलें सामान्य घर आहे असेंही
" कोणास वाटत नसून प्रत्येकास एखाद्या गजबजलेल्या विशाळ **धर्मशाळेंत**
" राहिल्यासारखेंच वाटतें; जेथें प्रत्येक जण स्वतःपुरताच पाहत असून
" शेजाऱ्याबद्दल कांहींच फिकीर करीत नाहीं; शेजाऱ्यावर उलटूनही पडतो,
" आणि साधेल तितकें त्याचें वित्त उपटून बळकटीस येतो; जेथें एकमे-
" कांचे खिसे व गळे कापण्यास पोलादी हत्यारांचा उपयोग न होतां दुस-
" ऱ्याच तऱ्हेच्या संभावित नांवाच्या चोरट्या हत्यारांचा उपयोग होतो[2];
" व तेवढ्याकरितांच जेथें **स्वास्थ्य** आहे असें ह्मणावयाचें त्यास **समाज**
" असें ह्मणावें काय ? जेथें **मैत्री, धर्म, बंधुत्व,** वगैरे गोष्टी अशक्य
" कल्पनांसारख्या वाटतात, व उत्कृष्ट **आचारी** हेच **आचार्य** व मिष्टा-
" न्नावर हात मारणें हीच धर्मश्रद्धा असें वाटतें, त्या स्थितीस **समाज**
" ह्मणावें काय ? जेथें उपाध्यायाची जीभ पंक्तींचें भोजन जेवण्यापुरतीच
" असून उपाध्यायांची आतुरता दक्षिणा उपटण्यापुरतीच आहे; जेथें
" आपले धर्मप्रवर्तक व राज्यप्रवर्तक उदासीनपणें आपआपली तुंबडी
" भरीत असून, कोणीही पक्षपात करूं नये व सरळ मार्गानें अप्रतिहतपणें

---

१ तात्पर्य, धर्मावांचून समाज चालणें अशक्य आहे. पुढील व्याख्यानांतील समाजस्थितीचें वर्णन आज आपल्या समाजास किती तंतोतंत लागू पडतें याचा वाचकांनीं विचार करावा.

२ हीं चोरटीं हत्यारें मुख्यतः तीन आहेत (१) सत्याचे नांवाखालीं होणारी लबाडी; जसें खोटें माप, खोटी तागडी, बनावट पुरावा वगैरे. रुपयाच्या सोळा साक्षी, रुपयाच्या आठ साक्षी वगैरे प्रचारांत आलेल्या म्हणी खोट्या नाहींत. (२) समाज चांगल्या रीतीनें चालावा अशाविषयीं स्वार्थसाधू लोकांची बाह्यात्कारी कळकळ; आणि (३) फाजील कायदेशीरपणा.

" जावें असें तोंडाचे वरकरणी उपदेश मात्र ऐकूं येतात; त्या स्थितीस
" **समाज** असें ह्मणावें काय ? काय या प्रवर्तकांचा व सरळ वाटांचा
" उपयोग ? असले प्रवर्तक व असले उपदेश असण्यापेक्षां नसलेले पुर-
" वले, मग त्यावांचून काय वाट होईल ती होईल ! या आचार्यांनीं व
" राज्य प्रवर्तकांनीं आपलें वेतन खाऊन नुसत्या झोंपा घेतल्या तरी आह्मी
" मोठे उपकार मानूं !

" याप्रमाणें चाणाक्ष मनुष्यास जिकडे तिकडे अति भयंकर देखावा
" दृष्टीस पडत आहे. गरीब लोक तांग्याच्या अजारी घोड्याप्रमाणें कष्ट
" करकरून आपल्या कष्टाचें फळ खाणाऱ्या लोकांच्या हयगयीमुळें अन्नान्न
" करीत मरत आहेत. इकडे श्रीमंत लोकांची स्थिति तर याहूनही भयं-
" कर असून ते आळसांत अन्नाची शिसारी येऊन व पराकाष्टेचा मेद
" चढून मांसलोधासारखे होऊन प्राण सोडीत आहेत. सर्वांत उच्च पदवीचे
" पुरुषास अति नीच पदवीचे मनुष्याकडूनही मान मिळत नाहीं; व मिळा-
" लाच तर खाणावळींतले नोकर पोस्त अगर चिरीमिरी उपटण्यास जसें रावसा-
" हेब रावसाहेब करितात तशाच प्रकारचा. गतकालीं अगदीं पवित्र वाटणाऱ्या
" वस्तूंचेंही सत्व अगदींच नष्ट झालें असून, आज शोभेकरितांच ते प्रकार
" ठेवावयाचे असून त्यांचा खर्चही लोकांस डोईजड झाला आहे. याप्रमाणें
" सर्वत्र सारखी स्थिति आहे. तात्पर्य, हें जग रसातळास चाललें आहे.
" **धर्मास** वायु होऊन त्याची वाचा बसली आहे. **राज्यव्यवस्थेस कोत-**
" **वालचावडीचें रूप** आलें आहे; व तींतील प्रत्येक पुरुषास **पगारा-**
" पुरती मात्र दृष्टी उरली आहे."

येथें अशी पृच्छा होते कीं इंग्लंडांत किंवा अन्यत्र कोठेंही अनुभविक व चाणाक्ष पुरुषाचे दृष्टीस हे विलक्षण प्रकार आले आहेत काय ? कां हे चमत्कार जर्मनींत **वाघ्नास** मधील ( माया चौकांतील ) उंच ठिकाणावरून मात्र दिसतात ? ट्यूफेल्सड्राक साहेब म्हणतात कीं, **समाज** मृत झाला असावा किंवा त्यास अखेरचा **घोर** तरी लागला असावा अशी चिन्हें सर्वत्र दिसत आहेत; आणि कितीही वरवर पाहणारा मनुष्य असला तरी त्यासही तीं दिसतील ! उदाहरणार्थ ते म्हणतात, " आजकालचा सर्व लोकांचा
" प्रौढीनें मिरविण्याचा मोठा सद्गुण म्हणण्यासारखा कोणचा आहे बरें ?
" आज सुमारें पन्नास वर्षें **स्वातंत्र्य** नांवाचा सद्गुण जिकडे तिकडे

" दुमदुमत आहे. व आतां **मनुष्या**पासून तों अगदीं एकाद्या **गोचडी-**
" पर्यंत, आपण कोणाचे **दास** आहों, किंवा आपल्या मनांत कोणाविषयीं
" **पूज्यबुद्धी** आहे, अगर एखाद्यास आपण मानितों, अशी कोणास शंकाहीं
" येऊं नये म्हणून प्रत्येकाची धरपड चाललेली आहे[३]. परंतु वास्तविक
" पाहिलें असतां आपले **वरिष्ठ पुरुष** अंमल चालविण्यास, व **आपण**
" त्यांच्या आज्ञेत वागण्यास, जर लायक असलों तर त्या श्रेष्ठ पुरुषांसंबं-
" धानें योग्य पूज्यबुद्धी वाटण्यांतच आपल्यास शोभणारें खरें **स्वातंत्र्य**
" आहे. कोणत्याही गोष्टींत स्वातंत्र्य ह्मणजे केवळ पुंडावा होय. मग
" अन्यायानें पुंडावा करून अशा रीतीनें त्याबद्दल घमेंड मारून सर्वांस
" त्याचा उपदेश करण्यांत काय अर्थ आहे ?

तर मग रूसोच्या (पान २५८) म्हणण्याप्रमाणें आज आपण **रानमाणसांच्या** नैसर्गिक स्थितींत परत चाललों आहों असें प्रोफेसर साहेबांचें ह्मणणें आहे कीं काय ? टच्यूफेलसड्राक साहेब ह्मणतात, " **समाजाचा प्राण** गेल्यावर आतां
" या सामाजिक शरीराची माती जड होऊन तें नासूं नये म्हणून लौकर
" त्यास स्मशानांत नेऊन जाळावें हाच पुढचा मार्ग आहे. आणि **लिबरल**
" **पक्षाचे लोक, अर्थशास्त्रवेत्ते लोक,** व नीतिशास्त्रापैकीं **परिणाम-**
" **वादी** लोक हे या कामास लागलेही आहेत. हे पहा ते समाजाचे प्रेता-
" भोंवतीं जमून चालले असून मोठमोठ्यानें स्तोत्रें म्हणून आपले आभार
" व आनंद दर्शवीत आहेत ! इकडे कांहीं थोड्याशा लोकांचे आक्रोशही
" चालले आहेत; पण बहुतेक लोक उच्छृंखळपणाचे रंग उडवीत उड-
" वीत आतां हें प्रेत जाळणार आहेत. आतां ही उघड चाललेली गोष्ट सरळ
" सोप्या भाषेनें सांगावयाची ह्मणजे हे **लिबरल पंथाचे, परिणामवादी** वगैरे
" लोक आपला हेतु तडीस नेऊन समाजांतील हरएक प्रकारची संस्था छिन्न
" विच्छिन्न करून टाकितील याविषयीं आतां अगदीं संशय राहिला नाहीं.

" इंग्लंड अगदीं एका अंगास आहे; पण त्यांत सुद्धां या **परिणाम-**
" **वादी** ( सुधारक ) लोकांची टोळी शिरलेली दिसत नाहीं काय ? हें
" **परिणामवादाचें** जिवंत बेट तेथें आपलीं मुळें पसरून खास वाढणार;

---

३ हें फाजील व्यक्तिस्वातंत्र्य आपणांत इतकें वाढलें आहे कीं, स्वतःस अपाय हो-ण्यासारखी गोष्ट जरी कोणी करूं लागला तरी त्यास तीही न करण्याविषयीं सांगण्याची चोरी झाली आहे!

" व तें तेथें गेलें तेंही मोठ्या विलक्षण खुबीनें गेलें. जशा वस्त्रास दशा
" असतात व प्रवाहांत वस्त्र वाहूं लागलें म्हणजे त्या हळूच त्याचे बरोबर
" जातात; पण भोंवरा वगैरे दिशा बदलण्याजोगें साधन मिळालें कीं, मग
" त्याच अघाडीस होऊन आपल्या मागून मुख्य वस्त्रासही ओढून नेतात,
" तशीच खुबी यांनीं केली आहे. आमच्या यूरोपांत **फलैकदृष्टि** लोक
" बहुतेक सर्वत्र पसरले असून त्यांच्यांत विलक्षण जूट व तरतरी आहे
" यांत संशय नाहीं. हा परिणामवादच पहा, हा आमच्या देशांत व
" यूरोपांतील दुसऱ्याही देशांत गेल्या पन्नास वर्षांत फोंफावून मोठमोठ्या
" विचारी लोकांतही तो पसरला नाहीं काय? आतां इंग्लंड शिवायकरून
" बाकीच्या देशांत विचारी लोकांमध्यें त्याची विशेष चलती नसून आतां
" तदर्थ कोठें उपदेशही सुरू नाहींत हें खरें; पण याचें कारण एवढेंच कीं,
" वर्तमानपत्रकार व सामान्य लोक यांमध्यें त्याचे पाय रुजले असून हें
" मत सर्वांनीं आपल्या आचरणांतच आणिलें असल्यामुळें आतां तदर्थ
" उपदेशांची जरूर उरली नाहीं. याही काळांत कारखान्यांतील मजूरदा-
" रांचे बुद्धीस व हृदयास कारखान्यांतील अंगभूत जोर व क्रूरपणा आहेच,
" मग या आगीवर परिणामवादाचें तेल पडल्यावर काय विचारावयाचें आहे?
" त्यांचे आटोक्यांत जो कोणी येईल त्यावर त्याचा प्रकाश पडावयाचाच!
" जुनें तेवढें नष्ट करण्यास हें किती उत्कृष्ट साधन आहे? नवें कांहीं
" बांधूं म्हटल्यास मात्र त्याचा उपयोग नाहीं. आणि तें फैलावतें तरी
" किती लवकर! जसें कुत्र्याचें वेड भराभर पसरत जाऊन लवकरच सर्व
" कुत्रीं पिसाळून मग शिकारी लोकांजवळ चाबूक असून नसून त्यांचें
" हाल कोणी खाईनासें होतें तद्वतच हें आहे." प्रोफेसर साहेब पुढें म्हण-
तात कीं, " या कुत्र्यांस वेळींच पाणी दिलें असतें म्हणजे हा अनर्थ
" टळला असता. तें पाणी कोणचें! तर **तत्वाचें ज्ञान** आणि **जीवनामृत**.

याप्रमाणें प्रोफेसर साहेबांचें ह्मणणें खरें धरिलें तर आज आपण फार मोठ्या पेंचांत असून या फलैकदृष्टि लोकांच्या व पाखंडी लोकांच्या सेनासमुद्रानें सर्वत्र घेरलों आहों; व आतां आपली चमडी तरी बाकी राहते कीं नाहीं अशी भीति आहे. प्रोफेसर साहेब म्हणतात, " सर्व जगच उध्वस्त
" व ओसाड होण्याचे पंथास लागलें असून हळू हळू आंत पोकळ होऊन
" म्हणा, किंवा बाहेरून एकदम भडका होऊन म्हणा, **समाजाची** ही

" जुनाट इमारत सर्वतोपरी नष्ट होणार; मग तिचे ऐवजीं दुसरी कोणची
" उभी होवो, अगर न होवो. तूर्त असा विचार चालला आहे कीं समाजाचे
" सर्व अध्यात्मिक संबंध काढून टाकून हीं **काढिलेलीं वस्त्रें** बहुतेक जाळून
" टाकावीं; मग त्यांतल्या त्यांत कांहीं बळकट फडकीं सांपडलींच तर तीं
" शिवून त्या **समाजाच्या** बाह्य शरीराचे संरक्षणार्थ एखादी गोधडी करावी
" ह्मणजे झालें[४]!" आम्हांला वाटतें कीं आमच्या कोंवळ्या अंतःकरणाच्या
" वाचकांस या बातमीपासून जितक्यास तितकेंच समाधान होईल.

पण आमचे टच्यूफेल्सड्राक साहेब ह्मणतात "यास इलाज कोणाचा चाल-
" णार आहे? या **कालचक्राचे** आरे धरून त्याचा वेग थांबवून काळास
" "मार्गे फीर!" असा सक्त हुकूम करणारा कोण आहे? तेव्हां या
" निर्दय व अपरिहार्य **दैवास** मान लववून, होतें आहे तेंच बरें आहे
" असें मानण्यांतच शहाणपण आहे."

आमच्या समोर असलेल्या कित्येक लेखी गोष्टींवरून आतां आम्हांस एवढें एक अनुमान काढण्यास काय हरकत आहे? कीं स्वतः टच्यूफेल्स-ड्राक साहेबांसंबंधानें पाहतां त्यांनीं या 'निर्दय व अपरिहार्य' दैवास मनापासून मान लवविली असून ते आतां अगदीं शांतपणें जरी नाहीं, तरी अर्धवट पिशाच्चासारख्या, अर्धवट देवासारख्या आपल्या स्वाभाविक तटस्थ वृत्तीनें या दैवगतीचा शेंवट कसा होतो हें पहात स्वस्थ बसले असतील! हें जग केवळ "चिंध्यांचा मोठा बाजार" असून त्यांत जिकडे तिकडे जुन्या चिन्हरूपी फडक्यांचा सारखा खच पडला आहे, व त्यामुळें आपण गुदमरून जातों कीं काय, असेही त्यांचे उद्गार आपल्या कानीं आले आहेत. त्यांचे 'शिकार न करितां राखून ठेविलेले दास,' 'कष्ट तुह्मांला फळ दुसऱ्यांला[५]' वगैरे शब्दांनीं त्यांस ऐकूं येणारा जगद्रूपी इमारतीच्या कोसळण्याचा कडकडाट, सजीवतेचा आव घालून आपल्या कांचेच्या

---

४ म्हणजे हल्लींच्या सुधारणेचा रोंख सर्व धर्मबंधनें नाहींशीं करून समाजाचें बाह्यांग जें राज्यसूत्र तें चालण्यापुरतीं त्यांतील अवश्य तत्वें घेऊन कायद्याचीं बंधनें करण्याकडे आहे.

५ 'कष्ट तुह्मांला फळ दुसऱ्याला'—हें वाक्य लॅटिन कवी व्हर्जिल याचें आहे. ग्रंथकर्त्याचा भावार्थ असा आहे कीं असे व्यापारी दृष्टीचे विलाप म्हणजे केवळ समाज मोडकळीस आल्याचें चिन्ह होय.

डोळ्यांनीं पाहणारीं व कोळी राताकिडे वगैरेंची धन होऊन बसलेलीं धर्मवस्त्राचीं पोकळ बुजगावणीं वगैरे गोष्टी लक्ष्यांत आणिल्या असतां, समाजव्यवस्थेंतील बहुतेक भाग आतां शांतपणें काळाचे स्वाधीन करितां आला तर तसें करण्यास ते आज तयारही आहेत असें अनुमान काढण्यास आम्हांस तर कांहीं हरकत दिसत नाहीं. विसिनिट्वोच्या शिखरावर बसून स्वतःस कांहीं धोका नाहीं इतकी व्यवस्था केल्यावर मोठ्या स्थैर्यानें **परिणामवाद**रूपी राक्षसास आपलें काम उरकून घेण्यास ते परवानगी देतील असें दिसतें. अर्थात असें करितांना या राक्षसाचा जोर वेसणा घालून, पाय--वेड्या घालून व जिकडे तिकडे त्यास दोऱ्यांनीं बांधून कमी करावा लागेल हें उघड आहे. पण इतकें केल्यावर या समाजरूपी मोडकळीस आलेल्या देवळाच्या इमारती या राक्षसानें आपल्या पायाखालीं तुडवून जमीनदोस्त करून तेथें नव्या, व पहिल्यापेक्षां चांगल्या इमारती होण्यास सवड करून द्यावी असा त्यांचा आशय आहे असें पुढें दिलेल्या वाक्यांवरून दिसतें.

ते म्हणतात, "समाज कांहीं नष्ट झाला नाहीं. हें त्याचें निर्जिव प्रेत "केवळ त्याचें नाशवंत शरीर होय. साप जसा कांत टाकतो तसें दुसरें "चांगलें शरीर धारण करण्याकरितां त्यानें हें पूर्वीचें शरीर नुसतें एकीकडे "लोटलें आहे ! ह्या बाह्यस्वरूपाचीं एकसारखीं रूपांतरें होतां होतां प्रत्यक्ष "**समाज** दिवसेंदिवस चांगला होत होत त्या अचिंत्य **अनंतांत काळाचा** "लय होईपावेतों असाच अव्याहत चालू राहील ! जेथें म्हणून दोन किंवा "तीन चैतन्ययुक्त मनुष्यें एकवटलीं तेथें समाज आहेच! तेथें तो आपल्या "चातुर्यानें या भूलोकापासून वरती स्वर्गापर्यंत व खालीं नरकापर्यंत अनेक "चतुरस्त्र रचना करीत राहणार! कारण केव्हांही पाहिलें तरी समाजांत "**परमेश्वराचें** एक, व **सैतानाचें** एक अशीं दोन हत्यारें असतातच. तीं "हत्यारें म्हणजे **व्यासपीठ** एक व **फांसाची दोरी** हें दुसरें."

समाजाचा प्राण जो **धर्म** तो कोठें तरी एकीकडे जाऊन स्वतःकरितां एखादें नवीन वस्त्र विणीत बसला असेल असें टच्यूफेलसड्राक साहेबांनीं म्हटलेलें आपण मागेंच ऐकिलें आहे. पण टच्यूफेलसड्राक साहेब हे स्वतःच हें वस्त्र विणण्याच्या मागांतील एकादी फणी नव्हत ना ? कारण "सत्ययुग मागें गेलें अशी लोकांत दंतकथा आहे पण खरें सत्ययुग पुढेंच आहे."

हें **सेंट सायमनचें** वाक्यही त्यांनीं एके ठिकाणीं उतरून घेतलें आहे. वास्तविक म्हटलें तर या वाक्यावर व त्याचे उत्पादकावर चांगली खरमरीत

---

६ सेंट सायमन. (१७६०–१८२५) एक फ्रेंच तत्ववेत्ता. हा डि अलेंबर्टचा (पान २६९) शिष्य. यास फ्रेंच सरकारानें अमेरिकन लोकांस इंग्लिशांविरुद्ध लढण्यांत मदत करण्यास १७७७ त पाठविलें होतें. तेथून आल्यावर तो फ्रेंच फौजेत कर्नल होता. परंतु पुढें शिपाईगिरीच्या कामांतून अंग काढून " मनुष्य जातीच्या प्रगतीचें होईल तितकें निरीक्षण करून तींत होईल तितकी सुधारणा करण्यांत देह झिजवावा " असा संकल्प करून १७८५ त तो हालंड व स्पेन देशांत प्रवास करण्यास निघाला. वाटेंत स्पॅनिश सरकारास त्यानें प्रजाहिताच्या अनेक गोष्टी सुचविल्या. तो परत आला तेव्हां फ्रान्समध्यें राज्यक्रांतीस सुरवात झाली होती. तिचा अजमास त्यास बरोबर न होऊन ही सामान्य व्यावहारिक सुधारणा आहे असें वाटून त्यानें तिची फार वाहवा केली; व एका प्रशियन सरदाराशीं सरकत करून दोघांनीं मिळून एक मोठी पदार्थविज्ञान व धंदेशिक्षणाची शाळा काढावी या हेतूनें राज्यक्रांतींतील जप्तीपैकीं पुष्कळ जमीन खरेदी केली; परंतु पुढें त्यांचा बेत फसून त्या जमिनींत घातलेले त्याचे सर्व पैसेही बुडाले. पुढें त्यानें गणित, ज्योतिष, पदार्थविज्ञान व रसायनशास्त्र यांचा अभ्यास केला. पण तो नेहमीच्या पद्धतीनें न करितां त्याची पद्धत कांहीं निराळीच होती. नंतर त्यानें प्राणिशास्त्राचा उत्तम अभ्यास करून " अनुभवाच्या शाळेंत शिरण्याकरितां " लग्न केलें. नृत्य गायनाचा व पैसे खर्चून जितक्या इतर गृहस्थितींचा अनुभव मिळण्यासारखा होता त्या सर्व त्यानें अनुभवून पाहिल्या. चांगल्या व वाईट स्थितीही त्यानें सोडिल्या नाहींत. वादविवाद, भांडणें, वैराग्य, कुटाळकी, जोग, रंडीबाजी, दारूबाजी वगैरे सर्व स्थितींचा त्यानें मुद्दाम होऊन अनुभव घेतला. फार काय सांगावें पण स्पर्शजन्य रोगापासून कशा यातना होतात याचा अनुभव घेण्याकरितां हे रोग देवी सारखे टोंचून लस भरून उत्पन्न करण्याचेंही त्यानें योजिलें ! याप्रमाणें त्याचें अनुभवशिक्षण १८०७ मध्यें संपलें; पण त्या सालीं तो बिचारा अगदीं कफल्लक होऊन त्यास दरमहा अडीच पौंडावर कारकुनी पतकरावी लागली ! सन १८१२ त म्हणजे त्याच्या ५२ व्या वर्षी आपले अनुभविक सिद्धांत आतां ठरविण्यास हरकत नाहीं असें पाहून त्यानें एकामागून एक असे अनेक ग्रंथ प्रसिद्ध केले. त्यांतील मतें काल्पनिक व व्यवहारास विरुद्ध होतीं तरी त्याचे भोंवतीं बराच शिष्यवर्ग गोळा झाला. प्रसिद्ध इतिहासकार थीरी व महातत्ववेत्ता कोंट हे त्याचेच शिष्य. सरते शेवटीं त्यानें नवीन धर्मस्थापनेचा घाट घातला. या धर्माचा उद्देश " सामान्य गरीब लोकांचा जो मोठा समाज प्रत्येक देशांत असतो त्याची नीतिदृष्ट्या सुधारणा होऊन आरोग्य वाढावें " हा होता; व तो साधण्याकरितां " प्रत्येक मनुष्यास त्याच्या लायकी प्रमाणें कोणचा तरी स्वतंत्र धंदा आला पाहिजे; व प्रत्येकाच्या विशिष्ट लायकीप्रमाणें त्याच्या कर्तबगारीचे समाजांत चीजही झालें पाहिजे; " या तत्वावर समाजस्थापन

टीकाच केली पाहिजे होती. पण आमच्या प्रोफेसर साहेबांनीं तसें कांहींच केलें नाहीं. तेंही असो; पण आणखी प्रोफेसर साहेब म्हणतात, "जेव्हां " **फिनिक्स पक्षी** आपली चिता पेटवितो तेव्हां त्यांतून कांहीं ठिणग्या " निघाल्या तर काय नवल आहे! हाय हाय! या चितेंतील ज्वाळांनीं " कोट्यावधी मनुष्यें, व त्यांत कांही तर **नेपोलियन**सारखे दाणे पतंगप्राय " होरपळून नष्ट झाले; व अजूनही अविचारानें फुंकर घालणाऱ्या लोकांच्या " दाढ्या या चितेशीं खचित पेटतील यांत संशय नाहीं!

" आतां हें **समाजरूपी फिनिक्स--पक्ष्याचें** अग्निकाष्ठांचें दिव्य कधीं " संपेल असले प्रश्न तुम्ही मला करूं नका. मनुष्यजातींतील स्थायीभाव " फारच चिकट आहे; त्यामुळें चालू वहिवाटींत बदल करणें म्हणजे त्याचे " जिवावर येतें. जुनें घर कोसळून अंगावर अगदीं पडेपर्यंत त्यांतून बाहेर निघ- " ण्याची बुद्धीच त्याला होत नाहीं. व एवढ्याचकरितां ज्या गोष्टी लोक " पूर्वीं श्रद्धेनें करीत असत, त्या आतां **शिष्टसांप्रदाय** म्हणून तरी ते करि- " तात. पूर्वीं जीं पवित्र चिन्हें होतीं त्यांतील पावित्र्य व सत्व जाऊन आज " शेकडों वर्षें लोटलीं; तरी नुसत्या समारंभाकरितांच कां होईना तीं अजून " लोकांनीं ठेविलीं आहेत. हें आपल्या चिकटपणाचें एक कारण झालें. पण " आपल्या समाजरूपी फिनिक्स पक्ष्याच्या पुनरुज्जीवनास आणखी किती " काळ लागेल हें पुढें होणाऱ्या कित्येक अदृष्ट गोष्टींवरही अवलंबून आहे. " याकरितां या चितेवरील कमीजास्त मानाच्या वेदनांत व आगींत दोनशें " वर्षें गेल्यावर तरी आपण पुन्हां **सजीव समाजाचे** रूपानें नांदूं लागून

---

करावा असा त्याचा हेतु होता. या विलक्षण पुरुषानें मृत्युसमयीं आपला सर्व शिष्यवर्ग गोळा करून त्यास आपला अखेरचा उपदेश केला. त्याचे मृत्यूनंतर त्याचे पंथास बरीच मोटी संकटें आलीं. त्याच्या पट्टशिष्यांपैकीं कांहींनीं एक धर्ममंदिर स्थापन केलें. १८३० त आठवड्यास या पंथाचें एक पुस्तकही निघूं लागलें; आणि त्यामुळें बरेच चांगले लोक ही त्यांत मिळाले. परंतु पुढें पंथांत दुफळी होऊन एका शाखेनें एक मठ बांधिला पण तो सरकारानें उध्वस्त करून तेथील मठाधिपतीस कांहीं मुदतीची कैदेची शिक्षा दिली.

७ फिनिक्स–ग्रीक लोकांची अशी कल्पना असे कीं " फिनिक्स नांवाचा एक चिरायु पक्षी असून तो एकाच शरीरानें ५०० किंवा १००० वर्षें वांचतो; व पुढें तें शरीर जीर्ण झाल्यावर तो आपणास सुवासिक काष्ठांच्या चितेवर जाळून घेऊन मग त्या चितेंतील राखेंतून पुन्हां त्यास नवा दिव्य देह प्राप्त होतो! हें समाजाचें रूपक आहे.

" घरसोडीचा मार्ग सोडून देऊन, खरीं, आपल्या योग्यतेचीं, कर्में करूं
" लागावें असा करार मनुष्यजातीस आपल्या नशिबाशीं करितां येण्यासा-
" रखा असल्यास नानू न करितां एकदम असा करार नशिबाकडून करून
" घेऊन हें काम आटोपून घ्यावें हेंच इष्ट नाहीं काय ? "

याप्रमाणें **समाज** हा **फिनिक्स पक्ष्या**सारखा असून तो या चितेवर जळल्यानंतर पुन्हां दिव्यरूपानें सजीव होईल या भरंवशावर आज हा जुना व वृद्धापकाळानें जर्जर झालेला **समाज** बुद्धिपुरःसर जाळून टाकण्यासही ट्यूफेल्सड्राक साहेब तयार झाले आहेत ! आमचें काम फक्त ट्यूफेल्सड्राक साहेबांसंबंधाच्या गोष्टी लोकांसमोर मांडण्याचें मात्र असल्यामुळें आम्हांस जास्त टीका वगैरे करितां येत नाहीं. परंतु आमचे मर्मज्ञ वाचक तोंड वाईट करून खेदपूर्वक म्हणतील कीं " जो गृहस्थ एका विश्वविद्यालयांत नुसत्या पदवीनेंच कां होईना पण प्रोफेसर आहे, व ज्यानें बजाविलेली कामगिरी जाणून या वाईटशाच समाजानें त्यास अन्न, कसेंबसें वस्त्र, तंबाकू, व गग्गक नांवाची दारू पुरविली; त्याच गृहस्थानें या आपल्या उपकारकर्त्या समाजाचे आभार जास्त चांगल्या रीतीनें प्रकट करावयाचे होते. केवळच अंधवत् भविष्यावर हवाला देणें हें **दैववाद्यास** किंवा आवेशी मनुष्यास मात्र शोभेल. ख्रिस्ती धर्मानुयायी लोकांच्या समाजाशीं संबंध ठेवणाऱ्या पुरुषास शोभत नाहीं. "

---

## भाग सहावा.

### जीर्णवस्त्रें.

वर सांगितल्याप्रमाणें ट्यूफेल्सड्राक साहेब जरी **दिगंबरी** मताचे असले तरी त्यांच्या इतका संभावित मनुष्य विरळाच दिसेल. **शिष्टाचाराचें** तत्व त्यांना चांगलें अवगत असून तें अगदीं त्यांच्या हाडीं खिळलें आहे; व त्यांच्या नैसर्गिक प्रौढ आचरणानें ते फारच शोभत असून त्यांच्या तऱ्हेवाइकपणासही त्यामुळें विलक्षण मोहकता आली आहे. ज्याप्रमाणें सूर्याच्या प्रकाशानें नुसत्या पाण्याच्या थेंबांनीं भरलेल्या ढगांवर इंद्रधनुष्य पडून विलक्षण मौज दिसते; फार तर काय, लंडन शहरांतील काळाढुस्स धूर, तोही

किमया केल्याप्रमाणें सुवर्णमय दिसूं लागतो; तद्वतच या **शिष्टाचारानें** ट्यूफेल्सड्राक साहेबांतील दोषांचें रूपांतर झालें आहे. **शिष्टाचारासंबंधीं** त्यांच्या नेहमींच्या विलक्षण तऱ्हेनेंच, पण मनापासून ते काय म्हणतात पहा.

" काय; **शिष्टाचाराचें** वर्तन **श्रीमंतांशींच** करावें व **श्रीमंतांनींच** करावें
" असें आहे काय ? **शिष्टसांप्रदायांत** व **श्रीमंती सांप्रदायांत** माझ्या
" दृष्टीनें तर एवढाच फरक दिसतो कीं, शिष्टसांप्रदायी मनुष्य **मर्यादेनें**
" जितकें **आपल्या** हक्काचें रक्षण करितो त्याहीपेक्षां **मर्यादेनेंच दुसऱ्याच्या**
" हक्काचें रक्षण करण्याकडे त्याची नजर जास्त असते. शिवाय **शिष्टसांप्र-**
" **दाय** ह्मणजेच **मनुष्यपण** असून तें सर्व मनुष्यांनीं सर्वांस दाखविलेंच पाहिजे.
" मी खरेंच सांगतों कीं, जर **सद्गुरु** आपल्या स्थानीं विद्यमान असतील व
" त्यांचे ठायीं थोडेंसें **सद्गुरुत्व** असेल तर **समाजांतल्या** दुसऱ्या पुष्कळ
" गोष्टी त्यांनीं सुधरावयाच्या आहेत त्यांतच **शिष्टाचाराची** गोष्ट आहे.
" **शिष्टाचार** असल्यावर प्रत्येक मनुष्यच आपल्या शेजाऱ्यास सद्गुरूचे
" ठिकाणीं उपयोगी पडेल, व मग अगदीं गरीब शेतकऱ्यासही टापटीप
" व शिष्टाचार लागून वनस्पतिशास्त्राचीही त्यास चांगली माहिती होईल;
" व हा जो **मातीचा ढेला** आपण फोडतों तो **ईश्वरानें निर्माण केलेला**
" व **ईश्वराचे चैतन्यानें भरलेला** आहे हेंही त्यास भासत राहील.

" कारण तुझ्या हातांत **राजदंड** असो किंवा लोहाराचा **घण** असो;
" तुझे आंगीं **चैतन्य** आहेना? व हा तुझा **बंधूही चैतन्ययुक्त** आहेना? शिवाय
"**नोव्हालिस**[पान२७४]म्हणतो त्याप्रमाणें पाहतां या जगांत **मनुष्याचें शरीर**
" हें एकच ईश्वराचें खरें देवालय आहे. या उत्कृष्ट देवालयापेक्षां पवित्र-
" तर वस्तूच नाहीं; व मनुष्यास अभिवंदन करणें ह्मणजे प्रत्यक्ष परमे-
" श्वरासच अभिवंदन करणें होय. त्याचप्रमाणें मनुष्यावर आपला हात
" टाकणें ह्मणजेही प्रत्यक्ष परमेश्वरासच उपसर्ग देणें होय.

"पण या मुद्यासंबंधानें इतरांपेक्षां पाऊलभर आपण पुढेंच गेलें पाहिजे. इंग्रज
"लोकांपैकीं **जानसन** [पान२१] हा सर्व **धर्मोपाध्यायांना** किंवा **धर्मोपाध्या-**
" **याचा** पोषाख असलेल्या प्रत्येक मनुष्यास वंदन करी. परंतु मी म्हणतों, तो
" उपाध्याय असो अगर नसो, त्याचें आंगावर औपाधिक वस्त्रें असोत अगर
" नसोत, **प्रत्येक मनुष्यच** ईश्वराचें मंदिर असून त्याचा प्रत्यक्ष **अवतार**
" आहे. व एवढ्याकरितां तो वंदनीयच आहे. पण हाय हाय ! सरसगट प्रत्ये-

" कास वंदन करूनही भागत नाहीं. कां तर, मनुष्यांत जसा **परमेश्वर**
" नांदतो त्याचप्रमाणें या मंदिरांत **सैतान ( झोटिंग )** ही शिरलेला
" आहे. आणि या **मंदिराचें** अभिवंदन किंवा पूजा होऊं लागली ह्मणजे
" तिचा स्वीकार करण्यास आंतील **परमेश्वरास** फुरसत न देतां हा
" **झोटिंगच** तिचा स्वाहा करितो. या **झोटिंगाचें** सांप्रतचें व्यक्त स्वरूप
" म्हटलें ह्मणजे **दंभ** किंवा **दिमाख** होय. आणि **परमेश्वरास** म्हणून आपण
" श्रद्धेनें अर्पण केलला बहुमानरूप बळी या **सैतानाचेच** वशांत उतरून
" **परमेश्वरास** पोहोंचत नाहीं, म्हणून असा सरसगट बहुमान देऊंच नये.
" त्यापेक्षां या शरीराचें जें बाह्य कवच किंवा आवरण ह्मणजे **वस्त्र**
" त्यांत दुष्ट हेतुरूप सैतान नांदत नाहीं व तें मनुष्याच्या पवित्र मूर्तीचें
" दर्शक **चिन्हही** आहे; त्या कवचास ह्मणजे रिकाम्या किंवा उतरलेल्या
" **कपड्यांसच** पूज्य मानावें हें बरें. असें करण्यांत कांहीं रूढिविरुद्ध
" गोष्ट आहे असेंही नाहीं. कारण मनुष्यें परस्पर नमस्कार करितांना
" **कपड्यांसच** मान देत नाहींत तर काय? सर्व मान मिळतो तो उत्तम
" छानछोक रीतीनें बेतून शिवलेल्या **कपड्यांसच** मिळत असून आंत
" बिचारा जो **प्राणी** असतो त्याला उद्देशून कोणीही मान देत नाहीं!
" त्या **प्राण्यास** मोठेपणा असतो तो या **कपड्यांमुळें**; जणूं काय त्यास
" नैसर्गिक श्रेष्ठत्व नाहींच. कोणाही सरदारास फाटकें घोंगडें आंगावर
" असतांना " धनी साहेब, रामराम!" असें कधीं म्हटल्याचें कोणीं ऐकिलें
" आहे काय? तथापि अशा रीतीनें दिलेल्या आदरांतही **दंभास** फाव-
" तेंच. कारण वास्तविक पाहतां मनुष्यें जो नमस्कार **कपड्यांस** उद्देशून
" करितात तो आपणासच केला असें समजून आंतला दांभिक **प्राणीच** उपटतो!
" म्हणून सर्व पापांचें बीज जी **लबाडी** ती ज्याला खपत नाहीं त्यानें
" निराळीच तजवीज केली पाहिजे. हें वस्त्ररूप कवच मनुष्यानें व्यापिलें
" असतां त्यास दिलेला बहुमान भलतीकडे जाण्याचा व कपड्यांस न
" पोहोंचण्याचा संभव आहे. ह्मणून हे कपडे रिकामे असतील त्या वेळे-
" सच त्यांना बहुमान द्यावा ह्मणजे झालें! हिंदू लोकांत जसा देवांस नम-
" स्कार करितात तसाच शिखरासही करितात त्याचप्रमाणें जितकी श्रद्धा
" मनुष्यत्वाविषयीं मला वाटते, तितक्याच श्रद्धेनें या पोकळ वस्त्रांसही
" मी मानितों. इतकेंच नव्हे, तर वस्त्र कोणीं घातलें नसलें ह्मणजे त्यास

" केलेला नमस्कार चुकून अनाठायीं जाण्याची भीति नसल्यामुळें अंगांत
" नसलेल्या वस्त्रांविषयीं अंगावरील वस्त्रांपेक्षांही मला जास्त आदर वाटतो.
" **जॉन बेलियलनें** स्काटलंडवर बरींच वर्षें राज्य केलें नाहीं काय ?
" पण त्यापैकीं बराच काळ जॉन बेलियल हा प्रत्यक्ष पुरुष स्वर्गवासी झाला
" असून पुढें त्याचें काम त्याच्या रिकाम्या **पोषाखानेंच** चालविलें होतें.
" अहाहा ! त्यानें पूर्वीं उपभोग घेतलेल्या या कपड्यांत किती तरी प्रभाव
" आहे बरें ! एवढा त्याचा मान पण बिचाऱ्यास अभिमान कसा तो
" बिलकुल नाहीं ! क्रोधाचें नुसतें स्वरूपही नाहीं मग आविर्भाव कोठला !
" हा **पोषाख** नेहमीं शांत व समाधानवृत्तीनें जगाशीं वागून, माझा मान
" ठेवा असा कोणास हुकूमही करीत नाहीं व कोणी मान न ठेवला तर
" बिचाऱ्याला वाईटही वाटत नाहीं. त्याच्या टोपींमध्यें अजून त्याच्या
" डोक्याच्या खुणा आहेत; पण त्या डोक्यांतील **दंभ** व **मौर्ख्य** आणि
" या दोहोंपासून उत्पन्न होणारें अप्रशस्त भाषण यांचें आतां तेथें नांवही
" उरलें नाहीं. त्याच्या कोटाचा हा हात लांब पसरला आहे पण तो कोणास
" मारण्याकरितां नव्हे. त्याची विजार अगदीं साधेपणानें लोंबत असून
" आंतल्या पायांमुळें जी अडचण होत होती ती मात्र आतां होत नाहीं. या
" जाकिटाखालीं आतां दुर्विकार व अंतःकरणांतील उच्छृंखळपणा हे दडून
" बसले नाहींत. तहान व भूक यांसही आतां तेथें आसरा नाहीं. याप्र-
" माणें मनुष्यास हीनत्व आणणाऱ्या एकंदर **वैषयिक गोष्टी**, काळीज कर-
" पवून टाकणारी **काळजी**, व संसारांतील **दुर्गुण** एकंदर नाहींसे झाले
" असून उरलेलें **मनुष्यत्व** मात्र आतां या वस्त्ररूपी घोड्यावर आरूढ झालें
" आहे व एखाद्या भूलोकीं संचार करणाऱ्या देवदूतासारखेंच तें भासत आहे.
7" मी इंग्लंडमध्यें फिरत असतां सुधारणेचा फाजील कडेलोट झालेल्या
" लंडन नामक तेथील राजधानींत गेलों होतों. तेथील धुरानें कोंदलेल्या
" वातावरणाखालीं विचार करीत, व नशिबाची परीक्षा पहात पहात हिंडत
" असतां तेथील लाखों लोकांच्या दंगलींत सुद्धां मला एकटा असल्यासारखेंच
" वाटे. म्हणून नेहमीं **जुन्या कपड्यांच्या** बाजारांत जाऊन मी त्या कपड्यांस

---

१ जानबेलिअल—स्काटलंडचा राजा, (१२९२–१२९६)—सर वाल्टर स्काटच्या स्काटलंडच्या इतिहासांत या राजाचें टोपण नांव " रिकामें डगलें" अशा अर्थाचें आहे. त्यास अनुलक्षून हा मजकूर लिहिला आहे.

“ वंदन करीत असें. तेथील **मानमाउथ रस्त्यावर**[२] चोरबाजारांत जिकडे
“ तिकडे **उतरलेले कपडे** नीट व्यवस्थेनें ठेविले असल्यामुळें ती पेठ एखाद्या
“ दिव्य न्यायसभेप्रमाणें दिसत असे. हे वापरलेले कपडे हे तेथील सभासद.
“ त्यांची योग्यता काय सांगावी ! त्यांस पाहून माझे मनांत विलक्षण पूज्य
“ भाव व वचक उत्पन्न होई. अहाहा ! ते ज्यांनीं वापरले होते त्या पुरु-
“ षांचीं सुखें, दुःखें, मनोविकार, सत्कर्में, दुष्कर्में, आणि मनुष्यें ज्यास
“ संसार म्हणतात त्या या कारागृहांत ज्या अनंत बऱ्या वाईट गोष्टी
“ त्यांनीं अनुभविल्या त्या सर्वांचे **साक्षीदार व साधक हे कपडे** ! मग
“ जर त्या सभेंत निमुटपणें बसूनही ते या अनिर्वाच्य गोष्टी प्रकट करीत
“ असले तर त्यांत नवल काय? उतरलेल्या रिकाम्या कपड्यांविषयीं
“ ज्याच्या मनांत पूज्यभाव नाहीं त्याच्या अंतरंगाचा कांहींच भर-
“ वसा नाहीं. हा पहा लांब दाढीचा **बाळसंतोषी** ! जणूं काय जुन्या
“ **ज्यू लोकांचा धर्माचार्यच** ! जणूं काय एकादा **देवदूत कल्पांताचे**
“ वेळेस **भूतांस** आपआपल्या पापपुण्याचा झाडा देण्याकरितांच बोलावीत
“ असावा, याप्रमाणें हा **बाळसंतोषी** ओरडून ओरडून घोगरा झालेल्या
“ स्वरानें उतरलेल्या वस्त्रांस चारी दिशांकडून पाचारीत आहे. त्यानें
“ आपल्या डोक्यास तीन टोप्या घातल्या आहेत. त्या मिळून
“ **ख्रिस्तीधर्माचार्य पोपसाहेब**[३] यांच्या मुकुटाप्रमाणें दिसत आहेत. त्यास
“ मिळालेले उतरलेले कपडे त्यानें आपल्या दोन्ही खांद्यांवरून खालीं
“ सोडले असून ते या देवदूताच्या पंखांप्रमाणें दिसत आहेत; व त्याच्या
“ पाचरणाप्रमाणें जे कपडे जमतील त्यांस या पंखांवरचे[४] जागा मिळणार
“ आहे. हा देवदूत हळू हळू संचार करीत असतां हवेंतून सळसळ शब्द
“ निघतो तो जणूं काय “ अहो संसारांतील भूतांनो, चला; झाडा देण्यास
“ चला! ” असें सुचविणाऱ्या त्याच्या तुतारीचा आवाज आहे. अहो
“ फडफडणाऱ्या भूतांनो, तुम्हांस धास्ती वाटण्याचें कारण नाहीं. तो
“ तुम्हांस भट्टींत घालून जलाच्या व अग्नीच्या संपर्कानें प्रायश्चित्त देऊन

---

२ हल्लीं या रस्त्यास डडले स्ट्रीट असें म्हणतात.

३ पोपसाहेबांच्या मूळच्या १०४८ तल्या मकुटास तेराव्या, चौदाव्या व पंधराव्या शतकांत आणखी तीन लहान लहान मुकुट जडविले आहेत.

४ देवदूतांस मनुष्याचा आकार असून पंख असतात अशी कल्पना आहे.

" पावन करून घेईल व मग पुन्हां तुम्हीही निर्मळ होऊन लोकांपुढें याल!
" ज्या कोणाची श्रद्धा व पूज्यबुद्धि नष्टप्राय झाली असेल, ज्यास पूज्य-
" भाव ह्मणजे काय आहे याचा अनुभव नसेल, ज्यानें मनोभावानें कोणा-
" सही मान दिला नसेल, त्यानें एक वेळ या मानमाउथ रस्त्यावरील
" चोरबाजारांत जाऊन तेथें जें काय दिसतें, त्याविषयीं नीट खोल विचार
" करून आपल्या डोळ्यांस व अंतःकरणास पाझर फुटतो कीं नाहीं तें
" सांगावें! तेथें **फील्डगल्लींत पिंवळे जुने हातरुमाल** ओळीनें लावून ठेविले
" असतात, त्यामुळें ती गल्ली जणूं काय डायोनिशिअसच्या कानाप्रमाणें
" वाटत असून तींत चाललेला गोंगाट ऐकून असें वाटतें कीं, ही गरीब व
" दुर्वृत्त लोकांची त्या कानांत फिर्यादच चालली आहे! तें पहा! " आम्हांस
" आळशी लक्ष्मीपुत्रांनीं दुःख, अज्ञान, व पातकें यांत तुडवून टाकिलें
" आहे," असें त्यांचें ह्मणणेंही स्पष्ट ऐकूं येत आहे. ही उपमा जर बरो-
" बर असेल तर त्या मानानें **मानमाउथ** रस्त्याला **मिरझाच्या स्वप्नांतील**
" टेंकडीची उपमा देण्यास काय हरकत आहे? या टेंकडीवरून जणूं काय
" आपल्यापुढें संसारांतील सर्व कारभारांचीं सोंगें वस्त्ररूपानें येऊन आपणांत
" पूज्यभाव व वचक उत्पन्न करीत आहेत! त्यांत हर्ष व शोक, वेडगळ प्रेम
" व वेडगळ द्वेष, देवळांतील घंटानाद व सुळावरील विलाप, कांहीं गम-
" तीचे तर कांहीं कींव येण्यासारखे प्रसंग, कांहीं देवासारखें तर कांहीं
" पशूंसारखें वर्तन, याप्रमाणें सर्व सृष्टिरूप वेड्यांचा बाजार येथें आपणांस
" प्रत्यक्ष दिसत आहे!"

प्रोफेसर साहेबांच्या या लिहिण्यांत बरीच अतिशयोक्ति असेल असें आम्हांस वाटतें; व असेंच आमच्या बहुतेक वाचकांसही वाटत असेल. आम्ही

---

५ डायोनिशिअसचाकान—या नांवाची एक विस्तीर्ण गुहा सायरॅक्यूज नजीक आहे. तिला हें नांव पडण्याचें कारण त्या गुहेचा कैवार इतका विलक्षण साधला आहे कीं तेथें बोललेले शब्द सायरॅक्यूजच्या राजवाड्यांतील एका विशिष्ट ठिकाणीं अगदीं स्पष्ट ऐकूं येत असत. यामुळें या गुहेंत ठेवलेल्या कैद्यांचें गुप्तभाषण डायोनिशियस बादशहा यास ऐकण्यास सांपडे!

६ मिरझाचें स्वप्नांतील टेकडी. अॅडिसन नांवाच्या इंग्रज ग्रंथकारानें मिरझाचें स्वप्न या नांवाचें एक लहानसें कथानक लिहिलें आहे. त्यांत मिरझा एका टेकडीवर बसला असून तेथून त्यास इहलोकच्या अनंत रंगाच्या पसाऱ्यांतून लोक मृत्युमुखीं पडून त्यास पुढें मिळणारीं पापपुण्याचीं फळें भोगतांना दिसत आहेत असें फार उदात्त वर्णन आहे.

सुद्धां **मानमाउथ** रस्त्यांतून पुष्कळ वेळां गेलों आहों, पण प्रोफेसर साहेब म्हणतात त्या मानानें आम्हांमध्यें पूज्यभावाचें वास्तव्य जितक्यास तितकेंच होतें. मग असें कां झालें? कदाचित् याचें कारण असेंही असेल कीं तेथें चालणाऱ्या व्यवहारानें गडबड होऊन आमचें मन व्यग्र व विचारहीन झालें असेल. कारण त्या पूज्य जागेंत जे भाविक लोक जातात त्यांस तेथील सराफ, दलाल वगैरे क्षेत्रस्थ लोक ऐहिक गोष्टींच्या गडबडीनें कांहीं चैन पडूं देत नाहींत. अर्थात् टचूफेल्सड्राक साहेबांस या लोकांशीं कांहीं करावयाचें नसल्यामुळें त्यांस स्वस्थ मनानें विचार करण्यास फावलें असेल! हे आमचे ठेंगण्या बांध्याचे तत्ववेत्ते डोईस कळसाची टोपी व अंगांत सैल कपडे घालून मोठ्या आतुर डोळ्यांनीं पहात पहात व गूढ विचार करीत करीत या मोडक्या बाजारांतून हिंडतांना आह्मांस पहावयास सांपडले असते तर फार मौज झाली असती. त्यांच्या दृष्टीस हा मोडका बाजार ह्मणजे एखाद्या दिव्य मठासारखा असून तेथील अद्वितीय दालनांत हे संसारक्रमाचे साक्षीदार त्यांच्या कानांत कांहीं विलक्षण गोष्टी सांगत असतात! अहो तत्वज्ञ टचूफेल्सड्राक साहेब, लोक जेथें नुसती वटवट करीत असतात तेथेंच आपणास लक्ष्य लावून दिव्य शब्द ऐकण्यास सांपडतात! आपले कान इतके तिखट आहेत कीं, जमिनींत गवत वाढतें तेंही आपणांस ऐकूं येत असेल!

परंतु इंग्रजी भाषेत होणाऱ्या ग्रंथाकरितां सामुग्री म्हणून आह्मांस दिलेल्या या कागदांच्या पुडक्यांत प्रोफेसर साहेबांच्या इंग्लंडांतील प्रवासासंबंधी कांहींच मजकूर नसून या जुन्या कपड्यांच्या दुकानांवरून सुचलेले विचार सुद्धां अगदींच बेताबाताचे असावे हें फार विलक्षण आहे. आमच्याशीं बोलतांना सुद्धां आपण इंग्लंडांत गेलों होतों या पलीकडे जास्त कांहींच त्यांनीं सांगितलें नाहीं; पण एवढे खरें कीं आपल्या प्रवास वृत्तानें एखाद्यास कंटाळा आणावा असा त्यांचा स्वभावही नाहीं.

आतां आपल्या **प्रोफेसर साहेबांच्या** मनाचे डोळ्यावर **वस्त्ररहस्याचे** किरण एव्हांपासूनच पडूं लागले होते ही गोष्ट येथें कळली हेंही बरेंच महत्वाचें आहे. या **वस्त्ररहस्याची** पहिली दीप्ति त्यांस **मानमाउथ रस्त्यावरच** भासमान होऊन या ग्रंथनदीचा उगम इंग्लंडांतील अंतरिक्षांत पसरलेल्या मषीसमुद्रापासनच झाला असेल तर ही गोष्ट आपणांस भूष-

णावह आहे. कारण या **वस्त्ररहस्याची** उत्पत्ती ह्मणजे लहानसान गोष्ट नसून मूळ एकाकार परब्रह्मापासून जसें ब्रह्मांड उत्पन्न व्हावें तशांतलीच आहे.

---

# भाग सातवा

## नवांकुर.

सांप्रत हा **जगद्रूपी फिनिक्सपक्षी** चितारूढ होत आहे, व ट्यूफेल्सड्राक साहेबांच्या गणिताप्रमाणें पाहतां त्याचें पुनरुज्जीवन इतकें सावकाश व्हावयाचें आहे कीं, तें पुरें करण्याचा आज दोनशें वर्षांचा मक्ता जरी कोणास देतां आला तरी तो फायदेशीरच होईल असें साहेब बहादुरांचें ह्मणणें आहे. इकडे आपली आयुर्मर्यादा पाहतां ती फारच थोडी असून फार झालें तर हा **जगद्रूपी फिनिक्स**पक्षी अग्निकाष्ठें सेवन करून भस्मरूप झालेला मात्र आपणांस दिसेल. याहून जास्त आशा करणें व्यर्थ होय. परंतु ट्यूफेल्सड्राक साहेबांस असें वाटत नाहीं. ते म्हणतात, " सजीव प्राण्यांत जें रूपांतर " होतें तें सावकाश, होत होत होतें. उदाहरणार्थ, नाग जेव्हां आपली " कांत टाकून देतो त्या वेळेस नवें कातडें आंत आलेलेंच असतें; आणि हा " **जगद्रूपी फिनिक्सपक्षी** प्रथम आपणास अगदीं भस्मसात् व निर्जीव " करून घेऊन मागून दिव्य देह पावणार अशी जर कोणाची समजूत " असली तर हा भ्रम होय. या रूपांतराचें स्वरूप याहून फारच निराळें " आहे. कारण या **फिनिक्सपक्ष्याच्या** चितेवरील आगीच्या पोटांत " जुन्याचा नाश व नव्याची उत्पत्ति एकसमयावच्छेदेंकरूनच होते. " जुन्या देहाची राख वाऱ्यानें जरा इकडे तिकडे होते तोंच कांहीं " अद्भुत शक्तीनें नव्या देहाचा **अंकुर** आंत दिसूं लागतो. या चितेंतील " अग्नीच्या ज्वाळा भडकून इकडे तिकडे वावरत असतांना जो ध्वनी " होतो, त्यांतच या **फिनिक्साच्या** गत देहाबद्दल अन्त्येष्टी व नूतन " देहाविषयीं शांतिपाठ हे दोन्ही मधुर शब्द ऐकूं येत असतात. फार कशाला, " ही चिता पेटली आहे तींत तुह्मीच पहा ह्मणजे खात्री होईल. " चला तर आपण प्रत्यक्ष पाहूं. आमच्याप्रमाणेंच ज्या बिचाऱ्यांस दोनशें वर्षें वांचून हें दिव्य रूपांतर झालेलें पाहण्याची बिलकुल आशा नाहीं, त्यांना हे **नवांकुर** कांहीं अद्भुत शक्तीनें उत्पन्न होत असतां पहावयास सांपडले

तर महद्भाग्यच म्हणावयाचें. असो, तर हें मनुष्यजातीसंबंधानें सामान्यतः त्यांचें काय ह्मणणें आहे तें पहा.

प्रोफेसर साहेब म्हणतात, " असलेल्या गोष्टीस नाहीं ह्मणून कसें " चालेल ? तूं माझा **बंधूच** आहेस. हा तुझा मजविषयींचा **द्वेष, हेवा,** " व रागाच्या सपाट्यांत तूं मजविषयीं खोट्या नाट्या गोष्टी कुभांड घेऊन " सांगतोस त्या तरी काय आहेत ? ही उरफाटीच, पण तुझी मजविष- " यींची **सहानुभूति** नव्हे काय ? मी जर एखादें **इंजन** असतों, तर मीं " चांगलें वाईट कशाही प्रकारचें काम केलें असतें तरी तूं खोट्या नाट्या " गोष्टी मजविषयीं सांगतास काय ? छे, छे ! मग मी कसाही असतों " तरी तूं माझी पर्वा केली नसतीस.

" प्रत्येक **मनुष्य** बाकीच्या **सर्व माणसांशीं** कांहीं विलक्षण बंधनांनीं " बांधलेला आहे; मग हीं बंधनें **प्रेमाचे** पुष्पहार असोत किंवा **प्रकृति-** " **परवशतेचे** लोखंडी सांखळदंड असोत. एखादा तऱ्हेवाईक चिरडखोर " मनुष्य पाहिला ह्मणजे इतर लोकांचे मनांत कांहीं विलक्षण कल्पना- " तरंग येतात. अशा वेळेस मनांतल्या मनांत त्यास उद्देशून मी ह्मणतों, " " हे माझ्या लहानग्या **भांवडा**, या वेळेस जर एक मोठी कांचेची हंडी " तुजवर उपडी पडून तीमुळें तूं जिवंत असतांच तुझा व जगाचा संबंध " कायमचा तुटला तर तुला व जगालाही कसें वाटेल बरें ! तुझ्या नांवचीं " जीं थोडीं बहुत पत्रें रोज पोष्टांतून येतात तीं या तुझ्या सभोंवतालच्या " कांचेच्या भिंतींवर येऊन आदळलीं तरी आतां त्यांस वाचावयास कोण " आहे ? त्याचप्रमाणें तुझ्या मनांतील विचार, प्रश्न, व उत्तरें पत्ररूपानें " आतां टपालाच्या थैलींतून जाण्याचा संभव नाहीं. तुझे विचार आतां " तुझ्या मित्रांच्या कानावर शब्दमार्गेंही जाण्यास साधन नाहीं; मग ते " त्यांचे हृदयावर काढून परिणाम पावतील ? आतां तूं खपून केलेलें कामही " कोणा गिऱ्हाइकाचे हातीं पडत नाहीं ! तात्पर्य, शरीरांत जसें अवय- " वांस रक्ताचा पुरवठा करणारें व अवयवांतील दूषित रक्त वाहून नेणारें, " शिरा व धमन्या असलेलें हृदय असतें तसा तूं या जगांत वर सांगित- " लेल्या मार्गांनीं व्यवहार करीत **अनंत काळ व अनंत स्थळ** यांशीं " संबंधित होतास ! तसा आतां तुझा या जगाशीं, किंवा काळाशीं व " **स्थळाशींही** कांहीं एक संबंध उरला नाहीं. या अपरिमेय व सर्वत्र पस-

" रलेल्या **जगद्रूप वस्त्रास** आतां कायमचें भोंक पडलें आहे; व आतां ती
" हुंडी काढून टाकून तें रफू केलेंच पाहिजे."

" याप्रमाणें भाषण, निरोप, कागद, देणग्या वगैरे त्याजपासून जाणाऱ्या
" व त्याजकडे येणाऱ्या **वस्तुरूप** शिरा व धमन्यांतून **विचार, कल्पना,**
" व **विकार**रूप रक्ताचा प्रवाह या जगांत चालतो तो प्रत्यक्ष दिसतो.
" परंतु या **जगच्छरीरांतील** याहीपेक्षां नाजुक जे **मज्जातंतू** आहेत ते
" आपल्या डोळ्यांस दिसत नाहींत. त्यांचे योगानें त्यानें केलेली किंवा
" त्याचे संबंधाची प्रत्येक गोष्ट अति सूक्ष्मांशानें सर्व **मनुष्यांवर** परिणाम
" पावते. उदाहरणार्थ, तो प्रसन्न मुद्रेनें अगर रागाच्या मुद्रेनें ज्या ज्या
" मनुष्याकडे पाहतो त्याचे त्याचे अंतरंगांत सहानुभूतीनें म्हणा किंवा
" विरोधानें म्हणा तसे तसे विकार उत्पन्न होतात. हे सूक्ष्म **मज्जातंतू**
" आपणांस प्रत्यक्ष दिसणारे नसून कल्पनाचक्षूंनींच ते आपण पाहिले
" पाहिजेत. शिकारीवर निर्वाह करणारा अमेरिकेंतला एखादा यःकश्चित् तांबडा
" तद्देशीय मनुष्य घ्या, तोही जर आपल्या बायकोशीं भांडला तर त्याचेंही
" प्रायश्चित्त सर्व जगास पडणार आहे. कारण एक दिवस त्यानें शिकार
" न केली तर बीव्हरच्या मांसाचा पुरवठा तितका कमी होऊन त्याची
" किंमत कांहीं तरी सूक्ष्मांशानें वाढेल. फार काय सांगावें, पण ही एवढीशी
" गोटी उचलून दुसरीकडे फेंकिली तर तेवढ्यानेंही सर्व सृष्टीचा गुरुत्व-
" मध्य बदलेल हें गणितशास्त्रावरून सिद्ध आहे.

" याप्रमाणें एका पिढींतील माणसें अनेक अनिर्वाच्य संबंधांनीं परस्प-
" रांशीं जखडलेलीं आहेत. पण एका पिढीचा इतर पिढ्यांशीं असणारा
" संबंध याहून कमी महत्वाचा आहे असें समजूं नये. **परंपरा** या शब्दा-
" विषयीं कधीं कोणीं विचार केला आहे काय? आपला केवळ जन्मच
" नव्हे तर या जन्मांतील हें **शरीर** व त्याचे **एकंदर साहित्यही** आप-
" णांस पूर्वदत्तच असून आपण जें **करितों**, जें **बोलतों**, जे **विचार** आपण
" **करितों**, आपणास जें जें कांहीं **वाटतें**, तें सर्व आपणांस आपले आजे,
" पणजे यांचे द्वारें मूळ जगाच्या सुरवातीपासून जें कांहीं मिळालें आहे, त्या
" पूर्वदत्तावरच अवलंबून असतें. उदाहरणार्थ—हा "**वस्त्ररहस्याचा**" गरी-
" बसा ग्रंथ तुम्हांस कोणी छापून दिला? श्लिशाविजन कंपनीनें कां? नाहीं.

" थीव्सच्या **क्याडॅमसनें**, **मॅंटझ्** येथील **फास्टनें**, व ज्यांची तुला यत्किं-
" चितही माहिती नाहीं अशा अगण्य मनुष्यांनीं केलेल्या श्रमांचें हें फळ
" आहे. **मिसोगाथिक अलफिला** जर झाला नसता तर तुमचा **शेक्सपि-**
" **यरही** झाला नसता, किंवा तो सांप्रतपेक्षां अगदीं निराळा तरी झाला
" असता. अरे वेड्या, तुझ्या घरांतील नुसती सुई सुद्धां **ट्यूबलकेननें** केली
" असून हा तुझा दरबारी पोषाख तरी त्याच्याच श्रमाचें फळ आहे.

" आणि ज्या अर्थी सर्व सृष्टीच **एकरूप** व **सचेतनव्यक्ति** आहे,
" त्या अर्थी **मनुष्यजातीचें एकरूपत्व** व **सचेतन व्यक्तित्वही** सिद्धच
" आहे. कारण **मनुष्यजात** म्हणजे सृष्टीचा आरसा होय. हा आरसा
" आहे म्हणून हे जगही आहे. **मनुष्यजात** नसती तर हें जग नाहींसा-
" रखेंच झालें असतें. या **मनुष्यजातिरूप** विलक्षण व्यक्तींत अनेक
" चैतन्यप्रवाह आहेत. त्यांपैकीं ज्यांना आपण **मतें** म्हणतों, ते प्रवाह
" फारच महत्वाचे असून आपल्या दृष्टोत्पत्तीसही येण्यासारखे आहेत.
" बाकीचे प्रवाह आपल्या समजुतींत येत नाहींत. हीं मतें अनेक **संस्थांतून**
" **राजनीत्यांतून, धर्मांतून**, व सर्वांपेक्षां जास्त, **पुस्तकांतून** भरलेलीं
" आहेत. विचारांची उत्पत्ति मतांपासून व मतांची उत्पत्ति विचारांच्या
" समूहापासून असें हें विलक्षण सांटेंलोटें आहे. पण एक वेळ उत्पन्न

---

१ कॅडमस–( इ० स० पू० १४०० ) यानें ग्रीक लोकांत मूळ अक्षरलिपी उत्पन्न केली व थीव्स शहर वसविलें अशी दंतकथा आहे.

२ फास्ट–मॅंट्झ येथील एक सोनार. टाइपांनीं छापण्याची कला मूळ यानेंच शोधून काढिली अशी प्रसिद्धि आहे, परंतु त्यानें गटेन्बर्ग व आपला जावई शीफर यांस ही उत्कृष्ट कला पूर्णतेस आणण्यांत मदत मात्र केली असें म्हणतात. त्यांनीं प्रथम मोठा ग्रंथ छापिला तो बायबल हा होय. या आवृत्तीच्या प्रत्येक प्रतींत असलेला हुबेहूब सारखेपणा पाहून फ्रेंच सरकारानें फास्ट यास जादूगार ठरवून कैदेंत टाकलें होतें असें ह्मणतात. हा पुरुष १४६६ त मेला असावा असें वाटतें. गॉटच्या फास्ट नाटकांत जो नायक आहे त्याची मूळ प्रतिमा हीच.

३ अलफिला—( ३१८–३८८ ) हा गाथ लोकांतील एक धर्माध्यक्ष होता. त्यानें बायबलचें भाषांतर केलें होतें. इंग्लिश भाषेस मूळ आधारभूत जी ट्यूटानिक भाषा तींतील अतिप्राचीन ग्रंथ हाच. याचे दोन भाग अजून उपलब्ध आहेत.

४ ट्यूबलकेन—बायबलांतील वर्णनाप्रमाणें बाबा आदम पासून आठवा पुरुष, व लोखंडी कामाचा मूळ प्रवर्तक.

" झालेल्या विचाराचा कधींही लय होत नाहीं ही गोष्ट किती अपूर्व आहे !
" अमुक एक विचार तुझ्या मनांत उत्पन्न झाला तरी तो या भूतलावर
" आजपर्यंत उत्पन्न झालेल्या विचारांतून जें कांहीं संचित तुला प्राप्त झालें
" आहे त्यामुळेंच तो तुझ्या डोक्यांत येतो, व तोही एकंदर भविष्य
" काळचे लोकांना संचित रूपानें मिळणार आहे. याप्रमाणें अगदीं अव्व-
" लचे शूर व विचारी पुरुषही आज आमच्या मनानें विचार करीत असून
" आमच्याच इंद्रियांनीं अनुभव घेत आहेत. या सर्व पूर्वकालीन शूर व
" विचारी पुरुषांचें आत्मे साक्षित्वानें व प्रोत्साहकत्वानें सर्वत्र सभोंवतीं
" नांदत असून प्रत्येक सुज्ञ पुरुषास ऐक्यभावानें प्रेमालिंगन देत असतात.
" याप्रमाणें सर्व **संतांचा समाज** ही कांहीं केवळ काल्पनिक गोष्ट नसून
" ती प्रत्यक्ष आहे. इतकेंच नव्हे, तर या समाजांत सर्व देशचे व सर्व
" काळचे विचारी व पराक्रमी लोक सदैव विराजमान असतात.

" या मनुष्यरूप व्यक्तीचे पोटविभाग पिढ्या होत. व त्या पिढ्या या
" सबंध व्यक्तीच्या उत्तरोत्तर ऊर्जित स्थितीस फारच उपयोगाच्या आहेत.
" नेहमीं परिश्रम करणाऱ्या या मनुष्यजातिरूप व्यक्तीचे आयुष्यांत
" या पिढ्या दिवसाप्रमाणें असून जन्म व मृत्यु हे जसे कांहीं संध्यासमय
" होत. मृत्यूचे समयीं ही मनुष्यजात जणू काय झोंपीं जात असून
" जन्माचे समयीं पुन्हां हुषारीनें काम करण्यास जागृत होते. वडिलांनीं
" केलें असेल तें चालवून मुलगा त्या संचिताचा उपभोग घेतो, पण या-
" शिवाय त्याचें स्वतंत्र काम त्याला लागलेंच आहे ! याप्रमाणें संचय होत
" होत त्याची पुढील काळाकरितां ठेव होते. कला, संस्था, मतें, धर्म हीं
" केव्हांही परिपूर्ण स्थितीस आलेलीं असतात असें नाहीं. या इमारतींची
" टाकी सदैव चालूच असते. **केप्लरनें**[५] सिद्धांत काढिले, त्यांचें निरीक्षण

---

५ केप्लर—(१५७१–१६३०) एक विख्यात जर्मन ज्योतिषी. यानें ज्योतिषसंबंधी बरेच शोध लाविले. त्यांत अत्यंत महत्वाचा म्हटला म्हणजे ग्रहांच्या कक्षा दीर्घवर्तुला-कृती आहेत हा होय. डि अलेंबर्ट यानें या पुरुषाविषयीं लिहितांना असें म्हटलें आहे कीं " आपल्या बुद्धिमत्तेवरून आपण प्रसिद्धीस यावें अशी या पुरुषास फारच उत्कंठा होती. तो प्रत्येक विषयांत फार खोल व बारकाईनें विचार करी; व कोठें थोडासा सुगावा लागला कीं मग त्याचा पिच्छा पुरवीत असे. त्यानें जसे पुष्कळ शोध लाविले तसा तो पुष्कळ कामांत फसलाही. परंतु यांत कांहीं नवल नाहीं. ज्या गोष्टींत त्यास माघार घ्यावी लागली त्या अगदींच अशक्य आहेत; पण त्या अशक्य आहेत अशी खात्री त्यास प्रयत्न करून फसल्याशिवाय यावी कशी? शिवाय जे शोध त्यानें लाविले तेही कांहीं सामान्य नाहींत."

" **न्यूटननें** केलेंच. पण जास्त पुढें व उंच जाऊन आणखी नवीन शोध
" करण्याचें काम न्यूटनकडे होतेंच. त्याचप्रमाणें **हिब्र्यू** लोकांचा स्मृति-
" कार होऊन गेल्यावर मागून **जेंटाईल** लोकांचा आद्यगुरुही योग्य काळीं
" अवतरलाच. असो; जसें हें बांधणीचें काम सतत चालू असून त्यावर
" नेहमीं नवे नवे कारागीर येतात, त्याचप्रमाणें जुने मोडकळीस आलेले
" भाग वरचेवर पाडणेंही अवश्य असून या कामाकरितांही योग्य काळीं
" योग्य पुरुषांचे अवतार व्हावे लागतात; व तेंही काम तसेंच अव्याहत
" नेटानें चालावें लागतें. **पोपसाहेबांचें महानुशासन** जाळलें तेवढ्या उबे-
" वर **लूथरचें** भागलें, पण पुढें **व्हाल्टेअर**( पा.२०५) पुन्हां कुडकुडूं लागला;

---

६ न्यूटन.--( १६४२-१७२७ ) प्रसिद्ध दुर्बीन नामक यंत्राचा उत्पादक. हा उत्कृष्ट शोधक व तत्ववेत्ता व ज्योतिषी होता. झाडावरून नुसतें एक फळ पडलेलें पाहून पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणाची, व त्यावरून सर्व सृष्टींत जें गुरुत्वाकर्षण चालू आहे व ज्यामुळें ही सर्व ग्रहमाला व विश्व चाललें आहे, त्याविषयीं सिद्धांत करणारा पुरुष हाच. हा जरी इतका विद्वान व विचारी असे तरी त्यास गर्व अगदींच नसून त्याचें वर्तन फारच पवित्र असे; आणि इंग्लिश लोकांस त्याविषयीं जो इतका अभिमान वाटतो तो यथार्थ आहे.

७ मोझेस नांवाचा राजर्षी हाच मूळ कायदेकार असें बायबलांत सांगितलें आहे.

८ जेंटाईल लोकांचा आद्य गुरु व ख्रिस्तीधर्मप्रसारक सेंटपाल. मूळ स्मृती जरी मोझेसनें केली होती तरी तीप्रमाणें आचरण होण्यास श्रद्धा व भक्ति हीं जेंटाईल लोकांत याच पुरुषानें उत्पन्न केलीं अशी कथा बायबलांत आहे.

९ मार्टिन लूथर—हा महापुरुष ख्रिस्तीधर्माच्या प्राटेस्टंट शाखेचा मूळपुरुष होय. हा पंधरावे वर्षीं युनिव्हरसिटींत तत्वशास्त्र व कायदा यांचा अभ्यास करूं लागला. परंतु एके दिवशीं एका मित्राबरोबर रानांत फिरावयास गेला असतां त्या मित्राच्या अंगा-वर वीज पडून तो मेला. यामुळें लूथरचें मनास उपरति होऊन पुढें सर्व आयुष्य ईश्वर सेवेंत घालविण्याचा निश्चय करून सेंट आगस्टाइनच्या एका मठांत तो राहिला. तेथें बायबलाचा एक लॅटिन ग्रंथ त्यास मिळाला तो त्यानें मोठ्या उत्साहानें व खोल विचार-करून वाचला व त्या योगें त्यावेळीं प्रचलित असलेल्या ख्रिस्ती चालीरीति, व मूळ बाय-बलांतील तत्वें यामध्यें किती विरोध आहे हें त्याच्या लक्षांत आलें. पुढें तो आपल्या मठाच्या कामाकरितां ख्रिस्तीधर्माचें मूळपीठ रोम येथें गेला असतां हा विरोध जास्तच स्पष्टपणें त्याच्या लक्षांत आला. तो परत आल्यावर डाक्टर आफ डिव्हिनिटी ही पदवी मिळून विटेनबर्गचे युनिव्हरसिटींत त्याची धर्मविषयाच्या प्रोफेसरच्या जागीं नेमणूक झाली. १५१७मध्यें पोप दहावा लिओ याच्या आज्ञेनें पापविमोचन पत्रिका नांवाच्या सनदा विकण्याचें काम चालू होतें. या प्रायश्चित्तपत्रिकांची विक्री जर्मनींत अति निंद्य प्रकारांनीं होऊं लागल्या-

" व त्यास नवेंच सरपण घेऊन नवीच आगटी पेटवावी लागली. त्याचप्रमाणें
" इंग्लंडांत जो मनुष्य पूर्वी व्हिग म्हणजे प्रजापक्षांत होता तोच आज
" रॅडिकल म्हणजे निःसीम पक्षाचा होतो, व त्याच्या पुढच्या पिढींत तर तो

मुळें सर्व सद्धर्मी लोकांस व विशेषतः लूथर यास फार वाईट वाटलें. लूथरनें या प्रायश्चित्त-पत्रिकेविरुद्ध एक लेख लिहिला त्यास जबाबादाखल पोपसाहेबांचें जर्मनींतील प्रायश्चित विक्रय करणारे दलाल टॅझेल यानेंही एक लेख लिहिला. परंतु लोकांनीं लूथरचेंच म्हणणें सप्रमाण धरिलें. यामुळें हा वाद सर्व जर्मनीभर पेटून जर्मनीच्या बादशहानें तो मिटविण्याविषयीं पोप साहेबांस विनंति केली. व त्याप्रमाणें लूथरला जबाब देण्याकरितां पाचारण झालें. रोम येथें गेल्यास आपली धडगत नाहीं असें पाहून लूथरनें रोम येथें जाण्याचें नाकारलें. तेव्हां लूथर यास तुम्हीं आमच्या स्वाधीन करावें, असा पोप साहेबांकडून बादशहास खलिता आला; परंतु ही गोष्ट बादशहानें नाकारली व खटला जर्मनींतच चालवावा असें पोप साहेबांस लिहिलें. त्याप्रमाणें जर्मनींत खटला चालून नेमलेल्या अध्यक्षा समोर लूथरनें आपलें सर्व म्हणणें सांगितलें. परंतु अध्यक्षांनीं सांगितलें कीं तुझें म्हणणें खरें खोटें कसेंही असलें, तरी पोप साहेबांचा ठराव तुला मान्य केला पाहिजे. ही गोष्ट लूथरनें नाकबूल केली. यावरून "प्रायश्चित्ताच्या सनदा देण्याचा आपला अधिकार जे कोणी नाकबूल करतील त्यास बहिष्कृत केलें जाईल" असें महानुशासन पोपनीं प्रसिद्ध केलें. लूथरनें सत्यपक्षाचा अभिमान धरण्याविषयीं लोकांकडे करुणा भाकिली. लूथरचा शिष्यवर्ग फारच झपाट्यानें वाढत चालला. अखेरीस वादविवाद वाढतां वाढतां १५२० त पोप साहेबांनीं लूथरला पतित ठरविलें! लूथरनें विटेम्बर्ग येथें आपले सर्व शिष्य जमवून पोपचा हा ठराव त्यास दाखवून "हा पहा कलिराजाचा ठराव!" असें म्हणून तो अग्नींत टाकिला. दुसरे वर्षी जर्मनीचा बादशहा पांचवा चार्लस याजकडून संरक्षणापुरती मदत घेऊन तो वर्म्सयेथील धर्मपरिषदेस गेला. "हसची काय दशा झाली ती लक्षांत आण" असें म्हणून वर्म्स येथें न जाण्याविषयीं पुष्कळांनीं त्यास आग्रहानें सांगितलें. पण तो म्हणाला घरावर जितकीं कौलें आहेत तितके कली जरी मला छळण्यांस आले तरी मी जाणार, मग काय होईल तें होवो." याप्रमाणें तेथें गेल्यावर "तूं आपलें म्हणणें परत घेऊन पोप साहेबांस शरण जा" अशी परिषदेनें त्यास आज्ञा केली. ही गोष्ट त्यानें नाकबूल केली, व तेथून परत निघाला तो वाटेंत एका जंगलांत "इलेक्टर आफ सॅक्सनीच्या घोडेस्वारांच्या एका टोळीनें त्यास गाठून एका किल्ल्यांत इतक्या गुप्त रीतीनें ठेविलें कीं त्याचा कोठें मागमूसही लागेना. इकडे जर्मनीच्या बादशहानेंही "तो वध्य आहे, व त्याचें जो कोणी संरक्षण करील त्यास राजद्रोहाचें शासन मिळेल" असा ठराव केला. पण इकडे लूथर हा आपल्या कैदेंतच सुखरूप होता. तो त्या जागेस आपली पर्णकुटी म्हणे व तेथें मित्र मंडळीशीं संभाषणें करण्यांत व ग्रंथ लिहिण्यांत वेळ घालवी. याप्रमाणें दहा महिनें राहिल्यावर तो विटेम्बर्ग येथें परत आला, आणि इंग्लंडचा राजा

" **सुधारक** होतो. याप्रमाणें कोठेंही पाहिलें तरी **मनुष्यजात** स्थिर
" नसून तिचें एकसारखें पुढें पाऊल आहे; मग तें वेगानें जावो, किंवा
" मंदगतीनें जावो. हा **मनुष्यजातिरूप फिनि**क्सपक्षी एकसारखा आपले पंख
" पसरून उंच चालला असून आपल्या भरारीच्या नादानें सर्व पृथ्वीस भरून
" टाकितो; किंवा त्यास आलेली जीर्णस्थिति जाऊन नवी येण्याकरितां
" सांप्रतप्रमाणें वरून खालीं तरी येऊन अग्निकाष्ठें सेवन करितो.

या विचारांत सांप्रतच्या कहराचे प्रसंगीं समाजस्थितीविषयीं कळकळ वाटणाऱ्या लोकांस जर कांहीं समाधान होण्यासारखें असलें तर पहावें. आतां हा एक उतारा पदव्यांसंबंधाचा देतों.

टचूफेलसड्राक साहेब म्हणतात, " सर्व बहुमानाच्या पदव्यांचा उदय
" **युद्धा**पासून झाला आहे; ही गोष्ट कांहींशी चमत्कारिक वाटेल. तुमचे
" ड्यूक म्हणजे सैन्याचे पुढारी किंवा बिनीवाले; तुमचे **अर्ल** म्हणजे बलिष्ट
" मनुष्य किंवा दळवी ( ? ) तुमचे **मार्शल** म्हणजे शिलेदारांचे नालबंद,
" याप्रमाणें सर्व पदव्या युद्धापासून आलेल्या आहेत. पण आतां
" शांततेचा व शहाणपणाचा अंमल होणार आहे असें भविष्य बरेच काळा-
" पासून चालत आलें असून आतां तर अशा शांततेच्या व शहाणपणाच्या
" अमलाचा संभव अगदीं नजीक ठेपला असून आतां या युद्धकाळच्या पदव्या
" एकीकडे ठेवून शांततेच्या काळास शोभणाऱ्या नव्या व श्रेष्ठतर पदव्या
" काढावयास नकोत काय ?

---

आठवा हेनरी यानें त्याच्या मताचें खंडनार्थ एक ग्रंथ लिहिला होता ( ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ) त्यास जबाबादाखल एक ग्रंथ लिहिला. १५२९ त जर्मनीच्या बादशहानें तुर्क लोकांशीं लढण्यांत साह्य मागण्याकरितां व धर्मसंबंधी तंटे मिटविण्याकरितां आपल्या मांडलिक राजांचा एक दरबार केला होता त्या प्रसंगी असा ठराव झाला कीं " सर्व बादशाहींत मॅस ( या नांवाचा रोमन क्याथलिक पंथांत एक पाठ अवश्य सांगितला आहे तो ) रोज झालाच पाहिजे. हा हुकूम अन्यायाचा आहे अशी त्या वेळीं सॅक्सनी, विटेमबर्ग वगैरे संस्थानांच्या मांडलिकांनीं " प्राटेस्ट " ( तक्रार ) केली. हा प्राटेस्टंट धर्माचा मूळ पाया. पुढें हे सर्व मांडलिक एकत्र होऊन त्यांनीं बादशहाविरुद्ध आपलें रक्षण करण्याकरितां जूट केली १५३० त लूथरचा शिष्य मालेंथान यानें नवीन प्राटेस्टंट धर्माचीं तत्वें ठरविलीं व १५३४ त लूथरचें बायबलचें जर्मन भाषांतर प्रसिद्ध झालें. हा पुरुष फार प्रखर प्रकृतीचा पण सत्यनिष्ठ व सत्वधीर असे व त्यानें आपला देह जन्मभर परोपकारार्थ झिजविला.

" ज्या एका पदवींत निखालस व कायमचा सत्यार्थ दिसतो ती पदवी **राजा**
" ही मात्र होय. व मनुष्यजातीच्या नियंत्यास **राजा** ही पदवी केव्हांही शोभ-
" णारच. नाविष्णुःपृथिवीपतिः हें धर्माचार्यांचें वाक्य अगदीं यथार्थ आहे. राजा
" जो अंमल करितो तो ईश्वरदत्त अधिकारानेंच करितो. त्यास मनुष्य जा-
" तींवर अंमल करण्यास ईश्वराची सनद असते असेंही कां म्हणाना ?
" कारण हा अधिकार देणें हें मनुष्याचे स्वाधीन नाहीं. अमक्यानें माझा
" राजा व्हावें असें ह्मणण्याचा अधिकार मला आहे काय ? मनास वाटेल
" तसा पुतळा उभा करून त्यास राजा म्हणून त्याच्या कल्पित आज्ञांत
" वागून किंवा त्याचा शिरच्छेद[१०] करून बरा वाईट खेळ करून घेणें झा-
" ल्यास तसा राजा नेमणें मात्र आपल्या हातीं आहे. पण जो मजवर अंमल
" करणार, ज्याचा हुकूम मला आपल्या स्वतःच्या हेक्यापेक्षां अधिक वाटणार
" तो माझा खरोखरीचा **राजा** मजवर ईश्वरानेंच नेमिला पाहिजे. व या
" ईश्वरी योजनेस शिरसा मान्य करणें यांतच **खरें स्वातंत्र्य** आहे. याहून
" दुसऱ्या स्वातंत्र्याची कल्पनाही अशक्य आहे.

येथें आह्मी एवढी एक गोष्ट कबूल करू कीं ट्यूफेलसड्राक साहेबांच्या अध्यात्म सृष्टींत राजकारणी विचाराचे प्रांतांत जसे ते जपून, संकोचवृत्तीनें व आश्चर्यभरित होऊन चालतात तसे अन्यप्रदेशीं हिंडत नसतात. आपणां इंग्रज लोकांस **प्रधानपक्षाविषयीं** व विरुद्ध असणाऱ्या **लोकपक्षाविषयींही** अत्यंत पूज्यबुद्धि वाटत असून समाजाचं हित करण्याकरितां या दोन्ही पक्षांत परस्पर वाग्युद्धें होऊन त्यापासून आपली उत्कृष्ट राज्यसंस्था कायम राहून जोरकस होत जाते; म्हणून हा उभय पक्षांतील विरोधही आह्मांस प्रिय वाटतो. अशा स्थितींत प्रोफेसर साहेबांच्या अध्यात्मसृष्टीं-

१० इंग्लंडचा राजा पहिला चार्लस प्रजाजनांवर जुलूम करूं लागल्यामुळें व त्याच्या हेतूस पार्लमेंट सभा आड आल्यावरून पार्लमेंटच्या मताची आवश्यकता न ठेवतांच राज्य चालवूं लागल्यामुळें त्यास न्यायासनापुढें उभें करून व त्याचा निवाडा करून इंग्लंडचे लोकांनीं त्यास अन्यायानें राज्य चालविल्याबद्दल शिरच्छेदाची शिक्षा ठरवून ती अमलांत आणिली ( १६४९ ). त्याचप्रमाणें फ्रान्सचा राजा १६ वा लुई यासही त्याच्या प्रजेनें राज्यक्रांतीच्या वेळीं देहान्त शासन दिलें ( १६९३ ). हा लुई वाईट होता असेंही नाहीं. त्याचा अपराध फक्त अनिश्चय हा होता. त्याची राणी तर अद्वितीय सद्गुणांनीं परिपूर्ण असूनही बिचारिला हीच शिक्षा अनुभवावी लागली.

तील राजधानींत किंवा अजातमृतांच्या शहरांत आपणास अगदींच भांबावल्यासारखें होईल. या विलक्षण राजधानींत मागें होऊन गेलेले व पुढें होणारेही लोक नांदत असून वर्तमान काळ ह्मणजे केवळ या भूतभविष्यांस जोडणारा सूक्ष्म पडदा आहे. त्याचे एका आंगास भूतकाळाचा व दुसरे आंगास भविष्य काळाचाही विस्तार असून ते उभयतां विस्तार अत्यंत मोठे, अपरिमेय, उदासवाणे व भयंकर आहेत. तेथील नुसत्या अंधुक अंधुक दिव्यांसही कांहीं विलक्षण दीप्ती आहे. तेथें आपली कशी अवस्था होईल नकळे. तेथें आपले प्रोफेसर साहेब अगदीं आर्षपणें समाधानवृत्तीनें संचार करीत असतात. भावी गोष्टी त्यांस झाल्या सारख्याच वाटत असून एखादी गोष्ट होण्यास कांहीं शतकांचा अवकाश असला काय किंवा कांहीं दिवसांचा असला काय दोन्ही गोष्टी त्यांस सारख्याच दिसतात. तेथें त्यांची राहणी इतकी विलक्षण आहे कीं ती पाहून एखाद्यास वाटेल कीं हा कोणत्या युगांतला प्राणी आहे नकळे. या पुरुषाकडे पाहिलें असतां त्याचे अंतरंगांत खोल, व शांत, सावकाश जळणारा, पण कधीं न विझणारा असा निस्सीम मताचा अग्नी स्पष्ट दिसत असून त्यापासून पहाणाऱ्यांच्या मनांत त्याजविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न होते व अंगाचा थरकांपही होतो ! ही गोष्ट आम्हीं पूर्वीं सांगितली असेलसें वाटत नाहीं; पण जरी सांगितली असली तरी तिची पुनरावृत्ति करणेंही आमचें कर्तव्य आहे.

उदाहरणार्थ, आपणास पार्लमेंटचे सभासद निवडून देण्याचा हक्क आहे त्यांत आपल्या प्रोफेसर साहेबांस कांहींच अर्थ आहेसें वाटत नाहीं. निदान या पुढील उताऱ्याचा आम्हांस तरी असा भावार्थ दिसतो. प्रोफेसर साहेब म्हणतात, "पाहिजे तर हल्लींचा क्रम सर्वत्र चालू करून पहा, म्हणजे
" तुम्हांस स्पष्ट दिसून येईल कीं ज्या स्वतंत्रतेचा उदय देवलोकांत असून
" जी आपणांस दिव्य स्थितीप्रत नेणारी असल्यामुळें अगदीं अवश्यही
" आहे, ती बॅलट बाक्स म्हणजे मताची मोजदात करण्याच्या पेटीमध्यें
" किंवा दुसऱ्या कोणच्याही युक्तीनें किंवा यंत्राचे साह्यानें नुसत्या बाह्य
" उपकरणांनीं कधींही उत्पन्न होत नसते. तशी बाह्य उपकरणांनीं ती
" उत्पन्न झाली तर बरेंच झालें; मग या गोष्टीनें आपल्या एकंदर सुधारणांवर
" ताण होईल!" ट्यूफेल्सड्राक साहेबांस आमची ब्रिटीश राज्यव्यवस्था कशी आहे तें यत्किंचित् तरी ठाऊक आहे काय ? कारण जर त्यांस ती ठाऊक

असती तर त्यांनीं असले उद्गार काढले नसते. दुसऱ्या वाक्यालंकारानें ते काय म्हणतात तें पहा, " आपले हें ( राज्यरूपी ) **घर** पुन्हां बांधलेंच " पाहिजे. पण तें बांधींपर्यंत आपणास आंत राहिलेंही पाहिजेच. **म्हणून** " हें घर **वरून खालीं** जर बांधीत यावयाचें असले ( आणि असाच " सर्वत्र विचार असेलसें वाटतें ) तर मात्र हें प्रतिनिधिमार्फत राज्यसूत्र " चालविण्याचें यंत्र छान उपयोगी पडेल. तसें दुसरें कोणचेंही पडावयाचें " नाहीं. पण मग आपण **स्वतंत्र** आहों अशा कोरड्या शब्दांनीं एकमे- " कांची समजूत करूं पाहणें बरोबर नाहीं; कारण अशानें **परवशतेच्या बेडी-** " **ला** मुलामा लावून **दागिन्याचें** बाह्य स्वरूप मात्र आणल्यासारखें " होईल." हा एक उतारा झाला. आतां हें दुसरें विधान वांचून शांतिवर्धक मंडळीस काय बरें वाटेल ? आमचे प्रोफेसर साहेब म्हणतात, " खालच्या " प्रतीचे लोक सर्वत्र लढाईची इच्छा करीत असतात. व हें त्यांचें करणें " बरेंचसें सकारणही आहे. कारण त्या वेळेस त्यांची फार जरूर असते ! " पण ती कशा करितां ? बंदुकीच्या गोळीनें प्राण देण्याकरितां ! (एरवीं त्या " बिचाऱ्यांस कोण विचारतो ? )

आतां ट्यूफेल्सड्राक साहेबांचा हा निःसीमपणाचा व अंतःकरणास भां-बावून टाकणारा राजकारणविचार सोडून त्याहून जरा स्वच्छतर प्रदेशांत यावें हें बरें. आपण **नवांकुरांची** टेहळणी करीत आहों, म्हणून लोकोत्तरपुरुष-पूजनाचा हा एक अंकुर त्यांतलाच आहे कीं काय तें पाहूं. त्याचें स्वरूप फारच आनंदकारक आहे पण तें इतकें गूढ आहे कीं, त्यांत किती महत्व आहे, किंवा त्यांत कांहीं महत्व असेल कीं नाहीं, हेंहीं कांहीं समजत नाहीं ! आमच्या वाचकांनींच हा अंकुर स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिला तर बरें होईल.

" एक **आज्ञा पाळण्याची** गोष्ट खेरीजकरून बाकीच्या सर्व गोष्टी " सांप्रतकाळीं लोकांस करितां येतात ही गोष्ट सर्वथैव खरी आहे. पण ही " दुसरीही एक गोष्ट अगदीं तिच्या इतकीच खरी आहे; ती ही कीं, " ज्याला **आज्ञाधारक**पणाचें काम करितां येत नाहीं त्याला **स्वातंत्र्य**ही " मिळावयाचें नाहीं; मग दुसऱ्यावर अंमल चालविण्याची गोष्ट लांबच " राहिली. जो कोणासही वरिष्ठ मानीत नाहीं तो कोणाच्या बरोबरीचा किंवा " कोणाहून वरिष्ठही नसावयाचा. परंतु सांप्रतची जरी अशी स्थिति असली " तरी असें मात्र कोणीं समजूं नये कीं, मनुष्यांचे मनांतून **पूज्यबुद्धीचा**

" गुण अगदींच नष्ट झाला आहे. छे, छे; तो जरी आज जागृत नसला तरी
" त्याचा समूळ नाश झाला नाहीं. पुंडावा करून स्वतंत्र होण्याची काम-
" गिरी जरी आज कोणावर बेतली, तरी अशा स्वातंत्र्याचा स्वीकार कर-
" ण्याचें स्वभावतःच मनुष्याच्या जिवावर येतें. आपल्या जातिबांधवांच्या
" सप्रेम मैत्रींत मात्र त्यास सुरक्षितपणा वाटतो. व आपल्यापेक्षां जो श्रेष्ठ
" आहे, त्यास **श्रद्धेनें** बहुमान दिल्यानेंच उच्चतर स्थितीचा त्यास अनुभव येतो.

" पण सांप्रत कदाचित् अशी तर गोष्ट झाली नसेलना, कीं, **भय** व
" **पूज्यबुद्धि** या दोन विकारांपैकीं **कनिष्ट** जें **भय** त्याचा मनुष्यानें त्याग
" केला असून **वरिष्ठ** जी **पूज्यबुद्धि** तिजप्रत अजून तो पोहोंचला नसेल!
" असेंही होण्याचा संभव आहे.

" तूर्त एक गोष्ट मात्र समाधान मानण्यासारखी आहे; ती ही कीं ज्या
" ज्या गोष्टी मनुष्यानें आपला हेका एकीकडे ठेवून केल्याच पाहिजेत, त्या
" त्या केल्यावांचून मनुष्याचें चालूं नये अशीच कांहीं **सृष्टि**देवीची अपूर्व
" योजना आहे. खऱ्या **ईश्वरी स्वरूपा**चा आविर्भाव कितीही हीन गोष्टींत
" झाला तरी त्यांसही डावलून तिकडे कानाडोळा करण्याची बुद्धि मनुष्यास
" होत नाहीं, मग त्या **ईश्वरी स्वरूपा**चें आविष्करण आपला जातिबंधू जो
" मनुष्य त्यामध्येंच झालें, तर त्याविषयीं मनुष्यांत पूज्यभाव उत्पन्न होईल हें
" काय सांगितलें पाहिजे? याप्रमाणें मनुष्याच्या अंतरंगांतच खऱ्या व धार्मिक
" पूज्यबुद्धीचें बीज रुजलेलें असून तें प्रत्येक युगांत, या सांप्रतच्या हीन
" युगांत सुद्धां, **लोकोत्तरपुरुषपूजनाच्या** लहान मोठ्या अंकुराच्या स्वरू
" पानें व्यक्त होतें. हें लोकोत्तरपुरुषपूजन पूर्वी सर्वत्र चालू होतें; सांप्रत
" सर्वत्र चालू आहे; व पुढेंही सर्वत्र चालू राहील. आणि या गोष्टींतच पुढील
" अनंत काळच्या राजसंस्थांचा भक्कम पाया स्पष्ट दिसत आहे."

या गोष्टींत असलेला पुढील राजसंस्थांचा भक्कम पाया आमच्या वाचकांस दिसला काय? किंवा निदान टच्यूफेलसड्राक साहेब म्हणतात ती **लोकोत्तरपुरुषपूजना**ची गोष्ट तरी त्यांचे अनुभवास येते काय? उदाहरणार्थ टच्यूफेलसड्राक साहेब ह्मणतात, " **प्यारिस व व्हालटेअर** (पान २०९) यांचें
" तुह्मांस विस्मरण झालें काय? व्हालटेअर हा पुरुष किती ह्मातारा, खप्पड
" झालेला, नास्तिक, थट्टेखोर, व नटवेबाज दरबारी कवी होता; तत्रापि
" तो सुज्ञ व चांगला वाटल्यावरून फ्रान्स देशांतील सर्व लोकसमाज त्याचे

" भजनीं लागला, व त्याची कृपादृष्टि एक वेळ आपणांवर व्हावी असें
" मोठमोठ्या राजांसही वाटू लागलें; आणि फ्रान्स देशांतील मोठमोठ्या
" सद्‌गुणी स्त्रियांनींही आपल्या केसांनीं त्याचे पाय झाडिले; ही गोष्ट तुह्मी
" विसरला काय ? सर्व फ्रान्स देशच त्या वेळेस या वीर पुरुषाच्या मंदि-
" राप्रमाणें झाला होता. मग जर हा आंतला देव स्वरूपानें माकडासारखा
" नसता तर त्याचे भजनीं किती लोक लागते न कळे !

" अगदीं वठून गेलेले **समाज**वृक्षांतही असले चमत्कार होतात; मग
" तो समाज पूर्ण उमेदींत असतांना कसे होत असतील ! मनुष्याच्या इति-
" हासांत सांप्रतचा अगदीं भिकार काळ होय. व सर्व युरोपांत फ्रान्स देश
" केवळ जीर्णारण्य असून त्यांतही जर असा प्रभाव दृष्टीस पडतो; तर मग
" जेथें **संसारवृक्षांस** पूर्ण टवटवी व उमेद असून तुमच्या पूज्य पुरुषाचे
" आंगींही दिव्यांग–सौष्टव असेल तेव्हांचे लोकोतर–पुरुषपूजनास कसें
" काय स्वरूप येईल याची तुम्हींच कल्पना करा ! तात्पर्य, ज्या ज्या गो-
" ष्टींत किंवा पुरुषांत **ईश्वरांश** आहे किंवा ज्या कोणास ईश्वरांशाची बता-
" वणी करितां येईल त्या प्रत्येक वस्तुविषयीं किंवा पुरुषाविषयीं मनुष्य-
" मात्रांत पूज्यबुद्धि असतेच, व ती कशानेंही नष्ट होत नाहीं. अमका
" मनुष्य आपल्यापेक्षां श्रेष्ठ आहे असें एखाद्या अडाणी कुणब्यास किंवा
" उन्मत्त राजासही दाखविलें तरी तोही लागलीच तेथें लोटांगणें घेऊं लागेल,
"मग त्यास कशाचीही आडकाठी झाली तरी तो त्याची दिक्कत करणार नाहीं."

याहून फारच विलक्षण रीतीनें तयार होत असलेले व जास्त खात्रीबंद **नवांकुर** या पुढल्या उताऱ्यांत वाचकांचे निदर्शनास येतील. प्रोफेसर साहेब म्हणतात. " काय म्हणतोस तूं ? कीं आतां धर्म नाहीं ? आतां धर्माचार्यांनीं मौन
" धारण केलें आहे काय ? नाहीं नाहीं. असें ह्मणूं नकोस. या गोष्टीविष-
" यींच तर माझा वाद आहे ! पण कसेंही असलें, तरी अजून निदान
" उपदेशाचें काम तरीं पाहिजे तसें चाललें आहे ना ? प्रत्येक खेड्यांत
" कोणी तरी उपदेशक **वर्तमानपत्र** नांवाचें व्यासपीठ स्थापून तेथून मनु-
" ष्याच्या मोक्षसाधनार्थ जें उत्कृष्ठ **धर्मतत्व** त्यास अवगत असेल त्याचें
" प्रतिपादन करीत असतो, तें तुला ऐकूं येत नाहीं काय ? नीट पहा. हे
" भिक्षुक वृत्तीचे धर्मोपदेशक सर्वत्र पसरले असून त्यांपैकीं कोणी अनवाणी
" आहेत तर कोणी अगदींच उघडे आहेत. हे उपदेशक चोहोंकडून उत्पन्न

" होऊन लोकांस शिक्षण व उपदेशही मोकळ्या मनानें करीत आहेत; व त्या-
" च्या मोबदल्यांत तांब्याचा एखादा पैसा व धर्मश्रद्धा एवढेंच ते चाहतात.
" हेही उपदेशक चोहोंकडे खोटे दगडाचे जुने देव फोडून टाकीत आहेत. आतां
" इतर मूर्तिभंजकांप्रमाणें यांचें स्वतःचें आचरण अशुद्ध असलें तरी त्यांत
" काय आहे ? ते निराकार, निर्गुण, परब्रह्मरूपी खऱ्या देवाच्या प्रार्थने-
" करितां आज जागा तयार करीत असून या मंदीरांतून खरे प्रासादिक
" धर्माचार्य उत्पन्न होऊन आपलें औपाधिक करितील व त्यांच्या आज्ञेनें
" लोक वागतीलही! मीं मागेंच सांगितलें नाहीं कां, कीं साप कांत टाकूं
" लागला म्हणजे खालीं नवें कातडें तयार होत असतें ह्मणून ?

कदाचित् या पुढल्या उताऱ्यांतही एखादा **नवांकुर** आढळेल. एवढा **उतारा देऊन हा फुटलेला पाट आह्मी बंद करितों !:-**

"पण आजसुद्धां **धर्म विद्यमान** नाहीं कां! छी छी; असा नुसता संशयही
" धरूं नको. मी तुला खचित सांगतों कीं **धर्म आज विद्यमान** आहे.
" हा जो आधुनिक **पुस्तकांचा** अफाट समुद्र हेलावत आहे, त्याच्या
" वरच्या फेंसाखालीं काय काय आहे, याचा तूं विचार केला आहेस
" काय ? त्यांत **सत्यधर्माचीं** तत्वें चोहोंकडे विखुरलीं असून तीं वेंचून
" **काळ** हा त्यांची विल्हेवाट लावील. फार काय सांगावें, या कर्दमांत
" धर्माचीं बाह्य अंगेंही मला स्पष्ट दाखवितां येतील. सांप्रतचे काळांत सांप्र-
" तचे स्थितीस अनुसरून सद्धर्माचें आविष्करण करणारा कोणी दिव्य
" ऋषी नाहीं असें तरी तुह्मांस वाटतें काय ? ज्यास ईश्वराचें दिव्य
" स्वरूप अतिउच्च व अतिनीच पदार्थांतही दिसत असून तें तो आपल्या
" दिव्य शक्तीनें लोकांस स्पष्ट करून दाखवील; व ज्याच्या स्वरमाधुर्यानें
" या चिंध्या गोळा करण्याच्या व जाळण्याच्या दुर्धर प्रसंगांतही मनु-
" ष्याच्या संसारास, थोड्या कालांतरानें कां होईना, दिव्य स्वरूप येईल
" असा दिव्य ऋषी आज तुह्मांस दिसत नाहीं काय ? मला दिसतो आहे;
" व मला त्याचें नांवही सांगतां येईल ! त्याचें नांव **गीट** (पान७०) ! ! !

" तरी पण आपल्या भजनास प्रार्थनालय नाहीं, स्तोत्रें नाहींत, औपा-
" धिकास उपाध्ये नाहींत, व अशा स्थितींत मोक्षसुखाची आशाही नाहीं,
" असें तरी तुह्मांस वाटत असेल, नाहीं बरें ? पण धीर धरा. तुमचे मनांत
" जर **विश्वास** असेल तर तुह्मांस " आपण निराधार आहों, " असें वाट-

" ण्याचें कारण नाहीं. नुकतेंच मीं त्या **संतसमाजाविषयीं** सांगितलें नाहीं
" काय ? होय. हे संत दिसत नाहींत. पण तेवढ्याकारितां ते नाहींत असें
" नाहीं. तुमचेमध्यें मात्र अधिकार असला म्हणजे तुह्मांस त्यांच्या समा-
" गमाचें व प्रेमाचें सुख निरंतर शक्य आहे. सत्वधीरतेनें त्यांनीं भोगि-
" लेली दुःखें सर्व देशांतून व सर्व काळांतून ईश्वराचे कानीं कर्णमधुर
" ध्वांन्याप्रमाणें रुजू झालीं आहेत; व सत्वधीरतेनें त्यांनीं केलेलीं सत्कृत्येंही
" अक्षय्य स्तोत्ररूप झालीं आहेत. म्हणून आतां आपणांस पुजावयास
" कांहीं धर्मचिन्ह नाहीं असें तुह्मी समजूं नका हीं **ईश्वराची सर्व**
" **सृष्टीच ईश्वरस्वरूप** असून हा अपरिमेय विस्तार हेंच त्याचें **देवालय**
" होय. **मनुष्यजातीचा इतिहास** व **मनुष्यव्यक्तीचा इतिहास** हे या
" मठांतील **धर्माचार्य** होत. येथें स्तुतिकाळचे चौघड्याचीही उणीव नाहीं!
" कारण लक्ष्य देऊन ऐका, म्हणजे अनादि काळापासून चालत आलेले
" प्रातःकाळचे ताऱ्यांचें दिव्य संगीत तुह्मांसही ऐकूं येईल.

---

# भाग आठवा.

## लौकिक गोष्टींतील लोकोत्तरत्व.

" लौकिक गोष्टींतील लोकोत्तरत्व " या भागांत प्रथम आमच्या प्रोफेसर साहेबांनीं आपलें अंतर्ज्ञानित्व प्रकट केलें आहे. **वस्त्ररहस्याचा** छडा लावण्याकरितां प्रोफेसर साहेबांनीं कसकसे दीर्घ प्रयत्न केले आहेत, हें आपण पाहिलेंच आहे. पण या भागांत **वस्त्ररहस्याचा** अति कठीण गड जिंकून अखेरीस त्यांनीं हा विषय आपलासा करून घेतला आहे. आपल्या प्रयत्ना आड येणाऱ्या अनेक गोष्टींशीं तोंड देतां देतां आजपर्यंत त्यांस पुरें झालें होतें. **राजवस्त्रांची** जाळीं, **कोळ्यांचीं** जाळीं, जीर्ण झालेली चिन्हवस्त्रें वगैरे जबरदस्त विषय त्यांचे वाटेंत आडवे आले होते. पण

---

११ अंतरिक्षांतून ग्रहनक्षत्रादि फिरत जात असतां त्यांचे गतीमुळें अत्यंत कर्णमधुर ध्वनि निघतो, असें वेदांतही वर्णन आहे. " जीनपाल म्हणाला जे लोक भित्र्या स्वभावाचे असून धर्मशील असतात त्यांस सर्वच आकस्मिक शब्द व आवाज दिव्य ध्वनीसारखें किंवा प्रातःकालच्या स्तोत्रपाठासारखे वाटतात. " कार्लाइलचीं भाषांतरें.

इतक्यांसही टक्कर देऊन त्यांनीं अखेरीस शिकस्त करून आपल्या इष्ट विषयांत प्रवेश केला. इतकेंच नव्हे; तर सर्व जगास आवरण घालणाऱ्या **काळ** व **स्थळ** या दोन अति गूढ व अतींद्रिय कल्पनांनीं त्यांस अगदीं भांबावून जेरीस आणिलें होतें; पण त्यांशींही न गांगरतां नेटानें युद्ध करून त्यांचेंही आवरण त्यांनीं मोठ्या उत्साहानें फोडून टाकिलें आहे! तात्पर्य त्यांनीं **अस्तित्वांतील** सारभूत विषयाचें इतक्या तीव्र व सखोल दृष्टीनें निरीक्षण केलें कीं त्या विषयाचे भोंवतालीं असलेलीं **गुणवस्त्रांचीं** सर्व आवरणें एकामागून एक पटापठ गळून पडून आतां त्यांच्या तल्लीन झालेल्या दृष्टी-पुढें सर्वांतर्यामीं असणारें **निर्मळ शुद्ध** परब्रह्म मात्र प्रत्यक्ष दिसत आहे.

म्हणून या ठिकाणीं या वस्त्ररहस्यास दृश्यांतीत किंवा अतींद्रियवस्तु-विचाराचें स्वरूप प्राप्त झालें आहे. ही शेंवटची उडी मारण्याचें साहस आपल्या हातून झालें कीं मग आपण आपल्या इष्टस्थळीं जाऊन सुखरूप पोहोंचलों असें होईल. तेथून आपल्या दिव्य कामास आरंभ होणार. मात्र आतां आपला धीर खचतां कामा नये. या अपूर्व भागावर बरेच परिश्रम घेतल्यावर तो अगदींच दुर्बोध नाहीं असें आम्हांस आढळलें आहे. उलट हा भाग इतर भागांपेक्षांही जास्त सुबोध असून त्याच्या प्रकाशानें **वस्त्र-रहस्यां**तील इतर भागही उज्वळ होऊन जास्त स्पष्ट दिसूं लागतात. आतां वाचकांनीं या भागावर आपलें सर्व बुद्धिवैभव खर्चून नेटानें आपलें काम करण्यास कंबर बांधावी. आह्मीही चौकसपणानें व्यवस्था लावून त्यांतील उतारे देण्याच्या कामास लागतों.

या भागाच्या सुरुवातीला आमचे प्रोफेसर साहेब शांतपणें म्हणतात,
" **अद्भुत चमत्कारांत** नेहमीं फार खोल अर्थ असतो. किंबहुना त्याचें
" इंगित किती खोल आहे तें आपणांस कळत नाहीं असेंही म्हणण्यास
" कांहीं हरकत नाहीं. पण सर्व प्रश्नांत मुख्य प्रश्न असा आहे कीं, **लोको-**
" **त्तर** किंवा **अद्भुत चमत्कार** ह्मणजे काय ? **सयामच्या** राजास
" बर्फाचा एक तुकडाही अपूर्व लोकोत्तर चमत्कार वाटला आणि एक
" वायु--आकर्षण यंत्र व ईथरची बाटली यांच्या साह्यानें त्या राजाच्या
" समजुतीप्रमाणें हा लोकोत्तर चमत्कार कोणासही करून दाखवितां आला

" असंता. आतां दुर्दैवानें माझा घोडा त्या राजाइतकाही बुद्धिमान् नाहीं
" म्हणून जेव्हां जेव्हां एखाद्या खाणावळींतील गोठ्यांत दोन पैसे टाक-
" ल्यानें त्यास वैरण खाण्यास मिळते, तेव्हां तेव्हां त्यास तोही लोकोत्तर
" चमत्कार वाटत नसेल काय ?

" पण कांहीं लोक म्हणतील कीं, **अद्भुत चमत्कार** ह्मणजे सृष्टिधर्मा-
" विरुद्ध असणाऱ्या गोष्टीच असल्या पाहिजेत. अशा लोकांस माझा एव-
" ढाच प्रश्न आहे कीं, **सृष्टिधर्म** ह्मणजे काय ? कारण जे **सृष्टिनियम**
" आज आपणांस अवगत असून त्यांचें कार्य केवळ सृष्टपदार्थांतील अंग-
" भूत शक्तींनेंच होतें असें आपणांस कळतें, त्या व्यतिरिक्त दुसरा एखादा
" सृष्टिनियम आज एखाद्या दिव्य दृष्टीच्या मनुष्यानें शोधून काढिला
" तर त्याचें कार्य कांहीं तरी दिव्य शक्तीनें होतें असेंच आपणांस प्रथम
" वाटेल. परंतु हेंच कार्य कोणच्या विशिष्ट नियमानें होतें तें आपल्या
" ध्यानांत आलें कीं लागलींच ही पूर्वींची समजूत दूर होईल; म्हणून
" वास्तविक पाहतां मेलेला मनुष्य जरी सजीव झाला तरी त्यांतही सृष्टि-
" नियमांचें उलंघन होतें असें नसून उलट त्याच्या योगानें बाकीच्या सृष्टि-
" नियमांस बळकटीच येते असें मी समजतों.

" शिवाय, एखाद्यास पाण्यावर लोखंड तरंगवितां आलें तरी त्यामुळें
" त्यास पुढें होऊन धर्मोपदेश करण्याचा अधिकार येतो कां, असें
" जर कोणीं विचारिलें, तर त्यास इतकेंच सांगतां येईल कीं पहिल्या शत-
" कांतल्या आमच्या वाडवडिलांस लोखंड तरंगविणाऱ्यास धर्मोपदेश कर-
" ण्याचा अधिकार आहे असें वाटलें असतें. पण आज आह्मी एकोणि-
" साव्या शतकांत आहों; आम्हांस असें कधींही वाटणार नाहीं.

" पण सुशिक्षित लोकवर्गाचा असा प्रश्न आहे कीं ही **सृष्टि** कायम

---

१ पाणी थंडीनें थिजून बर्फ होतें ही गोष्ट उष्णकटिबंधांतील लोकांस पूर्वी बहुधा ठाऊक नसे. असें सांगतात कीं सयामच्या राजास त्याच्या दरबारांतील डच वकिलानें आपल्या देशांत हिंवाळ्यांत पाणी घट्ट होतें व पांढरें होतें; असें सांगितलें, त्यावर त्याचा कांहीं-केल्या विश्वास बसेना; व वकीलसाहेब बोलतात तें कांहींतरी आपली थट्टा करितात अशीच त्याची समजूत झाली ! हल्लीं " एअर पंप " म्हणजे वाताकर्षक यंत्र आणि " ईथर " ( नांवाचा अति लौकर वाफ होणारा पदार्थ ) यांच्या साह्यानें कृत्रिम थंडी उत्पन्न करून हव्या त्या देशांत भर उन्हाळ्यांतही पाणी गार करितां व थिजवितां येतें.

" नियमांनींच चालावी असाच सृष्टीचा आद्य नियम नाहीं काय ? हें
" **सृष्टियंत्र** कायम नियमांनींच चालावयाचें नाहीं काय ? होय माझ्या
" मित्रांनो, **ईश्वरी** योजना कशी आहे हें कळणें कठीण आहे; तरी अनु-
" मान तुह्मी ह्मणतां असें होतें खरें जो **परमेश्वर** पूर्वकालीन ऋषींच्या
" मतें अव्यय ह्मणजे त्याच्यांत कांहीं बदल न होणारा असा आहे, तो
" मलाही न बदलणाराच आहे असें वाटतें; व ही **सृष्टि**, हें सर्व **ब्रह्मांड**
" ( याला पाहिजे तर तुह्मी **यंत्र** म्हणा ), हेंही न बदलणाऱ्या नियमां-
" नींच चाललें आहे असें मी मानितों; पण आतां माझा तुम्हांस हा
" जुनाच प्रश्न असा आहे कीं सृष्टीच्या नियमन ग्रंथांत नियम तरी आहेत
" कोणचे कोणचे ?

" तुम्ही म्हणतां, हे नियम आमच्या शास्त्रीय ग्रंथांत आहेत. पण
" तुमचे शास्त्रीय ग्रंथ म्हणजे तरी मनुष्यांच्या अनुभवाचेंच टिपणबूक
" ना ? ही सृष्टि उत्पन्न झाली तेव्हां तर हे नियम टिपावयास मनुष्य
" व त्याचें अनुभवज्ञानानें भरलेलें डोकें नव्हतेंना ? शास्त्रीय गोष्टींत
" अगदीं अत्यंत खोल विचार करणारे पुरुष तरी या सृष्टीच्या बुडाशीं
" बुडी देऊन सर्व सृष्टीचें व तिच्या नियमांचें मोजमाप घेऊन आले
" आहेत काय ? कां परमेश्वरानेंच मनुष्यांची सल्लामसलत घेऊन अगो-
" दर त्यांस या अतर्क्य ब्रह्मांडाचा नकाशा वगैरे काढून दाखविला होता
" म्हणून अमुक एक गोष्ट सृष्टिनियमास अनुसरून आहे कीं नाहीं हें
" त्यांस आज सांगतां येईल ? वास्तविक पुसाल तर बाबांनो असल्या
" बोलण्यांत कांहींच जीव नाहीं. हे तुमचे शास्त्रवेत्ते झाले तरी आमच्याच
" सारखे असून ज्या **सृष्टिरूप महासागरास** किनाराही नाहीं, व ठाव किंवा
" पृष्ठभागही नाहीं, त्यांत फार झाले तर आमच्यापेक्षां एक दोन बोटें अ-
" धिक खोल गेले असतील !

" कांहीं **ग्रह** आपआपले **उपग्रह** ( चंद्र ) घेऊन सूर्याभोंवतीं अमुक
" अमुक वेगानें व अमक्या अमक्या मार्गानें जातात, असें **लाप्लसनें** आ-
" पल्या ग्रंथांत लिहिलें आहे. आपल्या सुदैवानें त्यास व त्याच्यासारख्या
" दुसऱ्या पुरुषांस असे शोध लागले आहेत; व ते आह्मांस फार महत्वा-
" चेही वाटतात. परंतु या नियमांसच तुम्ही **ब्रह्मांडाची** कळ असें ह्मणतां
" कीं काय ? हे दहा पांच ग्रह हीच कां तुमची **ब्रह्मांडमालिका**? हींमध्यें

" तर कृत्तिका व व्याध किंवा लुब्धक[2] आणि हर्शेल[3] साहेबांचे गणिताप्रमाणें दर
" मिनिटास आपल्या पुढून पंधरा हजार सूर्य जातात त्यांचें कोठें नांवही
" नाहीं ! आणि एक मूठभर ग्रहरूपी निर्जीव गोळे व त्यांचे भोंवतीं अस-
" लेलीं चंद्ररूप कस्पटें यांचें अवलोकन करून व त्यांस कांहीं टोपण नांवें
" देऊन तारकापटावर खुणा करून आतां ते अमक्या अमक्या ठिकाणीं
" आहेत अशी आह्मी वल्गना करीत बसतो !!! ते कसे झाले, कां झाले,
" काय आहेत याचें यत्किंचित्‌ही ज्ञान आपणांस नाहीं. असल्या शास्त्रांत
" सगळ्या सृष्टीचे सगळे नियम आहेत काय ?

" ब्रह्मांड मालिकेची गोष्ट कशास पाहिजे! अत्यंत शहाणा व शोधक
" मनुष्यही घेतला व त्याचें ज्ञान कितीही असलें तरी ही सृष्टि त्यास
" अगदीं **अपरिमेय**, अगदीं निखालस अपरिमेय आहे. या सृष्टिसंबं-
" धाचा आपला अनुभव पाहिला तर तो फक्त अमुक मैल लांबीरुंदीपुरता व
" अमुक शतकांचा मात्र आहे. सृष्टींतील क्रम या तिळाएवढ्या भूलोकावर
" जितका अनुभवास येण्यासारखा आहे, त्याचा अगदीं थोडका अंश मात्र
" आपणांस ठाऊक आहे; त्याचें पूर्णज्ञान आपल्यास आहे किंवा होईल
" असें जरी धरिलें तरी येथील सृष्टिक्रम आणखी कोणत्या अज्ञेय प्रकारां-
" वर अवलंबून आहे हें कोणास ठाऊक आहे? ज्या शक्तींचा अंमल येथें

---

२ हल्लीं ( नोव्हेंबर २२ ) पाहटेस चार वाजतां सुमारें प्रहराच्या सूर्या इतके उंचीवर वायव्य दिशेस कृत्तिका व नैर्ऋत्य दिशेस व्याध किंवा लुब्धक हे तारे दिसतात.

३ हर्शेल–( १७३८—१८२२ ) हा एका इंग्रज गवयाचा मुलगा असून तो गायनाचें शिक्षण देऊन जेमतेम पोट भरी. ( इंग्रज लोकांत व युरोपांतील बहुतेक लोकांत गायन हा गुण बहुधा सार्वत्रिक आहे. निदान गायनलिपीच्या द्वारें कोणचेंही उत्तम गाणें उतरून घेऊन जसेंच्या तसें गातां यावें व जर आवाजाची देणगी अगदींच नसली तर निदान वाजवितां यावें इतकें तरी सुरज्ञान व गायनलिपीचें ज्ञान बहुतेकांस असतें. इकडच्याप्रमाणें विकृतचें गाणें बजावणें ऐकणारे आंबट शोकीन लोक तिकडे नाहींत. ) असो पुढें हर्शेलास ज्योतिषाचा नाद लागला. व त्यांत त्याची चांगलीच गती झाली. पण हा अभ्यास चांगला होण्यास दुर्बीन घेण्याइतके पैसे त्याजपाशीं नव्हते म्हणून त्यानें स्वतः खपूनच एक दुर्बीन केली ! व मग त्या वेळीं सर्व जगांत अत्युत्तम अशी दुसरी एक दुर्बीन केली. त्यानें ज्योतिषांत बरेच शोध लाविले. त्यापैकीं ग्रहमालेंतील यूरेनसचा शोध, त्याचे भोंवतीं असणारे चंद्र, शनीचे आणखी दोन चंद्र, शनीच्या कड्याची व गुरूच्या चंद्राची चक्राकार गती, हे शोध मुख्य आहेत.

" आपल्या अनुभवास येतो त्या शक्तीवरही दुसऱ्या कोणत्या अगाध
" शक्तीचा अंमल आहे, हें कोणास माहित आहे ? याला दृष्टांत एखाद्या
" खाडींतील माशाचा घ्या. त्याला त्या खाडींत खडपे कोठें आहेत. दगड
" कोठें आहेत. कोठें कसलें पाणी आहे, किती जोरानें वाहतें, धोक्याचीं
" स्थळें कोणचीं, हें सर्व ठाऊक असतें. पण त्या बिचाऱ्याला महासाग-
" रांतील **भरती ओहोटी**, ऋतुविशेषांत वाहणारे **प्रवाह**, कायमचे
" ( व्यापारोपयोगी ) **वारे, पावसाचे वारे, चंद्राचीं ग्रहणें** वगैरेचें यत्किं-
" चित् तरी ज्ञान असतें काय ! पण या सर्व गोष्टींचा परिणाम त्या खाडीं-
" तील पाण्याच्या स्थितीवर होतो; व यापैकीं कोणच्याही कारणानें कोण-
" च्याही वेळेस त्या माशास माहित असलेली त्या खाडीची स्थिति अग-
" दींच बदलून जाईल! आणि ही गोष्ट जरी सृष्टीच्या क्रमांतली असून
" नेहमींच्या नियमांस अनुसरून असली तरी त्या बिचाऱ्या माशास ती
" **अद्भुतच** वाटणार नाहीं काय ? हेंच रूपक मनुष्यास लागू पडतें.
" हा मासा ह्मणजे मनुष्य, ही पृथ्वी ही त्याची खाडी, हें सर्व ब्रह्मांड
" त्याचा महासागर, व अनंत कल्पांतून चालत आलेलें जें अतर्क्य **ईश्वरी**
" **सूत्र** ते त्या महासागरावरील वारे वगैरे होत.

" आपण या सृष्टीस ग्रंथाची **उपमा** देत असतों. पण वास्तविक पाहतां
" सृष्टि हा खरोखरीचा प्रत्यक्ष ग्रंथच आहे. या ग्रंथाचा कर्ता व लेखक
" **ईश्वर** होय. आतां हा ग्रंथ वाचण्यासंबंधानें म्हणाल तर असें पहा कीं, ज्या
" लिपींत हा ग्रंथ लिहिला आहे त्या लिपीचीं मूळाक्षरें तरी तुह्मांला किंवा
" दुसऱ्या कोणच्याही मनुष्याला येतात काय ? मग त्यांतील शब्द, वाक्यें
" व हजारों सूर्य मालिकांतून, हजारों कल्पांतून जीं अतर्क्य गद्यपद्यात्मक
" वर्णनें या ग्रंथांत असतील त्यांची तुह्मांस किती माहिती आहे हें विचा-
" रण्याची जरूरच नाहीं ! हा पवित्र ग्रंथ दिव्य चित्रलिपीनें[४] लिहिलेला

---

४ चित्रलिपी—भाषणाचा किंवा लिपीचा उपयोग नामनिर्देश करून पदार्थ व क्रिया प्रत्यक्ष करण्यापुरताच आहे. ( भाषणाची पोहोंच समक्ष व जवळ असलेल्या मनुष्यावर मात्र आहे. लिपीची पोहोंच सर्व पृथ्वीभर व अनंतकाळ पावेतों अगण्य लोकांवरही चालते. ) " रामा तरवारीनें वाघास मारितो ?" असें वाक्य बोलणाऱ्याच्या मनांत आपल्या श्रोत्याच्या किंवा वाचकाच्या मनावर " रामा " "तरवार" व "वाघ" हे पदार्थ व मारण्याची क्रिया वाक्यांतील अर्थाप्रमाणें हुबेहुब उत्पन्न करावी असा हेतु असतो. हा अर्थ

" आहे व मोठमोठाले अंतर्ज्ञानी ऋषीही या ग्रंथांतली एथली एक ओळ,
" तेथली एक ओळ वाचूनच तल्लीन होतात. आतां तुमच्या **संस्था** व
" **शास्त्रपाठशाळा** यांविषयीं पाहतां त्याही आपापल्यापरी शिकस्त करीत
" असून, इतक्या अडचणींतून व गुंतागुंतींतून या ग्रंथांतलें येथलें एक
" चित्राक्षर घे, तेथलें एक घे, अशीं कांहीं अक्षरें घेऊन तीं एकत्र करून
" व त्यांची लौकिक भाषेंत जुळवाजुळव करून व्यवहारांत आपणास
" अत्यंत उपयोगाच्या शास्त्रज्ञानरूप मात्रा तयार करितात. पण या
" सृष्टींत अशा मात्रा अगण्याहूनही अगण्य असून या ग्रंथाचें सर्व मर्म
" कोणासही कधीं काळीं कळेल, अशी नुसती स्वप्नाशाही वेडगळ होय!"

प्रोफेसर साहेब ह्मणतात, "**संवयीनें** आपण सर्व निवळ वेडे झालो आहों!
" नीट विचार करून पहा ह्मणजे तुह्मांस असें आढळून येईल कीं **संवयी**-
" सारखा चतुर कोष्टीच दुसरा नाहीं. या **संवयीनें** सर्व सृष्टींतील वस्तु-
" मात्राचा दिव्यपणा एक प्रकारच्या **मायिक वस्त्रानें** झांकिला
" आहे. व त्यामुळेंच वस्तुमात्र आपणांस गोचर होऊन आपल्या जवळ,
" आपल्या घरांतून, व कारखान्यांतून राहून आपणांस हरतऱ्हेनें उपयोगीं
" पडतात. पण त्यामुळें त्यांचें **दिव्य स्वरूप** आपणांस सदैव अदृश्य
" होतें! **तत्वज्ञ** लोकांची नेहमीं कुरकुर असतें कीं या **संवयीनें** आह्मांस
" अंधळें केलें असून आह्मी बहुधा प्रत्येक गोष्ट पूर्वीच्या **परिपाठामुळेंच**
" अंधपरंपरेनें करीत असतो. एखाद्या गोष्टीवर विश्वास ठेवावयाचा तो
" आह्मी **संवयीमुळेंच** ठेवितों. आणि कोणतीही जुनी राहटी न मानतां
" स्वतंत्रपणें विचार करण्याविषयीं आपण कितीही शेखी मारीत असलों
" तरी आपलीं अगदीं प्रत्यक्ष प्रमाणें सुद्धां आक्षेप न घेतलेल्या मनाच्या
" निवळ समजुती आहेत. इतकेंच नव्हे, तर **शास्त्रविद्या** ह्मणजे केवळ या
" **संवयीशीं** सारखा संग्राम करून **अंधपरंपरेचा** व **संवयीचा** पगडा

---

दोन प्रकारांनीं दाखवितां येईल; एक चित्र काढून व दुसरा सांकेतिक खुणांनीं. या सांकेतिक खुणांस लिपी असें म्हणतात. या सांकेतिक खुणा मूळ सबंध पदार्थनिदर्शक असून पुढें शब्दांचे विभाग जीं अक्षरें त्यांच्याही निदर्शक झाल्या; व नंतर अक्षरलिपी निघाली असावी असें वाटतें. चीन देशांत सबंध पदार्थ निदर्शक चित्रलिपी होती व अजून रूपांतरानें आहे. प्राचीन मिसर देशांत जी चित्रलिपी होती, ती अक्षरनिदर्शक चित्रलिपी होती. या चित्रलिपीचा शोध लागून त्याची फोड कळण्यास दोनशें वर्षें लागलीं. (पान २२३).

" दूर करून वस्तुस्थिति पाहण्याचा यत्न करणें होय. आणि अशा रीतीनें
" संवयीचा पगडा दूर झाला तरच आपण या अंधळेपणांतून मोकळे होऊं.

" या **संवयीनें** किती प्रकारच्या जादू व चकभुली व नजरबंदी उत्पन्न
" केल्या आहेत याची गणती नाहीं! या सर्वांत मोठी शिताफीची जादुविद्या
" म्हटली म्हणजे कोणतीही अद्भुत गोष्ट एकापेक्षां अधिक वेळां झाली
" म्हणजे ती आपल्यास अद्भुत अशी वाटूं नये ही होय. हें खरें आहे
" कीं असें आहे म्हणूनच आपलें चाललें आहे. कारण मनुष्य नुसतें आश्च-
" र्यच करीत राहिला तर त्याचे हातून काम तर झालें पाहिजे? म्हणून
" कोणच्याही गोष्टीच्या द्विरुक्तीबरोबर तींतलें अद्भुतपण नाहींसें होऊन
" आपलें खरें हित जें **काम** त्याकडे आपण या **संवयीच्याच** कृपेनें प्रवृत्त
" होतों! याप्रमाणें आपलें हित साधणारी **संवय** ही आपली धर्माची
" आईच होय. पण ही इतकी वेडगळ आई आहे, किंवा आपण तिचीं
" मुलें तरी इतकीं वेडगळ आहों, कीं विश्रांतीच्या व विचाराच्या वेळींही
" आपण या **संवयीच्या** फसवणुकींतच गुंग असतों. अहा जी गोष्ट
" **पहिल्यानें** होतांना अद्भुत असते ती दोनदां किंवा दोनशेंदां किंवा दोन
" कोटवेळां जरी झाली तरी तीसंबंधानें आपण गुंग औदासिन्यांत असावें
" **काय**? असें औदासिन्य त्या **अद्भुत** गोष्टीविषयीं कां व्हावें याचें कारण
" ईश्वरी सृष्टींत किंवा मानवी सृष्टींतही कांहीं दिसत नाहीं. तरी पण आपलें
" वर्तन असेंच आहे. जशी वाफेच्या इंजनांस वाफ ही आपण काम करण्या-
" करितां दिलेली आहे व असें करण्यांत आपला हेतु त्या यंत्रानें कापूस पिंजणें
" किंवा पैसा उत्पन्न करण्याजोगें दुसरें कोणतेंही काम करावें असा
" असतो, त्याचप्रमाणें आपणही काम करून घेण्याची यंत्रें आहों असें सम-
" जूनच जर आपणांस परमेश्वरानें विचारशक्ति दिली असेल तर मात्र
" **अद्भुत** गोष्टींविषयीं असें औदासिन्य शोभेल!

" **नांवांचाही** प्रभाव मोठा जबरदस्त आहे. न खुद्द नांवें तरी संवयीनें
" तयार केलेलीं, अद्भुत गोष्टींतलें अद्भुतत्व झांकून ठेवण्याचीं पांघरुणेंच
" होत. **डाकिणींचें** कौटिल्य व **भुताखेतांचे** संचारादि सर्व खेळ यांस
" आपण सुधारलेल्या लोकांनीं वेड किंवा मज्जातंतुविकार या सदरांत का-
" ढिलें आहे. पण वेड म्हणजे तरी काय व मज्जातंतुविकार म्हणजे काय हे
" **नवीन प्रश्न** मात्र यामुळें उत्पन्न होऊन भुताखेतांचा प्रश्नही न सुटतां

" तसाच राहिला आहे. पूर्वी जसें वेडाचें स्वरूप भयंकर व अपरिज्ञेय होतें
" तसेंच तें आजलाही आहे. हें **वेड** म्हणजे जसे कांहीं यमलोकांतील कर्द-
" माचे उमाळे सृष्टिरूप सुंदर स्वप्नांत दिसावे त्यासारखेंच आहे. आणि वास्त-
" विक पाहतां हें सृष्टिरूप स्वप्नही त्या कर्दमांतच तरंगत असून तें जरा
" नीटनेटकें दिसतें म्हणून त्यास आपण वेडाचे कोटींत लेखीत नाहीं. **लूथ-**
" **रनें** (पान३१६) पाहिलेलें **सैतानाचें** स्वरूप या शारीरिक डोळ्यांस दिसलें
" असलें अगर नसलें तरी त्याचा खरेपणा कमी होतो काय? अगदीं महाज्ञाता
" जरी घेतला तरी त्याचेमध्येंही अपरिमित अंतस्थ वेड किंवा सैतानाचें
" आधिपत्य असतेंच. या वेडांतूनच त्यानें आपला शहाणपणाचा पसारा
" उत्पन्न केला असून जशी ही घन पृथ्वी अतींद्रिय ईश्वरस्वरूपावर तरंगत
" आहे, तद्वतच ही शहाणपणाची सृष्टीही या अंतस्थ वेडाचे कर्दमांत
" तरंगत आहे.

" परंतु अद्भुतत्वाचें किंवा चमत्काराचें गोपन करण्याचे कामीं ज्या अ-
" नेक **चकभुली** उद्युक्त आहेत, त्या सर्वांत **स्थळ** व **काळ** या चकभुली
" फारच अवाढव्य, सर्वव्यापी, व इतरांस आधारभूत अशा आहेत. आ-
" पल्या दिव्य **आत्मत्वास** रूप देण्याकरितां व येथें त्याचें वास्तव्य क-
" रून त्याचे डोळे बांधण्याकरितां हीं **सर्वव्यापी वस्त्रें** आपल्या जन्माचे
" आगोदरपासूनच कातलेलीं व विणलेलीं आहेत आणि या सर्व सृष्टिरूप
" चित्रास आधारभूत असलेला पट याच **ताण्याबाण्यांनीं** बनलेला असून
" या काल्पनिक सृष्टींत बाकीचे सर्व भ्रम यांचे योगानेंच तयार होतात.
" या पृथ्वीवर राहून या वस्त्रांचा संन्यास किंवा त्याग होईल ही आशा
" व्यर्थ होय. मोठी पराकाष्टा झाली तर प्रसंगविशेषीं या वस्त्रांस भोंकें
" पाडून त्यांतून कांहीं निमिषें पाहण्यास सांपडलें तरी महद्भाग्यच; कारण
" त्यांतून आपण पाहूं लागतों न लागतों तोंच तावडतोब त्यांस रफू होऊन
" हीं भोंकेंही बंद होतात!

" एका पुरुषाजवळ इच्छामात्रें इष्टस्थळीं जाण्याची एक घोंगडी होती
" अशी दंतकथा आहे. या घोंगडीच्या योगानें त्यानें **स्थलावकाशास**
" सर्वथैव जिंकिलें होतें. अर्थात् त्याचे संबंधानें स्थलावकाश नाहींसाच
" झाला होता. त्याला सर्वत्र ठिकाणें " येथें " होतीं. " कोठें " हा
" पदार्थच त्याचे संबंधानें नव्हता. आज या विसिनिचट्टोच्या बाजारांत जर

" एखाद्या सणगरानें इच्छामात्रेंकरून इष्टस्थळीं नेणाऱ्या अशा घोंगड्या
" तयार करून सर्व जगास पुरविल्या तर या जगांत एकच पण केवढा
" मोठा विपर्यास होईल बरें! मग या सणगराच्या समोरच्या दुका-
" नांत दुसऱ्या एका सणगरानें आपणांस इच्छामात्रें इष्ट कालांत नेणाऱ्या
" घोंगड्या तयार करून आणिल्या ह्मणजे तर किती मौज होईल! या दोन
" घोंगड्या घेण्यास माझें सर्वस्व जरी खर्च झालें असतें तरी मीं या घोंगड्या
" घेतल्या असत्या. विशेषतः इच्छामात्रें इष्ट काळीं नेणारी घोंगडी तर
" मीं अगोदर घेतली असती. मग काय बहार! एक घोंगडी पांघरून
" आपण अमक्या स्थळीं असावें अशी इच्छा केली कीं पुरे, लागलींच
" तें स्थळ आपल्यापुढें तयार! मग दुसरी घोंगडी पांघरून आपण
" अमक्या काळीं असावें असें इच्छिलें कीं, लागलींच तो काळ तयार! ही
" दुसरी गोष्ट किती तरी विलक्षण आहे! मनास येईल त्याप्रमाणें या
" समाजरूप फिनिक्स पक्ष्याच्या चितेपासून जें उड्डाण मारावें तों लाग-
" लेंच त्याचें पुनरुज्जीवन होऊन तो बाहेर डोकावूं लागतो त्या वेळेस
" हजर! येथें पहिल्या शतकांत जाऊन प्रत्यक्ष पाल व सेनिका यांचे पुढें
" उभें राहून त्यांशीं संभाषण करावें व लागलेच भविष्यकाळांतील एक-
" तिसाव्या शतकांत जाऊन पाल व सेनिकाच्या तोडीच्या त्या काळच्या
" पुरुषांपुढें प्रत्यक्ष उभें राहून ते आज काळाच्या मायापटामुळें झाले
" नाहींत असें जरी सामान्य लोकांस वाटत असलें, तरी त्यांच्याशींही बोलावें!

" ही गोष्ट अशक्य आहे असें कां तुम्हांस वाटतें? ती अचिंत्यही आहे
" ना? तर मग **भूतकाल** गेला तो अगदींच नाहींसा झाला तर? आणि
" भूतकाळ तेवढाच मात्र नाहींसा झालाना? त्याचप्रमाणें अजून न आलेला
" **भविष्यकाळही** विद्यमान नाहीं असेंच म्हणावयाचें? आणि तोही फक्त
" भविष्यकाळच? छे, छे; असें नाहीं. **स्मरण** व **आशा** या तुझ्या अनि-
" र्वाच्य मानसिक शक्तीच या प्रश्नाचें उत्तर देत आहेत. जरी या मृत्यु-
" लोकच्या मायेनें आज आपण अगदीं अंध झालों असलों तरी **स्मरण** व **आशा**
" या विलक्षण मार्गांनीं भूतकाळ व भविष्यकाळ या दोघांना आपण अंत-
" र्दृष्टीनें पाहत असतों व त्यांच्याशीं एक प्रकारचा व्यवहारही करितों!
" आतां एवढें खरें कीं स्मरणाच्या व आशेच्या द्वारें जरी ते भूत व भवि-
" ष्यकाळ आपल्या समोर येतात, तरी ते स्पष्ट गोचर होत नाहींत. व

" आपला त्यांच्याशीं जो व्यवहार चालतो तोही मुकाट्यानें, खुणांनीं
" होतो. या **संसाररंगभूमीवर** काळाच्या देखाव्यापैकीं भूतकाळरूप भाग
" एकसारखा पडद्या आड जात आहे. व **भविष्यकाळ**रूपभाग समोर येत चा-
" लला आहे. तरी पण **भूतकाळ व भविष्यकाळ** दोन्हीही सध्यां विद्यमान
" आहेत. हा कालमर्यादेचा पडदा भेदून त्याच्या पलीकडे दृष्टि पोहोंचवून
" त्याचे पलीकडेही व्यापून राहिलेला जो **अनंत** त्याकडे क्षणभर नजर पोहों-
" चविली पाहिजे. प्रत्येक मनुष्याचे हृदय हें **परमेश्वराचें** मंदिर आहे.
" व प्रत्येक युगांतील अंतर्ज्ञानी ऋषींनीं या मंदिरांत प्रवेश केल्यावर त्यांस
" दिव्य दृष्टि प्राप्त झाली आहे. त्याच मार्गाचें तूं अवलंबन करून अंतः-
" करणप्रवृत्तीवरच विश्वास ठेवं. **स्थळ** व **काळ** हे **परमेश्वर** नव्हत; तर
" परमेश्वरानें उत्पन्न केलेले इतर सृष्टीप्रमाणेंच हे पदार्थ असून ज्याप्रमाणें
" कोणत्याही **स्थळां**तील भाग **परमेश्वरास** सदैव प्रत्यक्ष आहे, त्याच-
" प्रमाणें कोणत्याही **काळां**तील भागही परमेश्वरास नेहमीं सांप्रतप्रमाणेंच
" प्रत्यक्ष असतो. आपल्या पार्थिव हीनतेमुळें जशी **स्थळ**मानाची आपली
" दृष्टि संकोचित आहे त्याचप्रमाणें स्मरण व अटकळ किंवा आशा
" या भूतभविष्यज्ञानाच्या दृष्टी सुद्धां अति संकोचित आहेत. परंतु हें
" आपल्या मूळ शुद्ध आत्मस्वरूपास **हीण** लागलेले आहे हें ओळखून
" चाललें पाहिजे.

" याप्रमाणें **या** देवगृहांतील **अंतरात्म्याचें** सर्वव्यापी अमर्त्यत्व यत्किं-
" चित् तरी तुला भासमान होतें ना? ओ हो हो!!! जो आमचा अति
" प्रेमांतील मित्र काळानें आमच्या हातचा ओढून नेला, व तेव्हांपासून
" आम्ही किती लांब आलों हे दाखविणाऱ्या कालमार्गावरील एक मैलाचा
" दगडच अशी ही त्याची समाधी आम्हांस दिसत आहे, हा सर्व खरो-
" खरच **भ्रम** आहे काय? तर मग जसे आपण कांहीं अतर्क्य शक्तींनें
" परमेश्वरास सदैव प्रत्यक्ष आहों याचप्रमाणें तो आमचा जिवलग मित्रही
" तशाच गूढ प्रकारें आज येथें प्रत्यक्ष आहेना? असो; निखालस गोष्ट
" एवढी कीं कोणच्याही वस्तूचा नाश होतो म्हणजे **स्थल** व **काल** यांच्या

---

५ सतांहि संदेहपदेषु वस्तुषु प्रमाणमंतःकरणप्रवृत्तयः ॥ कालिदास.
जेथें विचारांत संदेहामुळें गोंधळ असेल तेथें अंतःकरणप्रवृत्तीप्रमाणें चालणें हेंच सत्पुरुषास योग्य आहे.

" **छायेमुळें** तिचें जें **स्वरूप** आपणांस भासतें तें ती छाया नष्ट झाल्यामुळें नष्ट
" होतें. तें स्वरूप तर मुळींच नसतें. तें केवळ या छायेच्या भ्रमामुळें
" दिसत असतें. एवंच छाया मात्र नाहींशा होतात व तेवढ्याच फक्त
" नाहींशा होण्यासारख्या आहेत, परंतु जें आहे व जें असेल, त्या सर्वांचा जो
" **सत्यस्वरूप आत्मा** तो आज विद्यमान असून तो सदैव अविनाशी
" आहे. ही गोष्ट जर दुर्दैवेंकरून तुम्हांस विलक्षणशी वाटली तर फुर-
" सतीचे वेळीं तिजवर विचार करा, मग तिजविषयीं विश्वास पटण्यास
" वीस वर्षें किंवा वीस शतकें जरी लागलीं तरी हरकत नाहीं. तिजवर
" तुम्हीं विश्वास हा ठेविलाच पाहिजे. ही गोष्ट सर्वथैव प्रत्यक्ष होण्याइतकी
" या पार्थिव हीनतेमुळें तुमची योग्यताच नाहीं!

" **स्थळ** व **काळ** ही तर्कानें बनविलेली सृष्टि असून या भूलोकावर
" तिजसहवर्तमान आपणांस नांदावयाचें आहे; तेव्हां व्यवहारांतील गोष्टींत
" आपल्या विचार करण्यावर, कल्पना करण्यावर, कल्पनांवर व पदार्थानु-
" भूतीवर **स्थळ** व **काळ** या कल्पनांचा परिणाम व्हावा हें योग्य असून
" अपरिहार्यही आहे. परंतु निवळ अध्यात्मिक विचारावरही त्यांचा
" इतका पगडा होऊन त्यांच्या योगानें आपल्या सभोंवार सर्वत्र जे **अद्भुत**
" **चमत्कार** पसरले आहेत त्यांचे संबंधानें आपण अंध व्हावें ही गोष्ट
" योग्य नाहीं. **स्थळ** व **काळ** यांचे यथार्थ महत्व आहे तें कबूल करण्यास
" चिंता नाहीं. त्यांस विचारसृष्टि असेंही खुशाल मानावें. पाहिजे तर ते
" प्रत्यक्ष पदार्थ आहेत असेंही माना. परंतु मग या पातळ पडद्यांच्या
" योगानें अति उज्वल अशी जी **ईश्वराची दीप्ति** तीही आपल्या दृष्टी-
" आड होते याचा पूर्ण विचार केला पाहिजे. उदाहरणार्थ, आज जर
" मीं आपला हात लांबवून हा सूर्य हातांत धरला तर तो मोठा अद्भुत
" चमत्कार वाटेल नाहीं बरें? पण रोज शेंकडों वेळां मी आपला हात
" लांबवून अनेक पदार्थ हातानें धरतों व त्यांस इकडे तिकडे नाचवितों
" त्याचें तुम्हांस कांहींच वाटत नाहीं हें कसें? अद्भुत चमत्कार वाटण्यास
" त्या पदार्थाचें अंतर मैलांवर गणलें जावें व त्याचें वजन पौंडांत गणलें
" जावें असें आहे काय? असें एखाद्या पोरास वाटणें साहजिक आहे.
" पण तुम्ही एवढे मोठे झालां तरी अजून बाळच कां? मला हात लांब-
" वितां येतो व त्यानें कांहीं पदार्थ धरण्याचें मी मनांत आणिलें तर धरतां

" येतो, एवढीच गोष्ट ईश्वराचा साक्षात्कार पटविण्यास बस नाहीं काय ?
" स्थळाच्या कल्पनेमुळें आपणांस पडणाऱ्या भ्रमाचें हें एक उदाहरण
" झालें. पण अशा अगण्य गोष्टी आपल्या सभोंवतीं असून या स्थळाच्या
" कल्पनेमुळें आपणांस त्यांचें यथार्थ स्वरूप दिसत नाहीं.

" **काळामुळें** होणारा विपर्यास याहूनही विलक्षण आहे. या सृष्टींतील
" अगाध जादूवर पांघरूण घालून सर्वत्र असलेल्या अद्भुत गोष्टींचें अद्भु-
" तत्व नाहींसें करणारा **काळ** हा जादुगार होय. कालांतर नाहींसें करणारी
" घोंगडी जर एक वेळ पांघरावयास मिळती, तर प्रत्यक्ष आपणांस हें सर्व
" जग जादुमय दिसलें असतें; आणि ही जादू पाहून तिचें पुढें आपणांस
" ठाऊक असलेल्या जादूच्या कथा व प्रत्यक्ष चमत्कार कांहींच नाहींत असें
" झालें असतें ! पण आपण किती दुर्दैवी कीं असली घोंगडी आपणांस
" मिळण्याची आशा नाहीं. व मनुष्याचें मौरूर्य तर अशा मासल्याचें आहे
" कीं त्याचे डोळे असल्या घोंगडीवांचून उघडणार नाहींत.

" उदाहरणार्थ--**आरफियस** किंवा **आॅफियन** यानें नुसत्या वीणारवानें
" **थीब्स** शहराचा तट बांधला असला तर ती गोष्ट किती तरी आश्चर्य
" कारक वाटावी ! पण मला एवढें सांगा कीं हा **विसिनिचद्वोचा** तट
" तरी कोणीं बाधला आहे ? हें शहर बांधण्याचे कामीं पडण्या-
" करितां डोंगरांतील काळ्या दगडांस या जागेभोंवतीं नाचावयास व त्याचे
" उत्तम खांब, सुरेख घरें, व उत्कृष्ट पेठा बनण्यास कोणीं लाविलें बरें? परंतु
" **ज्ञानाचे वीणारवानें** मनुष्य जातींत सुधारणा करणारे **आरफियस** या
" शहरें बांधणाऱ्या **आरफियस**पेक्षांही मोठे नव्हत काय ? आपला
" सर्वांत उत्कृष्ट **आर्फियस जुडियां** प्रांतांत राहत होता व स्वभा-
" षेच्या वीणारवानें त्यानें मनुष्याचे आत्मेही तल्लीन करून घेतले होते.
" त्याचा वीणारवही ब्रह्मांड कटाहांत सदैव दुमदुमणाऱ्या नादब्रह्माचे

---

६ आरफियस—ग्रीक लोकांच्या पुराणांतील एक दिव्य कवी. याच्या कवितेंत निर्जीव वस्तूंचे ठिकाणीं चलनवलनादि व्यापार उत्पन्न करण्याची शक्ति असे अशी कथा आहे. यालाच आफियनही म्हणत. यानें आपल्या वीणेच्या रवानें थीब्स शहर वसविलें असून त्या वीणेच्या नादावर दगड आपोआप योग्य ठिकाणीं बसून भिंती कोट व सर्व घरें तयार झालीं अशी कथा आहे.

७ जुडिया प्रांतांतील आरफिअस म्हणजे ख्रिस्त.

" जातीचाच असून तो अद्याप तसाच चालू आहे. त्याचा प्रतिध्वनि
" आपणां सर्वांच्या अंतःकरणांत आजही होत असून तोच दिव्य ध्वनी
" आपल्या अद्भुत शक्तीनें आज आह्मांस वर्तवीत आहे. अहो ! एखादी
" गोष्ट दोन तासांत झाली ह्मणजे ती अद्भुत होते आणि तीच दोन कोट
" तासांत झाली ह्मणजे तिचें अद्भुतत्व नष्ट होतें काय ? नाहीं; नाहीं.
" **थीब्सचा** तट एखाद्या **आराफियसच्या** वीणारवानें झाला असेलच.
" परंतु कोणचेंही महत्कृत्य मनुष्याच्या हातून होतें तें तरी अशा **महद्भू-**
" **ताचा** संचार झालेल्या कोणातरी **आराफियसच्या** मंजुळ **ज्ञानवी-**
" **णारवानेंच** होतें.

" हें **काळरूपी भ्रमाचें पटल** एक वेळ झटकून टाका. आणि मग जर
" तुम्हांस डोळे असले तर कोणच्याही शक्तीच्या तात्कालिक कारणा-
" पलीकडे जो **आद्य प्रवर्तक** आहे त्याचेकडे नजर पोहोंचवा. कांहीं
" रबराचे गोळे किंवा पैसे एकास एक लागून ठेवले म्हणजे एका टोंकास
" दिलेला आघात दुसऱ्या टोंकाचे पैशास अगर गोळ्यास पोहोंचून त्यास
" मात्र गती आलेली दिसते तसेंच हें आहे. पण अहो, जो आघात
" **चैतन्याच्या** अनंत स्थितिस्थापक गोळ्यांतून येतो व त्या शेंवटच्या
" गोळ्याचें चालन करितो तो त्या शेवटच्या गोळ्यास मात्र बसणाऱ्या
" प्रत्यक्ष आघातापेक्षां कमी महत्वाचा होतो काय? कालावधिनाशक घोंग-
" डीच्या साह्यानें जर **आदिअंत** दोन्ही आपणास प्रत्यक्ष दाखवितां आले
" असते तर आपले डोळे खचितच उघडले असते; व या **ईश्वरी**
" सृष्टीच्या कौतुकतेजानें आपलीं अंतःकरणेंही उज्वल झालीं असतीं. मग
" ही सृष्टीच काय, पण तींतील अगदीं भिकार प्रांतसुद्धां तारकांच्या रोष-
" णाईनें आरास केलेल्या स्वर्गनगराप्रमाणें आहेत असें आपणांस प्रत्यक्ष
" दिसलें असतें. मग प्रत्येक ताऱ्यामधून, प्रत्येक गवताच्या काडीमधूनही
" तींत विद्यमान असलेलें **परमेश्वराचें** दिव्य तेज आपणांस प्रत्यक्ष दिसलें
" असतें; मग प्रत्येक जीवामध्यें तें दिसलें असतें यांत नवल तें काय! हा
" सृष्टिक्रम म्हणजे केवळ **ईश्वराचें काळमय** वस्त्र असून त्या वस्त्रामुळें
" शहाण्या पुरुषास तो व्यक्त होतो व त्यामुळेंच तो मूर्खांना दृष्टीआडही होतो!

" त्याचप्रमाणें प्रत्यक्ष खरोखरीचें **भूत** ( पिशाच्च ) दिसलें तर त्यापेक्षां
" अद्भुत गोष्ट ती कोणची असणार आहे ? आपल्यास प्रत्यक्ष भूत दिसावें

" म्हणून **इंग्लंडांतील** तत्ववेत्ता **जानसन** याची सर्व जन्मभर सारखी तळ-
" मळ व खटपट चालली होती. त्यानें **काकलेन** ( गल्ली ) मध्यें जाऊन
" पाहिलें, स्मशानें धुंडाळिलीं, प्रेतांच्या पेट्यांवर मध्यरात्रीं ठोंठावून
" पाहिलें, पण त्याची इच्छा पूर्ण झाली नाहीं. किती हा तत्ववेत्ता मूर्ख
" म्हणावा ! मनुष्यमात्रांतील ज्या **चैतन्यौघाचें** त्यास एवढें कौतुक
" वाटे तें जिकडे तिकडे दोहोंथडी भरून चाललें असतां त्याकडे जसें
" त्यानें शारीरिक दृष्टीनें पाहिलें तसेंच मानसिक दृष्टीनें कां पाहिलें नाहीं ?
" फार लांब नको; नुसतें त्यानें स्वतः आपणांकडे जरी पाहिलें असतें
" तरीही त्याची इच्छा तृप्त झाली असती. कारण हा भला तत्ववेत्ता
" स्वतःच **खरोखरीचें** प्रत्यक्ष भूत होता ! त्यापेक्षां जास्त खरें भूत पहा-
" वयासही सांपडणार नाहीं. जवळ जवळ दहा लाख भुतें त्याचे आस-
" पासही रस्त्यांतून वावरत होतीं ! पुनः एकदां मी आपणांस सांगतों
" कीं हा **कालभ्रम** झुगारून द्या, व मानवी आयुष्याची साठ वर्षें साठ
" सेकंदांत आणा ह्मणजे झालें. मग साठ सेकंदच आयुष्य झालें ह्मणजे
" आपणांत आणि खऱ्या भुतांत काय फरक राहिला ? आपण सर्वच आ-
" काशरूप असून या शरीराकृतीस येऊन प्रत्यक्ष झालों आहों. व पुनः
" अंतर्धान पावून आकाशरूप अदृश्य होणार आहों. हें माझें लिहिणें
" अतिशयोक्तीचें किंवा रूपकालंकाराचें नव्हे. ही अगदीं प्रत्यक्ष, साधी,
" व शास्त्रदृष्ट्याही **खरी** गोष्ट आहे. आपण **शून्यांतून**[८] उत्पन्न
" होतों, शरीर धारण करितों व क्षणभर दृष्टीस पडून पुन्हां
" **शून्यांत** लय पावतों. लौकिकांत मानलेल्या भूतांसभोंवतीं जसा
" **अनाद्यंत कालाचा** गराडा आहे तसाच आपल्याही भोंवती आहे.
" आणि या गराडा घालणाऱ्या अफाट काळाच्या मानानें दोन मिनिटें,
" दोन वर्षें, किंवा दोन कल्पेंही सारखींच आहेत. आह्मापासूनही श्रद्धेचे
" व प्रेमाचे दिव्य ध्वनि उत्पन्न होत नाहींत काय ? सत्पुरुषांचे भूत-
" स्थितींत राहिलेले आत्मे असेच ध्वनी काढितात अशी समजूत आहे.

---

८ अव्यक्तादीनि भूतानि, व्यक्तमध्यानि भारत ॥
अव्यक्त निधनान्येव, तत्र का परिदेवना ॥ भगवद्गीता.

हीं भूतें कोठून येतात व कोठें जातात हें कांहींच कळत नाहीं. या दरम्यानच्या वेळेंत तीं व्यक्त असतात एवढें मात्र आपणास कळतें.

" तसेच आह्मीही आक्राळविक्राळ आरोळ्या, कानास आवडणार नाहीं
" अशी बडबड, भांडणें, सूड वगैरे अमंगल गोष्टीही लौकिक भूतांप्रमाणेंच
" भयंकर रीतीनें करून या **संसाररूप वेताळाच्या** नाचांत दंग नसतो
" काय? वेताळाच्या पिशाच्यास प्रभातसमयाचा वास आल्याबरोबर
" तीं जाऊन दिवसभर पुन्हां शांत असतात. त्याप्रमाणेंच आह्मीही आपली
" आयुष्यरूपी स्वप्नमय रात्र घालविली ह्मणजे नष्ट होतो. आतां **मासि-**
" **डोनचा** शिकंदरशहा (पान११४) कोठें आहे? **इसस व अरबेला** येथील
" समरांगणांत नखशिखांत शस्त्रमय होऊन धुमाकूळ घातलेली त्याची
" सेना तरी त्याचे मागें राहिली आहे काय? कां तेही निःशेष नष्ट झाले?
" पिशाच्येंही असेंच करितात ना? पाहिजे तर **नेपोलियनकडे** (पान५६)
" पहा; मास्कोहून काढलेला जगद्विख्यात पळ, **आस्टरलीडस** वगैरे ठिकाणचीं
" युद्धें, यांची आतां काय हवाल आहे? खऱ्या पिशाच्चसेनेंत व यांत एवढा
" तरी फरक आहे काय? हीं पिशाच्यें व त्यांचा सर्व धुमाकूळ **भयाण**
" रात्र संपतांच नाहींशी झालीं दुसरीं काय हवाल? हीं सर्व भुतें होतीं.
" दरोबस्त भुतेंच! सुमारें एक अब्ज भुतें दिवसा ढवळ्या बारा वाजतां
" या पृथ्वीवर चालत असतात. व घड्याळाचा एक टिक अवाज होतो
" तेवढ्या वेळांत सुमारें शंभर नवीं भुतें उठतात व तितकींच पहिलीं
" नाहींशीं होतात!

" अहाहा! **परमेश्वरा**, आह्मां प्रत्येकांत भविष्य काळचें एक भूत आहे,
" एवढेंच केवळ नसून आह्मी खरोखरींचीं प्रत्यक्ष भुतें आहों, ही गोष्ट
" किती विलक्षण आहे! इकडे लक्ष्य पोहोंचलें म्हणजे अनिर्वाच्य आश्चर्य

---

९ सा रम्या नगरी महान्स नृपतिः सामंतचक्रं च तत्।
पार्श्वे तस्य च सा विदग्धपरिषत्ताश्चंद्रबिंबाननाः॥
उद्रिक्तः स च राजपुत्रनिवहस्तेबंदिनस्ताः कथाः।
सर्वं यस्य वशादगात्स्मृतिपथं कालाय तस्मै नमः॥

ती सुंदर नगरी, तेथील राजेसाहेब, त्याचे मांडलिक राजे, त्याच्या सल्लामसलतीस असलेले राज्यधुरंधर पुरुष, ज्यांच्या मुखकमळास चंद्राचीच उपमा अशा त्याच्या अंतःपुरांतील स्त्रिया, त्याचे सगर्व असे मुलगे, त्याच्या दरबारांतील कवी आणि त्यांचीं काव्यें, हीं सर्वच काळाच्या तडाक्यानें आतां नुसत्या आठवणीच्या उपयोगाचीं झालीं! तस्मात् त्या काळास नमस्कार असो!

" कांहीं वर्षे या शरीराधारें प्रकट असतें. हा समोरचा संग्रामवारूवर बसलेला
" वीर पहा. त्याचे डोळ्यांतून जणूं काय निखारेच पडत आहेत. त्याच्या बाहूंत
" व छातींत शक्तीही आहे. पण हा वीर व हा संग्रामवारू दृश्य मात्र होत.
" केवळ **शक्तीचा प्रकटभाव** याहून जास्त असें त्यांत कांहींच नाहीं.
" मोठ्या डौलानें ते या पृथ्वीवर चालले असतां आपणांस वाटतें कीं ही
" पृथ्वी किती तरी भक्कम असेल ! पण वेड्या पृथ्वीही नुसता बुडबुडाच
" असून वरचा पापोद्रा एकदम फुटून वीर व वारू दोघेही गडप होतात,
" त्याचा ठाव ओळंब्यानेंही लागत नाहीं. ओळंब्याचें तरी नांव कशाला.
" त्याचा पत्ता लावण्यास प्रत्यक्ष कल्पनेचीही धाव कुंठित होते. कांहीं काळाचे
" अगोदर ते नव्हते; व थोडा काळ गेल्यावर पुन्हां नाहींसें होणार व
" त्यांच्या मागें त्यांचा यत्किंचित अवशेषही राहणार नाहीं.

" अगदीं अव्वलीपासून हीच गोष्ट चालत आली असून अगदीं
" अखेरपर्यंत ती अशीच चालत राहणार. पिढी मागून पिढी शरीर धारण
" करून अवतरते, ती अभेद्य अनादि काळोखांतून ईश्वरी कार्यार्थ प्रकट
" होऊन भासमान होते. प्रत्येकींत जी शक्ति, व जो प्राणाग्नि असतो तो
" येथें उपयोगास येऊन कोणी बिचारा उद्योगाच्या जात्यावर दळीत असतो;
" कोणी एखाद्या पारध्याप्रमाणें शास्त्रविद्यारूप पर्वताच्या अत्युच्च शिख-
" रावर चढतो, कोणी आपल्या जातिबंधूंशीं भांडतांभांडतां वेडगळपणानें
" युद्धरूप शिळेवर आदळून छिन्नविच्छिन्न होतो; याप्रमाणें होत आहे
" तों पुन्हां परत बोलावणें आलें कीं त्यांचें ऐहिक शरीरवस्त्र गळून
" पडून लौकरच ते होते कीं नव्हतें असें होऊन जातें. याप्रमाणें ही
" विलक्षण मनुष्यजात **परमेश्वराच्या** तोफखान्याप्रमाणें विलक्षण चमका
" मारीत व विलक्षण गडगडाट करीत अज्ञात आकाशांतून भराभर चाल-
" ली असून तिचा आदिअंत कोणीकडे आहे हें कांहींच समजत नाहीं!
" तात्पर्य आपणही **ईश्वर** निर्मित भूतसेना असून **शून्यांतून** आलों आहों

" व अग्निरसाचा श्वासोच्छ्वास टाकीत व पृथ्वीस चकित करीत मोठ्या दण-
" क्यानें भराभर चाललों असून पुन्हां त्या शून्यांतच गुप्त होणार आहों.
" आपल्या जाण्यामुळें पृथ्वीवरील पर्वत ढासळून पडत असून समुद्राच्या
" पोकळ्या भरून निघत आहेत. ही पृथ्वी केवळ निर्जीव चित्रा प्रमाणें असून
" सजीव प्रत्यक्ष भुतां पुढें तिचें काय चालणार आहे. अत्यंत कठिण अशा
" वज्रप्राय स्थळींही आमचीं पावलें उमटलीं आहेतच; व अगदीं पिछा-
" डीच्या लोकांनाही आघाडीच्या लोकांचा मार्ग दिसल्यावांचून राहणार
" नाहीं. पण हें सर्व आलें **कोठून** व जातें **कोठें** याचा **इंद्रियांस** उमज
" होत नाहीं; श्रद्धेनें सुद्धां उलगडा होत नाहीं. कांहीं तरी विलक्षण गूढ
" तत्वापासून निघून त्या विलक्षण तत्वांतच त्याचा लय होणार; याचा
" उगम ईश्वरापासून असून शेवटीं हें त्याचे ठायींच लीन होणार एवढें
" मात्र वाटतें. आम्हांस एवढेंच कळतें कीं,

" जें स्वप्नसृष्टिघटनेसहि येत कामा ॥
" तें द्रव्य घेउनि विधीहि घडीत आम्हा ॥
" तें स्वप्न जेविं लवमात्र दिसोनि जातें ॥
" तैसें समाधिंतहि जीवित गुप्त होतें ॥ १ ॥ "

---

# भाग नववा.



## सिंहावलोकन.

या प्रमाणें आपण या निधानस्थळीं येऊन पोहोंचलों. परंतु येथें आम्हांस मोठ्या महत्वाचा एक प्रश्न येतो:—आमच्या वांचकांपैकीं बरेच लोक आमच्याबरोबर या अखेरच्या मुक्कामाला येऊन पोहोंचले आहेत काय ? आतां हें वस्त्ररहस्य त्यांना सर्वत्र स्पष्ट दिसूं लागलें कीं नाहीं ? आपला प्रवास फारच मोठा होता व त्यांत बऱ्याच अडचणीही आल्या. प्रथम अगदीं सामान्य व इंद्रियग्राह्य असे बाह्य आंगांत घालण्याचे लौकिक **कपडे** लागले. तेथून ज्या विलक्षण **चर्म मांसाच्या कापडांत** मनुष्य गुरफटला आहे ते कपडे लागले. तेथून मनुष्याचीं **समाजवस्त्रें** लागलीं; या प्रमाणें येतां येतां अखेरीस मनुष्याच्या दिव्य आत्म्यास अगदीं लागून असलेलीं **स्थळ** व **काळ** हीं वस्त्रें ओलांडल्यावर मनुष्याचें व मनुष्यजातीचें मूळ स्वरूप सर्व आड-

पडदे जाऊन कांहीं अंशीं तरी प्रत्यक्ष आपणांपुढें दिसूं लागलें कीं नाहीं? आतां बऱ्याच वाचकांस समांतर पातळी नसलेल्या भिंगांतून पाहिल्याप्रमाणें तुरळक ओडब धोबड स्वरूपानें तरी मनुष्याचें मूळ स्वरूप दिसूं लागून त्याचे अविकारी व विकारी भाग निरनिराळे झालेना? आतां—

" काळ असे हा माग आमुचा जन्ममृत्यु धागे ॥
" तयावर जन्ममृत्यु धागे ॥
" चैतन्याचें धोटें टाकुनि काढितसों मागें ॥
" अखंड करुनी काम तयावर सृष्टिरूप वस्त्र ॥
" काढितों सृष्टिरूप वस्त्र ॥
" लेवुनि ज्यातें ईशहि तुमच्या दृष्टियोग्य होत ॥ "

या **फास्टचे** ( पान ७० व ३१४ ) भाषणांत किंवा—

" हे स्वप्नसृष्टि अवघी जागृति होतांच नष्ट कीं झाली! ॥
" नाहीं चिन्हहि उरलें, कीं ते होवोनि मागुती गेली ॥१ ॥
" हा दैवा! हीं सौख्यें, येथींचें वस्तुजातही सर्व ॥
" स्वप्नापरीच भासे, व्हावा आम्हां उगाच कां गर्व ॥ २ ॥
" हे उंच उंच किल्ले, विश्रांती घेति ज्यावरी मेघ ॥
" हे भव्य राजवाडे, गर्जति जेथें बलिष्ठ नृपमेव ॥ ३ ॥
" देवालयेंहि अनुपम, श्रद्धेचा जेथ होय अवतार ॥
" यांचेंहि कांहीं न उरे, मायेचा सर्व जाण हा पूर ॥ ४ ॥
" धीरत्वें ही उर्वी पावलि सर्वसहा प्रतिष्ठेला ॥
" परि हेही न उरे हो नाहीं स्थिरता इच्याहि सत्तेला ॥५ ॥

या जगत्प्रसिद्ध जादूगार **शेक्सपियर** ( पान ५ ) याचे भाषणांत कांहीं अर्थ आहे असें आतां आमच्या वाचकांस वाटूं लागलें आहे काय? तात्पर्य, जेथें या **समाजरूपी फिनिक्स** पक्ष्याचें पुनरुज्जीवन केवळ शक्यच नव्हे तर अपरिहार्यही दिसते अशा कविहृद्गत प्रदेशा आतां आपण सुरक्षित पोहोंचलोंना?

हा अर्धवट अश्रुतपूर्व पूल पुरा करण्याचें काम जरी अजून झालें नाहीं तरी ईश्वरीकृपेनें तो आमचे हातून इतपत उभा झाला हीं संतोषाची गोष्ट आहे. परंतु कांहीं धोका न होतां यावरून बरेच लोक आले असतील असें वाटत नाहीं. या अक्राम्य कर्दमप्रदेशावर भक्कम मचाण बांधून त्यावर कमानी करून त्यांवर येथून तेथून एकसारखा पूल करणें आम्हांस तर दुष्करच आहे.

म्हणून पूर्वीं सांगितल्याप्रमाणें वेडीं वांकडीं तुळवटें पिपांवर बांधून त्यांवरून जेमतेम जातां यावें अशीं केवळ तीं तरंगत मात्र टाकिलीं आहेत. आतां, वरून जातांना एका तुळवटावरून दुसऱ्यावर उडी टाकणें हें बऱ्याच ठिकाणीं धोक्याचें काम आहे हें खरें; पण त्यास आमचा इलाज नाहीं. या अंधारापुढें व या कर्दमसागरांतील इतर अडचणीपुढें आमचें कांहीं चालेचना.

तथापि इतक्या अडचणींतून आमच्या वाचकांपैकीं—हजारीं एक तरी—विलक्षण कुशाग्रबुद्धीचे लोक या पुलावरून आले नसतील काय ? धन्य आहे त्या महात्म्यांची ! त्यांस आमचें आतां एवढेंच म्हणणें आहे कीं आम्हांबरोबर आपण आलांत, फार चांगलें झालें ! पण येथल्या परिस्थितीनें आपण बुजून जाऊं नये. असाच कांहीं वेळ धीर धरा. म्हणजे आपल्या डोळ्यांवर आलेली अंधारी जाऊन क्रमाक्रमानें येथील परिस्थिति आपल्या परिचयांत येऊन आपली दृष्टि स्थिर होईल. व मग येथें काम करण्यास आपला हातही धजावेल. **( समाजाच्या ) पुनरुज्जीवनाचें** जें सर्वांत उत्कृष्ट काम त्यावर आतां आपणांस आपआपल्या शक्त्यनुसार खपावयाचें आहे. आपल्या खांद्याशीं खांदा देऊन काम करण्यास दुसरेही कामगार येतील; नवे पूल बांधले जातील; फार कशाला—हा आपला दोऱ्यावाशांचा गरीबसा पूलच आपण वरून जातां येतां ठिकठिकाणीं दुरुस्त करीत गेलांत, तरी तो सुध्दां चांगला भक्कम होऊन मग त्यावरून लुल्यालंगड्यांसही जातां येणार नाहीं काय ?

असो; पण आपल्याबरोबर असंख्य लोकांचा जमाव मोठ्या हुरूपानें व आशेनें निघाला होता, त्यांतले पुष्कळच लोक येथें दिसत नाहींत. त्यांची काय वाट झाली बरें ? पुष्कळच लोक आपला इलाज चालत नाहीं व आम्ही तर पुढें आलों असें पाहून निराश होऊन खिन्न मुद्रेनें आमच्या वाटेकडे पहात असतील; व कांहीं तसाच धीर धरून आले असतील आणि पुढें पाय घसरून किंवा उडी चकून पडल्यामुळें खालील कर्दमप्रवाहांत वहात असून त्यांपैकीं कांहीं इकडील थडीस व कांहीं परत पलीकडल्या थडीस तरी लागण्याकरितां प्रयत्न करीत असतील. त्यांनाही हात देणें अवश्य आहे. निदान त्यांचा धीर खचूं नये म्हणून त्यांचें थोडेंसें प्रोत्साहन तरी केलें पाहिजे.

ट्यूफेलसड्राक साहेबांच्या लेखांचें अवलोकन करितां करितां अलंकारिक भाषेंत बोलण्याची आम्हांलाही खोड लागली आहे. ती टाकून स्पष्ट मोकळ्या

भाषेनें आमचा आशय उलगडून सांगणें झाल्यास, सांप्रत ग्रंथानें बरेच वाचक गोंधळून जाऊन त्यांस यापासून ज्ञानलाभ न होतां हें रिकामें व्यर्थ भारूड आहे असें वाटत असेल व त्यांपैकीं कांहींना या ग्रंथाचा मथितार्थ काय व त्याचा उपयोग काय, हें कोडें पडून कोणच्या ना कोणच्या तरी स्थळीं ते बुचकळ्यांत पडून हताश होऊन बसले असतील, नाहीं बरें ?

तर, अहो ब्रिटिश वाचकांनो, येथें अखेरीस आपल्या भ्रमाचें निरसन केलें पाहिजे. आपल्या तिजोरींत भर टाकण्यास किंवा पोटपुजेची कांहीं तजवीज लावण्यास जर म्हणाल तर या ग्रंथाचा कांहीं एक उपयोग नाहीं. उलट या ग्रंथाची थोडीशी किंमत आपल्या अंगावर पडून आपलें कांहींसें नुकसानच झालें असेल. तथापि ट्यूफेल्सड्राक साहेबांनीं व त्यांच्या द्वारें आह्मीं-हीं आपणांस या भिकार वाटेनेंच दिव्य वस्तूंनीं भारलेल्या या स्थळीं आणि-ल्यावर एखाद्या जादूच्या पडद्यासारख्या या **वस्त्रावरणांतून** पलीकडच्या **अद्भुत स्थळा**कडे पाहतां आलें, व तेथें पाहिल्यावर " हें आपलें **दैनंदिन**-चरित केवळ अद्भुत असून त्याचा **पायाही** अगदीं अतर्क्य आहे, फार कशाला, आपलीं धोत्रें व घोंगड्याही केवळ अतर्क्य वस्तू आहेत" एवढेंही जर आपणांस उमजलें असलें, तर पैशानेंही जो लाभ व्हावयाचा नाहीं तो या ग्रंथापासून आपणांस झाला आहे हें खचित समजा. आणि त्याकरितां आपण ट्यूफेल्सड्राक साहेबांचे सदैव उपकार मानिले पाहिजेत; इतकेंच नव्हे तर प्रसंगीं तोंड उघडून हें आपलें मत आपणास व्यक्तही करावें लागेल.

इतक्यानेंही भागणार नाहीं. कारण कदाचित् आतां आपणांसही एवढें ठाऊक झालें असेल, कीं कोणत्याही प्रकारचें **चिन्ह** असलें तरी तें **वस्त्र-रूपच** असून ज्या ज्या **स्वरूपानें अतींद्रिय ब्रह्म** इंद्रियग्राह्य होतें,— मग तें बाह्येंद्रियांस प्रत्यक्ष होवो किंवा अंतरिंद्रिय जें मन त्यास होवो, तें तें **स्वरूप वस्त्रच** होय. या मानानें पाहतां इंग्लंडांतील लोकांची मॅग्नाचार्टा[१]

---

१ मॅग्नाचारटा—इंग्लंडांतील लोकांनीं १२१५ त जान राजापासून मिळविलेली हक्कांबद्दलची सनद. तींत एकंदर ६१ कलमें आहेत; त्यांत (१) राजानें कोणास कायद्याविरुद्ध बंदींत ठेवूं नये व अन्य प्रकारें शिक्षा करूं नये; (२) न्यायाची विक्री किंवा इनकार करूं नये, व न्यायास विलंब लावूं नये; (३) व राजानें कोणापासून आत्मकार्यार्थ व अन्यायानें पैसा घेऊं नये, हीं कलमें मुख्य होतीं. इंग्लंडांत राज्यकारभार

नांवाची बडी सनद ( ही सनद कातरून एक शिंपी तिचीं कपडे बेतण्याची फितें किंवा मापें करीत होता ) एवढीच काय, पण **कायद्यांचा** सर्व **अंमल** व थाटमाट, **राजपुरुषांचें पूज्यत्व** व सामान्य **सरदारांची मान्यता** हीं सर्वच वास्तविक पाहतां **वस्त्रें** व पांघरुणेंच असून आपल्या धर्माचीं **एकुणचाळीस सूत्रें** तरी काय आहेत? **वस्त्रेंच !धर्मकल्पनेच्या** आंगावर घालण्याचीं वस्त्र, इतकेंच. असें जर आहे तर **वस्त्राचें** शास्त्र फारच महत्वाचें असून त्यावर आपण जास्त खोल विचार केल्यास फलश्रुतीही उत्तम होईल, इतकी गोष्ट आपणांस कबूल केली पाहिजे. सूत्रकारांचीं **सूत्रें, अर्थशास्त्र,** किंवा **ब्रिटिश राज्यव्यवस्थेचीं मूलतत्वें** यांच्या तोडीचेंच हें शास्त्र आहे. किंबहुना हें शास्त्र सर्वांत अग्रगण्य असून त्यास हाताखालच्या या इतर शास्त्ररूपी कारखानदारांकडून जीं अनेक **तत्ववस्त्रें** निर्माण करून तीं अभिमंत्रण करून सर्वत्र वांटावयाचीं असतात, तीं हे कारखानदार पोटाच्या आगीमुळें कशीं तरी भरकटतात, म्हणून मालकीच्या नात्यानें त्यांजवर देखरेख करण्याचेंही काम या **वस्त्ररहस्याकडे**च आहे; ही गोष्ट सुद्धां कदाचित् आपल्या लक्षांत आली असेल.

असो, तूर्त आपण हे सर्व विचार एकीकडे ठेवू. विशेषत: सृष्टींतील **लोकोत्तर चमत्कारा**विषयीं सध्यां आपणांस कांहीं कर्तव्य नसल्यामुळें "**समाजाचें पुनरुज्जीवन**" या नांवाखालीं या ग्रंथाचा उत्तरार्ध प्रोफेसर साहेबच लिहिणार आहेत तेव्हां त्यासंबंधींही सर्व विचार एकीकडे ठेवून आम्ही इतकेंच सांगतों कीं, या **वस्त्ररहस्यापैकीं** कोणचाही भाग घेतला तरी त्यासही स्वतंत्र व साक्षात् अशी कांहीं योग्यता आहे; व प्रत्येक भागापासून व्यवहारांत उपयोगी पडण्यासारखे अनंत सिद्धांतही काढितां येतील. **वस्त्ररहस्याचे** वाचकांस बहुतेक सुरुवातीपासूनच **नीतिशास्त्र, राजनीति,** वगैरेविषयी अनेक गंभीर व सूक्ष्म विचार उत्पन्न होतात; पण ते तूर्त एका बाजूस राहूं द्या. त्याचप्रमाणें सर्व तऱ्हांच्या बुडाशीं कांहीं शिल्पकल्पना असतात, व त्या

---

चालविण्याकरितां कर बसवावयाचे ते पार्लमेंटच्या अनुमतानें मात्र बसावे असा निर्बंध असल्यामुळें राजांस पैशाची टंचाई झाली, किंवा इतर राज्यकारणांवरून प्रजेची मेहेरबानी त्यास अवश्य झाली ह्मणजे प्रजेनें त्यास नडवून कांहीं तरी जास्त हक्क घ्यावे असें होतां होतां हल्लीं राज्यकारभारांत राजाचा संबंध केवळ नाममात्र अवशेष आहे.

कधींतरी पूर्णपणें विकास पावून आपल्या समाजांत आम्हीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें फारच मोठ्या घडामोडी करितील; त्या शिल्पकल्पनाही तूर्त एका आंगास सारून या **वस्त्ररहस्याच्या** किंचित् उजेडानें आपल्या बांधवांचा जो एक नेहमीं **कपड्यांत वापरणारा वर्ग** आहे त्याचें निरीक्षण करूं. या वर्गापैकीं सुद्धां **सूत कांतणारे, विणणारे, कलफ देणारे, रंगारी, धोबी, इस्तरी करणारे** वगैरे जे कोट्यावधी लोक आज आपणाकरितां वस्त्रांवर काम करीत आहेत, आपण जगावें म्हणून जे बिचारे मरमर खपत आहेत, त्यांनाही तसेंच ठेवून मनुष्यजातींचे जे दोन लहान वर्ग, आगीभोंवतीं घिरट्या घालणाऱ्या पतंगाप्रमाणें, कपड्यांतच एकसारखे गुंगलेले असतात त्यांकडे म्हणजे **छानछोक लोक व शिंपी** यांकडे पाहूं.

या दोन लहानशा वर्गांसंबंधी सामान्यतः एवढेंच आम्ही बिनधोक सांगून ठेवितों कीं, लोकांत अज्ञान असल्यामुळें त्यांविषयीं असावें तसेंचांगलें लोकमत नाहीं व त्यांच्याशीं वागतांना लोक दयादि नैसर्गिक विकारांसही झुगारून देतात! ही गोष्ट पुढील दोनें भागांत वाचकांस कळून येईल.

---

# भाग दहावा.



## छानछोक लोक.

आतां प्रथम **छानछोक** लोकांविषयीं विचार करूं. पण पहिल्यानें **छानछोक** मनुष्य कोणास म्हणावें याची शास्त्रीयरीत्या योग्य चौकसपणानें व्याख्या केली पाहिजे. **छानछोक** मनुष्य म्हटला म्हणजे ज्याचा सर्व व्यापार, सर्व कारभार व सर्व जीवित्व कपड्यांत असतें; ज्याच्या जीवाची, आत्म्याची, पैशाची व शरीराची सर्व शक्ति कपडे घालून नटण्याच्याच एका कामास अनन्य भावें अर्पण केली असते, तो. बाकीचीं माणसेंही कपडे घालितात; परंतु छानछोक मनुष्याचा सर्वच व्यवसाय नीटनेटके व हुषारीनें कपडे घालावे कसे या एका विषयांत असतो. बाकीचे लोक जगण्याकरितां कपडे घालितात; पण हा मनुष्य कपडे घालण्याकरितांच जगत असतो. जें वस्त्राचें

---

२ हे दोन भाग अत्यंत उपरोधिक असून मार्मिक वाचकांस यांतील वाच्यार्थाचे खालीं जो खोल अर्थ आहे तो प्रत्यक्ष झाल्यावांचून राहणार नाहीं.

रहस्य स्फुट करण्याकरितां एवढ्या मोठ्या **जर्मन प्रोफेसरास** आपलें अगाध ज्ञान व विलक्षण कुशाग्रता खर्चून एवढा मोठा ग्रंथ लिहावा लागला, तें या **छानछोक** मनुष्यांत कांहींएक प्रयत्न केल्यावांचून उपजत बुद्धीप्रमाणें आपोआपच प्रकट होतें! छानछोक मनुष्यांत **वस्त्ररहस्याचा** जणूं काय संचार झाला असतो. त्यास **वस्त्रग्रंथ** करणारा कवी, असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. टयूफेलसड्राक साहेबांचे मतें **वस्त्राचें** जें **दिव्यस्वरूप** तें **छानछोक** मनुष्यांत जन्मतःच उत्पन्न होतें. अर्थात् मनुष्याच्या मनास तन्मय करून टाकणाऱ्या इतर गोष्टींप्रमाणें हेंही दिव्यतत्व एक तर कृतीचे रूपानें बाहेर व्यक्त होईल किंवा तसें होण्यास सवड नसली तर आंतल्या आंत त्या मनुष्याचें अंतःकरण शतधा विदीर्ण तरी करील!

परंतु एखाद्या दिव्यशक्तीचा संचार झालेल्या कर्तृत्ववान् पुरुषाप्रमाणें हा **छानछोक** मनुष्यही आपल्या मनांतील कपड्याची दिव्यकल्पना मोठ्या धैर्यानें आपल्या कृतींतच व्यक्त करितो; व कांहीं विशेष प्रकारचा पोषाख करून सर्व जगापुढें प्रत्यक्ष फिरतो; आणि **वस्त्रांच्या** नैसर्गिक महत्वास निरपेक्षबुद्धीनें जन्मभर आपणास वाहून घेऊन तें महत्व सदैव व्यक्त करीत असतो. आम्हीं दिलेली कवीची उपमा त्यास सर्वथैव लागू पडते. कारण प्रत्यक्ष स्वतःचें शरीरच पेंढा भरलेल्या चर्मपटाप्रमाणें कल्पून त्यावर **हडर्सफील्ड** येथील भपकेदार छिटांच्या अपूर्व शाईनें आपल्या दयितेचे डोळे रंजविण्याकरितां **पोषाखरूपी** काव्यच तो लिहीत नाहीं काय? वास्तविक म्हटलें, तर या काव्यास महाकाव्य असेंच म्हटलें पाहिजे. विलक्षण निरंकुशत्वानें केलेल्या त्यांतील कविता सर्व जगापुढें प्रत्यक्ष असून, वाटेल त्यानें सहज जातांजातांही त्या वाचाव्या, इतका त्या काव्यांत प्रसादगुण आहे. शिवाय **छानछोक** मनुष्यास विवेकाचेंही अंग असून **काळ** व **स्थळ** या कल्पनाही त्यास सदैव भासमान असतात, इतकें कबूल करण्यास हरकत नाहीं. आणि एवढी गोष्ट जर गृहीत धरली तर **छानछोक** मनुष्यास प्रत्यक्ष ऋषींचेंच साम्य येतें! कारण ऋषींत तरी ज्यास्त काय असतें? ऋषीलोक **कालाचें अनंत स्वरूप** व त्याचें **लौकिक परिमित स्वरूप** हीं दोन्हीं अभेददृष्टीनें पहात असतात. आपल्या **छानछोक** लोकांचे आचरणांतही हेंच मुख्य तत्व असतें! फरक इतकाच कीं ऋषीलोक **अशाश्वताचा** व्यय करून **शाश्वत** संपादन करितात आणि हे आपले **छानछोक** लोक आपलें

सर्व जीवित्व अर्पण करून **अशाश्वताकरितां** **शाश्वत** वस्तूचा व्यय करितात !

आतां, **वस्त्राकरितां** ते जी ही कायमची बूड करून घेतात, आणि हें ऋषित्व व कवित्व एकसारखें प्रकट करीत असतात, तें तरी कोणच्या फळाकरितां? फक्त आपण आहों एवढें लोकांनीं कबूल करावें म्हणून हे जिवंत प्राणी आहेत, किंवा निदान दृष्टीस पडणाऱ्या वस्तु असून दुसऱ्यांचे डोळ्यांकडे प्रकाशकिरण परावर्तन करण्याची त्यांचे आंगीं शक्ति आहे; एवढें जरी लोकांनीं मानिलें तरी बस आहे. आपल्या हिमस्त्या कायद्यानें जें थोडेंसें सोनेंरूपें त्यांचे वांटयास आलें असेल त्याहून ज्यास्त मिळावें अशीही त्यांची इच्छा नसते; केवळ तुह्मीं आपल्या डोळ्यांनीं त्याजकडे निरखून पाहिलें ह्मणजे झालें ! त्यांच्या जन्माचें अंतर्गत इंगित पाहिजे तर समजून घ्या; किंवा त्याविषयीं हवी ती कल्पना करा; फक्त त्याकडे तुह्मीं पाहिलंत ह्मणजे त्यांत त्यांचा संतोष आहे. इतकी बिचाऱ्यांची वासना संकोचित असून तेवढीही तृप्त करणें लोकांच्या जिवावर येतें, ही किती लज्जास्पद गोष्ट आहे! लोक तरी किती मूर्ख आहेत पहा ! कोठें वाळलेलीं कांसवें, सयामांतील आवळींजावळीं जोडमुलें, वगैरे गोष्टी पाहण्यांत विनाकारण आपले डोळे झिजवितील; परंतु या संसारांतील अत्यत **अद्भुत** गोष्ट ह्मणजे **जिवंत छानछोक** मनुष्य, त्याकडे ढुंकूनही पहाणार नाहींत ! फार तर काय, लोक त्याजविषयींचा तिरस्कार नुसता गुप्तही ठेवीत नाहींत !!! कोणी प्राणिशास्त्रवेत्यानें आपल्या वर्गीकरणांत ' स्तनपान करणारे प्राणी, ' या वर्गांत त्याचा नुसता नामनिर्देश तरी करावयाचा होता ! कोणीं शस्त्रवैद्यानें त्याच्या अंतःशरीराचें निरीक्षण तरी करावयाचें होतें ! सृष्टपदार्थालयांत मासल्याकरितां पुष्कळ प्राणी दारूंत घालून जपून ठेविले असतात. तसें तरी **छानलोक** मनुष्यास कोणीं ठेविलें आहे काय? नाहीं! बिचाऱ्या **छानलोक** मनुष्यानें कितीही नकशीदार शिवणीचे व मनोहारक रंगाचे पोषाख घातले, तपकिरी रंगाचे बूट घातले, तरी व्यर्थ ! हे आंधळे लोक कांहीं तरी भलत्याच नादांत लागतात, त्यामुळें इकडे खरें दृष्टिसुख देणारे कितीही **छानछोक** लोक असले तरी ते त्या बेटयांना दिसतही नाहींत.

तात्पर्य, दुर्बलांचे व आर्तांचे परित्राणार्थ धर्मयुद्धांचा व दाक्षिण्याचा काळ जसा मावळला तसा वस्तुचमत्काराच्या जिज्ञासेचाही काळ नाहींसा झाला हेंच खरें. कदाचित् तो अजून अगदींच नष्ट झाला नसून, न जाणों; नुसता

झोपींही गेला असेल. कारण या दोन्ही प्रकारच्या काळास जागृति देण्याकरितांच कीं काय, सांप्रत या **वस्त्ररहस्य** ग्रंथाचा अवतार झाला असावा ! या शास्त्रांतील सत्यतत्वें लोकांत पसरलीं तर या **छानछोक** लोकांचे विशेष गुणधर्म व त्यांचे अंतर्यामीं असलेल्या गूढतत्वाचें इंगित हीं सांप्रतच्या हास्यास्पद व लज्जास्पद भ्रमाच्या पांघरुणाखालीं फार दिवस दडून न राहतां त्यांचें खरें स्वरूप लौकरच प्रगट होईल! ट्यूफेलसड्राक साहेबांच्या लेखांतील पुढें दिलेल्या उताऱ्यांवरून या गोष्टीचें यथार्थ स्वरूप जरी प्रत्यक्ष प्रकट न झालें तरी निदान लोकांस त्याचें दिग्दर्शन तरी होईल असें आम्हांस वाटतें. पण मोठ्या लाचारीची गोष्ट आहे, कीं इतर अनेक ठिकाणांप्रमाणेंच याही स्थळीं प्रोफेसर साहेबांची तात्विक कुशाग्रदृष्टि दिवाभीतासारखी झांपड पडल्यामुळें किंवा उपरोधिक भाषणाच्या खोडीमुळें कांहींशी दूषित झाल्यासारखी दिसते. हा परिणाम प्रकृत स्थळीं कोणच्या कारणाचा असेल त्याचा विचार वाचकांनींच करावा. प्रोफेसर साहेब म्हणतातः—

" सांप्रतकाळीं कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं अशी स्थिति " झाली आहे. बहुतेक धर्मपीठांत **धर्मतत्वास** जागा मिळेनाशी झाली " असून आतां तें **धर्मतत्व** कांहीं थोड्याशा सज्जनांच्या हृदयांत मात्र " राहून कोणी महात्मा आपलें दिव्यतेज प्रकट करून पुन्हां " धर्मसंस्थापना करील या आशेवर तेथें शांतपणें बसलें आहे; " किंवा जसें एखादें पिशाच्च एक झाड[1] सोडल्यावर कोठें आधार " नाहीं म्हणून टेहळणी करीत हिंडतें, त्याप्रमाणें तें धर्मतत्वही धर्म-" वेड व धर्मभोळेपणा यांच्या अनेक विलक्षण तात्पुरत्या व चोरट्या " स्वरूपांनीं वागत आहे. अर्थात् मनुष्यस्वभावांतलें जें उदात्त **धर्मतत्व** " त्यास योग्य मार्गानें प्रकट होण्यास कांहीं साधन नाहीं; तरी तें अवि-" नाशी असल्यामुळें तसेंच राहून या कर्दमसमुद्रांत अश्रांत परिश्रम " करून कांहीं तरी अंधवत् कारभार करीत आहे. यामुळें अनेक धर्मपंथ " एकामागून एक प्रकट होतात आणि लयास जातात अगर रूपांतर पावतात.

" ही गोष्ट विशेषेंकरून **इंग्लंडांत** नजरेस येते. इंग्लंडांत संपत्ति अति-

---

१ झाड—ज्याच्या अंगांत भूतसंचार होतो त्या माणसास झाड म्हणतात.

" शय झाली असून तेथें लोकांस शिक्षणही वाईट मिळतें.[2] यामुळें असल्या
" धर्मवेडाच्या व धर्मभोळेपणाच्या पिकास हितावह अशीं दोन्हीं
" तत्वें म्हणजे उष्मा ( अर्थोष्मा ) व अंधःकार ( अज्ञानांधःकार ) इंग्लंडच्या
" हवेंत विपुल असल्यामुळें तेथें हें पीकही विशेष जोरावलें आहे. त्या
" देशांत अलीकडे उत्पन्न झालेल्या पंथांपैकीं एका पंथाचा आपल्या प्रस्तुत
" विषयाशीं अगदीं निकट संबंध असल्यामुळें त्याची जी थोडीबहुत
" माहिती मला मिळाली आहे ती येथेंच नमूद केली तर बरें होईल.

" हा पंथ **छानछोक** लोकांचा होय. इंग्लंडांतील वर्तमानपत्रकार या
" पंथास धर्मपंथांत न लेखितां केवळ व्यावहारिक किंवा लौकिक पंथांत
" लेखितात हें खरें; पण ही त्यांची चूक आहे; व या चुकीचें कारण या
" वर्तमानपत्रकारांना धर्मतत्वाच्या स्वरूपाचें गम्यही नाहीं, व तें प्रकट
" झालें असतां त्यास योग्य स्वरूपानें ओळखण्याची अक्कलही नाहीं.
" तथापि, अध्यात्मदृष्टया पाहिलें असतां या पंथांतील लोकांची निःसीम व
" निरपेक्ष भक्ति, व याज्ञिकी स्तोम, यांवरून हा धर्मपंथच आहे, अशी
" खात्री होते. आतां या पंथांत मंत्रतंत्राचे प्रकार आहेत किंवा अवतार-
" पूजनाचे किंवा अनेकेश्वरी मतांचे प्रकार आहेत, याचा निर्णय आमच्या
" सांप्रतच्या माहितीवरून करितां येत नाहीं. परंतु या पंथांत **मनीशियन[3]**
" **पंथाचें तत्व** कांहीं स्वरूपांतरानें असावें असें वाटतें. शिवाय या पंथां-
" तील मतांचे **अथास[4]** येथील योग्यांच्या मतांशींही बरेंच साम्य आहेसें
" दिसतें. मला तर वाटतें कीं, हा पंथ अगदींच नवा नसून पूर्वीपासून
" जो आत्मपूजकांचा पंथ कोणच्या ना कोणच्या तरी स्वरूपानें आहे

---

२ इंग्लंडचें शिक्षण ग्रंथकर्त्याच्या दृष्टीनें कितीही सदोष असलें तरी आपल्या येथील शिक्षणापेक्षां तें चांगलें आहे. आणि ह्मणूनच तेथें कार्लाइल, ह्यूम, मिल वगैरे सारखे दाणे उत्पन्न होतात.

३ मनीशियन पंथ—हा पंथ तिसऱ्या शतकांत मनीशियन नांवाच्या पारशी साधूनें काढिला होता. त्याचें मुख्य तत्व असें होतें कीं, सर्व वस्तुमात्र प्रकाश ( चैतन्य ) व तम ( जड ) या प्रकृतींपासून झालें आहे.

४ मॅसिडोनिया जवळच्या पवित्र मानलेल्या अथास पर्वतावर पूर्वी पुष्कळ मठ असत व हल्लींही आहेत. तेथील योगी उपोषित राहून आपल्याच नाभिकमलाकडे कांहीं काळ-पर्यंत सारखी दृष्टि लावीत. त्यांची अशी समजूत असे कीं, या सृष्टींत ईश्वराचें खरें वसति-स्थान नाभिकमलांत आहे.

५ झरडस्ट किंवा झोरोॲस्टर—( ख्रि० पू० ५८९—५१३ ) अति विख्यात पारशी धर्मसंस्थापक. याचें मुख्य तत्व " दुर्गुणावांचून ईश्वराची अवकृपा होत नाहीं, आणि सर्व सद्गुणांत परोपकार श्रेष्ठ आहे " असें होतें. या धर्मांत उर्मुझ ह्मणजे सत्तत्व आणि अर्हमन ह्मणजे असत्तत्व यांनीं मिळून ही बऱ्या वाइटांनीं भरलेली सृष्टि उत्पन्न केली असें वर्णन आहे. अर्हमन ह्मणजे सैतान—कली.

६ कांगफूची—चीन देशांतील महासाधू व स्मृतिकार. हा ख्रिस्तीशकापूर्वीं सहाव्या शतकांत होऊन गेला. याची इतकी तीव्रबुद्धि होती कीं, चवथ्या वर्षीच त्यास मंडेरिन (चिनी सरदारांची पाठशाळा) मध्यें घातलें.त्याचा बाप लहानपणींच निवर्तला होता पण त्याचा आजा उत्तम विद्वान् होता. त्यानें त्यास चांगलें शिक्षण दिलं. २३ वे वर्षीं त्यानें चिनी लोकांत सुधारणा करण्याचें मनांत आणिलें व बराच शिष्यवर्ग मिळविला. त्यांतले दहा जण निवडून त्यांना त्यानें लोकांस उपदेश करण्याकरितां पाठविलें. याची स्मृति अति उत्तम असून आज एशियांतील निम्म्या लोकांचे कारभार या स्मृतिवचनांवरूनच होतात. तरी त्या वेळीं राजानें त्यास हद्दपार केलें! व त्याचें देहावसानही परदेशांतच झालें. चिनी लोकांत या पुरुषास अत्यंत पूज्य मानितात व त्याचे वंशज आजही फार मोठे हक्क उपभोगीत आहेत.

७ **महंमद**—हा मुसलमानी धर्माचा आद्य प्रवर्तक. (जन्म सन ५७० मृत्यु सन ६३२) त्याचा बाप लहानपणींच मेल्यामुळें त्याचें पालन त्याचे चुलत्यानें केलें व त्यास तो **मक्के** पासून **दमासकस**पर्यंत उंटांचें लमाण घेऊन पाठवीत असे. या कामांत त्याच्या वयाचीं २८ वर्षें गेलीं. मग त्यानें **खादिजा** नांवाच्या एका श्रीमान गतभर्तृकेशीं लग्न केलें. पुढें तो व्यापार करूं लागला. परंतु लहानपणापासूनच धर्मविचाराकडे त्याची प्रवृत्ति असे. त्याच्या प्रवासांत अनेक पंथ त्याचे आढळांत आले; तथापि त्यांत निर्दोष धर्मपंथ त्यास न दिसल्यामुळें आपणच एक पंथ काढावा असें त्याचे मनानें घेतलें. मग त्यानें कांहीं दिवस मक्केच्या एका गुहेंत राहून एका इराणी ज्यूच्या व दोघां ख्रिस्त्यांच्या साह्यानें कुराण या नांवानें प्रसिद्ध असणारा ग्रंथ लिहिला; व त्यांतील धर्माचा तो उपदेश करूं लागला. पुढें सुमारें दहा वर्षांनीं त्याचा चुलता व त्याची बायको दोन्ही मरून त्याचा आश्रय कमी झाला व मग त्याचा लोकांकडून फारच छळ होऊं लागला. तो इतका कीं त्यास **तायेफ** शहरांत कांहीं दिवस अज्ञातवासांत काढावे लागले. पुढें त्याच्या अनुयायांची संख्या फार मोठी झाली व हे सर्वजण या धर्माकरितां तनमनधनेंकरून झटण्याची शपथ घेत; त्यावरून आपला छळ करणाऱ्यांचा समाचार घेण्यास शस्त्रबलाचा उपयोग करण्याची कल्पना त्याचे डोक्यांत आली. त्यावरून त्याचे शत्रूही चिडून गेले व त्यांनीं त्यास जिवें मारण्याची मसलत केली. या गोष्टीचा सुगावा मिळतांच एकच शिष्य बरोबर घेऊन तो **मक्केहून** निघाला व एका गुहेंत तीन दिवस लपून राहून मग ता० १६ जून ६२२ रोजीं

" वगैरे साधूंनीं या आत्मसेवकांचे बंड मोडण्याचा प्रयत्न मात्र केला. परंतु
" त्याचा समूळ उच्छेद कोणींच केला नाहीं. वास्तविक पाहतां हें **आत्म-**
" **श्लाघेचें** तत्व ज्या धर्मांतील लोकांत नाहीं असे धर्म फारच थोडे आहेत.
" म्हणन या पंथास नवीन **अहर्मानपंथ** किंवा नवीन **असुरपूजनाचा** पंथ
" असें जरी कोणीं म्हटलें तरी माझी कांहीं हरकत नाहीं.

" असो, नवीन धर्मपंथाच्या लोकांत विलक्षण हुरूप असतो, व
" मनुष्य कितीही हीन झाला असला तरी त्याच्या आंगांत कांहीं सामर्थ्य-
" ही असतें, त्या मानानें या **छानछोक** लोकांनींही पुष्कळ धैर्य व कार्य-
" दक्षता हीं प्रकट केलीं आहेत. हे लोक शुचित्वाचे व सोंवळ्याचें फारच
" प्रस्थ घालितात; व कांहीं विशेष प्रकारचा पोषाखही करितात. ( या
" पोषाखाचें थोडेंसें वर्णन या ग्रंथाच्या पूर्व भागांत आलेंच आहे. ) त्याच-
" प्रमाणें होतां होईल तोंपर्यंत ते कांहीं विशेष प्रकारची भाषा बोलतात.
" ही भाषा धड इंग्रजी नाहीं धड फ्रेंच नाहीं अशी कांहीं अर्धवट प्रका-

---

**मदीना** येथ गेला. ( त्या दिवसापासूनच मुसलमान लोक **हिजरी शक** धरितात. ) तेव्हांपासून तो महंत होऊन राजचिन्हें धारण करूं लागला व आपल्या धर्माचा प्रसार तरवारीच्या जोरावर करण्याचा त्यानें निश्चय केला. याप्रमाणें त्याच्या अनुयायांच्या धर्मश्रद्धेस लूट मिळण्याच्या आशेचें साह्य होऊन त्यांनीं बऱ्याच लहान लहान लढाया मारिल्या. मग **महंमदानें** इराणचा राजा **खुषरू** पारविझ, कानस्टँटिनोपलचा बादशाह **हेराक्लिअस,** इजिप्तचा राजा **मोकाकस,** इथिओपियाचा राजा, व अरबस्थानांतील सर्व राजे, यांस आपल्या धर्माचा स्वीकार करण्यास आव्हान केलें. त्यापैकीं दूर असलेले बलाढ्य राजे शिवायकरून बाकीचे त्यास शरण आले. अरब लोक मक्का शहरास पवित्र मानीत; तें शहर त्यानें हस्तगत केल्यावर अरबलोकही त्याचे शिष्य झाले. मग हिजरी सन १० मध्यें मक्केस शेवटचा निरोप देऊन तो निघाला तों **मदीना** येथें गेला. त्या वेळीं त्याचे बरोबर कमींत कमी ९०००० एकनिष्ठ लोक असून त्या वेळचा त्याचा थाट कांहीं अद्वितीय होता. मदीना येथें पोंचल्यावर लौकरच तो ६३२ त मरण पावला. हा पुरुष दिसण्यांत भव्य व मोहक असून पराक्रमी, व उत्कृष्ट वक्ता होता. मुसलमानलोक त्यास व त्याचे संबंधाच्या सर्व वस्तूंस अत्यंत पूज्य मानितात त्यावरून त्याचेबद्दलची त्यांची निःसीम श्रद्धा व्यक्त होते. कोणी असेंही मानितात कीं त्याची प्रेताची पेटी आकाशांत अंतराळीं लटकत आहे. परंतु त्याची कबर मदीना येथील नमाजग्यांत असून तिचे भोंवतीं लोखंडी जाळी लाविली आहे, अर्थात् तिचे जवळ कोणासही जातां येत नाहीं.

८ अर्हमानपंथ—सैतानी पंथ—टीप ५ पहा.

" रची आहे. एकंदरींत हे लोक शुचिर्भूतपणानें वागून जगाचा संसर्ग न
" होण्याविषयीं फार जपत असतात.

" या पंथांतील लोकांचे मठ व देवळेंही आहेत. यांपैकीं मुख्य मठ लंडन
" शहरांतच असून त्याचें नांव **अलमाक**[१] असें आहे. या देवळांतील पूजा-
" अर्चा रात्रीच्या होत असतात. त्यांचे **बडे पुजारी** व **बड्या पुजारिणीही**
" आहेत. परंतु हा औपाधिकाचा अधिकार कांहीं **विशिष्ट वयांत** मात्र
" त्यांस मिळतो. त्यांच्यांत उपदेवांचे पूजनाचाही कांहीं प्रकार असून
" ते आपले पूजाविधी फार गुप्तपणें करीत असतात. त्यांच्यांत धर्मपुस्तकेंही
" पुष्कळ आहेत. त्यांस " **फक्कड कादंबऱ्या**[१०] " अशा अर्थाचें कांहीं
" सामान्य नांव आहे. अर्थात् या पंथांतील धर्मव्यवस्था अगदीं पूर्ण
" झाली नसून वरचेवर तींत भर पडत असते. या फक्कड **कादंबऱ्या**
" पैकीं कांहींस प्रासादिक असें ठरविण्यांत आलें असून कांहीं अजून
" तशाच आहेत.

" या पवित्र पुस्तकांपैकीं कांहीं मासलेवाईक पुस्तकें मीं खरेदी केलीं.
" ( अर्थात् मला कांहीं खर्चही आला. ) मग **छानलोक** लोकांच्या धर्माची
" कांहीं विश्वसनीय माहिती मिळावी म्हणून मोठ्या हुरूपानें मी त्यांचा
" अभ्यास करूं लागलों. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं ! कारण,
" वाचनाविषयीं जरी मला अति उत्कंठा असते, व वाचनाचें मला व्यसन-
" ही आहे, ( ही गोष्ट लोकांत बहुधा महशूर आहेच, ) तरी या ग्रंथांनीं
" माझी अगदींच फजीती उडवून दिली ! मी मोठी कंबर बांधून हवी
" तितकी खटपट केली. पण कांहीं पृष्ठें वांचतों न वाचतों तोंच माझ्या

---

१ अलमाक—लंडन येथील सेंटजेम्सस्ट्रीट मधील " लिलिस रूम्स " नांवाचा बंगला. या बंगल्यांत पूर्वी बडे लोकांतील बॉल ( नाच ) होत. ( बालमध्यें अनेक स्त्रीपुरुष जमतात. व ज्याला जी स्त्री लभ्य होईल तिजबरोबर जोडी करावी, याप्रमाणें जोड्या तयार झाल्या ह्मणजे सर्वांनीं गाण्यावाजण्याच्या तालावर नाचावें अशी चाल आहे. ) तेथें नामांकित लोकांच्या स्त्रिया अध्यक्ष असत आणि तेथें प्रवेश होण्याकरितां लोक फार यत्न करीत व शिफारशी लावीत.

१० फक्कड कादंबऱ्या—अत्यंत मोहक शृंगार वर्णिलेल्या कादंबऱ्या. ग्रंथकर्त्याचा आशय असा आहे कीं, फक्कड कादंबऱ्यांतील जो शृंगार तो या लोकांची **धर्म-दीप्ति** होय.

" कानांत एकसारखा सुन्न असा अवाज होऊं लागून डोळे जड होऊन
" एक प्रकारची झोंप येऊं लागली; तिला न जुमानतां तसाच नेटानें
" वाचीत बसलों असतां एकाएकीं घेरी येऊन मी बेशुद्ध पडलों ! सरते
" शेवटीं माझ्या शरीरास व बुद्धीस अपाय होऊन प्रकृतीस धोका बसेल
" असें डाक्टर साहेबानीं निक्षून सांगितल्यावरून मनाचा निग्रह करून
" मीं तो नाद सोडला. कोणी परका मनुष्य **ज्यू लोकां**च्या देवळांत
" ढवळाढवळ करूं लागला म्हणजे त्यास एकाएकीं आगीचे गोळे व दुसरे
" कांहीं भयंकर प्रकार दिसून अखेरीस तो नाद त्यास सोडावा लागे
" त्याप्रमाणेंच यांच्याही धर्मपुस्तकांत कांहीं चेटुक तर नसेल ना? काय
" असेल तें असो ! माझ्याकडून होते नव्हते ते प्रयत्न करूनही त्यांत यश
" न आल्यामुळें हें सदरील पंथाचें वर्णन अपुरें राहिलें तर त्याबद्दल मला
" वाचकांनीं क्षमाच केली पाहिजे. हें वर्णन अगदीं अपुरें आहे हें खरें;
" पण असल्या महत्वाच्या गोष्टींत कानाडोळा करणें प्रशस्त नाहीं;
" शिवाय, जेवढी माहिती मला मिळण्यासारखी होती तेवढी मीं मिळविली
" आहे. हेंही कांहीं थोडें नाहीं.

" अर्थात् माझ्या जिवाची व माझ्या शरीराची मला काळजी असल्या-
" मुळें आणखी एखादी **फकड कादंबरी** वाचण्याचें साहस कांहीं झालें
" तरी मी फिरून करणार नाहीं. परंतु ही अडचण दूर व्हावी कशी या
" विवंचनेंत गटंगळ्या खात असतां, बुडत्यास जसा अकस्मात हात
" मिळावा तसा सुदैवानें मलाही मिळून त्यायोगें जरी माझें समाधान
" झालें नसलें, तरी तूर्तातूर्त अडचण दूर झाली आहे यांत शंका
" नाहीं. श्लिशविजन आणि कंपनी इंग्लंडहून नेहमीं कांहीं पुस्तकांचीं
" पार्सलें आणीत असते. त्यांपैकीं एका पार्सलास मळपृष्ठादाखल लपेटलेला
" एक छापील ताव होता. **महंमदी** लोकांना जशी सर्वच पुस्तकांविषयीं
" पूज्यबुद्धि असते तशीच कांहीं अंशीं मलाही असून, प्रसंगवशात् रद्दींत
" काढिलेल्याही कागदांत विलक्षण माहिती मिळण्याचा संभव आहे म्हणून
" असल्या कागदाकडेही मी लक्षपूर्वक पहात असतों. असो; याप्रमाणें त्या
" पार्सलाच्या आंतलें मळपृष्ट पहात असतां त्यांत '**फकड कादंबरी**' या
" विषयावरच एक लेख आहे असें पाहून मला किती अचंबा झाला
" असेल त्याची कल्पना वाचकांनींच करावी. हें पत्र बहुधा एखाद्य

" मासिक पुस्तकाचें असावें असें वाटतें. अर्थात् या कागदांत सदरहू विष-
" याचा विचार केवळ लौकिकदृष्ट्या केला आहे; व त्याचा सर्व रोंख
" या पंथांतील **पेलहॅम** नांवाचा कोणी बडा उपाध्याय व शिक्षक होता
" त्यावर असून त्यांत बराच कडकपणा आहे. एरवीं असल्या कपट्यांत
" छानछोक लोकांच्या पंथाचें सूक्ष्म स्वरूप असण्याचा अगदींच संभव
" नाहीं; व या कागदांत तरी हें त्या पंथाचें स्वरूप स्पष्टपणें वर्णिलें आहे
" असें नाहीं. तथापि स्थळविशेषीं मधून मधून चुटके आहेत. त्यांचा
" होण्यासारखा सर्व उपयोग मीं करून घेतला आहे. इतकेंच नव्हे; एका
" स्थळीं तर या पंथाच्या मताप्रमाणें मनुष्याचें सर्व कर्तव्य कोणचें याब-
" द्दल एका सबंध सूत्राचा किंवा अध्यायाचा उताराही आहे. अर्थात्
" हें कर्तव्यवर्णन प्रत्यक्ष उपाध्यायासारख्या पुरुषानें केलें असल्यामुळें
" फार महत्वाचें असून या विषयाची रजा घेण्याचे अगोदर त्याची माहिती
" जर्मन लोकांस पुढें दिलेल्या सात कलमांनीं करून देणें आह्मांस अगत्याचें
" वाटतें. त्यांतील अर्थासंबधानें कांहीं चूक होऊं नये म्हणून होतां होईल तों
" मूळांतली भाषाच मीं जशीच्या तशी ठेविली आहे.

" **सद्धर्माचीं तत्वें.**

" १. कोटांमध्यें तिकोनी तुकडा बिलकुल उपयोगाचा नाहीं. पण माग-
" च्या अंगास सुरकुत्याही येतां कामा नये.

" २. सर्व पोषाखांत गळेबंद फारच महत्वाचा आहे. तो मागच्या
" आंगास जरा सखल असून किंचित गुंडाळलेला असावा.

" ३. नवीन तऱ्हेची कितीही आवड असली तरी विलासी पुरुषानें
" आपल्या पोषाखांत हाटेंटाट लोकांप्रमाणें उगीच बोंगा वाढवूं नये.

" ४. कोटाचे सोंगे निरुंद असले म्हणजे सोईवार पडतें.

" ५ गृहस्थाचें खरें शहाणपण अंगठ्या घालण्याच्या पद्धतीवरून मात्र
" चांगलें व्यक्त होतें.

" ६. कांहीं अपवाद शिवायकरून मनुष्यानें पांढऱ्या बंड्या घालण्यास
" कांहीं हरकत नाहीं.

" ७. तुमानी ढुंगणावर फारच घट्ट असल्या पाहिजेत.

" या सर्व तत्वांत एकही तत्व आह्मांस मान्य नाहीं; इतकेंच नूतं निखा
" लसपणें **व नम्रपणें** आह्मीं सांगितलें म्हणजे बस आहे.

" या छानछोक लोकांच्या अगदीं विरुद्ध असा दुसरा एक पंथ इंग्लंडांत
" आहे. प्रथम हा पंथ **अयर्लंडांत** उत्पन्न झाला. व अजून त्याचें मुख्य
" ठिकाण तेथेंच आहे. परंतु हा पंथ हल्लीं इंग्लंडांतच काय पण बहुतेक
" सर्वत्रच फार झपाट्यानें फैलावत आहे. या पंथाचीं धर्ममतें अजून प्रसिद्ध
" झालीं नसल्यामुळें तीं मतें कशीं आहेत याची मला माहिती नाहीं. इकडे
" **छानछोक** लोकांचीं धर्ममतें लिहिलीं गेलीं असूनही तीं वाचण्याचें काम
" नुसत्या मानवी शक्तीस साध्य नसल्यामुळें तींही माहीत नाहींत! एकूण
" एकच. परंतु **छानछोक** लोकांच्या या प्रतिस्पर्धी शाखेस देशमानाप्रमाणें
" अनेक नांवें आहेत. इंग्लंडांत त्यांस **बिगारी** अथवा **पांढरे शिद्दी** असें
" म्हणतात. पण त्यांचे प्रतिस्पर्धी त्यांस बहुधा **चिंध्यावाले भिक्षुक** असें
" म्हणतात. स्काटलंडांत त्यांस **चिंध्यांच्या राशी** असें म्हणतात. हीं
" नांवें त्यांस बहुधा त्यांच्या पोषाखावरून पडलीं असतील असें वाटतें.
" आयर्लंडांत तर त्यांचें मूळपीठच असल्यामुळें तेथें त्यांस अनेक नांवें
" आहेत. पण त्या सर्वांत **गरीब गुलाम** हें नांव सर्वमान्य व मुख्य
" असावेंसें वाटतें. बाकीचीं नांवें बहुधा आंतील भेदविशेषामुळें पडलीं
" असावीं; किंवा मूळ खोडापासून निघालेल्या निरनिराळ्या शाखांस
" त्यांच्या विशेष लक्षणांवरून तरी हीं नांवें पडलीं असतील; पण हीं
" विशेष लक्षणें येथें देत बसणें अशक्य आहे. या पंथाच्या मूळ शाखेस
" **गरीब गुलाम** हें नांव असून बाकीच्या सर्व शाखांमध्यें या मूळशाखेचीं
" मतें, रितीभाती, व इतर विशेष धर्म आज जागृत आहेत इतकें सांगितलें
" म्हणजे पुरे आहे.

" या लोकांचीं आध्यात्मिक मतें काय आहेत; ही सृष्टी, मनुष्य, व
" संसार यांचें स्वरूप या **गरीब गुलामांना** कसें काय दिसतें; पुढें **भवि-**
" **ष्यकाळावर**, मागें **भूतकाळावर** व सांप्रतच्या **वर्तमानकाळावर** दृष्टी
" देऊन या लोकांस काय वाटत असेल, वगैरे गोष्टींची फोड करणें आह्मांस
" फारच अवघड आहे. **गरीब गुलाम** पंथाचे बाह्यस्वरूपावरून त्यांचा
" कांहीं फकिरी बाणा असावा असें वाटतें. फकिरी बाण्यापैकीं दोन व्रतें
" ह्मणजे एक **गरीबीचें** व दुसरें **आज्ञाधारकपणाचें** हीं तर **गरीब**
" **गुलामांचे** पंथांत फारच कडकडितपणें पाळतात! विशेषतः गरीबींत
" काळ कंठण्याचे व्रतांत तर ते यत्किंचितही ढळत नाहींत. फार काय, पण

" माझे ऐकण्यांत असें आहे कीं, हीं व्रतें पाळण्याविषयीं जन्माचे अगोदर-
" पासूनच त्यांची तजवीज असते! मग ती कडकाडित शपथा घेऊन होवो
" किंवा कांहीं अन्य प्रकारांनीं होत असो. तिसरें फकिरीचें व्रत म्हणजे
" ब्रह्मचर्य; तें पाळण्यांत मात्र त्यांचेमध्यें विशेष कडकाडितपणा असेल असें
" वाटत नाहीं.

"शिवाय एका गोष्टींत हे लोक **छानछोक** लोकांचें अनुकरण करीत
" असतील असें वाटतें. ती गोष्ट म्हणजे, कांहीं विशेष प्रकारचा पोषाख
" घालण्याची. आयर्लंडांतील **गरीब गुलामांच्या** पोषाखाचें या पुस्तकांत
" वर्णन देण्याचा आमचा विचार होता. परंतु आमच्या या कोत्या भाषेनें
" त्या पोषाखाचें वर्णन करितां येईल असें वाटत नाहीं. त्यांचे पोषाखास
" अनंत पदर, सोगे, व चीण असून हे प्रकार अमक्याच ठिकाणीं अस-
" तात असें नाहीं; शिवाय त्या पोषाखांत किती प्रकारचीं व किती रंगाचीं कापडें
" असावीं याचेंही कांहीं अनुमान आह्मांस करितां येत नाहीं. या पोषा-
" खांत इतकीं भोंकें व दारें असतात कीं कोणत्या मार्गानें त्या पोषाखांत
" आंग घालीत असतील याचा तर्कही करितां येत नाहीं. हे कपडे आंगा-
" वर टिकण्याकरितां अनेक प्रकारचीं बटनें, गुंड्या, बंद व सोग्यांच्या गांठी
" असतात. किंवा कधीं कधीं वर एक कातड्याचा किंवा तागाचा किंवा
" गवताच्या दोरीचा कंबरपट्टा असतो. गवताच्या वेटा ( दोरी ) वर यांची
" विशेष भक्ति असावी असें वाटतें. कारण जसे योगी लोक खडावा घालि-
" तात तसे हे लोक पायांतही गवताचेच जोडे घालितात. डोक्याच्या
" पोषाखांत मात्र त्यांच्यांत अनेक तऱ्हा आहेत. कांहीं टोप्यांचे कांठ अर्धेच
" असतात. कांहींस कळस नसतात व असलेच तर सैल, किंवा बिजागऱ्यांनीं
" बसाविलेले, किंवा नुसत्या कापडाच्या पड्याचेच असतात. कांहीं
" लोक टोपी उरफाटीच घालितात; ती युनिव्हरसिटींतील मुलांच्या टोपी
" सारखी दिसते.

" या लोकांचें **गरीब गुलाम** या अर्थाचें नांव मूळ बहुधा स्लेव्होनिक,
" पोलिश किंवा राशियन भाषेंतून आलें असावें असें वाटतें. परंतु त्यांच्या
" वर्तनाचें साम्य या तिन्ही देशांतील लोकांच्या वर्तनाशीं नसून पूर्वी इंग्लं-

“ डांत जे रानटी लोक असत त्यांच्या ड्रुइड नांवाच्या उपाध्यायांच्या
“ आचरणांशीं कांहीं थोडेंसें साम्य असावें असें वाटतें. कोणास वाटेल कीं
“ हे लोक पृथ्वीपूजक असावे; कारण ते नेहमीं खाणींतील खोदकाम
“ करीत असून तें काम ते बहुधा पृथ्वीच्या पोटांत मोठ्या श्रद्धेनें करीत
“ असतात. किंवा एकांतांत खाजगी गुहांत बसून या पृथ्वीपासून मिळालेल्या
“ पदार्थांचे प्रयोग करून पाहतात. त्यामुळें वर स्वर्गाकडे दृष्टि जाऊन
“ तेथील दिव्य तेजानें प्रकाशणारे ग्रह, नक्षत्रें, तारे, वगैरे कधीं त्यांच्या
“ दृष्टीस पडत असले तरी फारच क्वचित्; व तेव्हांही ते तिकडे काना
“ डोळाच करितात. ड्रुइड लोकांप्रमाणेंच हे लोक अंधारांत राहतात.
“ कधीं कधीं तर त्यांचे घरांस कांचेच्या खिडक्या असल्या तरी त्या फो-
“ डून त्यांत चिंध्या वगैरे भरून हवा तितका अंधार होईल असें करितात.
“ शिवाय सर्व सृष्टिपूजकांप्रमाणें त्यांनाही कधीं कधीं विलक्षण चेव येऊन
“ ते अति क्रूरपणाचींही कामें करितात व मग सुधारलेल्या लोकांप्रमाणें
“ पुरुषविशेषांचीं चित्रें[१२] करून न जाळतां प्रत्यक्ष जिवंत माणसांनाच ते
“ त्यांच्या झोंपड्यांतून जाळितात !

“ खाण्यापिण्याचे संबंधानेंही या लोकांत विशेष प्रकारचे आचार आहेत.
“ **गरीब गुलाम** पंथाचे सर्व लोक कंदमुळें खाणारे आहेत. कांहीं थोडे
“ लोक मात्र मत्स्याहारी असून हेरिंग नांवाच्या माशाचा ते उपयोग कारि-
“ तात. याशिवाय दुसरें मांस ते खात नाहींत. परंतु मेलेल्या जनावरां-
“ विषयीं **ब्राह्मणांची** जी समजूत आहे तसलीच पण उरफाटी समजूत[१३]
“ यांच्यांत असून मिळाल्यास ते मेल्या जनावराचेंही मांस खातात. त्यांचे
“ नेहमींचें खाणें ह्मणजे बटाटा या नांवाचे कंद होत. हे कंद ते भाजून खातात.
“ त्यांस नेहमींचा मसाला वगैरे कांहीं ठाऊक नसून ‘ **दर्शन**[१४] ’ नांवाचा

---

११ ड्रुइड--युरोपांतील गॉल प्रांतांत प्राचीन काळीं औपाधिक करणारे लोक होते ते. यांचे औपाधिक व्यवहार किर्रर्र् झाडींत होत.

१२ युरोपियन लोकांत एखाद्याविषयीं अति द्वेष व तिटकारा प्रकट करावयाचा असल्यास त्याचा पुतळा ( एफिजी ) करून जाळण्याचा प्रचार आहे.

१३ मेलेल्या प्राण्यास शिवूं नये अशी ब्राह्मणांची समजूत आहे. तिच्या उलट म्हणजे मेलेला प्राणी सांपडला तर मुद्दाम घेऊन तो आनंदानें खावा अशी समजूत.

१४ दर्शन–मिठाचें रिकामें भांडें दुरून “ पाहून ” येणारा स्वाद.

" एक अज्ञात मसाला मात्र ते या बटाट्यांस लावितात; हा पदार्थ कसा
" असतो याची चौकशी मीं बरीच केली परंतु अजून मला त्याचा पत्ता
" लागला नाहीं. दूध हें या लोकाचें अति सौम्य पेय असून, पाटीन
" नांवाची अति जलाल दारूही ते घेतात[15]. ही दारू व इच्या सारखींच
" दुसरींही कांहीं जलाल मद्यें ते घेतात तीं मीं पाहिलीं आहेत, अर्थात्
" या मद्यांत **अलकोहोल** नांवाचा मादक पदार्थ फार असून हीं मद्यें
" जणूं काय पातळ आगच, याप्रमाणें जाळीतच घशांत जातात. या
" लोकांच्या सर्व धर्मकार्यांत ही पाटीन नांवाची दारू अत्यंत आवश्यक
" असून तिचा खपही फार होतो.

" अयर्लंडांतला एक वाटसरू आम्हांस भेटला होता; तो साधारणपणें
" विश्वास ठेवण्यासारखा असावा असें वाटतें. त्यान आपलें नांव **माजी-
" जॉनबरनार्ड** आहे असें आम्हांस सांगितलें. अर्थात् या नांवाचा अर्थ
" आम्हांस अगदींच उमगत नसून हें कांहीं तरी टोपण नांव घेतलेलें
" असावें असें वाटतें. असो; या गृहस्थानें एका घराचें वर्णन दिलें आहे
" त्यावरून या घरांतील लोक **गरीबगुलाम** पंथांतलेच असावे असें वाटतें.
" हें वर्णन वाचलें तर आमच्या जर्मन वाचकांस **गरीबगुलाम** मनुष्य
" प्रत्यक्ष पाहिल्यासारखें होईल. शिवाय, वर सांगितलेल्या मळपृष्ठांत
" छानलोक लोकांच्या गृहस्थितीचेंही वर्णन त्यांच्या उपाध्यायांनीं दिलेलें
" आहे. हीं दोन्ही वर्णनें आम्ही लोकांपुढें ठेवितों. वाचकांनीं स्वतःच
" त्यांची परस्पर तुलना करावी म्हणजे झालें.

" प्रथम गरीब गुलामांच्या घराचें वर्णन देऊं. या घराचा मालक कोणी
" खाणावळवाला असावा असें वाटतें. हें वर्णन आह्मीं जशाचें तसेंच, कांहीं-
" एक फेरबदल न करितां देतों.

### " गरीब गुलामांचे गृहांतील अंतःस्थिती.

" या भटारखान्यांत एक मोठें थोरलें लोखंडाचें पातेलें, दोन रायवळ
" लांकडाचीं टेबलें, दोन बाकें, दोन खुर्च्या, व एक पाटीन नांवाच्या

१५ उष्ण पेयें यूरोपांत कांहीं अंशीं अवश्य आहेत. पण गरीब लोक मादक दारूच पितात. याचें कारण त्यांस आपल्या दुःस्थितीचा विसर पडण्यास दारूच्या अमलावांचून दुसरें स्वल्प साधन नाहीं; आणि हें दुःख तर उघड्या डोळयांनीं सोसण्याला चांगलेंच मानसिक धैर्य लागतें.

" दारूचें भांडें होतें. वर एक माळा होता. त्यावर जाण्यास शिडीनें वाट
" होती. माळ्यावर घरांतलीं माणसें निजत. खालच्या जागेंत कूड घालून
" दोन खोल्या केल्या होत्या. एकींत गाय व डुकरें बांधीत. दुसरींत ते व
" पाहुणेरावळे बसत. आह्मीं आंत गेलों तों घरांतील अकरा माणसें एका
" मोठ्या टेबलावर जेवीत होतीं. अग्रस्थानीं घरधनी बसला असून दुसऱ्या
" टोंकास त्याची बायको बसली होती. मुलें दोन्ही आंगांस बसलीं होतीं.
" त्या टेबलास मध्यभागीं भाजलेले बटाटे ठेवण्याकरितां एक बळद
" खोदला होता; व अंतराअंतरावर मिठाकरितां लहान लहान खळग्या
" पाडिल्या होत्या. एक दुधाचा पेला मात्र टेबलावर होता. बाकी जेव-
" णांतील प्रकार ह्मणजे मांस, दारू, भाकर, त्याचप्रमाणें सुऱ्या, चमचे,
" कांटे, ताटल्या वगैरे कांहींच नव्हतें. आमचा वाटसरू सांगत होता कीं
" घरधनी **गरीब गुलाम** हा खूब रुंद पाठीचा, रंगानें काळसर भुरका, व
" खूब सशक्त असून त्याचें तोंड एका कानापासून तों थेट दुसऱ्या काना-
" पर्यंत पसरलेलें होतें. घरधनीण जरी उन्हानें काळवंडली होती तरी
" चांगली बांधेसूद व नीटनेटकी होती. लहान मुलें **उघडीं** व गुटगुटित
" असून खाण्याकरितां हापापल्यासारखीं दिसत, असें आमचा वाटसरू
" सांगत होता. त्यांच्या तत्वविचारांबद्दल किंवा धर्ममतांबद्दल व आचारां-
" बद्दल त्यानें अवाक्षरही काढिलें नाहीं.

" आतां या वर्णनाचे जोडीला छानछोक लोकांची गृहव्यवस्था पहा.
" यांत वर लिहिलेले उपाध्याय स्वतःच रहात असतात.

### " छानछोक मनुष्याच्या घरांतील अंतर्व्यवस्था.

" एक उत्तम पोषाख करण्याची खोली असून तींत टेबलें, खुर्च्या,
" आरसे वगैरे सर्व सामान भरपूर व उत्तम प्रकारचें; निळ्या रंगाचे पडदे
" सोडलेले; गादीच्या खुर्च्या व इतर बैठकी; दोन सहा सहा फूट उंचीचे
" आरसे एका उत्कृष्ट टेबलाच्या दोहों आंगांस असून त्या टेबलावर सर्व
" प्रकारची उंची **प्रसाधन**[१६] सामुग्री ठेवलेली असते. दुसऱ्या एका लहान
" शिंपल्याच्या टेबलावर अनेक सुवासिक द्रव्यांच्या कुप्या खुबीदार रीतीनें
" मांडलेल्या असतात. या टेबलासमोर स्नानाचीं उपकरणीं उत्कृष्ट
" चांदीचा मुलामा दिलेलीं व्यवस्थेनें मांडून ठेविलीं असतात. जवळच

१६. अत्तरें कंगवे वगैरे छानछोकीचें सामान.

" डावे अंगास एक अति उंची लाकडाचें कपडे ठेवण्याचें कपाट असून त्याचें
" एक दार अर्धवट उघडलेलें असल्यामुळें आंतील उत्तम उत्तम पांघरु-
" णांची रेलचेल पाहणारास सहज दिसते. त्या कपाटाच्या खालच्या
" खणांत विलक्षण नाजुक आकृतीचे जोडे ओळीनें लावून ठेविले आहेत.
" या कपाटापुढेंच समोरच्या दारांतून हमामखान्यांतील (स्नानगृहांतील)
" सुंदर देखावा थोडीशी झांक मारीत आहे. मागल्या अंगास एक घडीचें
" कवाड असून त्यांतून हे **स्मृतिकार** (आह्मीं वर सांगितलेले उपाध्याय)
" येत आहेत. त्यांच्या खिजमतीस एक फ्रेंच हुजऱ्या अंगांत रेशमी
" जाकीट व त्यावरून नकशीदार पांढरा सफेत व पातळ कापडाचा कोट
" घालून समोर चालत आहे"—येणेंप्रमाणें छानछोक मनुष्याच्या नुसत्या
" दिवाणखान्याचें वर्णन आहे.

" इंग्लंडांत अगोदरच मतवैचित्र्याचा सुकाळ असून तशांतच ज्या
" लोकांचीं मतें ठाम नाहींत त्यांत हे दोन पंथ शिरून सर्व समाजांत गोंधळ
" करीत आहेत. त्यांचा एकमेकांशीं असलेला वैरभाव व द्वैत पाहून दूरद्रष्ट्या
" राजनीतिज्ञांस वाईट वाटतें. आतां एवढें खरें, कीं आत्मपूजन किंवा
" कलिपूजन करणारे **छानछोक** लोक आणि पृथ्वीपूजन करणारे हे **गरीब-**
" **गुलाम**लोक यांचे पंथ नुकतेच विकास पावूं लागले असून अद्याप त्यांचा
" विस्तार फारसा वाढला नाहीं. परंतु त्यांचीं मुळें सगळ्या समाजभर
" खोल गेलीं असून त्यांचीं आंत भक्कम जाळीं बनलीं आहेत; आणि त्यांचे
" योगानें सर्व इंग्लिश समाजांत एकमेकांशीं व्यवहार न ठेवणारे व परस्पर
" विरोधी असे लौकरच दोन तट होतील.

" संख्येच्या मानानें व शक्तीचे मानानें पाहिलें असतां **गरीब गुलाम**
" पंथाचा विस्तार प्रतिक्षणीं वाढत आहे. इकडे **छानछोक** पंथाकडे पाहिलें
" तर त्यांतले लोक परक्यांस आपल्या गोटांत घेण्याविषयीं इतके तत्पर
" नसतात. त्यांस आपल्या जातकुळीचा मोठा अभिमान असून आपसांत
" त्यांची एकी आहे. इकडे **गरीब गुलामांत** तट असून त्यांच्यांत अजून
" म्होरक्या किंवा प्रवर्तक कोणी नाहीं. त्यांच्यांत एकोप्यानें जीं कामें
" होतात तीं बहुधा लहान लहान गुप्त शाखांचे मार्फत चालतात. आह्मीं
" सांगितलेल्या संतसभेप्रमाणें **गरीब गुलामांची**ही जर एक संस्था झाली तर
" त्यापासून किती विलक्षण गोष्टी होतील बरें! सांप्रत या **गरीब गुलामांचा**

" धिःकार करून त्यांस जो तो तुच्छ मानितो. परंतु तुच्छवत होऊन " खालीं मान घालावी कोणीं व प्रौढीनें वर करावी कोणीं याचा निकाल " लागण्याची वेळ अगदीं नजीक येऊन ठेपली आहे असें वाटतें.

" या दोन परस्पर विरुद्ध पंथांच्या दरम्यान इतर बहुतेक लोक आहेत; " पण हळू हळू ते यापैकीं कोणच्याना कोणच्या तरी पंथास मिळून " अखेरीस **छानछोक लोक** व **गरीब गुलाम** यांशिवाय माणूस नाहीं " असें होऊन पुढें एके दिवशीं इंग्लंडांत हे दोघे परस्पर विरोधी तट मात्र " राहतील असें मला वाटतें. **ख्रिस्ती** व **विधर्मी छानछोक** लोक सारे " एका पंथांत जमतील; तसेंच दुसरीकडे **ख्रिस्ती** व **विधर्मी** काबाडकष्ट " करणारे लोक सारे **गरीब गुलामांचे** पंथांत जातील. मग **परिणामवादी** " **नीतिवेत्ते, निःसीम पंथाचे सुधारक,** नाखुष असलेले **कढईवाले**[१७] " यांचा भेद झाडून सर्व नाहींसा होऊन सर्व एकरूप होऊन **गरीब गु-** " **लामांचे** पंथांत शिरतील! **छानछोकपणा** व **गरीब गुलामपणा** हे " जसे कांहीं दोन अथांग व आधणाच्या पाण्यानें सळसळणारे भोंवरेच " आहेत असें मला वाटतें. सांप्रत ते या कठीण पृथ्वीच्या दोन विरुद्ध " टोंकांस उत्पन्न झाले असून जरी त्यांस भयंकर कढ येतात तरी ते मनु- " ष्याच्या चातुर्यावरणाखालीं दडून असल्यामुळें विशेष दृष्टोत्पत्तीस येत " नाहींत. परंतु नीट लक्ष लावून पाहिलें असतां त्यांचा विस्तार दिवसें- " दिवस वाढत चालला आहे असें दिसेल. हे केवळ दोन पोकळ कोन " पृथ्वीच्या पोटांत रसरसत असून आपणांस भरींव वाटणारी ही पृथ्वी " जणूं काय पापोद्न्यासारखी त्यावर झांकण आहे. व दरम्यानची जमीन " दिवसेंदिवस आंत ढांसळून या राक्षसी भोंवऱ्यांचा विस्तार क्रमाक्रमानें " वाढत जाऊन आज केवळ त्या दोघांमध्यें जमिनीची नुसती पडदी मात्र " राहिली आहे. हीही हळू हळू धुपून जाऊन कल्पांतसमयाच्या सर्वभक्षक " महापुराप्रमाणें हे दोन्ही भोंवऱ्यांतील सळसळीत पाणी सर्व मनुष्यजाती- " चा स्वाहाकार करील!

" किंवा या दोन्ही पंथांस मिळून एकाद्या अवाढव्य व अश्रुतपूर्व **विद्यु-**

---

१७ कढईवाले—१८३२ च्या रिफार्म बिलाचे अगोदर आपण स्वतंत्र धंदा करणारे आहों असा बहाणा करून पार्लमेंटांत मेंबर निवडून देण्याचे कामीं मत देण्यास हक्क यावा म्हणून कांहीं लोक आपल्या बरो ( गांव ) च्या हद्दींत दारू उतरण्याची एखादी कढई तात्पुरती ठेवीत.

" **द्राहक** (पान ५४) यंत्राचीच उपमा जास्त समर्पक होईल हें यंत्र चालविणारी
" शक्ती म्हणजे हा समाज होय. गरीब **गुलामपंथाचें** तत्व ही त्यांतील **ऋण-**
" **विद्युत्** होय. व **छानछोकबाजीचें** तत्व ही धन**विद्युत्** होय. यांपैकीं एका
" ध्रुवाचें काम राष्ट्रांत **पैशाचें** रूपानें उत्पन्न होणारी सर्व **धनविद्युत्** प्रति-
" क्षणीं आपणांकडे ओढून घ्यावी हें आहे. व दुसऱ्याचें काम भुकेच्या स्वरूपानें
" उत्पन्न होणारी राष्ट्रांतील सर्व **ऋणविद्युत्** ओढून घ्यावी हें आहे. ही ऋणवि-
" द्युत् कमी शक्तीची आहे असें नाहीं. आजपर्यंत या दोन प्रकारच्या विजांच्या
" संयोगानें फार सूक्ष्म ठिणग्या निघून तात्पुरते धक्के मात्र बसले. परंतु
" कांहीं काळ जाऊन हें सर्व राष्ट्र विद्युन्मय झालें ह्मणजे काय चमत्कार
" होतो पहा. मग राष्ट्रांतील **प्राणविद्युत्** हल्लींप्रमाणें धनऋण मिश्रित न-
" सल्यामुळें स्वस्थ राहणार नाहीं. तींतील **धन** व **ऋण** भाग ह्मणजे **द्रव्य**
" व **भूक** हीं अलग अलग होऊन दोन **ब्याटरी** प्रमाणें या सर्व जगाचा
" ग्रास करण्यास सज्ज होतील; व मग एका पोराचें नुसते बोट हालून
" जरी त्यांचा संयोग झाला तरी काय विचारावयाचें आहे! मग ही पृथ्वी
" छिन्नभिन्न होऊन कल्पांतसमयाप्रमाणें गडगड आवाज होऊन त्या ध-
" क्क्यानें एकदम नाहींशी होईल; व आपल्या भोंवतीं फिरत असलेल्या ग्रह-
" मालेपैकीं एक ग्रह अजीबात काय झाला असें सूर्यास होऊन मग **चंद्राचीं**
" **ग्रहणें**ही बंद होतील! किंवा याहीपेक्षां जास्त समर्पक उपमा पाहिजे
" असल्यास—"

बस, बस; आतां या उपमा व रूपकें नकोत! या उपमांच्या व रूप-कांच्या फाजीलपणाचा दोष ट्यूफेल्सड्राक साहेबांकडे आहे, कां आह्मी त्यांचे वेंचे देतों म्हणून आम्हांकडे आहे हेंही कांहीं कळत नाहीं.

ट्यूफेल्सड्राक साहेबांस आपल्या ग्रंथांत विनाकारण पाल्हाळ करून व्यर्थ चऱ्हाट लांबवीत बसण्याची संवय आहे, हें आम्हीं मागें अनेक वेळ सांगितलें आहे. ज्या त्या गोष्टीस धर्माचें स्वरूप देऊन त्याचें गूढपण वाढविण्याची त्यांस खोड आहे हें अव्वलपासूनच आपणांस ठाऊक झालें आहे. पण या व्यंगामुळें ट्यूफेल्सड्राक साहेबांच्या तरतरित दृष्टीस या **छानछोक** लोकांसंबंधाच्या भागांत जितका उणेपणा आला आहे तितका अन्यत्र कोठेंही आला नसेल. पण या त्यांच्या लिहिण्यांत कांहीं निराळाच खोल इंगितार्थ तर नसेल ना? आपले अंतर्दृष्टि प्रोफेसरसाहेब या भागांत स्वतः-

च्या अंधळेपणाची जितकी बतावणी करितात तितकी सर्व खरी असेल काय ? सामान्य मनुष्याची गोष्ट असती तर हा अंधळेपणा खरा धरण्यास कांहीं हरकत नव्हती. पण ट्यूफेल्सड्राक साहेबांसारख्या मनुष्यासंबंधानें निखालस असें कांहींच सांगतां येणार नाहीं. जर हें लिहिणें इंगितार्थक असलें तर कांहीं तरी बरें म्हणावयाचें ! कारण मग कांहीं लोक तरी असें म्हणणारे भेटतीलच कीं "हे तुमचे ट्यूफेल्सड्राक साहेब आम्हां वाचकांस अगदीं मूर्खच समजतात कीं काय ? त्यांनीं डाव केला पण तो साधला नाहीं. या लिहिण्यांतील त्यांचा इंगितार्थही आम्हांस कळला व तुमच्या प्रोफेसर साहेबांचें थोडेंसें अंतःस्वरूपही कळलें ! हाच अर्थ ते उघड सांगते ह्मणजे समजतें कसें काय आहे तें ! "

---

# भाग अकरावा

## शिंपी

याप्रमाणें **वस्त्ररहस्या**पासून व्यवहारांतील एका गोष्टीसंबंधानें निघणाऱ्या अनुमानाबद्दल निदर्शन झालें. छानछोक लोकांसंबंधानें इतकें विवरण बस आहे. आतां आपल्यापुढें **शिंप्यांचा** वर्ग आहे त्याविषयीं विचार करूं. या संबंधांत ट्यूफेल्सड्राक साहेबांचें व आमचें मत एकच आहे ही फार समाधानाची गोष्ट आहे; आणि एवढ्याच करितां या संबंधाचा त्यांचा लेख आह्मी मोठ्या खुषीनें देतों. आजपर्यंत आह्मी ट्यूफेल्सड्राक साहेबांचीं मतें गोषवाऱ्यानें देत आलों. पण आतां ग्रंथसमाप्तीचे वेळीं त्यांनींच स्वतः बोलावें, हें बरें.

ते लिहितात " **शिंपी** लोकांस मनुष्यत्वाचे खरे हक्क मिळून मानवी
" कुटुंबाची ही शेंवटची जखम भरून निघण्यास निदान शेंसवाशें वर्षें
" अजून लोटलीं पाहिजेत; व त्याही अवधींत त्यांच्या स्वातंत्र्याकरितां
" निकराचीं युद्धें होऊन बरेंच उत्कृष्ट मोहोरे लढाईच्या तोंडाशीं पडावे
" लागतील; अनेक सिंहासनें उलथीं पालथीं व्हावीं लागतील; व अनेक
" सत्पुरुष बळी पडून दुष्टांचें उपशमनही व्हावें लागेल. जगाच्या अंधळे-
" पणाचें एखादें उदाहरण पाहून जर कोणास नवल वाटण्यासारखें असेल

" तर क्षणभर तोंडांत बोट घालून विस्मय करण्यासारखें हें एक स्थळ
" आहे. कोणी बिचाऱ्यानें कल्पना काढिली असेल न जाणो ! पण ती
" चोहोंकडे पसरून आतां पक्क्या लोकभ्रमाचे पंक्तीस येऊन बसली
" आहे. ती ही कीं प्राणिशास्त्रदृष्ट्या पाहिलें असतां **शिंपी** हा पूर्ण मनुष्य
" नसून अंशतः मात्र मनुष्य आहे ! एखाद्याला **स्नायडर ह्मणजे शिंपी**
" ह्मणणें ह्मणजे एक चीड झाली आहे ! **शिंप्यासारखा** ह्मणजे पुरुषत्व-
" हीन असा अर्थ झाला आहे. इंग्रजी भाषेंत तर नऊ शिंपी ह्मणजे एक
" मनुष्य असें एक कोष्टकच आहे. एलिझाबेथ राणीला अठरा शिंप्यांनीं
" अर्ज केला असतां त्यांचें स्वागत करितांना " यावें, गृहस्थद्वय " असें
" तिनें ह्मटल्याबद्दल तर दप्तरीं दाखला आहे. हीच पराक्रमी राणी आ-
" पल्या मादी रिसाल्यापैकीं **शिंप्यांच्या** रिसाल्यास उद्देशून ह्मणे कीं,
" " या घोडेस्वारांच्या पलटणींतील एक घोडा किंवा एक स्वारही कधीं
" जखमी होण्याची भीति नाहीं ! " याप्रमाणें ही कल्पना लोकांचे मनांत
" सर्वत्र ठाम बसून गेली आहे.

" तथापि ही कल्पना खरी मानितां येईल कीं नाहीं असा कोणा प्राणि-
" शास्त्रवेत्त्यास प्रश्नच केला पाहिजे असें नाहीं. **शिंप्यांसही** त्यांच्या
" कपड्याखालीं अस्थि, शिरा, व शिवणकामांत उपयोगास न येणारे स्नायू
" सुद्धां आहेत, एवढें गृहीत धरण्यास कांहीं हरकत आहे काय ? मनुष्याच्या
" कामांपैकीं **शिंप्यांस** करितां न येण्यासारखें असें कोणचें आहे ? **शिंपीही**
" देण्याबद्दल जप्ती आणित नाहींत काय ? बहुतेक देशांत **शिंपीही** सर-
" कारास कर देत नाहींत काय ?

" आमचें मत काय आहे, याविषयीं या ग्रंथाचे वाचकांस संशय असणें
" अशक्य आहे. हा ग्रंथ लिहिण्याकरितां जीं आम्हीं आजपावेतां जागरणें
" केलीं, व आटोकाट प्रयत्न करून माहिती मिळविली ती जर अगदींच पाण्यांत
" जाणार नसली तर या कामीं सत्याची कड धरणें लोकांस केव्हांना केव्हां
" तरी भाग होईल. इतकेंच नव्हे तर शिंपी हा केवळ मनुष्यच नसून
" **प्रतिसृष्टिकर्ता** किंवा **विश्वकर्मा** आहे हें **स्विफ्टनें** अंतर्ज्ञानानें म्हटलेल वच-

१ जोनाथन स्विफ्ट—( १६६७—१७४५ ) हा अॅन राणीचे वेळीं टोरी पक्षांत ( पु० १ भाग २ टीप १ ) प्रमुख मुत्सद्दी होता. "गलिवरचा वृत्तांत" नांवाची कादंबरी यानेंच लिहिली. ही कादंबरी लिहिण्याचा उद्देश अन्योक्तीनें मनुष्य स्वभावांतील व्यंगोद्घाटन करावें असा होता.

' नही लोकांचे प्रत्ययास येईल. **फ्रँकलिननें** देवेंद्राचें वज्र व नरेंद्रांचे राज-
" दंड हिसकावून घेतले असें म्हणण्याचा परिपाठ आहे. पण यावर माझा असा
" प्रश्न आहे कीं, जो हिरावून घेतो तो मोठा, कां जो बक्षीस देतो तो
" मोठा ? कारण मनुष्यांस **शिंप्यानें** नुसते अंगरखेच दिले नसून त्यांस
" त्या अंगरख्याबरोबर श्रेष्ठपणा व कांहीं अतर्क्य सत्ता हींही त्यानेंच
" दिलीं आहेत. इतर व्यक्तिविषयक गोष्टी जरी एकीकडे ठेविल्या तरी
" नग्न मनुष्यांस **वस्त्रें** घालून त्यांस **समाजाचें** रूप आणिल्यानें आमचीं
" **संस्थानें** बनलीं, **राष्ट्रें** झालीं व सर्व मनुष्यजातच परस्परांस हातभार
" लावूं लागली हें इतकें कृत्य कोणाचें ? **शिंप्याचेंच** नव्हे काय ?
" आणि ही प्रत्यक्ष निराळीच सृष्टिरचना नव्हे काय ? पण हेंही असो.
" सर्व **कवी, स्मृतिकार,** व **ऋषी,** हेही एक प्रकारचे शिंपीच नव्हत
" काय ? आणि या श्रेष्ठ पुरुषांस उद्देशून त्यांचेपैकींच एका श्रेष्ठ पुरुषानें
" काय म्हटलें आहे तेंही पहा. "मनुष्याकारितां देवांस कवींनींच उत्पन्न
" केलें नाहीं काय[3] ? कवींनींच देवांस स्वर्गांतून खालीं आणून , व आप-
" णास वर चढवून दोघांची गांठ घालून दिली नाहीं काय ?

" तोच हा शिंपी ! बिचारा खालीं मान घालून आपल्या दुकानाच्या
" कठीण आधारावर काळ कंठित असतां त्याला तुच्छ करून त्याला हें जग
" इतर माणसांपेक्षां नऊपटीनें कमी मानितें ना ? पण बाबारे, आजपर्यंत
" तुझी कितीही अवहेलना झाली असली तरी आतां तूं वर मान कर;

---

२ बेंजामिन फ्रांकलीन ( १७०६---१७९० ) एक अमेरिकन देशभक्त व अर्वाचीन कालांतील अति विख्यात तत्ववेत्ता. हा बोस्टन येथील साबण व मेणबत्या करणाऱ्या एका दरिद्री मनुष्याचा मुलगा. त्यास शिक्षण फक्त दहावे वर्षापर्यंतच मिळालें. पुढें कांहीं दिवस तो स्वदेशीं व इंग्लंडांत छापखान्यांत रोज मजुरी करून होता. मग त्यानें स्वतंत्र छापखाना काढिला, फिलॅडेल्फिया येथें प्रथम वाचनालय स्थापन केलें, विम्याचे दफ्तर काढिलें व दुसरी कित्येक लोकोपयोगी कामें केलीं, विद्युत्संबंधीं कांहीं शोध लाविले; अमेरिकेचें स्वातंत्र्य स्थापण्याचे कामीं फार मेहनत घेतली व जार्ज वाशिंगटन सारख्यांकडून धन्य ह्मणवून घेतलें. यानें लिहिलेल्या ग्रंथांत " गरीब रिचर्डचे अडाखे " फार प्रसिद्ध आहेत. त्यांत अर्थशास्त्रांतील सिद्धांत फार सोप्या व चित्तवेधक रीतीनें सांगितले आहेत. फ्रँकलिननें आकाशांतील वीज व घर्षणजन्य वीज एकच आहे असें सिद्ध केलें. ही गोष्ट पतंग उडवीत असतां त्याचे लक्षांत आली.

३ कवी देवांचेही कर्ते—रामदास,

" आणि आशेच्या पाणीदार डोळ्यांनीं वरतीं पहा. आतां लौकरच तुझा
" माथा उजळ होण्याचीं सुचिन्हें दिसत आहेत. आजपर्यंत पायावर पाय
" घालून शिवणकाम करीत सारखें बसल्यानें तुझ्या पायांस घट्टेही पडले
" आहेत! धन्य तुझी! एखाद्या साधूप्रमाणें स्वर्गांतील दिव्य सुखें या
" कृतघ्न जगास मिळवून देण्याकरितां तूं एकसारखी ही एक प्रकारची तप-
" श्चर्याच करीत आहेस. आतां धीर धर. या वादळांतून स्वच्छ निळ्या
" आकाशाची छटा दिसूं लागली असून, अज्ञानतिमिर आतां लौकरच
" नाहींसा होऊन ज्ञानसूर्याचें तेज चोहोंकडे फांकेल; व मग आजपर्यंत
" सांचलेल्या उपकारांची फेड हें जग तुला सव्याज करील! लोक आज
" तुला हंसत आहेत तेच पुढें तुझी पूजा करितील. आज तुला मनुष्याचा
" अंश असें समजतात तेच पुढें तूं पुरता मनुष्यच नव्हेस तर त्याहून कांहीं
" तरी अधिक आहेस असें मानितील. आणि **शिंपी** हा केवळ सामान्य
" पुरुष नसून **पुरुषश्रेष्ठ** किंवा **देव** आहे असें लोकांस कळून मोठा वि-
" स्मयही होईल.

" **मक्केच्या कब्यावर** घालण्याकरिता **सुलतानसाहेब** दरसाल एक
" भरजरी कफन पाठवीत असतात. हें कफन शिवण्याकरितां **सेंटसोफा-**
" **याचे** नमाजग्यांत चोवीस शिंपी लागले असतां मी जवळच उभा होतों.
" तेव्हां माझ्या मनांत एकाएकीं आलें कीं, **अरबस्तानांतल्या** या दगडाप्रमाणें
" किती तरी अपवित्र पदार्थ या शिंप्यांच्या कलेनें पवित्र करून
" सोडिले असतील!

"परंतु एकदां स्कॉटलंडांतील एडिंबरो शहरांत एका गल्लीचा कोंपरा वळून
" जात असतां एका दुकानावर " **राजेसाहेबांची विजार शिवणारा** "
" अशीं अक्षरें लिहिलेली एक मोठी थोरली पाटी माझ्या नजरेस पडली,
" तेव्हां माझ्या मनाची स्थिति वरच्यापेक्षांही जास्तच विलक्षण झाली.
" त्या पाटीवर विजारीचें एक चित्र असून त्याच्या दोन्ही गुढघ्यांच्या
" मधल्या जागेंत " **हें पहा स्वर्गद्वार** " हें वाक्य होतें. हें वाक्य लिहि-
" णारा शिंपी या सक्तमजुरींत राहूनच आपल्या मुक्ततेकरितां ईश्वराचा
" धांवा करीत 'देवा! विजारीची योग्यता लोकांस कळून **कात्रीला** बहु-
" मान मिळेल असा सोन्याचा दिवस दाखीव,' अशी आपल्या मनांत
" प्रार्थना करीत असेल नाहीं बरें!

" व हा त्याचा धांवा ईश्वरानें ऐकिला असेंही कदाचित् ह्मणतां येईल.
" कारण, मनुष्याच्या आत्म्यास विकास पावण्यास ज्या आडकाठ्या अस-
" तात त्या अशा समयास दूर होऊन त्यास दिव्य कल्पनांची स्फूर्ती
" अशाच वेळेस होते. त्याप्रमाणेंच या वेळेस माझी स्थिति होऊन हा
" **वस्त्ररहस्य** ग्रंथ लिहिण्याचा संकल्प मीं त्या शिंप्याच्या दुकानासमोर
" असतांच केला. असला दुसरा ग्रंथ मला लिहितां येईलसें वाटत नाहीं.
" कारण, याच ग्रंथांत माझें बरेंच आयुष्य गुदरलें असून पुढेंही आणखी
" बरेंच गुदरेल असें वाटतें. त्या ग्रंथाचा हा उपक्रम व सोपा भाग असून
" याची समाप्ती मी येथेंच करितों.

---

# भाग बारावा.



## अखेर निरोप.

याप्रमाणें टच्यूफेल्सड्रॉक साहेबांनीं आपल्या मर्त्य बांधवांकरितां जो हा अगाध ज्ञानरत्नाकर निर्माण केला आहे त्यांतून उत्कृष्ट उत्कृष्ट मोत्यां-चे शिंपले काढून लोकांस सादर करण्याचें काम बनलें तसें आजपर्यंत आह्मी करीत आलों. हें मोठें कष्टाचें काम होतें; व याबद्दल आह्मांस शाबासकी मिळेल कीं नाहीं याचीही वानवाच आहे. परंतु या कामांत मधून मधून आशेचा अंकुर दिसे, त्यामुळें आमचें मन उल्हासित राहून आमचें काम इतपत तरी तडीस गेलें आहे. आणि आह्मांस वाटतें कीं या कामापासून समाधान होण्याची आम्हांस अगदीं निराशा वाटत होती तशीही कांहीं गोष्ट झाली नाहीं. कारण आमच्या ब्रिटिश लोकांच्या तुटपुंज्या ज्ञानामृतांत या अध्यात्माची जर थोडीशी भर पडली असली तर याहून उत्कृष्ट मोबदला तो आह्मी काय चाहणार? बरें, जरी तसें झालें नसलें तरी आह्मी हिरमुष्टी कां व्हावें, हें कळत नाहीं. कारण हें काम आह्मीं करावें असा दैवयोगच नव्हता काय? आणि असें जर आहे तर या आयुष्य-रूपी दिवसांत जीं जीं कामें आह्मीं करावीं असा ईश्वरी संकेत असेल त्यांपैकीं हें अवघड काम होऊन गेल्यानें आह्मांस आतां बाकीच्या कामाचें ओझें तितकें हलकें झालें एवढें तर खरें ना?

आतां ट्यूफेल्सड्राक साहेबांची रजा घेतांना अत्यंत आश्चर्य, कृतज्ञता व नापसंती यांचे विलक्षण मिश्र उमाळे आमच्या मनांत येऊं लागले आहेत; कां कीं, ज्या बुद्धिवैभवानें तत्वज्ञानाचीं व कलादिकांचीं उत्कृष्ट भुवनें धुंडाळून त्यांतील अमूल्य रत्नें सर करावयाचीं, तें बुद्धिवैभव अनेक त्याज्य वस्तूंनीं भरलेल्या, व जेथें उत्कट दैवयोगाशिवाय एखाद दुसरेंही रत्न सांपडण्याची मारामार, अशा अडगळींत व उकिरड्यांच्या घाणींत चाचपूं उकरूं लागलेलें पाहून कोणास खेद होणार नाहीं! अशा प्रसंगीं खेद हा होणारच; परंतु व्यर्थ टीका करून वेळ घालविण्यांत काय फायदा आहे? कारण, टीका करून ट्यूफेल्सड्राक साहेबांसारख्या गृहस्थाच्या माथ्यांतील वेड घालविण्याचा प्रयत्न यःकश्चित् ब्रिटिश मनुष्यानें करणें निवळ मूर्खपणाचें आहे! परंतु हें वेड आमच्या लोकांत पसरूं न देण्याची खटपट जरी आमचे हातून झाली तरी पुरे आहे. विचारसरणीची गोष्ट बाजूस ठेविली तरी श्लेषादि फाजील अलंकारांनीं भरलेली, वाक्य रचनेच्या नियमांस हवें तेव्हां हवें तसें झुगारून देणारी, जिचे भाग एकांत एक गुरफटलेले, अशी ट्यूफेल्सड्राक साहेबांची नुसती भाषापद्धतीही आपल्या देशांतील ग्रंथकारांत सर्वसामान्य झाली तरी केवढा अनर्थ ह्मणावयाचा? व हा अनर्थ होण्यास कांहीं मोठीशी हरकत आहे असेंही नाहीं. कारण आमचीच गोष्ट पहा; ट्यूफेल्सड्राक साहेबांच्या ग्रंथांतील जर्मन भाषेचा व्यासंग करितां करितां आमची जन्मभाषा जी इंग्लिश तिचाही शुद्धपणा बराच नाहींसा झाला नाहीं काय? ज्याप्रमाणें नदींतील लहान भोंवरा मोठ्या भोंवऱ्यांत मिसळून जाऊन मग त्यांतच फिरूं लागतो, त्याचप्रमाणें या पुरुषाच्या अगाध बुद्धिप्रभावानें आमचे क्षुद्र मनास आपलेंच अनुषंगीं करून ठेविलें असल्यामुळें आह्मांसही सर्व गोष्टींत आलंकारिक भाषेनें बोलण्याची खोड लागली आहे. आतां ही खोड दवडण्यास आह्मांस बरेच सायास पडून बराच काळही लागेल.

परंतु आमचे प्रोफेसर साहेब कितीही आडवाटेंत शिरणारे असले तरी "तूं आमचा वैरी आहेस व आह्मी तुझें वैर उगवूं" असें ह्मणून त्यांचा निरोप घेणें कोणाही वाचकास प्रशस्त वाटेल काय? आह्मी तर प्रांजळपणें कबूल करितों कीं, या उनाड, गांजलेल्या, व दुसऱ्यास गांजणाऱ्या पुरुषांमध्यें खचितच असें कांहीं आहे कीं त्यामुळें आपल्या जिवानें त्यांचेकडे ओढ घ्यावी!

त्यांचा एकंदर रोख पाहिला तर शाब्दिकज्ञानास व शब्दपरिपाठीस "हूं चला, निघा येथून!" असेंच ह्मणण्याचा दिसतो. त्याचप्रमाणें अर्धवट पांडित्यास "आतां येथें आपली डाळ शिजणार नाहीं" असें सांगून सत्यास "बाबारे तूंच मला आईबाप, गुरु, इष्टमित्र व राजा, यांचे ठिकाणीं आहेस" असेंही त्यांचें सांगणें आहे. अहो, ज्यानें प्रत्यक्ष काळपुरुषास किंवा सैतानासही तोंड दिलें किंबहुना हॅनिबाल[1]प्रमाणें ज्यानें आपलें सर्व जीवित कांहीं विलक्षण तऱ्हेनें हर घटकेस व मिळेल त्या हत्यारानें या काळपुरुषाशीं लढण्याकडेच वाहिलें व त्याप्रमाणें जो अखेरपर्यंत वागला, तो जरी यःकश्चित् शिपुरडा असता तरी त्याचेंही आम्ही प्रेमपुरःसर स्वागतच केलें पाहिजे होतें.

तरी मुख्य प्रश्न तसाच राहतो. हा पुरुष प्रसंगविशेषीं अति खोल बुद्धि प्रकट करणारा, शहाणा व दूरदर्शी असून त्याला जर खरोखरच महत्वाचे विचार लोकांत प्रकट करावयाचे होते, तर त्यानें त्यांस हें भलतेंच स्वरूप कसें दिलें? या प्रश्नाचें आमच्यापेक्षां अधिक समर्पक उत्तर कोण देईल तें देवो. पण आम्हांस तर असें वाटतें कीं, या गोष्टीस कदाचित् त्यांची आवडच कारणभूत झाली असेल; पण न जाणो असें करणें त्यांना भागही झालें असेल! कारण, प्रोफेसर साहेबांस परमेश्वरानें जे गुण अत्यंत उदार हातानें दिले होते तेही त्यांच्या कामास आले नाहींत, व जिकडे तिकडे त्यांची फजितीच होत गेली; यावरून ग्रंथकार या नात्यानें तरी आपणांस यश येईल असें त्यांस कशावरून वाटावें? म्हणून त्यांच्या स्वभावांतील नेहमींच्या

---

१ हॅनिबाल—आफ्रिकेंतील अति पुरातन संस्थान कार्थेज येथील अद्वितीय सेनापती (ख्रि० पू० २४७-१८३) हा लहानपणापासून आपल्या बापाच्या स्वारींतच वाढला. तरी त्यास अति लहानपणापासूनही शेतकीचें काम करावें लागे. नवव्या वर्षी हा आपल्या बापाबरोबर स्पेन देशांत गेला होता त्या वेळीं "मी रोमच्या संस्थानाशीं आमरण शत्रुत्वानें वागेन" अशी त्याजकडून त्याच्या बापानें शपथ घेवविली. व ही नवव्या वर्षी घेतलेली शपथ त्यानें आमरण पाळिली! त्यानें सर्व स्पेन सर केला व आल्प्स् पर्वत सैन्यासह ओलांडून रोमसंस्थानचा दोन वेळ अगदीं पाडाव केला. इतक्यांत रोमनें कार्थेजवर स्वारी केली तेथें तो अत्यंत निरुपायानें व अति घाईनें गेला असतां त्याचा पराभव झाला व शत्रूंनीं कार्थेज शहर जाळून त्याचा नायनाट केला. पुढें आश्रयार्थ अनेक ठिकाणीं हिंडतां हिंडतां कदाचित् आपण रोमच्या हातीं सापडूं ह्मणून त्यानें विष खाऊन आत्महत्या केली. याच्या इतका पराक्रमी योद्धा पूर्वी दुसरा झालाच नाहीं.

इसाळ्यानें त्यांनीं एक दोन वर्णनरूप चित्रें काढिल्यावर हींही लोकांस खपणार नाहींत असें वाटून वैतागानें त्यांनीं आपले सर्व रंग एक करून चित्र नाहींतर नाहीं, नुसतां फेंसच काढूं असें म्हणून हें कूर्च सारविलें असेल! असें तरी नसेल कशावरून? टयूफेलसड्राक साहेब कितीही शांत असले, तरी इतका वैताग त्यांचेमध्यें खचित असेल असें वाटतें.

दुसरा एक अजमास होतो, पण त्याची इतकी खात्री देतां येत नाहीं. इतर लोकांप्रमाणें टयूफलसड्राक साहेबांसही स्वतःच्या मताचा अभिमान असून तेंच लोकांनीं ग्राह्य करावें असें त्यांस वाटत नसेल असें म्हणतां येत नाहीं. त्यांच्या स्वभावांतील विलक्षण निराशा व औदासिन्य पाहून हें औदासिन्य व निराशा वास्तविक पाहतां खरीं नसून प्रेम व आशा यांचींच हीं बिघडलेलीं स्वरूपें असावीं असें आम्हांसही अनेक प्रसंगीं वाटलें नव्हतें काय? शिवाय स्वतः प्रोफेसर साहेबच काय म्हणतात पहा, " **चिर मैत्री** कशानें " शक्य होईल असें म्हणतां काय? " **सत्य** व **सत्** ( म्हणजे चांगलें ) " यांच्या अनुरोधानें चाललें तर मात्र **खरी मैत्री** व **एकी** शक्य आहे. " **एरवीं नाहीं.** एरवींची मैत्री म्हणजे ज्याप्रमाणें दोघांनीं तरवारी परजून " गुप्त ठेवून बाह्यात्कारी गोडीनें रहावें; किंवा आपसांत चढाओढीनें वाग- " णाऱ्या व्यापारी मंडळींचें जसें ऐक्य दिसावें त्यांतलाच मासला! वास्त- " विक पाहतां ईश्वरानें **मनुष्य** हा प्राणी असा केला आहे कीं, तो एकटाही " आपल्यापुरता परिपूर्ण आहे. तथापि दहा मनुष्यें **प्रेमबद्ध** होऊन " एकीनें जें काम करतील तें दहा हजार मनुष्येंही एकएकटीं खपून व्हाव- " याचें नाहीं; म्हणून एका मनुष्याकडून दुसऱ्यास जी मदत होण्यासारखी " आहे तीस पारावारच नाहीं." आतां या उताऱ्याच्या जोडीस ठेवून हा दुसरा उतारा वाचा म्हणजे झालें! " हल्लीं जगाची रात्र असून दिवस " उगवण्यास फार फार अवकाश आहे; आणि आपण केवळ वैराण वण- " व्याच्या उजेडांत वावरत असून **भगवान सूर्यनारायण** व स्वर्गांतील " दिव्य तारका आपणाला जणूं काय गुप्त झाल्यासारख्याच आहेत. बाकी, " **ढोंग** व **निरीश्वर**पणा हीं विक्राळ पिशाच्चें व त्यांचे समोर कोल्हेकुई " करणारी **विषयवासना** इतक्यांस मात्र या भूतलावर ढवळा दिवस झाला " असून ही मंडळी निर्धास्त हिंडत 'या पृथ्वीचें राज्य आमचें आहे,'

" असें ह्मणून ओरडत आहेत. ह्मणून हा संसार स्वप्नवत पोकळ भ्रम आहे
" असें जाणून जे या वेळेस स्वस्थ झोंप घेत आहेत तेच सध्यां हरीचे लाल होत!

हें खरें; पण जागे असून हा संसार खरा मानितात, अशा भांबावलेल्या लोकांची काय वाट? कारण प्रत्यक्ष **खरें** पिशाच्चही दोघांसमोर येत नाहीं. या मानानें पाहिलें तर या पिशाच्चांचा उपसर्ग होऊं नये ह्मणून या जाग्या लोकांनीं तरी एकीनें राहूं नये का? आणि जर रहावें असें असेल तर आह्मांस वाटतें कीं हा टयूफेल्सड्राक साहेबांचा **वस्त्ररहस्यग्रंथ** केवळ **आकाशदिव्यासारखा** असून सांप्रतच्या अंधःकारांत भटकतां भटकतां जे लोक बावरून गेले असतील त्यांनीं या दिव्याखालीं जमून येथून एकजुटीनें जावें अशा हेतूनें प्रोफेसर साहेबांनीं हा पाजळून ठेविला असेल. कारण पूर्वीं आम्हीं सांगितल्याप्रमाणें या गृहस्थाचें औदासिन्य कितीही विलक्षण असलें तरी त्याचे मनांत काय काय आशा असतील हें कोणीं सांगावें?

पण येथें दुसरी एक हकीकत सांगावयाची आहे; आणि ती तर या अजमासाशीं विसंगत दिसते. टयूफेल्सड्राक साहेब जर इतर मनुष्यांसारखे असते तर या हकीकतीवरून याच्या उलटच अजमास करावा लागता. कारण मग आपणास असा विचार पडला असता कीं, हा **आकाशदिवा** लावून रखवालदारच तेथून नाहींसा झाला हें कसें? आतां चुकलेले वाटसरू येथें जमून रात्र किती झाली हें विचारणार कोणाला? कारण टयूफेल्सड्राक साहेब हल्लीं विसिनिच्ट्वो येथें प्रत्यक्ष दृश्य नाहींत. ते आसमंतात् कोठें तरी पुन्हां गडप झाले असतील असाच तर्क होतो! कारण कांहीं दिवसांपूर्वीं होफ्राथ ग्यूसक्रेक साहेब यांचें आणखीं एक जंगी पत्र आम्हांस आलें आहे. या पत्रांत होफ्राथ साहेबांनीं आपल्या **लोकसंख्या कमी करणाऱ्या संस्थे**बद्दल व पूर्वीं पाठविलेल्या कागदांच्या भाऱ्यांबद्दल बरीच स्तुति केली आहे. (आम्हांस वाटतें कीं या कागदांच्या भाऱ्यांतील विलक्षण **चित्रलिपीची** माहिती होफ्राथ साहेबांस अजूनही नसावी!) असो; सरतेशेवटीं त्यानीं टयूफेल्सड्राक साहेब विसिनिच्ट्वोंतून एकाएकीं नाहींसे झाल्याचा विलक्षण मजकूर दिला आहे. ते पारिग्राफ आम्ही जशाचें तसेच उतरून घेतों.

" आमचे ऋषी अकस्मात् नाहींसे झाल्या दिवसापासून विसिनिच्ट्वो
" येथील लोकांस जें पराकाष्ठेचें पण निरर्थक दुःख होत आहे तें वर्तमान-
" पत्रद्वारा आपल्या कानीं आलेंच असेल. सर्व जर्मनीच्या आकांतानें त्यांस

" करुणा येऊन जर ते पुन्हां आले तर आमच्या भाग्यास पारावारच नाहीं.
" परंतु निदान ते कोणच्या गुप्त मार्गानें नाहींसे झाले इतकें जरी आम्हास
" कळलें तरी बस आहे. पण हाय, हाय! ती थेरडी **लिशेन** सुद्धां अग-
" दींच बहिरट झाली असून, किंवा तिनें बहिरटपणाचें सोंग तरी घेतलें
" असून, आपणांस याविषयीं कांहीं एक ठाऊक नाहीं असें म्हणत आहे.
" त्यांचा सर्व बंगला स्वच्छ झाडलेला असून त्याचे कुलपावर मोहोर ला-
" विली आहे. प्रत्यक्ष प्रिव्हीं काउन्सिलासही याहून जास्त माहिती
" लागत नाहीं.

" लोकांत खळबळ करून सोडणारी पारिसमधील **तीन दिवसांच्या**
" **धामधुमीची** हकीकत तोंडोंतोंडीं विसिनिच्ट्वोंत पसरून ज्याचे त्याचे कानीं
" दुमदुमू लागली तेव्हांपासून आठ दिवस प्रोफेसर साहेब बहुतेक मौन
" धरूनच होते. त्या आठवड्यांत एकदां मात्र " हं! सुरुवात झाली! "
" एवढें बोलतांना ते आढळले. पुढें लौकरच **शिंपी** लोकांचा दंगा होऊन
" बर्लिनप्रमाणेंच येथेंही अस्वस्थता पसरली होती; हें आपणांस कळलेंच
" असेल. अशा वेळेस येथें अशुभचिंतकांची किंवा **भीति**पिशाचिकेच्या
" दूतांची कमतरता नसते. या लोकांनीं जिकडे तिकडे अफवा उठविली कीं
" या **शिंप्यांच्या** दंग्याचा सर्व दोष **वस्त्ररहस्याच्या** शेवटच्या भागाकडे
" आहे! एखादा मनुष्य असता तर या वेळेसच त्याच्या तोंडचें पाणी
" पळालें असतें. परंतु आमच्या प्रोफेसर साहेबांच्या प्रकृतिस्थिरत्वाचें काय
" वर्णन करावें! ते अगदीं शांत होते; पण त्यांची खरी माहिती **या दा-**
" **साच्या** मार्गानें कौन्सिलांत गेल्यानें या आमच्या राष्ट्रावरील मोठेंच
" अरिष्ट टळलें व आतां **शिंपी** लोकही स्वस्थ झाले आहेत.

" पण आमचा घात या दोन्ही कारणांनीं झाला असेल असें वाटत नाहीं;
" तथापि **पॅरिस** व तेथील राज्यव्यवस्था यांकडे पाहिलें म्हणजे कांहींसा
" संशय येतो. उदाहरणार्थ जेव्हां **सेंट सायमोनियन सोसायटीनें**[3] आपले
" ठराव इकडे पाठविले तेव्हां गॅन्स[4]मध्यें जिकडे तिकडे हशा पिकून लोक

२ पान ६ टीप २८ पहा.

३ सेंट सायमोनियन सोसायटी--पु. ३ भा. ५ टी. ६ पहा.

४ गॅन्स--नांवाचा दारूचा गुत्ता अगर पिठा:

" आश्चर्य व खेद करूं लागले कीं, हें आहे तरी काय ! पण आमचे ऋषी
" अगदीं मौन धरून होते. तिसऱ्या दिवशीं मात्र ते म्हणाले " **मनुष्य** हा
" **मनुष्य** आहे हें अखेरीस याही ( पॅरिस ) शहरांतल्या लोकांस समजून
" येऊन त्याचें त्यांस आश्चर्यही वाटूं लागले आहे काय ? आणि या अत्युच्च
" व पुष्कळ काळपर्यंत लुप्तप्राय झालेल्या सिद्धांताचा हे लोक भलताच पण
" उपयोगही करूं लागले आहेत, पहा! " तेव्हांपासून **बझार्ड इन-**
" **फंटाइनें** आणि आमचे प्रोफेसर साहेब यांचे दरम्यान एक पत्र व एक
" उत्तर गेल्या आल्याचें टपाल खात्याच्या डायरेकटराच्या साक्षीवरून
" सिद्ध झालें आहे. हें उत्तर आल्यापासून सहावे दिवशीं प्रोफेसर साहेब
" नाहींसे झाले ते अजून कोणास दिसले नाहींत.

" बहुतेक प्रतिस्पर्धी पंथांचे लोक या अमूल्य पुरुषास नेहमीं पाण्यांत
" पहात. तेव्हां त्यांपैकींच कोणीं यांना पळवून तर नेलें नसेल ? किंवा प्रोफेसर
" साहेबच त्यांच्याशीं वादविवाद करून त्यांचा पाडाव करण्याकरितां आपण
" होऊनच त्यांच्या गोटांत गेले नसतील ना ? बहुधा त्यांचें देहावसान झालें
" नसावें असें व्यतिरेकें अनुमानावरून तर खचित वाटतें; व वियोगानें चूर
" झालेल्या आमच्या अंतरंगासही ते पुन्हां लौकरच भेटतील किंवा आपल्या
" हयातीचें कांहीं चिन्ह तरी प्रकट करितील असें वाटतें. परंतु असें कांहीं
" न झालें, तर सरकारचा हुकूम घेऊन त्यांचे कागदपत्र तपासावे लागतील.

---

५ बझार्ड इनफंटाइन--आमंड बझार्ड ( १७९१--१८३२ ) आणि प्रास्पर इन्फंटाइन ( १७९६ १८६४ ) हे सेंट सायमनचे अनुयायी असून त्यांनीं १८३० त सेंट सायमनचीं मतें ग्रंथरूपानें प्रसिद्ध केली. १८२९ त कार्लाइलनें " सांप्रत काळचीं विशेषक चिन्हें " ा ग्रंथ प्रसिद्ध केला त्या वेळीं सदरील सायमोनियन पंथाच्या पुरुषांकडून त्यास एक त्र आलें. कार्लाइलनें या ग्रंथांत सायमोनियन सोसायटीविषयीं लिहितांना म्हटलें आहे गीं " या लोकांत कांहीं विलक्षण समजुती आहेत पण त्यांत तथ्यांश बराच आहे. व लोक सांप्रतकाळचें एक विशेषक चिन्हच होत. " या लोकांशीं संबंध न ठेवण्याबदल टनें त्यास फार बजावून लिहिलें होतें तरी त्यानें सेंट सायमनच्या "नवीन ख्रिस्ती धर्म" ग्रंथाचें भाषांतर केलें.

६ व्यतिरकानुमान-त्यांना जर पुन्हां यावयाचें नसतें तर आपला बंगला साफसुफ न मोहोर वगैरेचा बंदोबस्त करून ते गेलेच नसते. ते बंदोबस्त करून गेले आहेत रून ते खचित येणार हें व्यतिरेकानुमान. पान ४३ टीप ६ पहा.

" या कागदांत बरीच हकीकत सांपडेल असें वाटतें. व **समाजाचें पुनरु-**
" **ज्जीवन** हा ग्रंथही कदाचित् या कागदांत सापडेल असें पुष्कळांचें
" ह्मणणें आहे."

हें होफ्राथ साहेबांचें पत्र येथें संपतें. या होफ्राथ साहेबांविषयीं आह्मांस वरचेवर मोठा चमत्कार वाटतो तो हा कीं जेव्हां जेव्हां ते आपल्या पुढें येतात तेव्हां तेव्हां स्मशानभूमींतील **वेताळाच्या चुड्यां**प्रमाणें दिसले न दिसले कीं लागलेच ते गडप होतात; पण त्यामुळें आह्मास जास्तच अंधार होऊन आगोदर जें थोडेसें अंधुक अंधुक दिसत असतें त्यांतही भ्रम पडूं लागतो.

तात्पर्य ट्यूफेल्सड्राक साहेबांचा सार्वजनिक चरित्रक्रम अद्याप संपला नसून त्याचें गूढत्व सुद्धां यत्किंचितही कमी झालें नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या चरित्राचा खरा व उत्कृष्ट उत्तरार्ध कदाचित् एव्हांपासूनच सुरू होत नसेल कशावरून ? येथें आम्ही नुसत्या कल्पनांच्या जाळ्यांत मात्र सांपडलों आहों; आणि ज्याप्रमाणें **प्रत्यक्ष वस्तूच छायारूप** झाल्यावर मग खरी वस्तू कोणची, छाया कोणची, असा भ्रम पडावा तशीच आमची स्थिति झाली आहे. आतां, **काळ** हा सर्व गोष्टी स्पष्ट तरी करितो किंवा त्यांस जागचे जागीं जिरवून तरी टाकितो, या नियमाप्रमाणें कालांतरानेंच जेव्हां या गोष्टीचा निर्णय होईल तेव्हां होईल. आमचा स्वतःचा तर असा अजमास आहे कीं एखाद्या शांत स्थळीं या लंडन शहरांतच ट्यूफेल्सड्राक साहेब आज कोठें तरी रहात असून ते असेच तेथें गुप्त न राहतां केव्हां ना केव्हां तरी बाहेर हालचाल करूं लागतील. " असा आमचा अजमास आहे " असें आह्मी म्हटलें पण आह्मांस तर बहुतेक अशी खात्रीच वाटते.

जसें एखाद्या थकलेल्या माणसास निद्रा सुख व्हावें त्याचप्रमाणें आतां आह्मांस आपली लेखणी खालीं ठवितांना अनिर्वाच्य आनंद होत आहे. आणि मनुष्यजातीचा अनुभव जर सर्वत्र सारखा असेल तर आमच्या असंख्य वाचकांनाही या गोष्टीबद्दल आमच्याप्रमाणेंच आनंद होत असेल, अस

७ वेताळाच्या चुड्या. स्मशानांत किंवा रणभूमी वगैरे अस्थि पडलेल्या ठिकाणीं त्या अस्थींतून फास्फरस निघत असतो. कारण फास्फरस हा नुसती हवा लागूनही पेटतो. ( ह्मणून तो नेहमी पाण्यांत ठेवावा लागतो ) त्याच्या ज्वाळा काळोख्या रात्रीं स्पष्ट दिसतात. पण त्या फार क्षणिक असतात. त्यांस भोळे लोक वेताळाच्या चुड्या असें ह्मणतात.

वाटतें. कांहीं महिने आमच्या असंख्य ब्रिटिश वाचकांच्या विचारांत व खाण्यापिण्यांत आह्मी उगीच अडचणी सारखे झालों होतों असे त्यांना वाटत असेल व कदाचित् ते आपला राग स्पष्ट शिव्या देऊनही प्रकट करीत असतील. पण इतर ईश्वरी प्रसादाप्रमाणें याही गोष्टीबद्दल आम्ही ईश्वराचे ऋणीच असलें पाहिजे. म्हणून अहो आमच्या सक्रोध वाचकांनो, आतां आम्हास निरोप देतांना अखेरीस एकदा बाहू पसरून व छाती पुढें करून आम्हांस आपण प्रेमालिंगन द्यावें अशी आम्ही आग्रहानें विनंति करितों. त्याचप्रमाणें हे **ऑलिव्हर आणि यार्क**[९] नांवाचे संस्थे, जिच्या उल्हासी व आनंदी वृत्तीनें आणि अनेक प्रकारच्या हास्योत्पादक व वेडगळ चेष्टांनीं इतकें विलक्षण काम उरकतें त्या तुझाही आतां आम्ही निरोप घेतों. तूं चिरायु होऊन आनंदांत ऐस. आपण या **अपार वाटेनें** कांहीं महिने हा संसार मार्ग एकमेकांच्या संगतींत क्रमीत होतों व मधून मधून आपली दृष्टादृष्टही होऊन निरोधानें कां होईना पण एककालींच आपण नांदत होतों हें तर खरें!

---

८ युरोपियन लोकांत वर्तमानपत्रें वगैरे वाचण्याचें काम जेवतांनाही करण्याची चाल आहे.

९. पृष्ठ १४ टीप ५ पहा. हा मूळ ग्रंथ प्रथम "फ्रेजर्स मॅगझीन" नांवाच्या मासिक पुस्तकांत लहान लहान हप्त्यांनीं छापून निघाला.

## पुस्तक तिसरें व स्यूतसौतिक ग्रंथ समाप्त.

